# प्रस्तावना

'बुद्धदर्शन' हा ग्रन्थ मराठी भाषेला मिळालेली मूल्यवान् देणगी आहे. वेद, वेदांगें, पुराणें आणि तत्त्वदर्शनें यांचा खोल व्यासंग केलेल्या अशा थोर पंडितानें मूळ पालीग्रंथाचा म्हणजे त्रिपिटकांचा उत्कृष्ट व्यासंग करून हा ग्रन्थ निर्माण केला आहे. प्राचीन भारतीय संस्कृतीचें व्यापक अध्ययन केलेल्या व्यक्तीलाच बौद्ध व जैन दर्शनाचें भारतीय अध्यात्मविद्येंतील स्थान व महत्त्व यांचें सम्यक् आकलन होऊं शकेल. अशा अधिकारी व्यक्तीनें पालीमधील मूळ आधारांचें परिशीलन करून व विचारपूर्वक मंथन करून हा ग्रन्थ लिहिला आहे.

बौद्धदर्शनावर पाश्चात्त्यभाषांमध्यें अनेक ग्रन्थ लिहिले गेले आहेत. मराठीमध्यें त्याची वाण होती. या ग्रन्थाचा मुख्य विशेष असा कीं, यांत सांगितलेलें बुद्ध-दर्शन हें त्रिपिटकांतील खास बुद्धोक्तीवर आधारलेलें आहे. गौतमबुद्धानंतर बौद्धदर्शनाचा शाखोपशाखांच्या रूपानें मोठा विस्तार झाला. महायानपंथाचा उदय झाल्यानंतर संस्कृत-भाषेकडे बौद्ध भारतीय वळले. व त्यांनी पालीसारख्या प्राकृत भाषेच्या ऐवजीं संस्कृत-भाषेमध्येंच धर्म व तत्त्वज्ञान यांचें विवेचन केलें. संस्कृतकडे वळण्याचें महत्त्वाचें कारण असें कीं वैदिकांचीं षड्दर्शनें संस्कृतमध्येंच लिहिलीं गेलीं होतीं. त्यामुळें तात्त्विक विचारविनिमयाकरितां बौद्ध पंडितांनाहि संस्कृताचा आश्रय करणें सोयीचें वाटलें. दार्शनिक विचार हे भिन्नभिन्न दर्शनांच्या किंवा विरोधीदर्शनांच्या वैचारिक चर्चेंत वाढीस लागतात.

म्हणून पंडितांची समान भाषा या दृष्टीनें संस्कृतचें महत्त्व बौद्ध व जैन यांनी अखेरीस मान्य केलें.

बुद्धोत्तर झालेल्या बौद्धपंडितांच्या विचारांचा परामर्श केवळ घेऊन *मूळ बुद्धोक्तीकडे दुर्लक्ष करण्याची प्राचीन पंडितांची प्रथा या ग्रन्थानें* मोडली हें एका दृष्टीनें चांगलें झालें. कारण बुद्धानंतर एका बौद्धदर्शनांतून चार दर्शन-संप्रदाय सौत्रांतिक, वैभाषिक, योगाचार व माध्यमिक या अभिधानांचे निर्माण झाले. त्यामुळें बुद्धाचे मूळ विचार आणि बुद्धानुयायी पंडितांचे मतभेद होऊन निर्माण झालेले उत्तरकालीन विचार यांमधला फरक समजणें दर्शनेतिहासाच्या दृष्टीनें आवश्यक ठरतें. श्री. कोलंगडे यांनीं मुळाकडे जाऊन बुद्धाच्या विचारांचा परामर्श घेतला, हें दर्शनेतिहासाला फार उपकारक ठरेल. म्हणूनच या ग्रन्थास 'बौद्धदर्शन' ही संज्ञा न देतां 'बुद्धदर्शन' ही अन्वर्थक संज्ञा दिली आहे.

चार्वाकाचा ऐहिक सुखवाद म्हणजे चार्वाकदर्शन वगळलें तर सर्व भारतीय अध्यात्मदर्शनांना मोठया प्रमाणांत मान्य व्हावा असाच जीवनविषयक दृष्टिकोण बुद्धदर्शनाचा आहे. विश्वविचारापेक्षां जीवनविचाराला बुद्धानें प्राधान्य दिलें. सकामदृष्टीनें जगलेलें जीवन हें दुःखात्मक व बंधनरूप असतें आणि निष्कामदृष्टीनें चालविलेलें जीवन हें शांतिरूप व निर्वाणपर्यवसायी होतें असें बुद्धदर्शनाचें सार आहे. तत्त्वदर्शन हें सत्यदर्शन वा सत्याचा शोध करणारें असतें. बुद्धाला ज्या सत्याचा साक्षात्कार झाला, तें सत्य आर्यसत्य होय. तें सत्य भारतीय संस्कृतीनें बुद्धोत्तर कालीं संपूर्णरीत्या मान्य केलें. दुःख, दुःखकारणें, दुःखहानि व हानीचा उपाय हीं चार आर्यसत्यें सर्व मोक्षदर्शनांनीं मान्य केलीं

आहेत. तृष्णामूलक भवचक्र आहे व तृष्णानाशजन्य निर्वाण आहे; हा प्रतीत्यसमुत्पादाचा सिद्धांत तात्पर्यरूपानें शंकराचार्यादिकांनी मान्य केला आहे. निर्वाणाची बुद्धकल्पना हीच सर्व भारतीयांनी स्वीकारलेली मोक्ष कल्पना होय. बंधसिद्धांत व मोक्षसिद्धांत या कल्पनांचा उगम उपनिषदांत झाला. त्यांचाच सर्वांगीण विचार व प्रसार बौद्ध, जैन व इतर भारतीयांनी उपनिषदुत्तरकाळीं केला. मोक्षविचाराला भारतीय ध्येयवादांत उच्चतमस्थान देण्याचें कार्य मुख्यतः भगवान् बुद्धानें केलें. म्हणून भारतीय अध्यात्मवादाचा जगांतील सर्वश्रेष्ठ प्रसारक म्हणून बुद्धाला उच्चतम स्थान प्राप्त झालें. शुद्ध शांतीच्या मार्गानें जगांत अधिकांत अधिक मानवांत मान्य व रूढ झालेला एकच धर्म होय. व तो म्हणजे बौद्ध धर्म होय. एवढें प्रचारसामर्थ्य बौद्धधर्मांत कां आलें ? इतर कोणत्याहि धर्मांत नसलेलें हें सामर्थ्य बौद्धधर्मच कां प्रकट करूं शकला ? याचें उत्तर साक्षात् बुद्धाच्या विचारसरणींत मिळतें. बुद्धानें विश्वरचनेच्या विचारांपेक्षां जीवनसाफल्याच्या विचाराला, शीलाला, सद्गुणांना, विश्वव्यापी मैत्रीला व चारित्र्याला महत्त्व दिलें; त्यामुळें गहन व अज्ञात अशा विश्वतत्वाबद्दलच्या तीव्र मतभेदांना टाळतां आलें. हे मतभेदच धार्मिक विग्रहांना विशेष कारण होतात. असा धार्मिक विग्रह हिंसेंत पर्यवसित होतो. बुद्धाला अहिंसेची म्हणजे शांतीची स्थापना करावयाची होती. त्याकरितां त्यानें असा मध्यम मार्ग शोधला कीं त्यामुळें धार्मिक प्रक्षोभ किंवा धर्मसंग्राम टाळूं शकला.

पौर्वात्यदेशांत विशेषतः भारतांत धर्मयुद्धें झालीं नाहींत. भारताच्या पश्चिमेकडील देशांत जे धर्म उत्पन्न झाले त्यांनी धर्मस्थापनेकरतां व

धर्मप्रसाराकरतां मोठमोठे हिंसामय संग्राम केले. पश्चिमेकडील धर्माचा इतिहास हा हिंसेचा व पर्यायानें अधर्माचा इतिहास झाला. धर्म जेव्हां प्रचारार्थ शस्त्र हातीं घेतो तेव्हां तो अधर्म बनतो. पौर्वात्य देशांत विशेषतः भारतांत धार्मिक ध्येयवादाची अशी रचना झाली कीं त्यामुळें शस्त्रात्मकविग्रहाच्या प्रवृत्तीचें बीजच दग्ध होऊन गेलें. अशा इतिहासाचें मुख्य श्रेय भगवान् बुद्धाकडे जातें. थोर विचार इतिहासाची दिशा व स्वरूप बदलतो, याचें हें प्रत्यंतर होय.

बुद्धाला विश्वविषयक किंवा वस्तुसत्ताविषयक तत्त्वदर्शनांच्या जंजाळांत पडावयाचें नव्हतें. अस्तिवाद व नास्तिवाद हे दोन्ही टाळणें हा त्याचा उद्देश होता. विश्व शाश्वत कीं अशाश्वत, जीव व शरीर एक कीं भिन्न, मरणोत्तर स्थितींत आत्मा असतो कीं नसतो हे विश्वविषयक किंवा वस्तुसत्ताविषयक तत्त्वदर्शनाचे प्रश्न आहेत. या चर्चेपासून कांहीं फायदा नाहीं. वैराग्याला, मनःशांतीला, लोकोत्तरज्ञानाला, निर्वाणप्राप्तीला, ब्रह्मचर्याला किंवा अष्टांगिक मार्गाला त्यांची आवश्यकता नाहीं; असें खुद्द भगवान् बुद्ध मालुक्यपुत्त या शिष्यास सांगतो. परंतु तो स्वतःस अनात्मवादी असें म्हणवून घेतो. विनयपिटकांतील महावग्ग या भागांतील ‘ अनत्तालक्खण सुत्त ’ हें प्रकरण प्रसिद्ध आहे. या प्रकरणांत बुद्ध आत्म्याचें स्वरूप सिद्ध करतां येत नाहीं, असें व्यतिरेक पद्धतीनें निश्चित करतो. या बुद्धाच्या अनात्मवादासंबंधी विद्वद्रत्न श्री. कोलंगडे यांनी ‘ अत्ता-अनत्तावाद ’ या प्रकरणांत सविस्तर चर्चा केली आहे. वैयक्तिक जीवात्मा बुद्धानें नाकारला आहे. शुद्ध, निर्गुण, व ब्रह्मरूप आत्मा नाकारला नाहीं, असें श्री. कोलंगडे यांनी केलेल्या चर्चेचें सार आहे. ही चर्चा अत्यंत

साधी व सूक्ष्मरीतीनें केलेली आहे. उपनिषदांचें व बुद्ध-दर्शनाचें तुलनात्मक अध्ययन या दृष्टीनें हें प्रकरण उत्कृष्ट उठावदार झालें आहे. अक्षर, अजर, अद्वितीय, अनादि, अनंत, अव्यक्त, दुर्दर्श, नित्य, विशुद्ध, शांत, सत्य, अमृत, शिंव, अद्भुत व परमसुख हे ब्रह्मविषयक निर्देश निर्वाणरूप परमतत्त्वाबद्दल बुद्धानें वापरलेले आहेत, हें पालीचीं प्राकृतरूपें देऊन श्री. कोलंगडे यांनी सविस्तर व साधार दाखवून दिलें आहे.

भगवान् बुद्ध हा 'जीवात्मा' हें तत्त्व मानत नव्हता; परंतु ब्रह्मतत्त्व स्वीकारत होता. 'ब्रह्मभूतो अतितुलो मारसेनप्प मद्दनो' (सुत्तनिपात) हें मार्मिक वाक्य श्री. कोलंगडे यांनी उद्धृत करून मोठी बहार केली आहे. या वाक्याचा भावार्थ असा आहे. 'मी ब्रह्मांत लीन झालों आहे; तुलनेच्या पलीकडे गेलों आहे; मारसेनेचें मर्दन करून निष्काम झालों आहे.' असें हें बुद्धवचन आहे. अमृत, सत्य, शुद्ध व शिव हीं ब्रह्म-विशेषणें शून्य वा अभावरूप तत्त्वाचा बोध करीत नसून भावरूप वा सद्रूप तत्त्वाचा बोध करून देतात. सत्य व परमसुख या दोन निर्देशामुळें तें परम-तत्त्व 'सत्' व आनंद होय हें सूचित होतें. परंतु तें 'चित्' आहे, या संबंधी स्पष्ट निर्देश बुद्धोक्तींत सांपडत नाहीं. ही शंका कायम राहते. म्हणजे ब्रह्माचें 'सत्' व 'आनंद' हें लक्षण बुद्धविचारसरणींत मिळतें. परंतु 'चित्' हें लक्षण मिळत नाहीं. उलट निर्वाण म्हणजे विझणें, शांत होणें असा अर्थ होतो. निर्वाण स्थितींत दिवा विझतो त्या-प्रमाणें व्यक्ति विझून जाते. ब्रह्म हें प्रकाश आहे असें उपनिषदें म्हण-तात. त्याच्या उलट ब्रह्मरूपनिर्वाण दीपनाशाप्रमाणें आहे, असें भगवान् बुद्ध सांगतो. श्री. कोलंगडे यांनी खूप शोध घेऊन ही चिंता सुद्धां दूर

केली आहे. ज्या वाक्यांत 'अंजर' निर्वाणपदाचें 'दीप' हें विशेषण आहे असें वाक्य त्यांनी उद्धृत केलें आहे. (पृ. २०८ बुद्धदर्शन)

या ग्रन्थाचें दुसरें एक महत्त्वाचें वैशिष्ट्य असें कीं ग्रन्थाचे अखेरीस 'बुद्धबोधवचनसंग्रह' (पृ. ३६३–४८२) हें परिशिष्ट जोडलें आहे. या संग्रहांत ३६५ मार्मिक बुद्धवचनें एकत्रित केलीं आहेत. प्राकृत भाषेंतील म्हणजे पालींतील मूळ वचन देऊन त्याच्या खालीं सुबोध मराठी अर्थ दिला आहे. बुद्धाच्या उपदेशाचें रहस्य या संग्रहांत सांठविलें आहे.

श्री. कोलंगडे यांचें बारा वर्षांपूर्वी 'भगवान गोतम बुद्ध' हें बुद्ध-चारित्रावरील पुस्तक (पृ. संख्या ३४४) प्रसिद्ध झालें आहे. तें आतां-पर्यंत इंग्लिशमध्यें प्रसिद्ध झालेल्या बुद्धविषयक साहित्याचा समग्र परा-मर्श घेऊन लिहिलें आहे. त्या पुस्तकानंतर 'बुद्ध-दर्शन' हें पुस्तक निघाल्यामुळें एक विषय समग्ररीतीनें पूर्ण झाला, असें म्हणतां येईल. श्री. कोलंगडे यांच्या ज्ञानमयतपश्चर्येचीं जीं अनेक फळें पुस्तकरूपानें प्रकाशित झालीं आहेत, त्यांतील हें बुद्धदर्शन सर्वोत्तम फळ होय. श्री. कोलंगडे यांनी मराठी वाचकाला व मराठी साहित्याला या ग्रन्था-च्या रूपानें उपकृत केलें आहे.

वाई
२६-४-१९५९

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# दोन शब्द



'पञ्ञावन्तस्सा' यं धम्मो, ना' यं धम्मो दुप्पञ्ञस्स।

वेदवाङ्मय व वेदसंस्कृति यांचा सखोल, तुलनात्मक व गुणगौरव-पर अभ्यास करून त्यानंतर इतर दर्शनांकडे वळण्याचा निश्चय करून त्यांतहि विद्वत्ता व पारंगतता मिळविणारे ज्ञानवृद्ध, तपोवृद्ध व वयोवृद्ध लेखक विद्वद्रत्न श्री. रामचंद्र गोविंद कोलंगडे यांनी 'बुद्ध-दर्शन हा ग्रंथ लिहिला आहे. त्याला दोन शब्द लिहावेत, अशी इच्छा प्रदर्शित केल्यावरून मी हें काम हातीं घेतलें आहे.

अडीच हजार वर्षांनंतर भगवान् बुद्धाचा सर्व जगभर जो महोत्सव झाला, त्यांत भारतानेंहि या भरतपुत्राच्या इतमामाला शोभेल असाच भाग घेतला. सरकारनें या बाबतींत मुख्य पुढाकार घेतल्यामुळें तें सर्व वर्ष सर्वथैव गाजलें.

अशा वेळीं भावनेचा भर ओसरल्यानंतर भगवान् बुद्धाचें जीवन, त्याची शिकवण, त्याचें तत्त्वज्ञान, व भारतीय दर्शनांतील त्यांचें स्थान ह्या गोष्टींचा विचार करणें क्रमप्राप्त झालें. याचा विचार करणारीं अशीं जीं कांहीं विद्वान व उदारमनस्क माणसें आहेत, त्यांत श्री. कोलंगडे हे एक आहेत. ते प्रज्ञावान आहेत. म्हणून त्यांना बौद्ध धर्माचें योग्य मूल्यमापन करतां येणें शक्य आहे. व शक्य झालें.

या दर्शनांत व षड्दर्शनांतील 'बौद्धदर्शनांत' मोठा फरक आहे. त्या दर्शनांत सांप्रदायिक वृत्ति आढळते. व येथें तुलनात्मक दृष्टि व शास्त्रपूत असें मूल्यमापन करण्याची वृत्ति प्रामुख्यानें दृष्टीस पडते. या ग्रंथाचे 'पूर्वार्ध' व 'उत्तरार्ध' असे दोन भाग पाडले आहेत. पहिल्या भागांत बारा प्रकरणें असून, पहिल्या अकरा प्रकरणांत 'चार आर्यसत्यें' 'प्रज्ञोत्कर्ष' 'प्रतीत्यसमुत्पाद' त्या समुत्पादाचें 'तात्त्विक पृथःकरण', 'अत्ता-अनत्तावाद', 'निर्वाण', 'निर्वाणास अधिकारी कोण ?' हे महत्त्वाचे प्रश्न हाताळलेले असून, बाराव्या प्रकरणांत 'बुद्ध आणि आहार', 'बुद्ध आणि स्त्री', 'बुद्ध व यज्ञ', 'बुद्ध आणि देव', 'बुद्ध आणि जातिवाद', 'ख्यातनाम बुद्धशिष्यवृंद' ( भिक्षु, भिक्षुणी, उपासक, व उपासिका ), 'बौद्धवाङ्मयाचा इतिहास व परिचय' ह्या विषयीं थोडक्यांत प्रपंच आहे. येथें पूर्वार्ध संपतो. उत्तरार्धांत 'बुद्ध बोधवचनसंग्रह' दिला असून मज्झिमनिकाय, दीघनिकाय व मुख्यतः खुद्दकनिकायांतील सुत्तनिपात, धम्मपद, खुद्दकपाठ, उदान, इतिवुत्तक गाथावाङ्मय यांतून अर्थबोधक व सुंदर उतारे घेतले आहेत. व त्यांचा अर्थहि दिला आहे. शेवटीं पाली पारिभाषिक शब्दकोश देऊन ग्रंथाची उपयुक्तता वाढविली आहे. अर्थात् या ग्रंथाची योजना योग्य अशीच आहे. बुद्धधर्मासंबंधानें आमच्या लोकांत जे दुराग्रह आहेत, ते दूर करण्यास या ग्रंथाचा फार मोठा उपयोग होईल.

बौद्ध शिकवणीचा विस्तार 'बीरण' दर्भाच्या वाढीप्रमाणें इतका खोलवर व सर्वत्र झाला आहे कीं, त्याचीं पाळेंमुळें हिंदुधर्मांतहि शिरून बसलीं आहेत. मदनाला शंकरांनी तृतीय नेत्र उघडून जाळून टाकल्या-

नंतर जसा तो सर्वत्रच मनोमय अवस्थेत राहूं लागला व शंकरालासुद्धां विचलित करण्याचा प्रयत्न करूं शकला, त्याप्रमाणें बौद्धधर्म भारतांतून नाहींसा केला अशी उद्‌घोषणा करून ख्यातनाम झालेल्या शंकराचार्यांवरच 'प्रच्छन्न बुद्ध' होण्याचा प्रसंग आला. सारांश सर्व भारतीय हिंदू आजकाल कळत अगर न कळत कमी अधिक मानानें बौद्धाळलेलेच आहेत असें म्हटल्यास बिघडत नाहीं. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें त्यांना वळणींवर आणण्यास श्री. कोलंगडे यांचा हा ग्रन्थ अत्यंत महत्त्वाचा आहे. त्याचप्रमाणें बुद्धधर्म हा स्वतंत्र आहे व तो अभ्यासावयाचा व प्रचारावयाचा म्हणजे हिंदू धर्माचा तिरस्कारच केला पाहिजे असल्या वेड्‌ट वृत्तींच्या नवबौद्धधर्मियांनाहि या ग्रन्थानें पुष्कळच पायबंद बसेल. 'निर्वाण', 'शून्यवाद', 'आत्मा-अनात्मा', प्रतीत्यसमुत्पाद व चार आर्यसत्यें यांचें विवरण वैदिक व औपनिषदिक ग्रन्थाच्या पार्श्वभूमिवरून झालें असल्यामुळें त्यांत शास्त्रशुद्धता येऊन बुद्धधर्माला आपली तोंडओळख त्यांत सांपडून येईल. ज्याकारितां बौद्धधर्म आपणास निराळा मानतो किंवा ज्याकारितां हिंदुधर्म 'बुद्धधर्माला' त्याज्य मानतो; तें सर्व मानणें गंधर्वनगरीतील भूमीवर आधारलेलें आहे, असें समजून आल्यावर आपण किती अजाण आहोत, याची जाणीव दोघांनाहि करून देण्यास लावणारा असा हा ग्रन्थ आहे !

बुद्धाचा 'अनत्ता, 'शून्यवाद', 'निर्वाण', 'कर्मवाद', 'हिंसात्मक यज्ञाची वैय्यर्थता', भक्तिमार्गाच्या प्रवेशानें भारतास पटलेली 'कर्मकाण्डाची व जातिभेदाची निष्फळता', 'नैतिक मूल्यांची महनीयता व त्यांचा परमोच्च विकास म्हणजेच मोक्ष' इत्यादि विचारसरणी बुद्धाच्या

शिकवणीनें भारतांत वद्धमूल झाली, हेंच भगवान् बुद्धाचें महान् कार्य ! भारतीय संस्कृतीला सर्वांग परिपूर्ण करण्याच्या कामीं भगवान बुद्धानें केवढा मोठा भाग उचलला होता, ही गोष्ट या ग्रन्थाच्या वाचनानें स्पष्ट होईल अशी आशा आहे. 'बुद्ध आणि आहार', 'बुद्ध आणि स्त्री,' 'बुद्ध व यज्ञ' यांचा प्रपंच घेतांना दोन्ही बाजू विचारांत घेऊन समतोल दृष्टीचा विचार हवा होता. पण तो येथें सांपडत नाहीं. उदाहरणार्थ-बुद्धाला डुकराचें मांस आवडत होतें असें दाखविणारे उतारे जसे घेतले आहेत, तसेच 'चत्तारो पंच आलोपे भुक्त्वा च उदकं पिब' या उद्गारावरून 'भिक्षूच्या पात्रांत जें पडेल तें खाल्लें पाहिजे' ही बाजू जर बरोबरीनें मांडली असती तर पहिलें विधान करण्याचा मोह ग्रन्थकाराला झाला नसता. भगवान् बुद्ध ८० वर्षें जगले व तेहि अंथरुणावर पडून नव्हे तर दररोज पदयात्रा करीत, हें दृश्य पाहिलें म्हणजे भगवान् बुद्धांना जिव्हालौल्य नव्हतें, ही गोष्ट आपोआपच दिसून येईल. असो. एकंदरीत या अभिनव ग्रन्थांत उद्‌बोधक भाग हा भरपूर आहे. श्री. कोलंगडे यांचें आम्ही अभिनंदन करतो व त्यांच्या या सेवेचें फळ भारतीयांना मिळून हिंदुधर्म व बुद्धधर्म यांच्यांत एकोपा नांदो ! अशी इच्छा कोणीहि संस्कृतिप्रेमी मनुष्य करील.

सुगतनिधान
खार, २४ मे १९५९

ना. के. भागवत.

परमपूज्य, न्यायरत्न, दर्शनालंकार

# डॉ. धुं. गो. विनोद

## यांचा आशीर्वाद

माझे परम स्नेही ज्ञानवृद्ध, तपोवृद्ध, व वयोवृद्ध रामभाऊ कोलंगडे यांनी एक धर्म-संस्कृति-विषयक पुण्य-ग्रन्थाची माला गुंफण्याचा स्तुत्य उपक्रम केला आहे. या 'सेक्रेड बुक्स'च्या व्यापक व सर्वसंग्राहक गुण—वैशिष्ट्यामुळें त्यांना एका अर्थी—महाराष्ट्राचे मॅक्समुल्लर म्हणतां येईल.

वैदिक संस्कृतीचें अंतस्तेज प्रकटविणारे त्यांचे सात ग्रन्थ सुप्रसिद्ध आहेत व आणखी सात हस्तलिखितें म्हणजे श्री. शंकराचार्य, बुद्धगीता (अर्थकथासहित सार्थ धम्मपद), अथर्वचंद्रिका, यजुर्वेद-दर्शन, महात्मा झोरोष्टर, प्रभु येशु खिस्त, बार्हस्पत्य सूत्र, व जीवनोत्कर्षरहस्य, इत्यादि बोधप्रद ग्रन्थ प्रकाशनाचे मार्गावर आहेत. भारतीय व प्रांतिक सरकार, विश्वविद्यालय, अनुदान समितीचे अध्यक्ष यांनी प्रस्तुत कार्यास अवश्य आर्थिक मदत करावी.

बुद्ध-दर्शन हा अभिनव पुण्यग्रन्थ त्यांच्या विशाल विद्वत्तेची, 'वैदिक' धर्मावरील अढळ श्रद्धेची, व मार्मिक तत्त्वदृष्टीची साक्ष देत आहे. या पुण्यमालेसाठीं त्यांनी एकाग्रतेनें व निवेदनवृत्तीनें केलेली तपश्चर्या, गेलीं वीस वर्षे, सतत माझ्या डोळ्यासमोर आहे. या तत्त्वद्रष्ट्याची निर्भीड व प्रमाणशुद्ध विचार-प्रणालि आजच्या महाराष्ट्रीय जीवनाच्या व संस्कृतीच्या पुनर्रचनेच्या कालांत निःसंशय उपकारक ठरेल.

"बुद्ध हा तत्त्वज्ञ नव्हता, केवळ नीति-ज्ञ होता. विश्वविचार व वस्तु-विचार त्यानें मुळींच केला नाहीं. केवळ जीवन-विषयक विचार व व्यक्ति-वाचक तत्त्वमीमांसा त्याला मान्य होती" असा एक दृष्टिकोण

अनेक वेळां पुरस्कृत केला जातो; पण तो अल्पार्थानें खरा आहे. खरोखर श्री. जगद्गुरु बुद्ध एक महान् दार्शनिक व सूक्ष्मदर्शी तत्त्व-ज्ञ होते.

जगद्गुरु बुद्धांचा प्रतीत्य-समुत्पाद हा एकच सिद्धांत त्यांना वैदिक तत्त्व-ज्ञांच्या पहिल्या रांगेंत नेऊन बसवितो. प्रतीत्य म्हणजे विशिष्ट परिस्थितीची प्रतिक्रिया म्हणून; व समुत्पाद म्हणजे उद्भव, कार्य, परिणाम; "हें एक असेल तरच हें दुसरें असेल" या संबंधाला dependent origination असें इंग्रजींत म्हणतात. प्रत्येक वस्तूचा समुत्पाद म्हणजे उदय हा अनेक कारणामुळें होत असतो.

"संबद्धता" हेंच एक सर्व वस्तूंचें महा-कारण आहे. संबंध-निष्ठा हें सर्व कार्य-कारण भावांचें मूल-स्वरूप होय. कोणतीहि वस्तु स्वतःसिद्ध नाहीं; स्वयंप्रभ नाहीं; तिचें स्वरूप संबंध-जन्य आहे. म्हणजेच तिला खरें स्व-त्व नाहीं. ही विशाल सह-संबद्धता नेहमीच, मानवी बुद्धीच्या कक्षेपलीकडे राहते. मला वाटतें मानवी बुद्धीचा, अपरिहार्य असणारा हा मर्यादितपणा हीच खरी अविद्या होय. नंतर संस्कार-विज्ञानादि संतति-विस्तार.

प्रतीत्य-समुत्पाद ही उपपत्ति गहन-गूढ दार्शनिक प्रतीतिशास्त्रावर आधारलेली आहे. बुद्ध-दर्शनांतील हें एक रहस्यरत्न आहे. आधुनिक विज्ञानाला आधारभूत असणारा कार्य-कारण भाव मॅक्स प्लँक, युंग, आइन्स्टाइन वगैरे बहुतेक तत्त्ववेत्त्यांनी अपर्याप्त, अपुरा, मर्यादित संदर्भांतच उपयुक्त असा मानला आहे. याचेंहि स्पष्ट कारण सर्व वस्तूंची सह-संबद्धता व सापेक्षता (Relativity) होय.

प्रतीत्य-समुत्पाद या उपपत्तीवरील विद्वद्रत्न कोलंगडे यांचें विवेचन अत्यंत मूलगामी व तर्कशुद्ध वठलें आहे. 'भगवान्' श्री शंकराचार्य व

'जगद्गुरु' श्री बुद्ध, यांच्या तत्त्वशास्त्रांतील अनेक साम्य स्थलें या ग्रंथांत मोठ्या मार्मिकतेनें व्यक्तविण्यांत आलीं आहेत.

मला वाटतें, भगवान् शंकराचार्य 'प्रकट' बुद्ध होते व जगद्गुरु बुद्ध हे 'प्रच्छन्न' शंकराचार्य होते. दोघेहि अगदी एकाच भक्तिमूलक व ज्ञानप्रधान कर्मयोगाचे प्रतिष्ठापक व प्रचारक होते.

भगवान् शंकराचार्य म्हणाले : "मीमांसकांनी सांगितलेलें जड-जटिल कर्मकांड नको. विशुद्ध ज्ञान हवें. अपरोक्ष म्हणजे प्रत्यक्ष अनुभूति हवी. सर्वत्र अद्वैत-भाव हवा".

जगद्गुरु बुद्ध म्हणाले : "हा हिंसाप्रधान यज्ञ, कर्मकांड नको. सम्यक् दृष्टि म्हणजे ज्ञान हवें; जातिभेद नकोत म्हणजे अद्वैतवृत्ति हवी; समता हवी व ममता हवी."

बुद्धांचें निर्वाण, विज्ञान व प्रतीत्य समुत्पाद यांची मूलगंगोत्री वेदान्तदर्शनाप्रमाणेंच श्री शंकराचार्यांचे परात्पर गुरु श्री गौडपाद यांच्या कारिकांत आहे. सांख्यदर्शनांतला प्रत्यय-संघ व प्रतीत्य-समुत्पाद हे देखील तत्त्वतः एकच आहेत.

मोक्ष व निर्वाण, आत्मा व विज्ञान हे एकच अर्थाचे शब्द आहेत. भगवद्गीतेनें ब्रह्मनिर्वाण व आत्मज्ञान हे संयुक्त शब्द बनवून व नियोजून भगवान् शंकराचार्य व जगद्गुरु बुद्ध यांचें मौलिक साम्य विशद केलें आहे. अर्थात् त्या दोघांमध्यें कांही भेद आहेत. पण ते गौण आहेत. तात्त्विकदृष्टीनें महत्त्वाचे नाहींत.

विद्वद्रत्न कोलंगडे यांनी या बुद्ध-दर्शनांत, 'विज्ञान' म्हणजे 'जीवात्मा' असें समीकरण सप्रमाण सिद्ध केलें आहे. बुद्ध, जीवात्मा मान-

तात याला पोषक असें एक उत्कृष्ट बुद्ध-वचन येथें देणें समुचित होईल. न्यायाचार्य उद्योतकराच्या न्यायवार्तिकांत सर्वाभिसमय सूत्रांतलें एक अवतरण आहे. त्यांत निःसंदेहतेनें स्वतः बुद्धाचेंच म्हणून मान्य झालेलें एक वचन आहे. बुद्ध म्हणतात : " भारं वो भिक्षवो देशयिष्यामि भारहारं च। भारः पञ्चस्कन्धाः भारहारश्च पुद्गल इति । यश्च आत्मा नास्ति इति स मिथ्यादृष्टिको भवति । ."

बौद्ध वाङ्मयाचा सुप्रसिद्ध अभ्यासक व अधिकारी डॉ. वॉरन, यांच्या ' Buddhism in Translation ' या ग्रन्थांत प्रस्तुत बुद्ध —वचनाचें भाषान्तर खालीलप्रमाणें आहे.

" O, you Mendicants, I am going to point out to you the burden as well as the carrier of the burden; the five states are the burden and The pudgala is the carrier of the burden; he who holds that there is no soul is a man with false notions. "

प्रत्यक्षतः भार वाहणारा आत्मा म्हणजे जीवात्मा नव्हे का ? " पुद्गल " या शब्दानें देखील श्री बुद्ध " जीवात्मा " हाच अर्थ सुचवितात. जैनांचा जड " पुद्गल " श्री बुद्धांना मान्य नव्हता. श्री. आपटे यांच्या संस्कृत-इंग्रजी कोशांत देखील " पुद्गल " शब्दाचा " आत्मा " हा एक अर्थ दिला आहे. शब्दभेद म्हणजे अर्थभेद नव्हे, हें आपण ध्यानांत घेऊं या.

विद्वद्रत्न कोलंगडे यांच्या या तत्त्वग्रन्थावर श्री व्यासांचे आशीर्वाद व महाराष्ट्र महालक्ष्मीच्या सुवर्णाक्षता पडाव्यात ही प्रार्थना.

१७ वेलेस्ली रोड, पुणें,<br>वटपौर्णिमा, ज्येष्ठ शके १८८१<br>तारीख २० जून १९५९

**धुं. गो. विनोद**

# आत्मनिवेदन

धराबद्धपद्मासनस्थांघ्रियष्टि–
र्नियम्यानिलं, न्यस्तनासाग्रदृष्टि: ।
स बुद्धः प्रबुद्धोऽस्तु नश्चित्तवर्ती,
य आस्ते कलौ योगिनां चक्रवर्ती ॥

श्रीमत् शंकराचार्य

भारतीय पवित्र संस्कृति ग्रंथमाला म्हणजे ‘ योगीश्वर ग्रंथमाला ’ या उच्च व पवित्र ग्रंथमालेंतील ‘ बुद्ध-दर्शन ’ हा नवीन पण अपूर्व व उद्बोधक ग्रंथ महाराष्ट्रास सादर करण्यांत आम्हांस साभिमान आनंद वाटत आहे. या ग्रंथांत फक्त भगवान् बुद्धाची ग्रंथोक्त शिकवण तेवढीच विचारांत घेण्यांत आली असून, बौद्धाचार्यांच्या त्यावरील स्वकपोल-कल्पित पक्षांध टीकेचा त्याला स्पर्श वा विटाळहि लावून देण्यांत आला नाहीं. भगवंतानी उभारलेल्या टोलेजंग धर्म मंदिराला वेद व उपनिषद् ग्रंथाचा केवढा खंबीर व भक्कम पाया लाभला आहे व त्या पायावरच धर्मपीठाची बैठक कशी प्रतिष्ठित व अलंकृत करण्यांत आली आहे, याची गोड अनुभूति, हा ग्रंथ वाचून पाहिल्यावर कोणाहि सूज्ञ, व समतोल दृष्टीच्या वाचकास येईल असा आम्हांस भरंवसा वाटतो.

या ग्रंथाच्या उपयुक्ततेसंबंधीं व तत्त्वविवेचनसंबंधी आम्हांस जें कांहीं सांगावयाचें होतें, तें सर्व न्यायरत्न डॉ. विनोद व वाईचे सुप्रसिद्ध

विद्वद्वर्य तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी व खारचे 'धर्मचक्र'– संपादक पालीभाषाभिज्ञ विद्वान प्रोफेसर श्री. ना. के. भागवत यांनी अनुक्रमें 'आशीर्वाद', 'प्रस्तावना' व 'दोन शब्द' यांत सांगून टाकल्यामुळें आम्हांस आतां अधिक सांगण्याचें असें कांहीं राहिलें नाहीं. तथापि तर्कतीर्थ जोशी, व प्रो. भागवत यांनीं ज्या एक दोन शंका आपल्या लिखाणांत उपस्थित केल्या आहेत, त्यांचें योग्य समाधान करून वाचकांचा निरोप घेणें इष्ट वाटल्यावरून तत्संबंधीं दोन शब्द लिहून वाचकांचा निरोप घेतों.

तर्कतीर्थांनी आपल्या प्रस्तावनेंत 'बुद्धास आत्मा मान्य होता' या आमच्या विधानास पुष्टि दिली आहे पण त्यांस 'जीवात्मा मान्य नव्हता' असा शेरा मारला आहे. या संदर्भांत न्या. विनोद यांनी सहजासहजीं उद्धृत केलेलें न्यायवार्तिकांतील बुद्ध-वचन अत्यंत महत्त्वाचें व निर्णायकच आहे असें वाटतें. आमच्या नम्रमतें बुद्धास 'जीवात्माहि मान्य होता' असें ठासून सांगावेसें वाटतें. कारण त्यांच्या सर्व विधानावरून वैदिकांचा जो जीवात्मा, तोच त्यांचें प्रतीत्यसमुत्पादांतील विज्ञान होय, असा आमचा ठाम समज आहे. हा विषय आम्हीं 'अत्ता-अनत्तावादांत' सविस्तर चर्चून स्पष्ट दाखवून दिला आहे. तिकडे वाचकांचें लक्ष वेधूं इच्छितों. यानंतर दुसरी गोष्ट म्हणजे प्रो. ना. के. भागवत यांनी आमच्या 'बुद्ध आणि आहार' या विषयावरील कांहीं विधानासंबंधी केलेल्या आरोपाची होय. या प्रकरणांत आम्हांस असें दाखवावयाचें होतें कीं बुद्ध हे अहिंसावादाचे कट्टर अभिमानी होते व असले तरी ते मांसाहार निषिद्ध मानणारे नव्हते. शाकाहाराप्रमाणें मांसाहारहि

त्यांस कांहीं प्रसंगीं मान्य असून त्यांनी तो कोठें कोठें ग्राह्य मानून आचरणांतहि आणला होता. हें आणि इतकेंच दाखविणेचा आमचा उद्देश होता. त्यापलीकडे त्यांच्यावर शिंतोडे उडविण्याचा मुळींच नव्हता आणि तो आम्ही साधार व सोदाहरण दाखवून दिला आहे. हें एवढें वगळल्यास बाकीचें आमचें सर्व विवेचन व विषयप्रतिपादन त्यांस बहुतेक मान्य व पसंत आहे, असें त्यांच्या अभिप्रायावरून प्रतीत होतें. याशिवाय अधिक सांगावें असें कांहीं निराळें राहिलें नाहीं. मात्र एवढें सांगितल्याशिवाय आमच्यानें पुढें जाववत नाहीं कीं भगवान् बुद्ध हे वैदिक धर्माचे निंदक व विरोधक नसून उलट त्यांनी आपल्या धर्मकथनांत व धर्मविवेचनांत उपनिषद् वचनांचाच महान् आधार घेतला आहे, याची ओळख हा ग्रंथ वाचून पाहिल्यावर प्रामाणिक वाचकांच्या सहज ध्यानीं रुजेल. असो.

आतां जातां जातां या ग्रन्थाच्या प्रकाशनास ज्यांनी ज्यांनी मदत केली आहे, त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानून या आत्मनिवेदनाला पूर्णविराम देतो. या ग्रन्थास व गीताग्रन्थास (अट्ठकथासहित सार्थ धम्मपद ग्रन्थास) तीन हजार रुपयांची उदार देणगी देऊन आमच्या उच्च व पवित्र वाङ्मय प्रकाशन कार्यास मुंबई सरकारांनी म्हणजे डायरेक्टर ऑफ् एज्युकेशन, (डॉ. एस्. एस्. भांडारकर) पुणें यांनी जी बहुमोल मदत केली त्याबद्दल कृतज्ञतापूर्वक आम्ही त्यांचे आभार मानतो. त्यांच्या मदतीशिवाय हा ग्रन्थ प्रकाशांत येण्यास फार मोठी अडचण होती. ती या उदार देणगीनें दूर झाली हें नमूद केल्याशिवाय आम्हांस पुढें जाववत नाहीं.

तसेंच आमच्या विनंतीस मान देऊन पूजनीय न्यायरत्न डॉ. धुं. गो. विनोद यांनीं उद्बोधक आशीर्वाद दिला, व वाईचे सुप्रसिद्ध विद्वान तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं कृपाळु होऊन आमच्या ग्रन्थास 'प्रस्तावना' व खारचे पालीभाषाभिज्ञ 'धर्मचक्र'चे संपादक प्रो. ना. के. भागवत यांनी 'दोन शब्द' लिहून दिले त्याबद्दल आम्ही त्यांचें हृत्पूर्वक आभार मानतो. शेवटीं बेळगांवचे तरुण भारत प्रेसचे म्यानेजर श्री. बंडोपंत तेंडोलकर व वाई प्राज्ञप्रेसचे व्यवस्थापक श्रीं. मधुकर शंकर साठे, यांनी या ग्रन्थाचें छपाईकाम नीट व सुसूत्र करून दिलें, याबद्दल त्यांचेहि आम्ही मनःपूर्वक आभार मानतो. सरशेवटी पाश्चात्य प्रख्यात विदुषी मिसेस हिस् डेव्हिड्स् यांचें बुद्धविषयक मत देऊन आत्मनिवेदनास रजा देतों. त्या वाई म्हणतात तें असें:—

"Goutam Buddha was born, brought up, and lived and died as a Hindu. There was not much in the metaphysics and principles of Goutam which can not be found in one or other of the orthodox systems and a great deal of his morality could be matched from the earlier or later Hindu books." —Mrs Rhys Davids

— रा. गो. कोलंगडे

# अनुक्रम सूची





. . . ता. कं. बुद्धबोधवचन संग्रहाच्या पृष्ठावर २६३ क्रमांक पडावयास पाहिजे होता. पण चुकून ३६३ पडला आहे. एकूण १०० क्रमांकाची तफावत झाली आहे. इकडे वाचकांचें लक्ष वेधूं इच्छितो.

# अधिकृत ग्रन्थ —

१ मज्झिम निकाय
२ दीघ निकाय
३ विसुद्धमग्ग
४ अंगुत्तर निकाय
५ संयुत्त निकाय
६ धम्मपद
७ उदान
८ इतिवुत्तक
९ सुत्तनिपात
१० शतपथ ब्राह्मण
११ तैत्तिरीयोपनिषत्
१२ कठोपनिषत्
१३ श्वेताश्वतरोपनिषत्
१४ भगवद्गीता

---

शिवाय इतर इंग्रजी, हिंदी व मराठी ग्रन्थ, लेख, व्याख्यानें व प्रवचनें इत्यादि इत्यादि...

## योगीश्वर प्रकाशनांतील ग्रन्थांची सूची

# प्रसिद्ध झालेले ग्रन्थ

१ योगीश्वर याज्ञवल्क्य –
(सुधारून वाढविलेली तिसरी आवृत्ति) कि. ६ रु.

२ शुक्लयजुर्मणिमाला – (शिल्लक नाहीं.)
(शुक्लयजुर्वेदांतील निवडक मंत्रसंग्रह)

३ याज्ञवल्क्य-दर्शन – (शतपथ-परिचय) कि. ७ रु.

४ त्यागराज भगवान् गोतम बुद्ध – (शिल्लक नाहीं.) कि. ५ रु.

५ ऋग्रत्न भाण्डार ऊर्फ लघु ऋग्वेद – कि. १० रु.
(ऋग्वेदातील निवडक १६०० मंत्राचा सार्थ मंत्रसंग्रह)

६ ऋग्वेद-दर्शन –
(ऋग्वेदाचें अंतरंग दर्शन) कि. १० रु.

७ वेदमहाभाष्यकार सायणाचार्य – कि. ४ रु.

८ धर्मचक्रवर्ती गोतम बुद्ध –
(लहान आवृत्ति) कि. ३ रु.

९ बुद्ध-दर्शन – (बुद्धाची यथार्थ शिकवण) कि. ७ रु.

# क्रमशः प्रसिद्ध होणारे ग्रन्थ

## ( हे खालील ग्रन्थ लिहून तयार आहेत ).

१० आद्य श्री. शंकराचार्य –
( संपूर्ण चरित्र, व त्यांचें अवतारकार्य )

११ महात्मा झोरोष्टर – ( पारशांचा आद्य धर्मगुरु )
( चरित्र, इतिहास व धर्म )

१२ यजुर्वेद-दर्शन –
( शुक्लयजुर्वेदाचें अंतरंग-दर्शन )

१३ बुद्ध-गीता –
( अर्थ-कथासहित सार्थ धम्मपद )

१४ प्रभु येसू ख्रिस्त –
( चरित्र व शिकवण )

१५ शुक्लयजुर्मणिमाला –
( सुधारून वाढविलेली आवृत्ति दुसरी )

१६ बार्हस्पत्यसूत्र – ( अध्याय १ ते ६ )

१७ हजरत महमद पैगंबर –

व इतर किरकोळ ग्रन्थ

वरील ग्रन्थ यथाक्रम व यथा-काल प्रसिद्ध करण्यांत येतील.

— रा. गो. कोलंगडे



ध्यान मूर्ति तक्षशिला

नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा सम्बुद्धस्स.

# बुद्ध-दर्शन

## प्रकरण १ लें

## आर्यसत्य पहिलें

## जग हें दुःखमय आहे.

इदं खो पन भिक्खवे दुक्खं अरियसच्चं। जाति पि दुक्खा, जरा पि दुक्खा, व्याधि पि दुक्खा, मरणं पि दुक्खं, अप्पियेहि सम्पयोगो दुक्खो, पियेहि विप्पयोगो दुक्खो, यम्पिच्छं नो लभति तं पि दुक्खं; संखित्तेन पञ्चुपादानखन्धा दुक्खा.॥

( धम्मचक्कपवत्तन सुत्त ५ )

हा संसार–जागतिक जीवन–हें सुखमय आहे, का दुखःमय आहे, याविषयीं जगांतील थोरथोर विचारी व विद्वान लोकांत बराच मतभेद असल्याचें आढळून येतें. कोणी म्हणतात, तो सुखमय आहे, कोणी म्हणतात तो दुःखमय आहे. मग खरें काय, याविषयीं सामान्य जनतेची दिशाभूल झाल्यास त्यांत आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. हा प्रश्नच असा कांहीं चमत्कारिक आहे कीं, तेथें ठाम निर्णय देणें कठीण होऊन बसतें. वरवर पाहणाऱ्यास तो सुखमयसा दिसतो, हें कांही खोटें नाहीं.

सुखवादी लोकांची फैफियत अशी आहे कीं, जगांत सुख आहे, म्हणून तर मनुष्यप्राणी जगून व तगून राहिला आहे. नाहींतर तो केव्हांच नामशेष होऊन जाता. ज्या अर्थी तो आज पर्यंत जगून व टिकून राहिला आहे, त्या अर्थी जगांत सुख आहे, याविषयीं संशयच नको. जगांत जिकडे तिकडे शहरें वसलीं आहेत, वाडे उठले आहेत, बंगले थाटले आहेत,

बाजार सजले आहेत, घोडे दौडत आहेत, बग्या धांवत आहेत, विमानें घरघरत आहेत, मोटारी फोफावत आहेत ! मग हें काय सुखाचें लक्षण नव्हे, तर कशाचें ? संसारांत सुख आहे, म्हणूनच मनुष्य विद्या शिकतो, व्यापार करतो, धंदा चालवतो, नोकरी पत्करतो, शेतांत राबतो, खाणींत उतरतो, समुद्रांत बुडतो, आकाशांत उडतो, डोंगरावर चढतो, कारखाने उभारतो, राज्य चालवितो, लढाई मारतो, देशोदेश फिरतो, काय नाना तऱ्हा करतो. हें सर्व कशासाठीं ? सुखाकरतां नव्हे तर कशा करतां ? अलबत् सुखाकरतां व सुख आहे म्हणून ! मनुष्याची सर्व घडपड व धांवपळ केवळ या सुखासाठींच. तें नसतें तर कोणी कोणास विचारता ना. किंवा कोणी कोणास पुसता ना ! जगांत जें चैतन्य स्फुरत आहे, तें सर्व या सुखासाठीं ! अशी ही सुखवादी लोकांची – विशेषतः पाश्चात्य पंडितांची – विचारसरणी आहे.

ठीक आहे. हें त्यांचें म्हणणें खरें आहे, असें क्षणभर धरून चालूं. कारण तरुण व सुंदर प्रेमरमणीशी एकांतांत बसून विविध सुखविलास व आमोद–प्रमोद करतांना, मधुर मधुर पक्वान्नाचें सुंदर लज्जतदार सुग्रास नित्य जिभेला मनमुराद चारतांना, गानकोकिलेचें सुमधुर स्वरालाप कान भरून ऐकतांना, गुलाबासारख्या मोहक फुलांचा दिव्य सौगंध नाकानें यथेच्छ लुटतांना, मऊ मऊ पराच्या गादीवरून इकडे तिकडे लोळण घेतांना सुखाचा साक्षात्कार होतो, ही गोष्ट मान्य केलीच पाहिजे. हे सर्व प्रकार सुखाचे आहेत, याविषयीं दुमत नाहीं. पण प्रश्न हा कीं, हें सुख स्थिर आहे. काय ? शाश्वत आहे काय ? नित्य आहे काय ? तसें असेल तर सांगा.

होय म्हणावें तर तिकडून तरी काय ? तीहि पंचाइतच. कारण जेथें सुखाचें नृत्य चाललेलें असतें, तेथें पुढें क्षणांतच 'अहो संसार कष्टता' असा आर्त व दीन ध्वनि ऐकूं येतो ! कोणाला खावयाला अन्न आहे, तर रहावयाला घर नाहीं; घर आहे तर गृहिणी नाहीं, गृहिणी आहे तर पैसा नाही; पैसा आहे तर आरोग्य नाही; आरोग्य आहे तर आयुष्य नाहीं ! एक आहे तर एक नाहीं, आज आहे तर उद्या नाहीं ! घरोघर नि गां गांव हा प्रकार कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत नित्य

दृष्टोत्पत्तीस येतोच येतो !' आणि अशी ही घडामोड – उलटापालट – सतत चाललेली असतेच !!

मग हें काय सुखाचें लक्षण समजावयाचें ? तरुण रंगेल जोडप्यांचा विलासी संसार सुखांत व मजेंत चालला आहे, असें म्हणतां म्हणतां अचानक निर्दय काळाची निष्ठुर झडप पडून, प्रेमरमणीचा अगर प्राणपतीचा दुःसह वियोग सहन करण्याचा दुर्धर प्रसंग त्यावर येऊन ठेपतो ! धंदा' सुरळीत व भरभराटींत चालला आहे, असें म्हणतां म्हणतां मध्येंच कोठून तरी अचानक थप्पड बसून, सर्वस्वास मुकावें लागतें ! कोणाच्या नोकरीवर गदा येते, तर कोणाची प्रकृतिच ढासळते ! कोणाची मसलत फसते, तर कोणाची निराशा होते ! कोणाचा व्यवसाय खचतो तर कोणाचें कर्म उभें राहतें !! असें एक का दोन, नानातऱ्हेच्या अडचणी, आपत्ति-विपत्ति, संसारांत हरहमेष पुढें येऊन माणसास भेडसावीत व सतावीत असतात ! हें सर्व पाहिलें म्हणजे संसार पटावर सुखमयाचा शिक्का मारण्याचें धाडस विचारी माणसाकडून करवेल कीं काय, हा एक मग महत्वाचा प्रश्नच होऊन बसतो. नाहीं कां ? हा सर्व प्रकार पाहून श्रीसमर्थ रामदास प्रश्नरुपानें उद्गारलें कीं, ' जगीं सर्व सूखी असा कोण आहे ? ' आणि तो विचारवंतांना मोठा विचारणीय झाला आहे.

तात्पर्य हें कीं, सर्व पाश्चात्य पंडित जागतिक सुखाला, विषयसुखाला, शरीरेन्द्रिय-तर्पणाला, सुख समजतात व मानतात. त्यांना अतींद्रिय सुखाची–अध्यात्म सुखाची कल्पना नाहीं व गोडी नाहीं आणि त्यावर त्यांचा विश्वासहि नाहीं ! असो. आतां यावर पौर्वात्य–विशेषतः भारतीय पंडितांचें–आणि तशांतच बुद्ध भगवंतांचें काय म्हणणें आहे, हें आतां पाहूं. कारण प्रस्तुतचा प्रश्न – हा सुखाचा प्रश्न–येथें बुद्ध भगवंतांच्या चष्म्यातूनच सोडवावयाचा आहे आणि ते झाले तरी भारतीय विभूतीच–धर्मचक्र प्रवर्तकच असे अविस्मरणीय महायुग पुरुष–आहेत. अर्थात् या प्रश्नावर भगवंतांचा काय कौल मिळतो, हें पाहणें आतां क्रमप्राप्तच आहे. त्यांनीं या प्रपंचाचा, राजविलासाचा, शरीराचा, व जगाचा पूर्ण, सूक्ष्म व खोल विचार व तपास करून, दीर्घ परीक्षण व निरीक्षण यांच्या साहाय्यानें

असा निर्णय घेतला आहे कीं, संसार हा वस्तुतः सुखमय नाहीं, तो दुःखमयच आहे ! दुःखाचेंच तेथें साम्राज्य पसरलेलें आहे ! दुःखाचीच तेथें अखेर सरशी आहे !! अर्थात् ही गोष्ट कित्येकांस विचित्र वाटेल व त्यांच्या सुखलोलुप मनाला पटणारहि नाहीं. 'जगांत सुख नाहीं म्हणजे काय ! किती फोली व वेडेपणाची समजूत ही' ! असें आधुनिक नवशिक्षित लोक यांत विचकून नाकहि मुरडतील, हें आम्हीं जाणून आहों. आजची भारतीय पिढी शरीरानें भारतीय असली, तरी मनानें पूर्ण साहेबी वळणाची—पाश्चात्य ठशाची—असल्यामुळें आणि म्हणून जागतिक जंजालांत पूर्ण गुरफटल्यामुळें त्यांना भारतीय तत्त्वज्ञानाविषयीं असावी तशी श्रद्धा व आत्मीयता नाहीं, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें ! पण दीर्घ व सूक्ष्म विचारांतीं भगवंतांच्या वरील निर्णयांत केवढा भरीव अर्थ व गंभीर सत्य गर्भित आहे, ही गोष्ट अखेर मागेंपुढें केव्हांतरी मान्य करावीच लागणार! तेव्हां या बाबतींत भगवंतांची विचारसरणी कशी वाहते, हे पाहणें आतां ओघानेंच प्राप्त झालें.

पण पुढें जावयाच्या आधीं एक गोष्ट प्रामुख्यानें वाचकांपुढें मांडावीशी वाटते. ती ही कीं, भगवंतांचा उच्च दर्जा. ते कांहीं भुके-कंगाल अशा दरिद्र नारायणाच्या पोटीं जन्मास आले नव्हते. तर प्रत्यक्ष राजविलास संपन्न अशा भाग्यशाली राजाच्या पोटीं त्यांचा जन्म झाला होता. अर्थात् ते राजकुलोत्पन्न असून, प्रत्यक्ष युवराज होते ! थोडक्यांत म्हणजे सर्व सुखोपभोग व विविध राजविलास यांचें त्यांना पूर्ण आनुकूल्य ! रहावयास सुंदर राजमहाल ! सहवासास यशोधरेसारखें सुंदर स्त्रीरत्न ! विलासास स्वर्गातील अप्सरेसारख्या ललितकलाकुशल असें सुरमणीय गणिकामंडळ ! इच्छा भोजन, विविध रत्नालंकार, उंची वस्त्रप्रावरणें, चाकर नोकर, दासदासी, रथघोडे इत्यादि सुखविलासाची विविध भरपूर सुखोपकरणें !! मानवी जीविताला इष्ट व प्रिय अशी सर्व सुखसाधनें त्यांना पूर्ण अनुकूल होतीं ! व त्याप्रमाणें त्यांनीं कांहीं काल त्या सर्वांचा यथेच्छ उपभोग घेतलाहि. अशा भोगैश्वर्यसंपन्न राजपुत्राचा—सत्यान्वेषणार्थ सुखसर्वस्वावर पाणी सोडून, खडतर वनवास पतकरून, आनंदानें दारि-

द्याला मिठी मारणाऱ्या त्यागराजाचा—कडक तपश्चर्येच्या दिव्य मुशींतून तावून सुलाखून सहीसलामत बाहेर पडलेल्या सम्मा सम्बुद्धाचा—धर्मचक्रवर्तीचा—तो महानिर्णय आहे! ध्यानस्थ मनानें केलेला तो दिव्य निर्णय आहे!!

काय आहे तो महानिर्णय? जग हें दुःखमय आहे!! जन्म म्हणजे दुःख! जरा म्हणजे दुःख! व्याधी म्हणजे दुःख! मरण म्हणजे दुःख! प्रिय वस्तूंची अप्राप्ति म्हणजे दुःख! प्रिय वस्तूचा वियोग म्हणजे दुःख! अप्रिय संयोग म्हणजे दुःख! हें सर्व थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मानव जन्म—अर्थात् पंचुपादान स्कंध—हें दुःख!! वर मथळ्यावर जें वचन उद्धृत केलें आहे, त्याचा भावार्थ हा असा आहे. जन्म म्हणजेच दुःख!! त्याचा पर्याय अर्थ म्हणजे हा कीं संसार म्हणजे दुःख! तो इथून तिथून सगळा दुःखानें भरलेला आहे!! हा निर्णय कांहीं असा तसा नाहीं. जगाचें व जगांतील यच्चयावत् वस्तूंचें सूक्ष्म निरीक्षण व परीक्षण करून, योगस्थ मनानें केलेला तो दिव्य निर्णय आहे! व तो चार आर्य सत्यांपैकीं पहिला व प्रमुख आहे. काय आहे तो, तर भगवान असें सांगतात कीं, 'यदनित्यं तद्दुःखम्' (यदनिच्चं तद्दुक्खम्)—जें अनित्य म्हणजे क्षणभंगुर-कालभंगुर—अर्थात् नश्वर, तें सगळें दुःखच!!

आतां येथें थोडेंसें विषयांतर करणें आम्हांस इष्ट व जरूर वाटतें. म्हणजे असें कीं, भगवान गौतमबुद्धांनी राजवाड्याला जेव्हां अखेरचा रामराम ठोकला, त्यावेळीं त्यांची मनस्थिति कशी होती व गृहत्यागाला कारण काय झालें, हें प्रथम समजलें म्हणजे त्यांनीं जग हें दुःखमय कां म्हटलें, याचा चांगला प्रकाश पडण्यास चांगली मदत होईल. म्हणून याविषयींचे त्यांच्या तोंडचे प्रत्यक्ष शब्दच येथें उद्धृत करतो म्हणजे झालें. भगवान या विषयावर बोलत असतांना भिक्षूंना सांगतात तें असें:—भिक्षूहो! मला संबोधि प्राप्त व्हावयाच्या पूर्वीं म्हणजे असंबुद्ध बोधिसत्व *स्थितींत असतांना मी स्वतः जन्म—जरा—मरण—धर्मी असून, स्वाव धर्मांनीं* युक्त अशा पदार्थांची इच्छा करीत होतो. म्हणजे माझें मुख त्या वस्तूंवरच म्हणजे पुत्र, भार्या, दासदासी, अजवस्त्र, खाद्यपेय, इत्यादि विषयावरच—

अल्पांत खरें सुख नाहीं. अल्प म्हणजे नाशवंत. मग या दुःखाचा अंत होईल कीं नाहीं, आणि होत असल्यास कोणत्या उपायानें, कोणत्या मार्गानें होईल, तो मार्ग व तो उपाय शोधून काढण्याच्या भरीस पडून, पुढे त्यांनी गृहत्याग करून, प्रव्रज्या घेऊन, दीर्घ तपश्चर्या व खोल विचार करून, शोधून काढण्याचा निश्चय केला व त्यांत त्यांना यशहि लाभलें. म्हणून प्रव्रज्याही धर्मज्ञानाला अवश्य आहे—एस मग्गो उजु मग्गो एस मग्गो अनुत्तरो—असें म्हटलें आहे. या त्यांच्या निर्णयालाच आर्यसत्य हें नांव आहे. काय आहे तें आर्यसत्य, हें आतां टप्याटप्यानें पहात जाऊं.

त्यांचें पहिलें आर्यसत्य आहे, तें असें:— जो प्राणी जन्मला, तो मागेपुढें केव्हां तरी मरणारच. अर्थात् 'जातस्यहि ध्रुवो मृत्युः'— दिसेल तितुकें नासेल' हा निसर्गाचा दंडकच आहे. 'मरणन्तं हि जीवितं' असें त्यांनी स्पष्ट घोषित करून टाकलें आणि तें अनुभवानें सत्यच ठरलें. आतां खरें सांगावयाचें म्हणजे मरणासारखें मनुष्याला जगांत दुसरें दुःखच नाहीं! सर्वांत कटुतर दुःख म्हणजे हें मरण!! कारण त्यावेळीं जगांतील सर्व इष्ट व प्रिय वस्तूंस कायमचें मुकावें लागतें! केवढा दुर्धर व दुःसह कठीण प्रसंग तो! आईबाप, बहीणभाऊ, बायकोपोरें, इष्टमित्र, दासदासी, शेतीवाडी, धनदौलत, उद्योगधंदा, नांवलौकिक, या सर्व प्रिय वस्तूंचा व प्रिय गोष्टींचा तो कायमचा वियोग होण्याचा प्रसंग! मनुष्याच्या आशा—आकांक्षा त्यावेळीं पार जेथल्या तेथे गारठून जातात! अत्यंत परिश्रम करून उभारलेला उद्योग-धंदा व मिळविलेली संपत्ति व सत्कीर्ति या सर्वांवर पाणी सोडावें लागतें! अत्यंत काळजीनें व लडिवाळपणानें वाढविलेलें व सुखानंदांत घोळविलेलें हें शरीरसुद्धां सर्वस्वी टाकून देण्याचा तो महा कठीण व दुर्धर असा भयंकर प्रसंग असतो!! हें सर्व अर्थात् मनुष्याला-प्रपंचांत गुरफटलेल्या मनुष्याला—अत्यंत दुःखदायक नव्हे काय? कष्टकारक नव्हे काय? क्लेशदायक नव्हे काय? आणि म्हणून मरण हें सर्वतोपरी अप्रिय व भयप्रद असल्यामुळें महद्दुःख होय, असें भगवंतांनी म्हटलें, तें चुकलें कोठे? त्यांत वावगें असें तें काय आहे? आणि हें मरणभय मनुष्याला सदानकदा भेडसावीतच असतें. 'जातानं मच्चानं

निच्चं मरणतो भयं' असें भगवंतांनी घोषित केलें, तें यथायोग्य नाहीं असें कोण म्हणेल ?

त्याचप्रमाणें हें म्हातारपण. तें झालें तरी काय, तितकेंच दुःखद आहे ! शरीर जीर्ण व क्षीण झालें म्हणजे-आणि तें मागेंपुढें केव्हांतरी तसें होणारच-मग जवळ जवळ सगळाच कारभार संपुष्टांत येतो. मग डोळ्याला धड दिसत नाहीं. कानाला नीट ऐकूं येत नाहीं. पायानें सरळ चालवत नाहीं. हातानें धड धरवत नाहीं. बुद्धींत भ्रंश होतो. स्मरणशक्ति न्हास पावते. केस पिकून सफेत होतात. दांत पडून तोंडाचें बोळकें होतें. कंबर वाकून कमान बनते. सर्व गात्रें लटपटूं लागतात. बसलें तर उठवत नाहीं. उठलें तर बसवत नाहीं. रात्रीं झोंप नाहीं. दिवसा चैन नाहीं. तशांत मरणाची क्षणोक्षणीं भीति ! असें हें म्हातारपण म्हणजे जवळ जवळ अर्ध मरणच ! किंवा मरणापेक्षांहि तें कष्टतर व दुःखप्रद आहे. मरणाचें दुःख काय तें एकदांच होईल तेवढेंच. पण हें म्हातारपण म्हणजे नित्य मरण-हाल-कष्ट-भोग-सायास ! त्यापेक्षां मरण कितीतरी बरें. त्यापासून कायमची सुटका तरी होते. तेव्हां अशाप्रकारचें हें म्हातारपण-जीवास अगदी बेजार करून-सतावून सोडणारें म्हातारपण-अर्थात दुःखांतच गणलें गेलें, यांत अनुचित तें काय झालें ? भगवंतांनी मरणाप्रमाणेंच त्यालाहि दुःखाच्या पंक्तीत गोवलें, यांत कांही गैर झालें, असें आम्हांस वाटत नाहीं.

आता तुम्ही असें म्हणाल कीं हें म्हातारपण चुकविलें तर मग कसें ? . तसें झालें तर ठीकच. पण गम्मत ही कीं, तें कशानेंहि कोणालाहि चुकवितां येत नाहीं. आजपर्यंत तें कोणालाहि चुकलें नाहीं व कोणालाहि चुकवितां आलें नाहीं. व पुढें तें कोणालाहि चुकणार नाहीं व चुकवितां येणार नाहीं. हा निसर्गाचा निष्ठुर नियमच आहे. आयुष्य काय, म्हातारपण काय, मरण काय, ही निसर्गाची देणगी असल्यामुळें ती कोणालाहि देतां घेतां येत नाहीं. ज्याचें त्यानेंच तें भोगलें पाहिजे. तें कशानेंहि घालवितां येणार नाहीं. 'न दीघं आयुं लभते धनेन न चापि वित्तेन जरं निहन्ति । अप्पं हिदं जीवितं आहु धीरा असस्सतं विप्परिणाम-धम्मं ॥' ( मज्झिमनिकाय ८२-३०-७ ) धनाच्या म्हणजे इतर साध-

नाच्या योगानें दीर्घ आयुष्य प्राप्त होत नाहीं. किंवा जरेचा नाश करतां येत नाहीं. हें जीवित अगदी अल्प आहे आणि तसेंच तें अशाश्वत असून, अखेर नाश पावणारें आहे, असें शाहणे म्हणतात. हें इतकें सांगण्याचा हेतु इतकाच कीं म्हातारपण कांहीं करूनहि टाळतां येत नाहीं. अर्थात् तें अटळ आहे, हा सांगण्याचा मुद्दा.

मरणाची गोष्ट झाली तरी अशीच आहे. तेंहि कोणालाहि चुकलें नाहीं व चुकवितां येणार नाहीं. आणि तें कोणाला कसें नि केव्हां गांठेल याचा नेम नाहीं. अर्थात् जीवित हें चंचल व अनिश्चित आहे. आणि मरण मात्र नियत व निश्चित आहे. म्हणून मनुष्यानें जीवित हें समर्थ असे तोपर्यंतच काय आपलें प्रापंचिक व पारमार्थिक हित व कल्याण साधावयाचें तें साधावें. भगवान याविषयीं स्पष्ट इशारा देऊन ठेवतात. तो असा— 'अप्पमिदं, भिक्खवे, मनुस्सानं आयु, गमनीया सम्परायो, कत्तब्बं कुसलं, चरितब्बं ब्रम्हचर्यं, नत्थि जातस्स अमरणं। यो, भिक्खवे, चिरं जीवति सो वस्ससतं, अप्पं वा भिय्यो' ति॥ (वि. म. ८-३५) भावार्थ :— भिक्षूहो ! मनुष्याचें आयुष्य अल्प आहे. सद्गतीविषयीं विचार करावा, चांगलें कर्म करावें, ब्राम्हचर्य म्हणजे 'नीतिमार्गानें-अष्टांगिक मार्गानें-चालावें, जो जन्मला त्याला मरण चुकत नाहीं, तो फार दिवस जगला म्हणावयाचा तर शंभर वर्षें जीवंत राहील. फार तर पुनः आणखी कांहीं दिवस. यापलीकडे नाहीं. 'शतायुर्वै पुरुषः' हें जें श्रुतिवचन आहे, त्याचाच अनुवाद भगवंतानी केला आहे. हें मरण चुकविणेसाठी भारतांत मागें अनेकांनी अनेक प्रयत्न केले आहेत. उदाहरणार्थ त्रिपुरासुर, हिरण्यकशिपु, लंकाधीश रावण, नमुचि इत्यादिकांनी विश्वप्रयत्न केले पण त्यांना तें अखेर गांठलेंच. कोणी अंतराळांत जाऊन राहिले ! कोणी समुद्रांत शिरून बसले ! कोणी पर्वत-शिखरावर चढून राहिले ! कोणी गुहेत जाऊन लपून बसले ! पण मृत्यूनें अखेर त्या सर्वांचा ठाव घेतलाच कीं नाहीं ? ही गोष्ट भगवंतानाहि पूर्ण पटल्यामुळें त्यांनीहि पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत. ते असें स्वच्छ सांगतात कीं, जगांत असा प्राणी नाहीं कीं, ज्याला मृत्यु येणार नाहीं व असें स्थान नाहीं कीं जेथें तो गांठणार नाहीं.

'न अंतलिक्खे न समुद्दमज्झे न पब्बतानं विवरं पविस्स । न विज्जती सो जगतिप्पदेसो यत्थट्ठितं नप्पसहेय्य मच्चु ॥' (ध. प. ९–१३) भावार्थ :– अंतरिक्षांत काय, समुद्रामध्यें काय, किंवा पर्वत कुहरांत काय, असें कोठें जरी दडून बसलें तरी मृत्यु गांठणार नाहीं असें स्थळ विश्वांत कोठेंच नाहीं. आणि तें अक्षरशः सत्य आहे. आणि तो क्षण म्हणजे सर्वांत अत्यंत दुःखद व दुःसह आहे, हें पुनः सांगावयास पाहिजे कीं काय ?

हें मरण नि हें म्हातारपण येवढ्यावरच ही दुःखाची कथा थांबती तर गोष्ट कांहीं निराळी होती; पण तशी वस्तुस्थिति नाहीं, हें मानवाचें मोठें दुर्दैव होय ! या संसारांत अधुन मधून दुःखाचे कांहींना कांहीं विपरीत प्रसंग असे सारखे घुटमळतच असतात. त्यांतील सांगण्यासारखा एक प्रकार म्हणजे ही आधिव्याधि होय. जरा मरणाचें दुःख काय लांबचें असून, मनुष्याला अखेर अखेर तें भोगावयाचें असतें. पण हें आधिव्याधि दुःख मात्र जन्मापासूनच पाठीस लागलेलें ! आज काय, डोकें दुखतें, उद्यां पोटशूळ उठला, परवां ताप आला, मध्येंच हींव भरलें, खोकला झाला, हातपाय धरले, असे एक कां दोन, कोणत्या ना कोणत्या रूपानें तरी हा रोग राक्षस मनुष्यास सदानकदा सतावीतच असतो ! या आधि-व्याधिचे अनेक प्रकार असल्यामुळें व त्यांचा मारा शरीरावर वारंवार निरनिराळ्या रूपानें होत असल्यामुळें त्या दुःखाची मोजदाद करणें हें आवांक्याबाहेर आहे.

शिवाय आणखी, हा व्याधीचा प्रश्न बाजूस ठेवला तरी प्रपंचांत हर-हमेष असे कांहीं प्रसंग उद्भवतात कीं, त्यामुळें जीव अगदीं बेचैन होऊन मोठ्या मेटाकुटीस येतो. केव्हां नावडत्या गोष्टी हटकून पदरांत पडतात व आवडत्या गोष्टी नेमक्या निसटून जातात. या सर्वांचें पर्यवसान अखेर दुःखांतच होतें. अप्रिय गोष्टींचा संयोग व प्रिय गोष्टींचा वियोग यांची या प्रपंचांत जणूं कांहीं शर्यतच चालली असून, त्यांच्या तावडींत सांपडलेल्या बिचाऱ्या जीवाची त्रेधा व तिरपीट इतकीच म्हणून सांगून पुरवत नाहीं. समुद्राच्या तरंगाप्रमाणें या दुःखाच्या लाटा एकामागून एक अशा अंतःकरणावर सारख्या कमी अधिक प्रमाणांत आदळत व आपटतच असतात ! आणि त्या तडाख्यांत सांपडून बापुडा हा जीव अगदीं हैराण, बेचैन व त्रस्त होऊन

संसार सगळा वस्तुतः दुःखमय आहे! ही गोष्ट अगदीं सत्य सत्य आहे. हेंच त्यांचें पहिलें आर्यसत्य होय. भगवंतांना जगांत दिसलें तें हेंच! हें क्षणभंगुर सुख म्हणजेंच संसार दुःख!!

आतां येथें ही गोष्ट स्पष्ट करून सांगणें जरूर आहे कीं, प्रत्येकाला वरील सर्व दुःखाचा प्रत्यक्ष अनुभव येतोच येतो, अगर आलाच पाहिजे, असें नसून, त्या गोष्टी अखेर दुःखांत मोडतात, याचें सम्यग् ज्ञान झालें म्हणजे झालें. हेंच निराळया शब्दांत सांगावयाचें तर जग हें सकृद्दर्शनी सुखदायक दिसलें व वाटलें तरी परिणामीं तें दुःखदायक आहे, ही गोष्ट विचाराला पटली म्हणजे झालें. प्रत्येक दुःखाचा प्रत्येक मनुष्याला प्रत्यक्ष अनुभव आलाच पाहिजे, असा आग्रह नाहीं. कारण धर्माचें अधिष्ठान ज्ञानावरच आहे. म्हणून जगाचें वास्तव स्वरूपाचें ज्ञान झालें म्हणजे कार्यभाग झाला, हे पहिलें आर्यसत्य प्रथम सांगण्याचा भगवंतांचा हेतु हा कीं, दुःख हें मनुष्याला स्वाभाविकपणेंच नको असल्यामुळें तें कसें उद्भवतें व कसें टाळतां येईल, हें त्यांस पुढें सांगावयाचें आहे. तें आतां पुढील प्रकरणीं पाहूं.



प्रकरण २ रें

# आर्यसत्य दुसरें

# दुःखसमुदय

'इदं खोपन भिक्खवे दुक्खसमुदयं यं अरियसच्चं यायं तण्हा पोनोभविका नन्दीरागसहगता तत्रतत्राभिनन्दिनी, सेय्यथीदं, कामतण्हा, भवतण्हा, विभवतण्हा ।'

( धम्मचक्क पवत्तन सुत्त, ६ )

भावार्थ :- दुःखोत्पत्ति, हें भिक्षुहो ! दुसरें आर्यसत्य आहे. तें कोणतें म्हणाल तर ती ही तृष्णा होय. ही जी तृष्णा, ती पुनः पुनः उद्भवणारी, राग व लोभ यांनी युक्त, संसारांत जेथें तेथें रममाण होणारी, अशी असून, तिचे कामतृष्णा, भवतृष्णा व विभवतृष्णा असे तीन प्रकार आहेत.

संसार हा दुःखमय आहे, असें मागच्या प्रकरणांत सांगण्यांत आलें. कारण तेथें सर्वत्र अनित्य वस्तूंचाच प्रपंच नटला आहे. नाश नाहीं—अंत नाहीं—अशी वस्तूच तेथें सापडावयाची नाहीं. आणि म्हणून या चंचल व क्षणभंगुर विश्वपसाऱ्यांत शाश्वत सुखाची आशा नसून, तेथें रममाण होणारें हें भाबडें मन डिसूळ विषयसुखाच्या नादीं लागून, पदोपदीं दुःखाच्या खाईंत व भडक्यांत सांपडून विव्हळत व उद्विग्न होत असतें. अशी जर या प्रपंचाची कथा आहे, तर मग तें दुःख कां होतें, त्याला कांहींतरी कारण आहे, कां तें स्वयंसिद्ध आहे, हा प्रश्न मग ओघानेंच पुढें येऊन उभा राहतो. याला भगवान बुद्ध असें उत्तर देतात कीं, त्या दुःखाला कारण आहे, तें कांहीं स्वयंसिद्ध म्हणजे स्वयंभू नाहीं. जगांत जेवढे म्हणून पदार्थ आहेत, त्या सर्वांना कारण आहे, जन्म आहे. कारण विश्वाची घटनाच अशी आहे कीं, तेथें कारणाशिवाय कोणतेंच कार्य घडत नाहीं. प्रत्येक कार्याला कांहींतरी कारण असतेंच असतें व लागतेंच लागतें. मग ते ज्ञात असो या अज्ञात असो. दृश्य असो या अदृश्य असो.

असें जर आहे, तर मग तें कारण असें कोणतें? जगांत कारणाशिवाय कार्य नाहीं,—अर्थात् कार्य कारण—नियतीनें हें जग बांधलें गेलें आहे. हे विश्व उभारण्यांत आलें आहे. असें जर आहे, तर तें कारण कोणतें? याला उत्तर भगवंतांनी वरील मथळ्यातील वचनांत स्पष्ट देऊन ठेविलें आहे. तें म्हणजे—दुःखाचें मूळ—म्हणजे ही तृष्णा! कामभोगेच्छा! विषय सुखलालसा! ही जी कामतृष्णा-विषयसुखपभोगलालसा—तीच सर्व दुःखाची मायकूस आहे! मनुष्याला पदोपदी दुःखाचे चटके देणारी ती हीच तृष्णा! ही मायावी तृष्णा! कसें, तें आतां पाहूं.

सकृद्दर्शनी आम्ही येथें हें सांगू इच्छितो कीं, बुद्ध भगवान यांचीं पावलें वैदिक ऋषींच्या—विशेषतः याज्ञवल्क्ययोगीश्वरांच्या—पावलांना धरूनच सरकत आहेत. म्हणून प्रथम वैदिक धर्माचें सांगणें सांगून मग बुद्ध भगवंताचें सांगणें सांगितल्यास तें वाचकांना अधिक पटणारें आहे. तेव्हां या विषयावर वैदिक ऋषी काय सांगतात, त्यांचा कौल काय पडतो, हें आतां पाहूं. त्यांच्या मतें मनुष्यप्राण्याची घडणच मूलतः अशी आहे कीं, तेथें तृष्णा-वासना-सुखभोगेच्छा-ही स्वभावसिद्धच आहे. 'काममयोऽयं पुरुषः' असें याज्ञवल्क्यांनी शतपथांत स्पष्ट म्हटलें आहे. 'पुत्रकामो हि मर्त्यः' असें ऋग्वेदानें घोषित केलें आहे. याचा अर्थ असा कीं, वासना नाही—तृष्णा नाहीं—काम नाहीं—असा मनुष्यच सांपडावयाचा नाहीं. अर्थात् मनुष्य म्हटला कीं तेथें मन हें आलेंच. आणि मन आहे, तेथें वासना ठेविलेली. किंवा मनाचाच तो एक पर्यायच आहे. 'कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा धृतिर्हीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एव' (श. प. १४-४-३-९) असें योगीश्वरांनी मनाचें लक्षण-स्वरूप-सांगितलें असून, तें शास्त्रशुद्ध नाहीं असें कोण म्हणेल? वासना, संशय, निश्चय, श्रद्धा, नास्तिकता, धैर्य, भीरूता, लज्जा, बुद्धि, भय इत्यादि सर्व मनच म्हणजे मनाचेच निरनिराळे पर्याय आहेत.

यावरून हें उघड झालें कीं, जेथें मन आहे, तेथें काम—वासना—तृष्णा—ही निसर्गसिद्धच आहे. येथें वासना अगर तृष्णा या शब्दांत वासना, कर्म, व भोग या त्रिपुटीचा समावेश होतो. जोपर्यंत मनुष्य हा

अविद्यावश आहे म्हणजे इंद्रियनिष्ठ आहे, तोपर्यंत तो विविध पण नश्वर विश्वपसाऱ्यांत स्वभावतःच रंगून व गुंगून जातो, हा सृष्टीचा नियमच आहे. आणि तोपर्यंत वासना – कर्म – भोग – त्र्यात्मक भवचक्र त्याच्या मागचें कधींहि सुटावयाचें व चुकावयाचें नाहीं, व तें आतांपर्यंत कोणालाहि सुटलें व चुकलें नाहीं !

हा सिद्धांत वैदिकांना काय किंवा बुद्ध भगवंताना काय दोघांनाहि सारखाच मान्य आहे. या बाबतींत दोघांचेंहि संपूर्ण मतैक्य आहे. मनुष्याकडून जी काय हालचाल होते तिच्या मुळाशी वासना – सुखेच्छा – असते. त्याशिवाय कर्म शक्यच नाहीं. 'सुखं लब्ध्वा करोति । नासुखं लब्ध्वा करोति' – सुख मिळत असेल तर मनुष्य कर्म करतो. असुख म्हणजे दुःख मिळत असेल तर कर्म करण्यास उद्युक्त होत नाहीं. असें छांदोग्यात चक्क म्हटलें असून 'सुखाय कर्माणि करोति लोकः' – सुखासाठीच मनुष्य कर्म करतो – असें भारतांत म्हटलें आहे. याचा भावार्थ असा कीं, मनुष्याची सर्व धडपड सुखासाठींच आहे व असते. त्यातच दुःखनिवृत्ति हा भावहि अभिप्रेत आहे. सुखप्राप्ति व दुःखनिवृत्ति यासाठींच कर्माचा अवतार आहे. सुखाचे ठोकळमानाने दोन भाग पडतात. त्यांत एक चंचल व नश्वर सुख. हें विषयनिष्ठ व इंद्रियगम्य आहे. दुसरें नित्य व शाश्वत असून तें बाह्य जगावर अवलंबून नसून, तें अंतरंगातच बुद्धिग्राह्य व आत्मगम्य आहे. या दोन सुखांपैकीं, पाश्चात्य पंडित इंद्रियनिष्ठ सुखालाच सुख म्हणतात व सुख समजतात. पण हें विषयसुख नश्वर असल्यामुळे वैदिक ऋषी त्याला सुख म्हणत व समजत नाहींत. कारण जें नश्वर तें सुख नव्हे - न अल्पे सुखमस्ति - अल्पांत म्हणजे नश्वरतेंत सुख नाहीं – असा त्यांचा ठाम निश्चय असल्यामुळें खरें व शाश्वत सुख कोणतें, याचा शोध केला पाहिजे - 'सुखं त्वेव विजिज्ञासितव्यं' - असें त्यांनी जिज्ञासूंना नीट बजावून सांगितलें आहे. आणि भगवान बुद्धाचा उपदेश झाला तरी हाच आहे. जें सुख नश्वर त्याला ते सुख न म्हणता दुःख हा शब्द वापरतात. 'यदनिच्चं तद्दुक्खं' - जें अनित्य म्हणजे नश्वर तें सगळें दुःखच होय - हें त्यांच्या दुःख मीमांसेचें मुख्य पालुपद आहे. आणि सुखवासना नसेल तर मनुष्याकडून कर्म घडणें - हालचाल

होणें-शक्यच नाहीं. मनुष्याच्या सर्व प्रापंचिक चळवळीच्या बुडाशी ही सुखवासनाच स्फुरत असते. ही गोष्ट 'अकामस्य क्रिया काचित् दृश्यते नेह कर्हिचित् । यद्यद्धि कुरुते किंचित्त-त्तत्कामस्य चेष्टितम्' असें मनूनें म्हटलें आहे, तें अनुभवसिद्ध नाहीं, असें कोण म्हणेल ? असो.

याज्ञवल्क्यानी या कर्माची तत्त्वज्ञान-चिकित्सा केली आहे, ती खरोखर येथें मननीय आहे. कर्म कसें घडतें, त्याची मीमांसा योगीश्वर सांगतात तें असें:-' काममयोऽयं पुरुषः, स यत्कामो भवति तथा क्रतुर्भवति, यथाक्रतुर्भवति तत्कर्म कुरुते, यत्कर्म कुरुते तदभिसंपद्यते'(श.प.१४-७-२-२७) मनुष्य वासनामय आहे. तो जशी इच्छा करतो, तसा त्याचा निश्चय ठरतो; जसा निश्चय ठरतो तसें कर्म घडतें आणि जसें कर्म घडतें तसें फळ मिळतें, अशी ही योगीश्वराची कर्ममीमांसा आहे. या एकाच वचनांत वासना, कर्म व फळ या त्रयीचा समावेश झाला असून, त्याचा उल्लेख वैदिक ऋषी कर्म या शब्दानेंच करतात. आणि भगवान बुद्धाच्या प्रतीत्य समुत्पादाचें बीज यावरील याज्ञवल्क्य-वचनांतच गर्भित झालेलें आहे, हें सुज्ञ वाचकांच्या तेव्हांच ध्यानांत येण्यास फारसें कठीण पडणार नाहीं. त्याची प्रचीति पुढें येईलच.

हेंच सोप्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे प्रथम इच्छा, मग निश्चय, नंतर कर्म, आणि अखेर भोग. अशा सुखप्राप्तीच्या चढत्या पायऱ्या आहेत. हेंच दृष्टांत रूपानें सांगावयाचें तर बीज-वृक्ष-फल हें उदाहरण पुढें करून सांगता येईल. बीज, वृक्ष, फल यांचा जो अन्योन्य संबंध तोच काम-कर्म-भोग यांचाहि आहे. म्हणजे कामाशिवाय कर्म नाहीं, व कर्माशिवाय भोग नाहीं.

यावरून हें उघड आहे कीं, सर्व भोगांच्या मुळाशी कामाचें-म्हणजे वासना ऊर्फ तृष्णेचें-पाणी खेळत आहे व असतें. वैदिक श्रुति जिला काम ऊर्फ वासना म्हणतात, तिलाच भगवान बुद्ध तृष्णा (तण्हा) या नांवानें संबोधितात. शब्दांत फरक असला अगर दिसला तरी अर्थात् साम्य आहे. आतां ही वासना ऊर्फ तृष्णा मनुष्यांत कां व कशी उद्भवते, याविषयीं

दोन शब्द सांगणें हें आतां अपरिहार्यच झालें. 'मला अमुक पाहिजे, अमुक पाहिजे' ही जी मनोवृत्ति तीच वासना उर्फ तृष्णा होय. 'इदं, मे स्यादिदं मे स्यादितिच्छा काम संज्ञितः'–मला हें असावें, हें मिळावें, अशा प्रकारच्या ज्या इच्छा, वासना, त्यांना काम हें नांव आहे, असें विद्यारण्यांनी पंचदशींत कामशब्दाची व्याख्या केली आहे. (पं.६–२६१). अर्थात् हवेसें वाटणें हीच वासना, हाच काम नि हीच तृष्णा. वासना, काम, तृष्णा, हृदयग्रंथि हे सर्व एकाच अर्थाचे पण वेगवेगळे पर्याय शब्द आहेत.

आतां ही वासना उद्भवण्यास मनुष्याच्या अंतरंगांत कोणती प्रक्रिया घडते, याचा थोडक्यांत शोध घेऊं. बाह्य जग व तेथील विविध पदार्थ यांच्या गुणरूपाचें ज्ञान होण्यासाठीं म्हणून शरीरांत ज्ञानेंद्रियांची योजना करण्यांत आली असून, त्यांचा व त्यांच्या विषयभूत जागतिक पदार्थांचा संबंध आला म्हणजे त्या संपर्कापासून एक प्रकारच्या संवेदना उत्पन्न होतात. त्या वेदना अनुकूल म्हणजे सुखोत्पादक असल्या तर मन तेथें रत होऊन, त्या वस्तूंशीं सतत संबंध ठेवण्याची इच्छा करतें. सुखाची व्याख्या वैदिक पंडित 'अनुकूल वेदनीयं सुखं'–विषयसंस्पर्शापासून होणाऱ्या अनुकूल वेदनांना सुख-अशी करतात. हाच भावार्थ भगवान बुद्धांनीहि 'इट्ठफोट्ठब्बानुभवलक्षणं सुखं-इष्ट वस्तूचा अनुभव म्हणजे सुख-या वचनांत अनुवादित करून ठेविला आहे. इष्ट वस्तूंच्या स्पर्शापासून होणाऱ्या अनुभवाला-मधुर संवेदनाला-सुख असा भगवंतांचा मथितार्थ असून, वैदिकांचाहि तोच भाव वरील वचनांत आला आहे. म्हणजे सुखोत्पादक वस्तूची इच्छा म्हणजेच वासना.

हें जरा अधिक स्पष्ट करून सांगावयाचें झालें, तर उदाहरणरूपानें असें सांगता येईल. समजा, आपण संध्याकाळच्या वेळीं फिरावयास गेलो आहों, रस्त्यावरून चाललो असतांना आजूबाजूच्या बंगल्यापुढील बागेंत गुलाबाचीं लहान मोठीं व रंगीबेरंगी अशीं मधुर व मनोहर फुलें प्रफुल्ल फुलून झाडावर आनंदानें डुलत आहेत. तिकडे आपली सहज दृष्टि गेली म्हणजे तें मोहक रूपसौंदर्य पाहून डोळे तेथें लुब्ध होतात, व गोड पराग

नाकाला मोहित करतो. अर्थात् तें रूप पाहून डोळ्याला व वास घेऊन नाकाला सुख व समाधान होतें. त्यावेळीं ती फुलें जवळ घेण्यास हात वळवळूं लागतात. पण दुसऱ्याच्या बागेंत तीं असल्यामुळें निरुपायानें पाऊल पुढें टाकणें भाग पडतें. जसजसें पुढें पुढें जावें तस तसें पुनः त्या मोहक फुलांची आठवण होऊन, तें फूल जवळ असावेसें वाटतें. हें जवळ असावेसें वाटणें हीच वासना.

आणि ती उत्कट झाली-बलवत्तर झाली म्हणजे तिचे इच्छेंत रूपांतर होतें. हीच बुद्धाच्या मतें तृष्णा होय. याच प्रमाणें इतर इंद्रियांचीहि गोष्ट आहे. सुख-दायक वस्तूंची उपभोगेच्छा म्हणजेच तृष्णा. हीच गोष्ट भगवान् बुद्ध पुढील प्रमाणें स्पष्ट करून सांगतात. ते म्हणतात :– 'भिक्षूहो! येथें पुनः पुनः उद्भवणारी, राग व लोभ यांनी युक्त, व जेथें तेथें सुखांत रममाण होणारी अशी जी, तीच तृष्णा होय. कामतृष्णा, भवतृष्णा व विभवतृष्णा अशी ती त्रिविध असून, सर्व दुःखाची तीच मायकूस आहे' ( 'कतमञ्च भिक्खवे दुक्खसमुदयं अपरियसच्चं ? या' यं तण्हा पोनोभविका, नन्दिराग सहगता तत्र तत्राभिनन्दिनी, सेय्यथीदं – कामतण्हा, भवतण्हा, विभवतण्हा ) ( दी. नि. २२–२–९ ) यावरून ही गोष्ट स्पष्ट आहे कीं प्रथम सुखाचे आमिष दाखवून अखेर दुःखाचे चटके देणारी अशी ही मायावी तृष्णा आहे. ती अविद्येची सहचारिणी आहे. सर्व दुःखाचे मूळ जशी अविद्या तशीच ही तृष्णाही पण आहे. या तृष्णेच्या साम्राज्यांत सर्व अनित्य वस्तूंचा अंतर्भाव होतो. आणि म्हणून 'अविज्जा–तण्हावसेन द्वे मूलानिच वेदितब्बा' – अविद्या व तृष्णा हीं दोन संसाराची मुळें असून सूज्ञांनी तीं जाणलीं पाहिजेत, असें अभिधम्मांत म्हटलें आहे. ( अ. ध. १–८–३–९ ).

आतां ही तृष्णा कशी संभवते, कशी उत्पन्न होते, याविषयीं दीघनि-कायांत भगवान बुद्ध पुढील प्रमाणें सांगतात. 'सा खो पने' सा भिक्खवे तण्हा कत्थ उप्पज्जमाना उप्पज्जति कत्थ निविसमाना निवसति ? । यं लोके पियरूपं सातरूपं, एत्थे' सा तण्हा उप्पज्जमाना उप्पज्जति निविसमाना निविसति ।' ( दी. नि. २२–१९ ). भावार्थ :– 'भिक्षूहो ! ही तृष्णा कशी संभवते व कशी घर करून राहते, असें तुम्ही विचाराल

तर त्याला उत्तर हें कीं, संसारांत जें जें म्हणून प्रियकर आहे, सुखकर आहे, तेथें तेथें ही तृष्णा उगम पावते. आणि त्यामुळेंच ती मनुष्याच्या अंतरंगांत घर करून – बिऱ्हाड ठोकून – वसते.

अर्थात् हें कसें घडून येतें तर तो प्रकार असा:–मनुष्य हा जसजसा वाढत जाईल–मोठा होत जाईल–तसतसा त्यास जगाचा अधिकाधिक संबंध येत जाऊन विविध विषयाचें तो सेवन करूं लागतो. उदाहरणार्थ, तो डोळ्यानें पदार्थाचें रूप पाहतो. तें प्रिय असल्यास तो तेथें रंगतो म्हणजे त्या वस्तूवर त्याचें प्रेम जडतें व तें अप्रिय असल्यास त्याचा तो द्वेष करतो, म्हणजे त्यापासून विन्मुख होतो. म्हणजे प्रिय वस्तूवर त्याचें प्रेम जडतें व अप्रिय वस्तूवर द्वेष जडतो. त्याचप्रमाणें तो कानानें शब्द ऐकतो, तो गोड लागला तर त्यावर त्याचें प्रेम जडून, त्यामध्यें तो रममाण होतो. नाकानें तो पदार्थाचा वास घेतो. तो मधुर असल्यास, त्यावर त्याचें मन जडून त्यामध्यें तो आसक्त होऊन राहतो. याचप्रमाणें इतर इन्द्रियांची सुद्धां गोष्ट आहे. सारांश इंद्रियांचा हा जन्मजात स्वभावच आहे कीं, राग-द्वेष हे त्याचे स्वभावसिद्ध आहेत. आणि प्रिय वस्तूवर प्रेम व अप्रिय वस्तूवर द्वेष करणें हा त्यांचा धर्मच आहे. 'इंद्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ' असें श्रीकृष्णांनी गीतेंत मागेंच सांगून टाकलें आहे. आणि हा सिद्धांत बुद्धांनाहि पण अमान्य आहे, असें नाहीं.

याप्रमाणें इष्ट व प्रिय वस्तूंमध्यें अनुरक्त होणारा–आसक्त होणारा–मनुष्य त्या वस्तूंच्या स्पर्शापासून होणाऱ्या सुसंवादी गोड वेदनांत आनंद मानतो. त्याचें गोडवे गातो व त्याचा उपभोग घेतो. त्या वेदनांना आपलेपणा दिल्याने त्यांत राग म्हणजे प्रेम उर्फ आसक्ति उत्पन्न होते. या आसक्तीलाच भगवान बुद्ध उपादान असें म्हणतात. उपादान म्हणजे प्रिय वस्तूवरील आसक्ति होय. आणि ती वस्तु उपभोगण्याची जबर वासना उर्फ इच्छा म्हणजेच तृष्णा. या उपादानयुक्त विषयवासनेमुळें पुढें भवाची म्हणजे गर्भाची उत्पत्ति होते. आणि त्या भवापासून पुढें योग्य काळीं जन्म होतो. आणि जेथें जन्म आहे, तेथें जरा व मरण हीं दुःखलें पुढें टेविलेलीच. याप्रमाणें संसाराचें मूळ कारण म्हणजेच ही तृष्णा असून तिच्या-

पासूनच जन्म, जरा, मरण, शोक, पीडा, चिंता, आक्रोश इत्यादि दुःखात्मक संसाराचा महावृक्ष अंकुरला, वाढला व विकास पावला आहे.

आतां संसारांत मनुष्याला काय प्रिय आहे, याविषयीं बुद्ध सांगतात तें असें:–' भिक्षूहो, संसारांत काय प्रिय आहे, असें तुम्हीं विचाराल तर त्याला उत्तर हें कीं, संसारांत चक्षु हा प्रिय आहे. कारण त्यांत सुख आहे. तसेंच त्याचा विषय जें रूप, तेंहि प्रिय आहे. कारण त्यांतहि सुख आहे. त्याचप्रमाणें श्रोत्र व त्याचा विषय शब्द, घ्राण व त्याचा विषय गंध, जिव्हा व तिचा विषय रस, काय व त्याचा विषय स्पर्श, हीं सर्व सुखकर असल्यामुळें तीं प्रियकर आहेत. आणि या द्वंद्वापासून ही तृष्णा उत्पन्न होते व अंतःकरणांत घर करून राहते.

त्याचप्रमाणें चक्षुरादि इन्द्रिय–विज्ञान म्हणजे विषय स्पर्शज्ञान व त्यापासून होणारी वेदना. हीं दोन्ही सुखकर असल्यामुळें त्या सर्व प्रियकर आहेत. आणि म्हणून त्यापासून अंतःकरणांत तृष्णा उद्‌भवते व मुळी धरून राहते. तसेंच रूपादि विषय–संज्ञा, विषय–संचेतना, विषय–वितर्क व विषय–विचार ( म्हणजे ध्यान अगर चिंतन ) हे सर्व प्रियकर आहेत. कारण त्यांत सुख आहे आणि म्हणून त्यापासून तृष्णा अंकुरते व वाढीस लागते. ( दीघनिकाय २२–१९ ). तिचें विषबीज एकदाचें अंतकरणांत रुजून, दृढमूल होऊन वाढीस लागलें म्हणजे, मनुष्य प्रेमांध - मोहांध - होऊन आस्ते आस्ते मग न कळतच दुःखाच्या डोहाकडे कसा आकर्षिला जातो - ओढला जातो - व अखेर मृत्युच्या आहारीं कसा जाऊन पडतो, याचें वर्णन भगवंतानी फार उत्तम रीतीनें व मोठ्या मार्मिकतेनें करून, तृष्णेचें फसवें म्हणजे मायावी व सत्य स्वरूप उघड करून दाखविलें आहे व तें मननीय असल्यामुळें तें येथें देऊन मग पुढील वाटचालीस लागतो.

ही तृष्णा नदी, विषयी मनुष्यास न कळत दुःख सागराकडे - अनर्थ - परंपरेकडे - आस्ते आस्ते कशी ओढून नेते, त्याचें वर्णन बुद्धांनी पुढील वचनांत स्पष्ट करून दाखविलें आहे, तें असें :– 'इति खो आनंद ! वेदनं पटिच्च तण्हं, तण्हं पटिच्च परियेसना, परियेसनं पटिच्च लाभो, लाभं पटिच्च विनिच्छयो, विनिच्छयं पटिच्च छन्दरागो, छन्दरागं पटिच्च

अज्झोसानं, अज्झोसानं पटिच्च परिग्गहो, परिग्गहं पटिच्च मच्छरियं, मच्छरियं पटिच्च आरक्खो, आरक्खाधिकरणं दण्डदान-सत्थादान-कलह -विग्गह-विवाद-तुवंतुवं-पेसुञ्ञ-मुसावादा-अनेके पापका अकुसला धम्मा सम्भवन्ति ॥' ( दीघनिकाय, १५-९ ) भावार्थः— याप्रमाणें, आनंदा ! वेदनेमुळें तृष्णा उत्पन्न होते. तृष्णेमुळे विषय शोध, पर्येषणेमुळें लाभ, लाभामुळे विनिश्चय ( दृढ निश्चय ), विनिश्चयामुळें छंदराग ( प्रयत्न करण्याची इच्छा ), छंदरागामुळें अध्यवसान म्हणजे प्रयत्न, अध्यवसानामुळें परिग्रह ( जमा करणें ), परिग्रहामुळें, मात्सर्य, कंजूषपणा मात्सर्यामुळें चिंता, चिंतेमुळें दंडग्रहण, शस्त्रग्रहण, कलह, विग्रह, विवाद' मीमी-तूंतूं, चुगुली, असत्य भाषण, व अनेक पापधर्म उत्पन्न होतात. म्हणजे तृष्णेपासून ही अशी अनर्थ परंपरा उद्भवते.

अर्थात् या तृष्णेमुळें–अधाशीवृत्तीमुळें–मनुष्याचें अधःपतन कसें होतें, हें चित्र भगवंतानी वरील वचनांत स्पष्ट व सुंदर रंगवून दाखविलें आहे. तें डोळ्यापुढून गेल्याबरोबर बहुश्रुत वाचकांना 'ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते। संगात् संजायते कामः कामात्क्रोधोभि जायते ॥ क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥' या गीतावचनाची सहज आठवण होते. नाहीं काय ? सांगण्याची तऱ्हा वेगळी असली तरी भावार्थ दोहोंतला सगळा एकच. असो.

आतां ही जी तृष्णा आहे, ती तीन प्रकारची आहे. कामतृष्णा भवतृष्णा व विभव-तृष्णा. कामतृष्णा म्हणजे विषयसुख भोगेच्छा. प्रापंचिक सुख लालसा. या काम शब्दांत कशाकशाचा समावेश होतो, याचें स्पष्टीकरण विसुद्धमग्गांत केलें आहे, तें असें:–छन्दो कामो, रागो कामो, छंदरागो कामो, संकप्पो कामो, रागो कामो, संकप्परागो कामो, इमे वुच्चन्ति कामा ' (वि. म. ४-८३). छंद, राग, छंदराग, संकल्प, संकल्पराग, यांना काम असें म्हणतात. हा जो काम म्हणजे सुखभोगेच्छा यानें युक्त अशी ही विषयाभिनंदिनी तृष्णा आहे, तिला गौतमबुद्ध सत्काय-समुदय म्हणजे आत्मवादाचें कारण असें म्हणतात. ( मज्झिमनिकाय, चूळवेदल्ल सुत्त, ४४) हें कामतृष्णेचें स्पष्टीकरण झालें. आतां भवतृष्णा म्हणजे येथें

मृत्युलोकीं जन्मणेची इच्छा व विभवतृष्णा म्हणजे परलोकीं जन्मणेची इच्छा होय.

या कामनेमुळेंच – सुखलालसेमुळेंच – आणि तिच्या प्रोत्साहनानेंच प्रसंगविशेषी राजा राजाशी भांडतो, क्षत्रिय क्षत्रियाशी भांडतो, ब्राम्हण ब्राह्मणाशी भांडतो, वैश्य वैश्यांशी भांडतो, आई मुलाशी, मुलगा आईशी, पुत्र पित्याशी, पिता पुत्राशी, भाऊ भावाशी, व बहीण भावाशी झगडत असते. व लोक याप्रमाणें परस्परांत भांडूं झगडूं लागले असतां, तें भांडण विकोपास जाऊन पुढें मुष्टामुष्टी होते, लाठीकाठी चालते, व शस्त्राशस्त्रीं चमकते. आणि अखेर दुःखाचा डोंब उठतो व त्यांतच मरणहि येतें !! अर्थात् हें मरण म्हणजे महद्दुःख !! हा कामवासनेचा –जागतिक सुखलालसेचा – स्वार्थप्रेरित महत्वाकांक्षेचा – दुष्परिणाम होय.

त्याचप्रमाणें ह्या कामवासनेमुळेंच – सुखलालसेमुळेंच – चोर घरफोडी करतात, रस्ता रोखतात, लूटमार करतात भोसका भोसकी करतात. या कामवासनेमुळेंच स्त्रीपुरुष व्यभिचारकर्म करण्यास प्रवृत्त होतात. आणि या सर्वांना परिणाम अखेर असा होतो कीं, पुढें राज-सेवक या गुन्हेगारांस पकडून घेऊन जातात व त्यांना दंड व शिक्षा करतात. काठीनें सडकतात, चाबकानें चोपतात, हात छाटतात, दंड तोडतात, केव्हां केव्हां गुन्ह्याच्या मानानें सुळावर चढवितात अगर तलवारीनें मस्तक छाटतात ! अशा रीतीनें हे कामासक्त पुरुष स्वार्थानें व लोभानें प्रेरित होऊन, लहान मोठे गुन्हे करून, अखेर मरण ओढवून घेतात. आणि त्यांत ते दुःखभागी होतात. हा सर्व कामवासनेचा-तृष्णेचा-दुष्परिणाम नव्हे तर काय ?

शिवाय आणखी, सुख मिळावें म्हणून मनुष्य उद्योग करून, चाकरी करून, राजसेवा करून व इतर व्यवहार करून पुष्कळ पैसे मिळवितो, वतनवाडी करून शेतांत राबतो; पण त्याच्या मनांत रात्रंदिवस ही भीति असते कीं, हे माझे पैसे चोर लुटून तर नेणार नाहींत ना ! बांधलेलें घर आगीनें जळून जाणार नाहीं ना ! पाणी वाहून नेणार नाही ना ! भाऊबंद हिरावून घेणार नाहींत ना ! अशी विवंचना त्यास रात्रंदिवस बेचैन करीत

असते आणि दुर्दैवानें मधेंच अचानक कांहीतरी संकट ओढवून त्यास मरण-प्राय दुःख होतें !! हे वरील सर्व प्रकार अमर्याद तृष्णेचेच दुष्परिणाम होत. ( मज्झिमनिकाय, महद्दुक्ख क्खंध सुत्त १३ ).

फार काय सांगावे, मनुष्य हा सुखोपभोगाच्या फाजील भरीस पडून, तत्प्राप्त्यर्थ हीन कर्म करण्यास, दुष्कर्म करण्यास, प्रवृत्त होतो. यामुळेच जगांत सर्वत्र अनर्थ माजून राहतात. या तृष्णेच्या नादीं लागूनच, सुखाशेच्या आहारीं जाऊन, तो शरीरानें दुष्कर्म करण्यास तयार होतो. वाणीनें व मनानें हीन कर्म करण्यास प्रवृत्त होतो. याप्रमाणें नीच कर्म करून कांहीं काळ तो सुखी होतो. हें खरें असलें, तरी अखेर त्याचें पापकर्म कोणत्या ना कोणत्यातरी रूपानें पुढें उभें राहून, शेवटीं दुःखाचें मापच त्याच्या पदरीं येऊन पडतें व तेव्हां त्यास महद्दुख होतें ! व मेल्यावर त्या पापकर्माचें प्रायश्चित् त्यास भोगावें लागतें, हें निराळेंच. हा कामवासनेचा कटु परिणाम होय.

'भिक्षूहो ! पापकर्म करून, दुष्कर्म करून, हीन कर्म करून, मनुष्य बचावेल, सुरक्षित राहील असें स्थान आकाशांत नाहीं, समुद्रांत हीं, पर्वत कंदरांत नाहीं. या संसारांत असें स्थळच नाहीं कीं, जेथें पळून व लपून बसल्यास त्या पापी मनुष्याचा त्या पापापासून बचाव होईल !!

'न अंतलिक्खे न समुद्दमज्झे ।
न पर्वतानं विवरं पविस्स ॥
न विज्जती सो जागतिप्पदेसो ।
यत्थट्ठितो मुञ्चेय्य पापकम्मा ॥ ( ध. प. ९-१२ ).

एवंच, तात्पर्य काय तर या तृष्णेमुळे-कामनेमुळे-विषयलोभामुळे जगांत संघर्ष उत्पन्न होऊन, योग्यायोग्य विचार न करतां स्वार्थ साधण्यास मनुष्य उद्युक्त होतो आणि त्या भरांत दुष्कर्म करण्यास-नानाविध पातकें-करण्यास--तयार होतो. आणि तीं पातकें करून शेवटीं आपल्यावर अनेक आपत्ति विपत्ति-नाना तऱ्हेचीं संकटें-ओढवून घेऊन, अखेर दुःखाच्या डोहांत जाऊन गडप होतो ! हा अनर्थ पाहून बुद्धांनी या तृष्णेला दुःखसमुदय-म्हणजे दुःखोत्पत्तीचें मूळ-संसारबीज-असें म्हटलें, तें यथायोग्यच आहे, असें म्हटल्यास त्यांत चूक ती काय झाली? क्षणभंगुर-कालभंगुर-

जागतिक नश्वर सुखाच्या मोहाला बळी पडून हा सुखलोलुप अज्ञ व अल्प मानव जन्म-मरणरूपी संसाराच्या फेऱ्यांत पडून, भवबंधनांत अडकून, सारखा दुःख व कष्ट- हाल नि अपेष्टा-सोशीत व अनुभवीत आहे व असतो, ही गोष्ट-हें पारमार्थिक सत्य-भगवंतानी पुढील गाथेंत स्पष्ट गोवून दाखविलें आहे, तें असें:-

'सरितानि सिनेहितानिच ।
सोमनस्सानि भवन्ति जन्तुनो ।
ते सोतासिता सुखे-सिनो ।
ते वे जाति जरूपगा नरा ॥
तसिणाय पुरक्खता पजा, ।
परिसप्पन्ति ससो व बाधितो ॥
सञ्योजन-सङ्ग-सत्ता ।
दुक्खमुपेन्ति पुनप्पुनं चिराय ॥

( ध.प. २४-८७९ )

भावार्थः- या तृष्णारूपी नद्या त्या प्राण्यांच्या मनाला सुखकारक व आनंददायक वाटतात. म्हणून जनता त्या प्रवाहांत पडून सुखाच्या इच्छेमें जन्म-जरा-मरणादिकाच्या चक्रांत अडकून पडते. या तृष्णेच्या मागें लागलेले प्राणी व्याधाच्या जाळ्यांत सांपडलेल्या ससाप्रमाणें अिकडून तिकडे नि तिकडून अिकडे असे सारखे धांवपळ करीत असतात. तृष्णेच्या मगरमिठींत सांपडल्यामुळें व विषयपंकांत रुतल्यामुळें त्यांना दुःखाच्या खार्डीत पुनः पुनः पडावें लागतें !!

या सर्व विवेचनाचा धांवता आढावा घ्यावयाचा तर थोडक्यांत असें सांगता येओल कीं, मनुष्याला संसारांत जें दुःख होतें, जे कष्ट होतात, त्याला मूळ कारण ही तृष्णा, ती जगातील प्रिय वस्तूंत उत्पन्न होऊन, तिच्या अपेक्षेनें अंतःकरणांत ठाण मांडून बसते. याविषयीं भगवंतांचें वचन आहे, तें असें:- *यं लोके पियरूपं सातरूपं एत्थे' सा तण्हा उपज्जमाना उपज्जति, निवसमाना निवसति। इदं वुच्चति भिक्खवे दुक्खसमुदयं अरियसच्चं।'* ( दी. नि- २२-१९ ) -जगांत जें कांहीं प्रियकर व सुखकर असतें व जें कांहीं आवडतें, तेथें ही तृष्णा उत्पन्न होते व तेथेंच चिन्हड ठोकून राहते. याला भिक्षूहो, अरियसत्य असें म्हणतात.

अर्थात् ही तृष्णा प्रथम सुखाचें आमिष दाखवून, आणि केव्हां केव्हां सुखाचें मापहि पदरांत टाकून, नंतर मग मनुष्याला अचूक उचलून दुःखाच्या डोहांत भोरया करते! अर्थात् ही मोठी मायावी असून, अज्ञ व अल्पजन तिच्या मोहाला बळी पडून, रात्रंदिवस सारखे तिच्या भजनी लागतात व अखेर बिचारे फसतात व पस्तावतात. राग, द्वेष, मोह हे सर्व तिचे सायीदार व फंयारी असून त्यांच्या सहायानें, ती आपलें मोहजाल पसरते व हिसूळ विषयसुखलालसेनें मूढ प्राणी-विषयसुखाला चटावलेले-मूढ प्राणी त्यांत दीपावरील पतंगाप्रमाणें पटापट येऊन पडतात! ही जी चांडाळचौकडी—म्हणजे राग, द्वेष, मोह, तृष्णा—यांचें सामर्थ्य व दुर्दमनीयत्व पाहून व पेलून भगवंतानी ही पुढील गाथा म्हणून दाखविली.

> नत्थि रागसमो अग्गि
> नत्थि दोससमो गहो।
> नत्थि मोहसमं जालं
> नत्थि तण्हा समा नदी॥ ध.प. १८-१७

आणि असें असूनहि,—हा अनुभव जगाला नित्य येत असूनहि —मनुष्याचे डोळे अजून उघडत नाहींत, हे केवढें आश्चर्य!! अर्थात् दुःख कां व कसें उत्पन्न होतें, याचें भगवंतांनी दुसऱ्या आर्यसत्यांत निरूपण केलें आहे.



प्रकरण ३ रें

## आर्यसत्य तिसरें

# दुःख-निरोध

**इदं खो पन भिक्खवे दुक्खनिरोधं अरियसच्चं। यो तस्सा येव तण्हाय असेस-विराग-निरोध चागो पटिनिस्सग्गो मुत्ति अनालयो ॥** ( धम्मचक्क पवत्तन सुत्त ७ )

भावार्थः- आणि भिक्षूहो ! तिसरे आर्यसत्य काय आहे ? या तृष्णेपासून संपूर्ण वैराग्य, त्या तृष्णेचा निरोध, तिचा त्याग, परित्याग, तिच्या तावडीतून संपूर्ण सुटका, व तिच्याविषयीं अनासक्ति म्हणजे उपरति, याला म्हणतात दुःखनिरोध आर्यसत्य.

जगांत जिकडे तिकडे दुःखाचेंच प्रचंड व निबिड जाळें पसरून राहिलें असून, त्याचें मूळ तृष्णेंत रुजलें आहे, हें जर खरें आहे, तर मग या दुःखांतून-भवचक्रांतून-मुक्त होण्यास-पार पडण्यास-कांहीं मार्ग, उपाय, आशा आहे कीं नाहीं ? मनुष्य हा स्वभावतःच काममय-अर्थात् तृष्णावश-असल्यामुळें त्याला दुःखांतून मुक्त होणें कधींच शक्य नाहीं, असाच याचा अर्थ कीं काय ? हेंच दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें म्हणजे मनुष्याच्या कपाळीं शाश्वत दुःखच लिहिलें आहे, हाच इत्यर्थ गृहीत धरावयाचा काय ? 'तृष्णया बध्यते जन्तुः' अशी स्थिति प्राप्त झाल्यावर हा जन्ममरणाचा फेरा कांहीं केल्या चुकत नाहीं, व चुकविता येत नाहीं, असा प्रसंग प्राप्त होऊन, मनुष्य त्यामुळें हताश व निराश होऊं पाहील, तर बुद्ध भगवान त्यास धीर देऊन असें आश्वासन देत आहेत कीं, बेटा ! तसें भिण्याचें, हताश होण्याचें, कारण नाहीं ! जगांत दुःखाचें, निबिड जाळें माजलें आहे व त्याच्या बुडाशीं तृष्णेचें पाणी खेळत आहे, हें खरें असलें

तरी योग्य मार्गानें प्रयत्न केल्यास या प्रबल व उच्छृंखल तृष्णेला चांगला पायबंद घालता येतो, – नव्हे तिचा निरोध करता येतो, अितकेंच नव्हे तर तिचा उच्छेदहि करतां येतो, हेंहि पण तितकेंच खरें आहे. असें झालें म्हणजे सर्व दुःखाची मग आपोआपच निवृत्ति होऊन, मनुष्य हा मग या जन्मीच अखंड व उदंड आनंद साम्राज्यांत विहार करूं शकतो व करूं लागतो !

तेव्हां आतां हा प्रश्न सहजच उत्पन्न होतो कीं, या तृष्णेला पायबंद घालावयाचा कसा ? तिचा निरोध व नाश करावयाचा कसा ? याला भगवंताचें उत्तर असें कीं, तिचें उत्पत्ति स्थानच मुळीं नष्ट करावयाचें ! म्हणजे ज्यामुळें ती उत्पन्न होते, वाढीस लागते, तें बीजच भाजून काढावयाचें. तसें झालें तरच तरणोपाय आहे. एरवी नाहीं. या तृष्णेचा बीमोड झाला – तिचा नाश झाला – म्हणजे भव – गर्भवास – चुकतो. भव चुकला की जन्म चुकतो. जन्म चुकला म्हणजे मग जराहि नाहीं, मरणहि नाहीं. मग दुःखहि नाहीं, शोकहि नाहीं. या तृष्णेची मोहिनी नाहींशी झाली म्हणजे सगळे दुःखस्कंध आपोआपच निरुद्ध होतात आणि मग सगळा संसार – ग्रंथ संपुष्टांत येतो.

ही तृष्णा हृदयांत मुळी धरून राहते, त्याला मुख्यतः तीन कारणें आहेत. राग – द्वेष – व मोह, हीं तीं कारणें होत. जो पर्यंत हे रागद्वेष आहेत, तोपर्यंत तिचे उच्छेदन शक्य नाहीं. म्हणून रागद्वेषाचा प्रथम अस्त झाला पाहिजे. तो होण्यास वेदनांचा निरोध साधला पाहिजे. हा जो राग म्हणून विषय – प्रेम – तें वस्तूच्या स्पर्शामुळें होतें. म्हणजे राग हा प्रिय वस्तूंच्या संपर्कापासून होतो. ज्याचें मन विषयपंकांत रुतून बसले आहे, स्त्रीपुत्रवित्तादिकांत रंगलें व रमलें आहे, जागतिक जंजालांत गुरफटलें आहे, त्याची कामतृष्णा – विषयवासना – शमन पावणें शक्य नाहीं. म्हणून जें गोड लागतें, जें प्रिय वाटतें, जें मनोहर दिसतें, तें सर्व सकृद्दर्शनी सुखद भासत असलें, तरी पुढें कालांतरानें नाश पावत असल्यामुळें अखेर दुःखासच कारणीभूत होतें. आणि म्हणून तें सुख – तें नाशवंत सुख – परिणामीं दुःखदायक समजून, भयकारक समजून, शोकदा-

यक समजून, त्यापासून निवृत्त होणें-परावृत्त होणें-हेंच हितकर व परमसुखकर होय. मनुष्याचें शहाणपण तें इथेंच आहे.

जवळ जवळ असाच उपदेश बुद्ध उदायीला सांगत आहेत. तो उपदेश म्हणजे असा:- 'पञ्च खो इमे, उदायि, कामगुणा। कतमे पञ्च ? चक्खु विञ्ञेय्या रूपा इट्ठा कन्ता मनापा पियरूपा कामूपसंहिता रजनीया, सोतविञ्ञेय्या सद्दा, घानविञ्ञेय्या गन्धा, जिव्हाविञ्ञेय्या रसा, कायविञ्ञेय्या फोट्ठब्बा इट्ठा कन्ता मनापा पियरूपा कामूपसंहिता रजनीया। इमे खो उदायि पञ्च कामगुणा। यं खो उदायि इमे पञ्च कामगुणे पटिच्च उप्पज्जति सुखं सोमनस्सं इदं वुच्चति कामसुखं मीळहसुखं पुथुज्जनसुखं अनरियसुखं; न आसेवितब्बं न भावेतब्बं बहुलीकातब्बं, भायितब्बं एतस्स सुखस्सा'ति वदामि ॥ ( मज्झिमनिकाय ६६-८ )

भावार्थ :- उदायि ! हे कामगुण-म्हणजे विषयभोगेच्छा-पांच आहेत. कोणते पांच ? चक्षूनें ज्ञात होणारें इष्ट, मनोहर, प्रिय, प्रलोभनीय व रजनीय असें रूप, त्याच प्रमाणें श्रोत्रानें ज्ञात होणारे शब्द, घ्राणानें ज्ञात होणारे गंध, जिभेनें ज्ञात होणारे रस, कायेनें ज्ञात होणारा स्पर्श, हे सर्व इष्ट, मनोहर, प्रिय, प्रलोभनीय, व रमणीय असे आहेत. उदायि ! या अशा पांच कामगुणापासून-विषय संपर्कापासून-प्रेम, सुख व आनंद उत्पन्न होतो. यालाच कामसुख असें म्हणतात. हें जें काम सुख आहे, तें क्षुद्र मीढ सुख, अज्ञ-जनसुख, अनार्य सुख असून तें असेवनीय व अवर्धनीय आहे. या सुखाला भ्यायला पाहिजे. अर्थात् अशा कामसुखाचा-इन्द्रिय-सुखाचा-त्याग केला पाहिजे. तरच तृष्णेला पायबंद बसतो, असें सांगण्याचा भगवंताचा भावार्थ.

त्याचप्रमाणें हे पांच उपादान स्कंध-म्हणजे नामरूपात्मक शरीर-अर्थात् शरीरगत रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान-हेहि नश्वर व म्हणून अनित्य असल्यामुळें तेहि दुःखरूपच होत. 'यदनिच्चं तद्दुक्खं'-जें अनित्य तें दुःख-हें बुद्धभगवंताचें मुख्य पालुपद असून, हे पांच उपादान-स्कंध अनित्य असल्यामुळें त्यांची गणनाहि दुःखांतच करण्यांत

झाली आहे. पण पृथग्जन—म्हणजे सामान्यजन—अज्ञानामुळें त्यांचें यथार्थ स्वरूप न जाणता अविद्येत गुरफटून मोहवश होऊन पंचस्कंधात्मक शरीरालाच आत्मा समजून—अमर समजून—त्याचे लाड व चोचले परोपरीनें पुरविण्याच्या भरीस पडतात. पण बिचारे अखेर फसतात. सुखासाठीं म्हणून जीव तोडून अविश्रांत श्रम करून अखेर दुःखाचें मापच पदरांत घेतात !

कारण अनात्म वस्तूला-अनित्य वस्तूला-नश्वर वस्तूला-आत्मा समजून, नित्य समजून, शाश्वत समजून त्यास कवटाळून जे बसतात, त्यांना अखेर पस्तावाची पाळी येतेच येते, हें कटु सत्य ते विसरतात. जें उत्पन्न होतें तें नाश पावतें—यं किञ्चि समुदयधम्मं, सब्बं तं निरोधधम्मं—हा निसर्गनियम असल्यामुळें नाशवंत वस्तु ही दुःखच आहे, असें भगवंतानी कटाक्षानें सांगितलें आहे. आणि म्हणून दुःखांतून मुक्त व्हावयाचें तर तृष्णेचा—वेदनापासून होणाऱ्या रागद्वेषादिविकाराचा—निरोध व त्याचप्रमाणें देहावरील अहंबुद्धीचा त्याग केला पाहिजे. म्हणजे संसारांत जें प्रियकर आहे, सुखकर आहे, तिकडे धांवपळ करणाऱ्या वासनेला रोखून धरलें पाहिजे. तेथून तिला परावृत्त केलें पाहिजे. म्हणजे इंद्रियनिग्रह केला पाहिजे. आणि ममत्वबुद्धि—म्हणजे मी मी व माझें माझें ही वृत्ति—टाकून दिली पाहिजे. अर्थात् स्वार्थबुद्धीला व देह सुखाला फाटा दिला पाहिजे. असें झालें म्हणजे तृष्णेला पायबंद बसतो. पायबंद बसला म्हणजे तिचें प्राबल्य ओसरत जातें आणि अखेर ती क्षय पावते. ती लय पावली म्हणजे संसार वृक्षाची वाढ खुंटून अखेर तो वृक्ष वठून जातो. अर्थात् मनुष्याची सर्व दुःखांतून मुक्तता होते. आणि दुःखमुक्ति म्हणजेच सुखप्राप्ति—शाश्वत सुखप्राप्ति—म्हणजेच निर्वाण ! ! 'तण्हाक्खयं सब्ब दुक्खं जिनाति'—तृष्णाक्षय सर्व दुःखाचें परिमार्जन करतो—असें भगवंतानी स्पष्ट म्हटलें आहे.

या तृष्णानिरोधाचा खुलासा भगवंतानी पुढील वचनामध्यें करून ठेविला आहे. तो असा:— ये लोके पियरूपं सातरूपं एत्थे सा तण्हा पहीयमाना पहीयति निरुज्झमाना निरुज्झति। इदं वुच्चति भिक्खवे दुक्खनिरोधं अरियसच्चं ॥' ( दीघनिकाय, २२–१९ ).

भावार्थ :— जगांत जें प्रियकर व सुखकर असतें, तेथें वास करूं पाहणारी तृष्णा, तिचा नाद सोडल्यास ती मग आपोआपच पराङमुख होते. म्हणजे तृष्णेचा हव्यास—छंद—सोडल्यास ती मग हळूहळू विराम पावते. याला म्हणतात दुःखनिरोध आर्यसत्य. हें तिसरें आर्यसत्य होय. 'तण्हा संखातं यानं निग्गतं या तस्मा याना निब्बाणं' अशी निर्वाणाची व्याख्या असून, तिचा भावार्थ म्हणजे तृष्णेपासून उद्भवणारी जी इच्छा तिचें निर्मूलन म्हणजेच निर्वाण होय, असें थोडक्यांत सांगता येईल. हाच भावार्थ 'संगत्यागं विदुर्मोक्षं' या वचनांत वसिष्ठानी अंतर्भूत केला असून, 'सविषयं मनः बंधाय निर्विषयं मुक्तये स्मृतं' असें योगवासिष्ठांत बंध व मोक्ष यांचें थोडक्यांत दिग्दर्शन करण्यांत आलें आहे.

हा तृष्णाक्षय झाला-कामवासना नष्ट झाली-म्हणजे मागें जं शिल्लक राहते, तेंच सुख-परमसुख-होय. आणि परम सुख म्हणजेच निर्वाण ! 'निब्बाणं परमं सुखं' असें भगवंतांनी धम्मपदांत चक्क बोलून दाखविलें आहे. 'आनंद ब्रम्ह' हें जें वैदिकांच्या ब्रम्हाचें लक्षण, तेंच भगवंतानी आपल्या निर्वाणाचें 'परमं सुखं' या शब्दांनी गौरवून सांगितलें आहे. 'परमं सुखं' हें लक्षण वैदिकांनी श्रुतींत म्हणजे छांदोग्यांत ब्रम्हालाहि लाविलें आहे. असो. मुद्दा काय तर तृष्णा शमली की दुःख गेलें व दुःखविमुक्ति म्हणजेच सुखप्राप्ति-आनंद प्राप्ति !! अंधकाराचा नाश म्हणजेच प्रकाशाचा उदय, तसाच हा प्रकार आहे. असो. तृष्णा-क्षय म्हणजेच निर्वाण असें सांगितलें, तें ठीकच असलें तरी तो तृष्णाक्षय कांहीं तितका सोपा नाहीं. चुटकीसरशी तो साध्य होणारा नव्हे, 'दुःसाध्यो वासना-त्यागः' अशी वस्तुस्थिति असल्यामुळें, त्याला फार मोठें दिव्य करावें लागतें. सहजासहजी हातीं लागणारा तो कांहीं परसांतला भोपळा नव्हे ! त्याला फार मोठा प्रयत्न व प्रदीर्घ अभ्यास व अविश्रांत परिश्रम करावे लागतात. तेव्हां कोठें या तृष्णेची मगरमिठी सुटण्याचा संभव आहे. आणि हें घडून यावयास प्रथम अविद्येची उचलबांगडी झाली पाहिजे. त्याशिवाय तृष्णेची कंबर मोडणें, तिला हतबल करणें-शक्य नाहीं. या अविद्येचा-जागतिक भ्रमाचा-भोपळा फुटल्याशिवाय तृष्णेला शह बसणें

तिचें उन्मूलन-उच्चाटण-होणें हें सहसा शक्य नाहीं. या अविद्येचा-जागतिक भ्रमाचा-नाश झाला, तरच तृष्णेचा बीमोड-तिचा निरोध-शक्य आहे. एरवीं ती ब्रम्हदेवालाहि दाद देणारी यया नव्हे!

म्हणून जगाचें सत्यज्ञान, वास्तवज्ञान, हें अवश्य आहे. कारण जगाचें वास्तव स्वरूप समजलें-सत्य स्वरूप उमगलें-म्हणजे अविद्येचा पडदा बाजूस सारला जातो. अर्थात् बुद्धीतून ती हद्दपार केली जाते. हें घडून येण्यास अंगीं वैराग्य म्हणजे विषयविरति नीट बाणली पाहिजे. नीट रुजली पाहिजे. त्याशिवाय-विषय सुखाचें वेड उतरल्याशिवाय-नश्वर संसाराच्या मायावी पसाऱ्यातून मनाला मुक्त केल्याशिवाय-हा चमत्कार घडून येणें शक्य नाहीं. अर्थात् सत्यज्ञान होणें-यथार्थ स्वरूप समजणें-हें साध्य नाहीं. सत्यज्ञान नाहीं, तो पर्यंत अविद्येची मगरमिठी सुटण्याची आशा नाही. अविद्येची पकड सुटली नाहीं, तो पर्यंत तृष्णेचें वेड गारठणार नाहीं. तृष्णेचें वेड शमलें नाहीं, तो पर्यंत संसार चुकणार नाहीं. आणि जोपर्यंत संसार चुकला नाहीं, तोपर्यंत दुःखाची आग विझणार नाहीं!! 'यावन्न तत्त्वविज्ञानं तावच्चित्तशमं कुतः' ही गोष्ट वैदिक धर्मांत काय अगर बुद्धधर्मांत काय अक्षरशः सत्य आहे. म्हणून प्रापंचिक जीवनांत विवेक दीप पाजळून-म्हणजे प्रज्ञा प्रज्वलित करून-संसाराचें यथार्थ ज्ञान करून घेतलें पाहिजे. तरच तृष्णेचा बीमोड होऊन सर्व तापत्रयाचें-दुःख क्लेशादिकाचें-परिशमन होईल व परमशांतिसुखाचें श्रेष्ठ व शाश्वत स्थान लाभेल! हेंच निर्वाण!! आणि तें याजन्मींच लाभतें!! (अंगुत्तर निकाय, ३-५२)

ही जी बुद्धाची शिकवण-तत्त्वप्रणालि-ती वैदिकांच्या उपनिषद्विचेला पूर्ण धरून आहे. इतकेंच नव्हे, त्या पायावरच त्याची उभारणी करण्यांत आली आहे. योगीश्वर याज्ञवल्क्यजींचें शतपथातील वचन येथें मोठें मननीय आहे. या विषयावर त्यांचें सांगणें आहे. तें असें :- 'यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि स्थिताः। अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रम्ह समश्नुते॥ (श. म. १४-७-२-९) - भावार्थ :- मनुष्याच्या अंतःकरणातील सर्व कामना जेव्हां नाहींतशा होतील, तेव्हां मनुष्य हा अमर होतो, इतकेंच नव्हे तर या जन्मींच-या देहींच-ब्रम्हाचा आनंद तो उपभोगितो. हें जें वचन

आहे, तें ब्रम्हानंद प्राप्तीविषयीं आहे आणि 'तण्हाखयं सब्बदुक्खं जिनाति -तृष्णाक्षय हा सर्व दुःखाचा परिहार करणारा आहे,-हें बुद्धवचन, यांत तत्वतः व अर्थतः भेद आहे कोठें ? वैदिकांची आनंद प्राप्ति म्हणजेच बुद्धाची दुःखनिवृत्ति व बुद्धाची दुःखनिवृत्ति म्हणजेच वैदिकांची आनंद प्राप्ति !! अर्थात् आनंदप्राप्ति म्हणजेच दुःखनिवृत्ति व दुःखनिवृत्ति म्हणजेच आनंदप्राप्ति !! वैदिकांचें ब्रम्ह व बुद्धाचें निर्वाण, अर्थात ब्रम्ह व निर्वाण हें एकच !!! तें कसें हें आम्ही पुढें निर्वाण प्रकरणांत दाखविणार आहो. एवंच येथें सांगावयाचें तात्पर्य हें कीं, मनुष्यास कायमचें दुःखमुक्त व्हावयाचें असल्यास, त्यास तृष्णेचें निर्मूलन केलें पाहिजे. हाच नि एवढाच मार्ग मोकळा आहे.

हाच भावार्थ 'भोगेच्छा मात्रकोबन्धस्तत्त्यागो मोक्ष उच्यते या वसिष्ठवचनांतहि गर्भित आहे. हें आर्यसत्य पूर्ण ओळखूनच भगवंतानी स्पष्ट शब्दांत चक्क सांगून टाकलें कीं, 'तण्हक्खयो सब्ब दुक्खं जिनाति'- भिक्षूहो ! तृष्णाक्षय हा सर्व दुःखावर जय मिळविणारा अचूक रामबाण आहे !! तो कसा साधावा, हें पुढील प्रकरणांत त्याचा विचार करूं.

प्रकरण ४ थें

आर्यसत्य चवथें

# आर्य अष्टांगिक मार्ग

इदं खो पन भिक्खवे दुक्खनिरोधगामिनी पटिपदा अरियसच्चं। अयमेव अरियो अट्ठङ्गिको मग्गो। सेय्यथिदं। सम्मादिट्ठि। सम्मा संकप्पो। सम्मा वाचा। सम्मा कम्मन्तो। सम्मा आजीवो। सम्मा वायामो। सम्मा सति। सम्मा समाधि। (धर्मचक्रप्रवर्तन सुत्त ८)

भावार्थ :– आणि भिक्षूहो! दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा आर्यसत्य कोणतें? तें म्हणजे हाच अष्टांगिक मार्ग होय. त्याचा तपशील म्हणजे हा असा :– सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्मांत, सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति व सम्यक् समाधि.

बुद्ध भगवंतानी दुःख निरोधाचा म्हणजे संसारनिवृत्तीचा अर्थात् तृष्णाक्षयाचा – निर्वाणप्राप्तीचा – जो एकमेव मंगल मार्ग सांगितला आहे, त्यास बौद्ध धर्मांत आर्य अष्टांगिक मार्ग असें म्हणतात. त्या मार्गाची एकंदर आठ अंगें असल्यामुळें त्यास अष्टांगिक असें नांव प्राप्त झालें असून, तो मार्ग प्रज्ञा, शील व समाधि अशा तीन प्रकारांनी विभागला गेला आहे. बुद्धांनी मुमुक्षूला सांगितलेला हाच काय तो एकमेव शुद्धीचा– मुक्तीचा–निर्वाणाचा – राजमार्ग आहे. त्या मार्गांत मुख्यत्वे करून ज्ञान, कर्म, शील व जीवनक्रम यांचा समावेश असुन, त्यानें बुद्धि शुद्ध व सम होऊन तो निर्वाणप्राप्तीस उपकारक होते, हा भाव त्यांत गर्भित आहे. मनुष्याला

निर्वाण मिळावयाचें तें पैशानें अगर जातीनें मिळत नसून भावशुद्धीनें मिळतें, हें सांगण्याचें भगवंताचें तात्पर्य.

'कम्मं विज्जाच धम्मो च सीलं जीवितमुत्तमं।
एतेन मच्चा सुज्झन्ति न गोत्तेन धनेन वा ॥
( वि. म. २६२ ).

कर्म, विद्या, धर्म, शील व उत्तम जीवित यांनीच मनुष्य शुद्ध होतो. केवळ कुलानें अगर धनानें तें शक्य नाहीं असें विसुद्धिमग्गांत म्हटलें आहे. तोच भावार्थ *'शीलेनहि भवत्यार्यो न धनेन न विद्यया'* या महाभारत-वचनांतहि उमटला आहे. अर्थात् बौद्ध धर्मांत काय किंवा वैदिक धर्मांत काय मनुष्य शीलसंपन्न झाल्याशिवाय, सत्कर्मनिष्ठ बनल्याशिवाय, सुविद्य असल्याशिवाय केवळ द्रव्याच्या अगर कुलाच्या जोरावर आनंद साम्राज्याचें परमोच्च शिखर गांठीन-निर्वाण अगर मोक्ष प्राप्त करून घेईन-ही आशा निंबापासून अंब्याची अपेक्षा करण्यासारखीच हास्यास्पद आहे. वैदिक ऋषी-याज्ञवल्क्य-झाले तरी 'अमृतत्वस्य नाशास्ति वित्तेन'-द्रव्यानें अमरपद प्राप्त होण्याची आशा नाहीं.-असा स्पष्ट नि चकचकीत निर्वाळा देतात. बुद्धांनी निर्वाण प्राप्तीचा म्हणून हा जसा अष्टांगिक मार्ग सांगितला आहे, तसाच योगीश्वरानींहि ब्रम्हसाक्षात्काराचा-म्हणजे मोक्षाचा-मार्ग उपदेशिला आहे तो असा:- 'तमेतं वेदानुवचनेन विविदिषन्ति। ब्रम्हचर्येण तपसा श्रद्धया यज्ञेनानाशकेन। चैतमेव विदित्वा मुनिर्भवति एतमेव प्रव्राजिनो लोकमीप्सन्तः प्रव्रजन्ति' ॥ ( शतपथ १४-७-२-२५ ). या आत्म्याला वेदवचनानें, ब्रम्हचर्यानें, श्रद्धेनें, यज्ञोपासनेनें व उपवासव्रतानें मुमुक्षु लोक जाणण्याची-अर्थात् संसारमुक्त होऊन मोक्ष साधण्याची-इच्छा करतात. त्या आत्म्याचें ज्ञान झालें म्हणजे मुमुक्षु हा मुनि होतो आणि या आत्मलोकाची प्राप्ति व्हावी म्हणून संन्यासी हे गृहत्याग करून घराबाहेर पडतात. सारांश हा कीं वैदिक मुमुक्षु हा विद्या, ब्रम्हचर्य म्हणजे इंद्रियनिग्रह, तप ( कायिक, वाचिक व मानसिक ), श्रद्धा म्हणजे धर्मग्रंथावर दृढ विश्वास, यज्ञ म्हणजे देवोपासना, उपवास म्हणजे अल्पाहार यांच्या योगानें ब्रम्हज्ञान मिळवून मुक्त होऊं पाहतो.

आणि बुद्धांचा उपदेश झाला तरी सारांशानें तोच अर्थ अभिव्यक्त करतो.

त्यांच्या अष्टांगिक मार्गांत तत्वतः वरील गोष्टींचाच उपदेश अंतर्भूत झाला आहे, हें विचारी मनुष्याच्या ध्यानांत आल्याशिवाय रहात नाहीं. हा संसारसागर तरून जाण्यास त्यांनी जो उपाय संयुत्त निकायांत सांगितला आहे, तोहि याबाबतींत मननीय आहे. तेथील वचन आडळतें तें असें :–

सब्बदा सीलसंपन्नो पञ्ञावा सुसमाहितो ।
आरद्धविरियो पहितत्तो ओघं तरति दुत्तरं ॥
( सं. नि. १-५३ ).

जो शीलसंपन्न, प्रज्ञावान्, समबुद्धि, कर्तव्यदक्ष व दृढनिश्चयी आहे, तोच हा दुस्तर–संसार ओघ तरून जातो. यांतील सील, प्रज्ञा व समाधि या तीन शब्दांत अष्टांगिक मार्गाचा पूर्ण समावेश होत असून, त्याचा तपशील दिला आहे तो असा :–

| | |
|---|---|
| १ सम्यक् दृष्टि<br>२ सम्यक् संकल्प | प्रज्ञा |
| ३ सम्यक् वाचा<br>४ सम्यक् कर्मांत<br>५ सम्यक् आजीव | सील |
| ६ सम्यक् व्यायाम<br>७ सम्यक् स्मृति<br>८ सम्यक् समाधि | समाधि |

(मज्झिमनिकाय, ४४)

वरील गोष्टच मज्झिमनिकायांत स्पष्ट सांगण्यांत आली आहे ती अशी:–

'तीहि च खो आवुसो विसाख खन्धेहि अरियो अट्ठङ्गिको मग्गो सङ्गहितो । या चावुसो विसाख, सम्मा वाचा, योच सम्मा कम्मन्तो, योच सम्मा आजीवो इमे धम्मा सीलखन्धे सङ्गहिता । योच सम्मा वायामो,याच सम्मासति, याच सम्मा समाधि इमे धम्मा समाधिखन्धे सङ्गहिता । याच सम्मादिट्ठि, योच सम्मा संकप्पो, इमे धम्मा पञ्ञाखन्धे सङ्गहिता ॥
( मज्झिमनिकाय चूलवेदल्लसुत्त ४४ )

वरील संयुत्त निकाय वचनांत सील, प्रज्ञा व समाहित शब्द आले आहेत ते प्रज्ञा, सील व समाधि या अर्थानेंच आले आहेत, हें निराळें सांगावयाची गरज नाहीं. आणि या अष्टांगिक मार्गालाच बुद्धानी ब्रम्हचर्य हें दुसरें नांव दिलें असून, तो ब्रम्हचर्य शब्द याज्ञवल्क्यांच्या वरील शतपथ वचनांत स्पष्ट नमूद करण्यांत आला आहे, हें येथें नमूद केल्यावाचून आम्हांस पुढें जाववत नाहीं. असो. आता या अष्टांगिक मार्गाचीं जीं आठ अंगें आहेत, त्यांचा क्रमशः पण थोडक्यांत परामर्श घेत जातो. त्यांतली पहिली पायरी म्हणजे सम्यग्दृष्टि ही असून, तिचें स्वरूप काय हें आतां थोडक्यांत पाहूं.

**सम्यक् दृष्टि** :- कतमा च भिक्खवे सम्मा दिट्ठी ? यं खो भिक्खवे दुक्खे ञाणं, दुक्खसमुदये ञाणं, दुःक्खनिरोध ञाणं, दुःक्खनिरोध-गामिनिया ञाणं अयं वुच्चति, भिक्खवे, सम्मदिट्ठि ।
( दीघनिकाय २२-२१ )

भावार्थ :- आणि भिक्षूहो ! सम्यक् दृष्टि कशाला म्हणतात ? दुःखाविषयीं ज्ञान, दुःख कसें व कां उत्पन्न होतें याविषयीं ज्ञान, तें कसें टाळतां येईल, या विषयीं ज्ञान व तें टाळण्याचा अचूक मार्ग कोणता या अष्टांगिक मार्गाविषयी ज्ञान, यास, भिक्षूहो ! सम्यक् दृष्टि असें म्हणतात.

भगवान बुद्धाच्या अष्टांगिक मार्गातील पहिली पायरी म्हणजे तो ही-ही सम्यग्दृष्टि. त्यांच्या तत्त्वज्ञानास प्रारंभ दुःख म्हणजे काय हें सांगण्यापासून होतो. वैदिकांचें याच्या उलट आहे 'ब्रम्ह वा इदमग्र आसीत्'-आनंदमय जें ब्रम्ह तें जगाच्या पूर्वी व प्रारंभी होतें-या

महावाक्यापासून त्यांच्या तत्त्वज्ञानास प्रारंभ होत असून, 'तत्त्वमसि' ( तें तूं आहेस ), किंबहुना 'अहं ब्रह्मास्मि' या वाक्यानें त्याची परिसमाप्ति होते. आणि बुद्ध आपल्या तत्त्वज्ञानास 'अिदं खो पन भिक्खवे दुक्खं अरियसच्चं'—हा संसार, भिक्षुहो! दुःखमय आहे—यापासून सुरवात करून, 'निब्बाणं परमं सुखं' या महावाक्यानें त्याचा शेवट करतात. याप्रमाणें क्रमांत जरी फरक अगर विरोध असला व दिसला, तरी दोघांच्या विचारसरणींत तत्त्वतः बरेंच साम्य आहे, हें विसरूं नये. दोघांच्या उपदेशाचा भावार्थ जवळ जवळ एकच व सारखाच आहे.

असें जर आहे तर त्यांच्या उपदेशक्रमांत मग फरक कां, याविषयी सूज्ञ वाचकांच्या चिकित्सक मनांत सहजच प्रश्न उभा राहतो. व त्याला उत्तर म्हणजे हें कीं दोघांच्या भूमिका एक नसून निरनिराळघा आहेत. वैदिक ऋषींचें तत्त्वज्ञान मानवी विचाराच्या परमोच्च बिंदूस जाऊन पोचलें आहे. तशी गोष्ट बुद्धधर्माची नाहीं. तो 'अस्ति' अगर 'नास्ति' यांपैकी कोणत्याच टोंकाला गेलेला अगर जाणारा धर्म नाहीं व नव्हे. तो हे दोन्ही अंत टाळून मध्यम मार्गानें जाणारा धर्म आहे व तशी त्या धर्माची प्रतिज्ञाच आहे.

ही गोष्ट भगवान बुद्ध स्वतः आपल्या तोंडानें जाहीर करतात. मग वैदिकांचा मार्ग— 'अस्ति' मार्ग—त्यांना कसा पसंत पडेल व पडावा? ते चक्क सांगतात कीं— 'सब्बं अत्थी' ति खो कच्चायन अयमेको अन्तो । सब्बं नत्थि' ती अयं दुतियो अन्तो । एते ते कच्चायन उभो अन्ते अनुपगम्म मज्झेन तथागतो धम्मं देसे' ति ।' ( संयुत्त निकाय, १२-१५-७ ). 'सर्व आहे' हा एक अंत व 'सर्व नाहीं' हा दुसरा अंत. पण कच्चायना! हे दोन्ही अंत सोडून तथागत मध्यम मार्गानें आपल्या धर्माचा उपदेश करतो. हें वचन लक्षांत घेतल्यास भगवंताच्या धर्मोपदेशाचा मार्ग कोणत्या रोखानें जातो, हें स्पष्ट समजण्यास आतां कोणतीच अडचण रहात नाहीं. तेथें वैदिकांच्या खोल व उच्च विचाराचा पूर्ण अभाव असणार, हें निराळें सांगावयास नकोच.

याचें कारण असें कीं, सामान्य बुद्धीला आकलन न होणाऱ्या गहन व गूढ तत्त्वज्ञानाच्या सूक्ष्म चर्चेच्या भरीस पडण्याचा त्यांचा कल वाहात नाहीं. *आत्मा आहे कीं नाहीं, जीव मरणोत्तर असतो कां नसतो, लोक शाश्वत का* नश्वर, जीव व शरीर एक कां भिन्न, या व अशा गहन व गंभीर प्रश्नांच्या चर्चेपासून तादृश फायदा नाहीं व तत्कालीन समाजस्थिति तेवढ्या खोल पाण्यांत शिरण्यास फारशी उत्सुक नाहीं, अशी त्यांची समजूत असल्यामुळें ते प्रश्न सोडविण्याच्या भरीस ते पडूं इच्छित नाहींत, हा मुद्दा त्यांनी जगाला स्पष्ट जाहीर करून सोडला आहे. आपल्या धर्माचा व चर्चेचा विषय कोणता, हें त्यांनी पुढील वचनांत स्पष्ट व निःसंदिग्ध बोलून दाखविलें आहे. याविषयी मालुंक्य पुत्रास सांगतात तें असें:– 'तस्माति'ह मालुंक्यपुत्त अब्याकतं च मे अब्याकततो धारेथ, ब्याकतं च मे ब्याकततो धारेथ। किञ्च मालुंक्यपुत्त मया अब्याकतं? 'सस्सतो लोको' ति मालुंक्यपुत्त मया अब्याकतं, असस्सतो लोको' ति····पे०..., अन्तवा लोको' ति····पे०····, अनन्तवा लोको' ति....पे०····, तं जीवं तं सरीरं.... पे०...., अञ्ञं जीवं अञ्ञं सरीर'न्ति....पे०...., होति तथागतो परम्मरणा'ति....पे०...., न होति तथागतो परम्मरणा'ति....पे०..., होति च न च होति तथागतो परम्मरणा'ति....पे०...., नेव होति न न होति तथागतो परम्मरणा'ति मया अब्याकतं। कस्मा चे'तं मालुंक्यपुत्त मया अब्याकतं? न हेतं मालुंक्यपुत्त अत्थसंहितं ना'दिब्रम्हचरियिकं, न निब्बिदाय न विरागाय न निरोधाय न उपसमाय न अभिञ्ञाय न सम्बोधाय न निब्बाणाय संवत्तति, तस्मा तं मया अब्याकतं:

किञ्च मालुंक्यपुत्त मया ब्याकतं? अिदं दुक्खं'ति मालुंक्यपुत्त मया ब्याकतं, 'अयं दुक्खसमुदयो'ति....पे०....,' अयं दुःखनिरोधो'ति····पे०····, अयं दुक्खनिरोधगामिनी पटिपदा'ति मया ब्याकतं। कस्मा चे'तं मालुंक्यपुत्त *मया ब्याकतं?* एतं हि मालुंक्यपुत्त *अत्थसंहितं, एतं आदिब्रम्हचरियिकं,* एतं निब्बिदाय, विरागाय, निरोधाय, उपसमाय, संबोधाय, निब्बाणाय संवत्तति तस्मा तं मालुंक्यपुत्त मया ब्याकतं।' ( मज्झिमनिकाय ६३–६ ).

भावार्थः- अतएव मालुंक्यपुत्रा! जें माझ्या उपदेशाचा विषय नाहीं, तें उपदेशास योग्य नाहीं, असें समज. व जें माझ्या उपदेशाचा विषय आहे, तें तेवढें उपदेश योग्य आहे, असें धरून चाल. तर माझ्या उपदेशाचा विषय असा कोणता नाहीं? लोक शाश्वत कां अशाश्वत, जगाला अंत आहे कां नाहीं, जीव व शरीर एक का भिन्न, तथागत मरणोत्तर असतो कां नसतो, हे व असले प्रश्न माझ्या उपदेशाचे विषय नाहींत. म्हणून मी ते तुम्हांस स्पष्ट केले नाहींत. याचें कारण काय म्हणून तूं विचारशील, तर त्याला माझें उत्तर हें कीं, तशा प्रश्नाच्या विवेचनापासून माझ्यामतें तादृश्य फायदा नाहीं. त्यापासून आदि-ब्रम्हचर्यास कांही उपयोग होणार नाहीं. शिवाय वैराग्य-प्राप्तीला, मनःशांतीला, लोकोत्तर ज्ञानाला, सत्य ज्ञानाला, निर्वाणप्राप्तीला त्यांचें ज्ञान अवश्यक नाहीं. म्हणून त्या गोष्टी माझ्या धर्मोपदेशाचे मी विषय केल्या नाहींत. अर्थात् स्पष्ट केल्या नाहींत.

कोणत्या गोष्टी मी स्पष्ट केल्या आहेत? येथें जगांत दुःख आहे, त्या दुःखाची उत्पत्ति अमुक अशी आहे, त्या दुःखाचा निरोध म्हणजे शेवट अशा रीतीनें करतां येतो व त्याचा निरोधमार्ग हा असा आहे, या विषयांचें मी व्याख्यान केलें आहे. आणि ते विषय मी स्पष्ट करून दाखविले आहेत. मी असें कां केलें असें तूं विचारशील, तर त्याला उत्तर हें कीं, त्या विवेच-नापासून फलनिष्पत्ति आहे. तें ब्रम्हचर्य पाळण्यास उपयोगी आहे. त्यापासून वैराग्य लाभणार आहे. मनाला शांति मिळणार आहे. लोकोत्तर ज्ञान, सम्यग्ज्ञान, व निर्वाणप्राप्ति यास तें उपकारक आहे. म्हणून ते विषय मी स्पष्ट करून लोकांपुढें मांडले आहेत.

या वरील उताऱ्यावरून काय बोध होतो? बुद्ध भगवान हे कोणत्याहि अंतिम टोंकाला जाण्याचें कटाक्षानें टाळीत आहेत. मध्यम मार्ग हाच त्यांच्या वाटचालीचा मुख्य मार्ग असून, त्या मार्गावरून त्यांनी आपला धर्मध्वज मिरवीत नेला आहे. ही गोष्ट आतां सूर्यप्रकाशा इतकी स्पष्टच झाली. वैदिकांचा गहन व सूक्ष्म मार्ग तत्कालीन जनमनाला झेंपणार नाहीं व आजीवकांचा कट्टर नास्तिकवादहि परवडणार नाहीं, ही गोष्ट सतत डोळ्यासमोर ठेवून, या दोन्ही टोंकाला बगल मारून, त्या दोहोंचा

मधला मार्ग त्यांनी पसंत केला व तो यशस्वी झाला. वैदिकांचा सूक्ष्म ज्ञानमार्ग सामान्य जनतेला सर्वपणें फारच दुर्घट असल्यामुळें त्यांनी तो मार्ग टाळला, हें त्यांच्या अंगीकृत भूमिकेला उपकारकच झालें. ज्या गोष्टी सामान्य बुद्धीला आकलन करतां येत नाहींत, अगर येण्यासारख्या नाहींत, किंवा प्रत्यक्ष अनुभवांत उतरत नाहींत, अगर उतरण्याजोग्या नाहींत, अशा बुद्धिबाह्य व इंद्रियातीत गोष्टींविषयीं नुसतें व नसतें तर्कट लढवून कल्पनेचे पोकळ मनोरे उभारण्यांत त्यांना तितकेंसें स्वारस्य व पुरुषार्थ न वाटल्यामुळें तशा सूक्ष्म व गूढ, रुक्ष व नीरस, विषयाच्या शुष्क चर्चेत खोल न शिरतां-त्याचा खीस काढण्याच्या भरीस न पडतां-जें प्रत्यक्ष दिसतें व अनुभवास पटतें, तेवढ्या गोष्टींचा त्यांनी आपल्या धर्माचा प्रतिपाद्य विषय करून, त्यावरच सगळा भर दिला, ही गोष्ट मालुंक्यपुत्र-सुत्रांतील वरील उताऱ्यावरून स्पष्ट-अगदी स्पष्ट-होत आहे.

त्यांच्या चार आर्यसत्यांचें सूक्ष्म अवलोकन करता त्यांच्या धर्मोपदेशाचा रोख असा दिसतो की, गहन तत्त्वज्ञानाच्या खोल पाण्यांत न शिरतां, मनुष्य हा दुःखाला युजत असल्यामुळें तें दुःख कां होतें, त्याचें मूळ कशांत आहे व तें निर्मूल कसें करतां येईल व तो मार्ग कोणता या चार आर्यसत्यांचें सम्यग् ज्ञान करून घेतल्यास, दुःखाचा प्रसंग टळून मंगल निर्वाणाच्या अखंड व उदंड आनंदसाम्राज्याची गुरुकिल्ली हातीं लागतें, इतकें पटवून दिल्यास आपला कार्यभाग झाला, असें समजून, त्या दिशेनें त्यांनी आपली भूमिका रंगविली व ती अखेर यशस्वी झाली.

त्याप्रमाणें जो संसारत्याग करून, भिक्षु होऊन चार आर्यसत्यांचें यथार्थ व भरीव ज्ञान करून घेऊन त्याप्रमाणें आचरण करील, तो या दुःखमय भवचक्रांतून-संसार बंधनांतून सुटून, शाश्वत सुखाचा-परमश्रेष्ठ निर्वाणाचा-अखंड शांतीचा-खात्रीनें धनी होईलच होईल, असा निर्वाळा त्यानी पदोपदीं देऊन ठेवला आहे. म्हणून मुमुक्षूनें आपली ज्ञान दृष्टि -विवेकदृष्टि-निवळून घेण्याचा कसून प्रयत्न केला पाहिजे, हें त्यांनी अष्टांगिक मार्गाच्या पहिल्या टप्प्यांतच-सम्यग् दृष्टींतच-स्पष्ट सांगितलें आहे. येथें दृष्टि म्हणजे मत अगर धारणा असा अर्थ आहे.

अर्थात् बुद्धाच्या पंथांत शिरूं पाहणाऱ्या जिज्ञासूनें करावयाची पहिली गोष्ट म्हणजे त्यांनी सांगितलेल्या चार आर्यसत्याचें यथार्थ व तात्विक स्वरूप ओळखणें. हीच सम्यग्दृष्टि होय. हें झालें तरच पुढील मार्ग सरळ व सुखावह होतो. कारण दृष्टि साफ व निर्दोष झाली म्हणजे संकल्पहि त्या मानानें सम्यक् होतो आणि संकल्प निवळला म्हणजे वाचाहि उजळते म्हणजे सम्यक् होते. अशी ही परंपरा आहे आणि ही गोष्ट भगवंतांनी या पुढील वचनांत स्पष्ट केली आहे. ' सम्मादिट्ठिस्स भो सम्मा संकप्पो पहोति, सम्मा संकप्पस्स सम्मा वाचा पहोति, सम्मावाचस्स सम्मा कम्मन्तो पहोति, सम्माकम्मन्तस्स सम्मा आजीवो पहोति, सम्मा आजीवस्स सम्मावायामो पहोति, सम्मावायामस्स सम्मासति पहोति, सम्मासतिस्स सम्मासमाधि पहोति, सम्मासमाधिस्स सम्माञाणं पहोति, सम्माञाणस्स सम्माविमुत्ति पहोति ॥' ( दीघनिकाय, १८-२७ ).

भावार्थ :- भिक्षुहो ! सम्यक् दृष्टीपासून सम्यक् संकल्प उत्पन्न होतो. सम्यक् संकलपापासून सम्यक् वाचा उत्पन्न होते. सम्यक् वाचेपासून सम्यक् कर्मान्ति, सम्यक् कर्मान्तिपासून सम्यक् आजीव, सम्यक् आजीवापासून सम्यक् व्यायाम, सम्यक् व्यायामापासून सम्यक् स्मृति, सम्यक् स्मृतीपासून सम्यक् समाधि, सम्यक् समाधिपासून सम्यक् ज्ञान आणि त्या ज्ञानापासून सम्यक् विमुक्ति उत्पन्न होते.

अर्थात् प्रतीत्य- समुत्पादाप्रमाणें या अष्टांगिक मार्गाची झाली तरी कांहींशी कथा आहे. एक साध्य झालें म्हणजे त्याच्या पुढचें साध्य होतें. पहिल्या सात अंगांस समाधीचे परिष्कार-म्हणजे तट-अशी संज्ञा आहे, आणि या अष्टांगिक मार्गालाच ब्रम्हचर्य असें दुसरें टोपण नांव आहे. या अष्टांगाचा वरील प्रमाणें खुलासा करण्यांत आला, त्याचें कारण एवढेंच कीं योग्य समाधीची भावना होऊन ती अखेर पूर्ण साध्य व्हावी. असो.

यावरून सम्यक् दृष्टीची-म्हणजे चार आर्यसत्यांचें यथार्थ ज्ञान याची-आवश्यकता व महत्व किती आहे, याची वाचकांस आतां कल्पना करतां येईल. जगाचें मूळ स्वरूप-यथार्थ स्वरूप-चंचल व नश्वर स्वरूप-कसें व कां आहे-याचा प्रकाश बुद्धींत एकवार चांगलासा विंबला म्हणजे

प्रपंचरत मन त्यायोगें मग आपोआपच निवळूं लागतें. मन जसजसें निवळत जाईल, तसतसे संकल्पहि परिशुद्ध होत जातात. संकल्प म्हणजे विचार जसजसे परिशुद्ध होत जातील, तसतशी वाणीहि उजळत जाते आणि असाच प्रकार उत्तरोत्तर वाढत जाऊन, पुढें समाधि–चित्ताची एकाग्रता– साधून, तद्वारा बुद्धींत सत्यज्ञानाचा सुमंगल प्रकाश खुलून, अखेर आनंदमय निर्वाणाचें मंगल दर्शन घडतें. येथें संसार चुकला ! जन्ममृत्यूचें भवचक्र सुटलें ! दुःखाची काळरात्र संपली आणि बुद्ध भगवंताचें परमश्रेष्ठ निर्वाणपद हातीं आलें !!

दुःख म्हणजे काय, त्याची उत्पत्ति कशी होते, व त्याचा विनाश कसा करतां येतो, याचें विवेचन मार्गें पहिल्या तीन आर्यसत्यांत आलें असल्यामुळें त्याची येथें पुनरावृत्ति करून ग्रंथ वाढवूं इच्छित नाहीं. पण जातां जातां एक गोष्ट सांगणें इष्ट वाटल्यावरून ती येथें नमूद करून मग पुढचा मार्ग सुधारतो. सम्यक् दृष्टि व सम्यक् संकल्प यांचा अंतर्भाव प्रज्ञेंत करण्यांत आला आहे. आणि सम्यक् दृष्टि व सम्यक् संकल्प यांचें अधिष्ठान अनुक्रमें बुद्धि व मन असून, त्या दोहोंचा बौद्ध धर्मांत प्रज्ञेंत समावेश होतो. या सम्यक् दृष्टीची व्याख्या बुद्धघोषाचार्यांनी विशुद्धमग्गांत केली आहे, ती येथें देऊन हा विषय आटपता घेतो. ती व्याख्या म्हणजे अशी :– सङ्खेपतो हि चतुसच्च–पटिवेधाय पटिपन्नस्स योगिनो निब्बानारम्मणं अविज्जानुसयसमुग्घातकं पञ्ञाचक्खु सम्मादिट्ठि । सा सम्मादस्सन-लक्खणा, धातुप्पकासनरसा, अविज्जान्ध-कारविद्धंसनपच्चुपट्ठाना ॥ ( वि. म. १६–७६ ) भावार्थ :– चार आर्यसत्याचें यथार्थ ज्ञान करून घेणेसाठी साधकाची जी अंतर्दृष्टि, तिला प्रज्ञाचक्षु हें नांव असून, तिचें ध्येय म्हणजे निर्वाण प्राप्ती व अविद्यामलाचा नाश हें आहे. वस्तूंचें यथार्थ ज्ञान करून देणें हें तिचें लक्षण, धातूंचें प्रकाशन करणें हें तिचें कार्य, व अविद्यांधरकाराचा नाश करणें हें तिचें स्वरूप होय.

येथे बुद्ध घोषांनी सम्यक्दृष्टीला प्रज्ञाचक्षु असें म्हटलें आहे, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. आम्ही वैदिक लोक ज्याला प्रज्ञानेत्र ( ऐ. उ. ३–५–३ ) म्हणतो, त्यालाच बौद्धधर्मांत सम्यक् दृष्टि ऊर्फ प्रज्ञाचक्षु म्हण-

ण्याचा परिपाठ आहे. हेंच दुसऱ्या तऱ्हेनें एकच शब्दांत सांगावयाचें झाल्यास सत्यासत्य-बोधक व्यवसायात्मिकाबुद्धि हा शब्द सुचविता येईल. नित्यानित्य वस्तूचा विवेक करावयाचें कार्य वैदिकांच्या दृष्टया बुद्धीचें असल्यामुळें धर्मक्षेत्रांत-तत्त्वज्ञानांत-पदार्पण करूं पाहणाऱ्या मुमुक्षु साधकानें प्रथम आपली बुद्धि-ज्ञानदृष्टि-निवळण्याचा व उजळण्याचा प्रयत्न केला पाहिजे आणि ही गोष्ट बुद्धधर्मांत फक्त भिक्षुसच साध्य व शक्य आहे, असा बुद्ध भगवंताचा निर्वाळा असल्यामुळें पृथग्जनास म्हणजे अितर सामान्य जनास तें शक्य व साध्य नाहीं, म्हणून हा उपदेश भगवंतानी भिक्षूंसच केला आहे. जे सुशील पृथग्जन आहेत, त्यांना फारतर त्यांच्या सत्कर्माच्यायोगें-पंचशील पाळण्यानें-स्वर्गलाभ होईल, पण निर्वाण मिळणार नाहीं. ती दौलत फक्त अर्हतासाठींच आहे. याचा अधिक विचार पुढें यथाप्रसंग आम्ही करूंच करूं. अस्तु.

एवंच सांगावयाचें तात्पर्य काय कीं ज्याला ही सम्यग्दृष्टि लाभली-ज्याचा प्रज्ञाचक्षु उजळला-त्याचीं संसारबंधनें सगळीं तुटून, दुःखमय भवसागरांतून सुरक्षित तरून तो अखंड सुखस्वरूप अशा परमश्रेष्ठ निर्वाण-पदास-सुगतीस-सहज व सरळ जाऊन पोंचतो, अशी भगवंतानी पुढील वचनात स्पष्ट ग्वाही देऊन ठेवली आहे.

वज्जञ्च वज्जतो ञत्वा अवज्जञ्च अवज्जतो ।
सम्मादिट्ठिसमादाना सत्ता गच्छन्ति सुग्गतिं ॥
( धम्मपद २२-१४ )

भावार्थ :- जें असत्य आहे तें असत्य व जें सत्य आहे तें सत्य असें जे यथार्थतया पाहतात, ते सम्यक्दृष्टि लोक सुगतीस म्हणजे शाश्वत आनंदमय स्थानास-जाऊन पोंचतात, हें बुद्ध भगवंताचें वचन सत्यान्वेषणेच्छु कोणत्याहि धर्मातल्या, मुमुक्षूला मननीय नाहीं असें कोण म्हणेल ?

**सम्यक् संकल्प** :- 'कतमोच भिक्खवे सम्मा संकप्पो नेक्खम्म सङ्कप्पो, अब्यापाद सङ्कप्पो, अविहिंसा सङ्कप्पो, अयं वुच्चति भिक्खवे सम्मा सङ्कप्पो ॥' ( दीघनिकाय २२-२१.)

करण्यास-योग्य होत नाहीं. प्रापंचिक सुखाची मधुरता व रमणीयता ओसरल्याशिवाय-जागतिक पसाऱ्याचा वीट आल्याशिवाय-मनुष्याच्या अंतःकरणांत धर्माविषयीं खरी आवड-खरी तळमळ-खरी जिज्ञासा-उत्पन्न होत नाहीं. आणि जोपर्यंत तशी आवड व तशी तळमळ उत्पन्न होत नाहीं, तोपर्यंत सदाचरण-धर्माचरण-घडण्याची आशा नाहीं, आणि सदाचरण नाहीं, तर निर्वाणाचें नांव मग घ्या कशाला ? म्हणून ज्यास धर्मक्षेत्रांत पदार्पण करावयाचें आहे, त्यानें प्रथम देहतर्पणबुद्धीला चांगला आळा घातला पाहिजे, ही अट भगवंतांनें साधकास स्पष्ट घालून दिली आहे. कारण वासना त्याग केल्याशिवाय-तृष्णेचा निरोध केल्याशिवाय-धर्मज्ञानाचा स्वच्छ व निर्मल प्रकाश अंतःकरणांत उजळणार नाहीं, हें सत्य त्यांनी स्पष्ट व स्वच्छ जाणलें होतें. म्हणून सम्यक् संकल्प या सदराखालीं पहिला नियम म्हणून त्यांनी रोख ठोक सांगून टाकलें, कीं निर्वाणेच्छु साधकानें मनातील विषयासक्ति-देहतर्पणबुद्धि-काढून टाकून, तें विषय-रहित करावें. यालाच नैष्कर्म्य संकल्प असें म्हणतात. कारण जन्माला कारण मूळ ही वासना-म्हणजे तृष्णा असून, जन्ममृत्यूचें संसारचक्र चुकवावयाचें झाल्यास वासनेचें-जागतिक सुखभोगेच्छेचें-निर्मूलन हाच एक त्याला रामबाण उपाय आहे. सर्व दुःखाचें मूळ वासनेंत-तृष्णेत-गर्भित असल्यामुळें तिचा सर्वस्वी बीमोड झाल्याशिवाय दुःखमय संसारातून-जन्ममृत्यूच्या भवचक्रातून-मुक्त होण्याची आशा निव्वळ फोल आहे. 'वासनावलितं जन्म, मोक्षं निर्वासनं मनः' हें योगवासिष्ठातील वसिष्ठ-महर्षींचें वचन बुद्धासहि मान्य आहे. एवंच तात्पर्य हें की, भिक्षूनें मन निष्काम-निर्विषय करून व राखून भिक्षुजीवन कंठावें. तरच निर्वाणाचा मार्ग सरळ व सुलभ होईल.

आतां सम्यक् संकल्पाचा दुसरा प्रकार म्हणजे असा कीं, तो संकल्प क्रोधशून्य असावा. कामभोगेच्छा ही जशी भिक्षुजीवनास बाधक तसेंच क्रोध-लोभ-मोह-द्वेषादि विकारहि सर्वस्वी त्याज्य व निंद्य आहेत. या क्रोध लोभादि विकारानें ग्रस्त झालेलें मन-दूषित झालेली वृत्ति-शांत व स्थिर राहणें केव्हांहि शक्य नाहीं. व मन शांत व स्थिर झाल्याशिवाय

मनुष्याकडून सदाचरण–धर्माचरण–घडणें दुरापास्तच. म्हणून साधकाचे संकल्प–अर्थात् विचार–हे केव्हांहि विकाररहित दोषरहित–असावेत व असले पाहिजेत

त्याचप्रमाणे ते संकल्प हिंसाशून्य असावेत. त्यांत परपीडेचा-परहिंसेचा –परद्रोहाचा–परापहरणाचा–लवलेशहि नसावा. अर्थात् साधकाचें मन विश्वप्रेमी व विश्वहितकारी असावें. दुसऱ्यास पीडा देऊन, हिंसा करून; स्वतःचें सुख साधणेची बुद्धि–अगर प्रवृत्ति–केव्हांहि क्षेमकर नाहीं. स्वतःला जसें सुख प्रिय व दुःख अप्रिय असतें, तशीच गोष्ट प्रत्येक प्राण्याचीसुद्धां असल्यामुळें, दुसऱ्याला दुःख देऊन स्वतःचें सुख साधण्याची जहाल स्वार्थ बुद्धि ही धर्मक्षेत्रांत अत्यंत वावडी व म्हणून त्याज्य व निंद्य मानली आहे. अतएव साधकाचें मन निष्काम, निर्विकार, निर्द्रोह व निर्दोष व्हावयास व असावयास पाहिजे. अशाप्रकारचे जे संकल्प तेच सम्यक् संकल्प होत.

अर्थात् ज्याला सम्यक् दृष्टि लाभून मनांत सद्विचार–अर्थात् विवेक –जागृत झाला, त्यालाच सार कोणतें व असार कोणतें याचें यथार्थ ज्ञान होतें. आणि तोच निर्वाणाचा अधिकारी होण्यास लायख ठरतो. हीच गोष्ट भगवान पुढील वचनांत बोलून दाखवितात ती अशी :–

सारञ्च सारतो ञत्वा असारञ्च असारतो ।
ते सारमधिगच्छन्ति सम्मा-संकप्प गोचरा ॥
( धम्मपद १–१२ )

जे साराला सार समजतात व असाराला असार समजतात, तेच मुमुक्षु सार म्हणजे निर्वाण याप्रत जातात. कारण ते सद्विचाराला-विवेकाला-धरून चालणारे असतात. असो.

**सम्यक् वाचा** (सम्मा वाचा)–'कतमा च भिक्खवे, सम्मावाचा ? मुसावादा वेरमणी, पिसुणाय वाचाय वेरमणी, फरुसाय वाचाय वेरमणी, सम्फप्पलापा वेरमणी, अयं वुच्चति, भिक्खवे, सम्मा वाचा ॥
( दीघनिकाय २२–२१ )

भावार्थ :- आणि भिक्षुहो ! सम्यक् वाचा म्हणजे कोणती ? असत्य भाषणापासून विरति, दुष्ट भाषणापासून विरति, कठोर भाषणापासून विरति, वायफळ भाषणापासून विरति, याला, भिक्षुहो, सम्यक् वाचा म्हणतात.

आतांपर्यन्त जें विवेचन झालें, तें प्रज्ञेंत मोडणाऱ्या सम्यक् दृष्टि व सम्यक् संकल्प या जोड विषयासंबंधानें झालें. आतां या पुढील विवेचन सीलांत गणले गेलेल्या सम्यक् वाचा, सम्यक् कर्मांत व सम्यक् आजीव या विषयासंबंधानें करावयाचें आहे. प्रज्ञेंत मन व बुद्धि यांचा समावेश करण्यांत आला असून, सीलांत वाचिक, व कायिक कर्माचा-अर्थात् सदाचाराचा-अंतर्भाव होतो म्हणून प्रथम सम्यग् वाचेचें स्वरूप सांगून, मग कायिक आचरणाचें सांगितलें आहे.

सम्यग् वाचा म्हणजे तो अशी-असत्य भाषण, दुष्ट भाषण, कठोर भाषण, फाजील भाषण, वायफळ भाषण, यांपासून अलिप्त असें जें भाषण तें सम्यक् भाषण. जगांत जे तंटेबखेडे माजतात व अनर्थ ओढवतात, त्यांतील बराचसा भाग जिव्हेकडे येतो. असत्य भाषणामुळें व कठोरभाषणामुळें जगांत नित्य कलह, भांडण, तंटे, द्रोह, गुन्हे होत आहेत, हा अनुभव तेव्हांच नव्हे, तर आजहि सार्वत्रिक आहे. मनुष्य हा स्वार्थी असल्यामुळें तो स्वभावतःच लबाड आहे. 'सत्यं देवा अनृतं मनुष्याः' असें याज्ञवल्क्यांनी शतपथांत म्हटलें असून, तें अगदी यथार्थ आहे. व्यवहारांत याचा पदोपदी अनुभव येतो. 'मनुष्य व देव यांच्यांत जो फरक आहे तो या सत्यानृतांमुळेंच होय. मनुष्य कायावाचामनें करून सत्यस्वरूप बनला म्हणजे मग तो देवच झाला !

पण हें घडून येणें महा दुर्घट आहे. मनुष्याला स्वार्थ आहे आणि म्हणून तो लबाड आहे. देवाला स्वार्थ नाहीं, म्हणून ते सत्य आहेत. हाच देव व मनुष्य यांतला फरक. स्वार्थापायीं मनुष्य लबाड बोलतो व पापाचरण करतो. पण पुढें फसतो आणि मग पस्तावतो. या आपत्तिपासून दूर राखण्यासाठीं वैदिक गुरुदेव शिष्याला उपदेश करतात कीं 'बा शिष्या ! सत्यं वद, धर्मं चर. सत्यान्न प्रमदितव्यं, धर्मान्न प्रमदितव्यं, कुशलान्न

प्रमदितव्यं । ( तै. १-११-१ ) आणि बुद्ध भगवान झाले तरी पर्यायानें हाच उपदेश करतात.

त्यांची 'सम्मा वाचा' म्हणजे सत्य व मधुर भाषण. पण तसें स्पष्ट न सांगता पर्यायानें तो अर्थ सुचविला आहे. 'काय बोल' हे त्यांनीं सांगितलें नसून, 'काय बोलूं नकोस' हें सांगितलें आहे. 'खोटें बोलूं नकोस, कठोर बोलूं नकोस, निंदा करूं नकोस, थापा देऊं नकोस, गप्पा मारूं नकोस, चहाडी करूं नकोस ! हा त्यांचा उपदेश 'सम्मा वाचा' या सदरांत आला असून, त्या वरून सत्य बोल, प्रिय बोल, गोड बोल हा गर्भितार्थ सरळ निष्पन्न होतो.

वरील सारखें दुर्भाषण हें दुसऱ्यांस बोचणारें व दुखविणारें असल्यामुळें त्यापासून अलिप्त रहा, असें सांगणें म्हणजेच सत्य व मधुर भाषण बोल हें पर्यायानें सुचविणें होय. असत्य व दुष्ट भाषण याचा अनिष्ट परिणाम भगवान पूर्ण ओळखून असल्यामुळें त्यांनी साधकाला स्पष्टच अशारा दिला कीं—

'वची पकोपं रक्खेय, वाचाय संवुतो सिया ।
वचो दुच्चरितं हित्वा वाचाय सुचरितं चरे ।।
( धम्मपद, १७-१२ )

हे भिक्षो, वाणीच्या प्रकोपापासून संरक्षित रहा. वाणीचा संयम कर वाणीच्या दुराचाराला सोडून, वाणीच्या सदाचाराचें आचरण कर !'

असें हें सम्मा वाचाचें बुद्धकथित स्वरूप आहे. तें वैदिक धर्माला मानवणारें असेंच आहे. यांत वाद नाहीं. असो.

**सम्यक् कर्मान्त** (सम्मा कम्मन्तो) :- कतमो च भिक्खवे सम्मा कम्मन्तो ? पाणातिपाता वेरमणी, अदिन्नादाना वेरमणी, कामेसु मिच्छाचारा वेरमणी, अयं वुच्चति भिक्खवे सम्मा कम्मन्तो. ।
( दिघनिकाय २२-२१ )

भावार्थ :- भिक्षुहो ! सम्यक् कर्म कोणतें ? प्राणघातापासून विरति चौर्यकर्मापासून विरति, व्यभिचारापासून विरति, यास भिक्षुहो ! सम्यक् कर्म असें म्हणतात.

वैदिक धर्मांत काय किंवा बुद्ध धर्मांत काय, कर्माला अत्यंत महत्वाचें स्थान आहे. 'यथोपासते तदेव भवति'—मनुष्य जसें कर्म करील तसा तो होतो—असें शतपथांत म्हटलें आहे. अर्थात् कर्म हें धर्माचें—सूक्ष्म धर्माचें—प्रकट स्वरूप आहे, असें म्हटल्यास अधिक शोभेल. म्हणून 'आचारप्रभवो धर्मः'—'आचारः प्रथमो धर्मः' असें आपल्या धर्मांत म्हटलें आहे.

हीं वैदिक वाक्यें आचाराचें प्रभुत्व व महत्व दाखविण्यांत अग्रगण्य आहेत. बौद्ध धर्मांतहि हाच प्रकार आढळतो. तेथें आचाराबद्दल सील शब्द आढळतो. उत्तमशीलसंपन्न मनुष्यच भवसागर तरुन निर्वाण प्राप्त करून घेण्यास योग्य व समर्थ होतो.

'सब्बदा सीलसंपन्नो पञ्ञावा सुसमाहितो ।
आरद्ध-विरियो पहितत्तो ओघं तरति दुत्तरं ॥
( सं. १-३३ )

जो शीलसंपन्न आहे-सदाचरणसंपन्न आहे-प्रज्ञावान आहे, सुशांत आहे, प्रयत्नशील आहे, तत्त्वज्ञानी आहे, तोच दुस्तर असा हा संसार ओघ तरून जाण्यास समर्थ होतो. यावरून सीलसंपन्न मनुष्यच धर्मक्षेत्रांत विजयी होऊन सुखशांति प्राप्त करून घेतो.

याचें कारण असें कीं शीलसंपन्न—सच्चरित्र—मनुष्यालाच चित्ताची एकाग्रता साध्य होऊं शकते. चित्ताची एकाग्रता साध्य झाली तरच प्रज्ञा उजळून, तेथें सत्यज्ञानाचा साक्षात्कार उमटतो आणि सत्यज्ञानाचा साक्षात्कार झाला म्हणजे सर्व दुःखांतून-संसारचक्रांतून-जन्ममृत्यूच्या मगरमिठीतून-सुटका होऊन, निर्वाणाचें अढळ शांतिस्थान-परम सुखाचें

मंगल धाम-हातीं लागतें व मानवजन्माचें साफल्य व सार्थक होऊन हा नरजन्म कृत्यकृत्य होतो !

ही विचारसरणी भगवंतानी पुढील वचनांत स्पष्ट गोवून दाखविली आहे. 'सीलपरिभावितो समाधि महप्फलो होति महानिसंसो, समाधिपरिभाविता पञ्ञा महप्फला होति महानिसंसा, पञ्ञाभावितं चित्तं सम्मदेव आसवेहि विमुच्चति' ( दीघनिकाय, १६–१२ ) शीलयुक्त–सदाचारयुक्त–समाधि मोठी फलदायक व तशीच मोठी लाभदायक होते. आणि समाधियुक्त प्रज्ञा ही मग तशीच फलदायक व लाभदायक होते. याप्रमाणें प्रज्ञाभावित चित्त सर्व मलदोषांतून–म्हणजे कामासव, भवासव, दृष्टि–आसव, अविद्यासव–या सर्व आसवांतून सर्वस्वी मुक्त होऊन, स्फटिकाप्रमाणें शुद्ध, स्वच्छ व निर्मल होते.

आणि चित्त शुद्ध व निर्मल झालें म्हणजे तेथें सत्यज्ञानाचा प्रकाश उजळून, अविद्येचा नाश-अतिथी-होते. अविद्येचा नाश म्हणजेच दुःखमुक्तता - बंधमुक्तता - संसारमुक्तता - अर्थात् शाश्वत शांति !! हें सर्व घडून यावयास मनुष्य प्रथम शीलसंपन्न व्हावयास पाहिजे. शीलसंपन्न होणें म्हणजे दुश्चरितापासून अलिप्त राहणें. हाच भाव उपनिषदांतहि गोवून ठेवण्यांत आला आहे.

'नाविरतो दुश्चरितान्नाशान्तो नासमाहितः ।
नाशान्तमनसो वापि प्रज्ञानेनैनमाप्नुयात् ॥'
( कठ, १–२–२३ )

बौद्ध धर्मांत शील, धर्म व कर्म हे शब्द जवळ जवळ समान अर्थी आहेत. म्हणून सदाचाराचें वर्णन करतांना भगवान केव्हां सील शब्द, केव्हां धम्म ( धर्म ) शब्द, तर केव्हां कम्म ( कर्म ) शब्द वापरतात. पण त्या सर्वांचा भाव जवळ जवळ एकच व सारखाच आहे. तेव्हां सील शब्दांत कोणत्या गोष्टींचा अंतर्भाव होतो हें सांगणे आतां ओघासच आलें.

सीलाचे कुशल व अकुशल असे भेद असून, त्या दोन्हीचें वर्णन या पुढील वचनांत आढळतें तें येणें प्रमाणें :–

'पाणातिपातो खो वच्छ अकुसलं, पाणातिपाता वेरमणी कुसलं।
अदिन्नादानं खो वच्छ अकुसलं, अदिन्ना-दाना वेरमणी कुसलं।
कामेसु मिच्छाचारा खो वच्छ अकुसलं, कामेसु मिच्छाचारा
वेरमणी कुसलं।

मुसावादो खो वच्छ अकुसलं, मुसावादा वेरमणी कुसलं।
पिसुणा वाचा खो वच्छ अकुसलं, पिसुणाय वाचाय
वेरमणी कुसलं।

फरुसा वाचा खो वच्छ अकुसलं, फरुसाय वाचाय वेरमणी कुसलं।
सम्फप्पलापो खो वच्छ अकुसलं, सम्फप्पलापा वेरमणी कुसलं।
अभिज्झा खो वच्छ अकुसलं, अनभिज्झा कुसलं।
व्यापादो खो वच्छ अकुसलं, अव्यापादो कुसलं।
मिच्छादिट्ठि खो वच्छ अकुसलं, सम्मा दिट्ठि कुसलं।
इति खो वच्छ दस धम्मा अकुसला, दस धम्मा कुसला।'
( मज्झिमनिकाय, ७३–२ ).

पुढें जावयाच्या आधीं एका गोष्टीचा खुलासा करणें हें आम्हांस इष्ट वाटतें. ती म्हणजे ही कीं, वैदिक धर्मांत निषिद्ध गोष्टीला पाप व विहित गोष्टीला पुण्य हे शब्द वापरण्याची जशी वहिवाट आहे, तशीच वहिवाट बुद्ध धर्मांतहि आहे. मात्र फरक अितकाच कीं तेथें 'पुण्य' शब्दाऐवजी 'कुसल' व 'पाप' शब्दाऐवजी 'अकुसल' हे शब्द वापरतात. यादृष्टीनें वरील वचनांचा अर्थ आहे तो असा.

| पापाचरण | पुण्याचरण |
|---|---|
| १ जिवाची हिंसा हें पाप आहे | १ हिंसेपासून विरति हें पुण्य आहे. |
| २ चोरी करणें हें पाप आहे | २ चोरी न करणें हें पुण्य आहे. |
| ३ व्यभिचार हें पाप | ३ व्यभिचारापासून विरति हें पुण्य. |
| ४ खोटें बोलणें हें पाप | ४ खोटें न बोलणें हें पुण्य. |

| पापाचरण | पुण्याचरण |
| --- | --- |
| ५ चहाडी करणें हें पाप | ५ चहाडी न करणें हें पुण्य. |
| ६ कठोर बोलणें हे पाप | ६ कठोर न बोलणें हें पुण्य. |
| ७ गप्पा मारणें हें पाप | ७ गप्पा न मारणें हें पुण्य. |
| ८ लोभ धरणें हें पाप | ८ लोभ न धरणें हें पुण्य. |
| ९ रागावणें हें पाप | ९ न रागावणें हें पुण्य. |
| १० मिथ्यादृष्टि हें पाप | १० सम्यक् दृष्टि हें पुण्य. |

याप्रमाणें बौद्ध धर्मांत दहा पातकें व दहा पुण्यें असून, त्यांत पहिली तीन शारीरिक, त्याच्या पुढचीं चार वाचिक व शेवटलीं तीन मानसिक कृत्यें आहेत. कोठें कोठें पाप व पुण्य यांबद्दल 'दुराचरण व सदाचरण हे शब्दहि वापरण्यांत येतात. एकंदरींत बौद्धधर्माचें मुख्य आचारशास्त्र वरील वचनांत केंद्रीभूत झालेलें असून, तें अष्टांगिक मार्गांत 'सम्मा संकल्प' 'सम्मावाचा' व 'सम्मा कम्मांत' या तीन सदरांत विभागलेलें आहे.

अर्थात् जोपर्यंत मनुष्य या उपरनिर्दिष्ट पापाचरणापासून परावृत्त होत नाही-इतकेंच नव्हे तर त्यांतच रंगून राहतो-तोपर्यंत तो भगवंताच्या दृष्टीनें धर्मक्षेत्रांत पदार्पण करण्यास मुळींच अधिकारी होत नाहीं. असा दुराचारी मनुष्य तीं पापकर्में करून प्रथम प्रथम जरी सुखी व संपन्न दिसत असला व झाला असला, तरी शेवटीं तो पापकर्मामुळें आपल्या नाशास-अधोगतीस-आपणच कारण होतो, ही गोष्ट भगवंतानें अगदी स्पष्ट बोलून दाखविली आहे.

भगवान म्हणतात :–

> 'यो पाणमतिपाते ति मुसावादञ्च भासति ।
> लोके अदिन्नमादयति परदारं च गच्छति ।
> सुरामेरयपानंच यो नरो अनुयुञ्जति ।
> इधेव पे'सो लोकस्मि मूलं खनति अत्तनो ॥'
>
> (धम्मपद, १८, १२ व १३).

भावार्थ :– जो प्राणिहिंसा करतो, जो असत्य बोलतो, जो चोऱ्या करतो, जो परदारेशी व्यभिचार करतो, जो निशाबाजी करतो, तो मनुष्य आपला आधारच खणून काढण्यास आपणच कारणीभूत होतो.' हा भगवंतानें दिलेला अिशारा जोपर्यंत हा देहतर्पणरत मानव लक्ष्यांत घेऊं अिच्छित नाहीं, तोपर्यंत तो पशुकोटींतच गणला जाऊन, त्याचें दुःख कालत्रयींहि चुकावयाचें नाहीं ! मनुष्य होऊन तो सुखशांतीच्या नंदनवनांत *प्रवेश करील, ही आशाच मग व्यर्थ आहे !*

आतां मनुष्याच्या हातून जें कांहीं आचरण घडतें, त्याच्या मुळाशी कोणतातरी एक हेतु असतोच असतो. त्याशिवाय कर्म घडणें शक्यच नाहीं. म्हणजे हेतु हें कर्माचें बीज-प्रेरकशक्ति-आहे. तें चांगलें अगर वाईट-कुशल अगर अकुशल-याची परीक्षा त्याच्या बुडाशी वावरणाऱ्या हेतूवरूनच केली जाते. म्हणजे हेतूच्या बऱ्यावाईट लक्षणावरून, कर्माचें स्वरूप ओळखलें जातें आणि म्हणून हेतूंचेंहि कर्मप्रमाणेंच कुशल अकुशल असे भेद पाडण्यांत आले आहेत. ते भेद म्हणजे हे असे :– 'लोभो दोसो च मोहो च हेतु अकुसला तयो अलोभादोसामोहा च कुसला ब्याकता तथा ॥' ( अभिधम्म, भाग १ ). लोभ, द्वेष व मोह हे तीन हेतु अकुशल व अलोभ, ( म्हणजे परोपकार ), अद्वेष ( मैत्री ) व अमोह ( ज्ञान ) हे तीन हेतु कुशल म्हणजे चांगले आहेत. याचें कारण असें कीं, मनुष्य हा जेव्हां लोभवश, द्वेषवश किंवा मोहवश होतो अगर असतो, तेव्हां त्याचें चित्त स्थिर, स्वच्छ व शांत न राहतां, स्वार्थामुळे-विकारवशतेमुळें-तें चंचल, गढूळ व सारखें प्रक्षुब्ध होऊन खळबळत असतें. आणि यामुळें त्यावेळीं विवेकदीप मंदप्रभ होऊन मनुष्याला स्वहित किंवा परहित-आत्मकल्याण किंवा परोपकार-समजणें दुर्घट होऊन, तो प्राणी नेमका स्वार्थांधतेमुळें-आडमार्गास लागतो व अखेर दुःखगर्तेत गडप होऊन धडपडूं व तळमळूं लागतो ! तसा दुर्धर प्रसंग ओढवूं नये म्हणून या त्रयी दोषापासून चार पावलें दूर राहणें हें परिणामीं हिताचें, सुखाचें व कल्याणाचें आहे. धर्म हा दूरदृष्टि–सूक्ष्मदृष्टि–असल्यामुळें, तो केव्हांहि मनुष्याला पथ्यकर

अधिकारी होईल. आणि अखेर सद्विचार व सदाचार यांनी परिशुद्ध झालेला तो मुमुक्षु अखेर संसारमुक्त-दुःखमुक्त-होतसाता परमशांतीचें मंगल स्थान प्राप्त करून घेऊन या दुर्लभ मानव जन्माचें सार्थक करील! सरशेवटीं सांगावयाचा मुद्दा हा कीं, ज्याला धर्म क्षेत्रांत प्रवेश करून आपला मानव जन्म कृतार्थ करावयाचा आहे, त्यानें प्रथम आपले शील सुधारून तें निर्दोष करावयास व राखावयास पाहिजे. म्हणजे काया, वाचा, मनें त्याचें आचरण परिशुद्ध व निर्मल असावें.

हो गोष्ट भगवंतानें खालील गाथेंत स्पष्ट बजावून ठेविली आहे.

'कायप्पकोपं रक्खेय कायेन संवुतो सिया।
कायदुच्चरितं हित्वा, कायेन सुचरितं चरे ॥ ११ ॥
वचीपकोपं रक्खेय वाचाय संवुतो सिया।
वचीदुच्चरितं हित्वा, वाचाय सुचरितं चरे ॥ १२ ॥
मनोपकोपं रक्खेय मनसा संवुतो सिया।
मनोदुच्चरितं हित्वा, मनसा सुचरितं चरे ॥ १३ ॥
कायेन संवुता धीरा अथो वाचाय संवुता।
मनसा संवुता धीरा, ते वे सुपरिसंवुता ॥ १४ ॥
(धम्मपद, १७, ११ ते १४)

भावार्थ :– शारीरिक दुराचरणापासून सुरक्षित रहा! जिभेला आवरून धर! वाणीचे दुराचार टाकून तिच्या सदाचाराचें आचरण कर! तसेंच मानसिक दुराचारापासून अलिप्त रहा! मनाचें संयमन कर! मनाचे दुराचार टाकून देऊन मानसिक सदाचाराचें आचरण कर! जो धीर पुरुष कायेनें, वाचेनें आणि मनानें सुसंयमित राहतो, तोच पूर्णत्वानें संयमित झाला असें होतें.

याप्रमाणें सम्यक् कर्मांताचें हें थोडक्यांत विवरण आहे. तें कोणत्याहि धर्माला शोभण्यासारखेंच आहे हें निराळें सांगावयास नकोच.

सम्यक् आजीव (सम्मा आजीव) :– 'कतमो च भिक्खवे सम्मा आजीवे। ? इध भिक्खवे, अरिय सावको मिच्छा आजीव पहाय सम्मा आजीवेन जीविकं कप्पेति, अयं वुच्चति भिक्खवे सम्मा आजीवं ॥

भावार्थ:- आर्य श्रावकानें मिथ्या आजीवास म्हणजे निषिद्ध उद्योगास सोडून विहित उद्योगधंदा करून आपला चरितार्थ चालवावा. याला सम्यक् आजीव म्हणतात.

जो बौद्ध उपासक आहे, त्यानें वाटेल तो धंदा करून उदरनिर्वाह करावा, असा त्या धर्माचा आदेश नाहीं. कारण निषिद्ध व्यवहारापासून मिळविलेलें अन्न सत्वशुद्धीस पोषक व उपकारक होत नाहीं. आणि सत्कर्मार्जित अन्न जर मिळालें नाहीं, तर मन शुद्ध व सात्विक बनण्यास अडथळा होतो. कारण अन्नाचें सूक्ष्म रूप म्हणजेच मन होय. आहारावरच सत्वशुद्धि अवलंबून असल्यामुळें त्या विषयीं धार्मिक मनुष्यानें फार जपलें पाहिजे.

भगवंताने हे पुढील पांच धंदे उदरनिर्वाहास निषिद्ध म्हणून सांगितले आहेत. शस्त्राचा व्यापार, गुरांचा व्यापार, मांसाचा व्यापार, मद्याचा व्यापार व विषाचा व्यापार. हे पांच धंदे धर्मशील मनुष्यानें करावयाचे नाहींत. हे व अशाप्रकारचे इतर धंदे सोडून बाकीच्यावर उपजीविका करण्यास बौद्ध धर्माची हरकत नाहीं. अर्थात् उपरिनिर्दिष्ट पांच धंदे सोडून भितर विहित धंद्यावर उपजीविका करणें याला सम्यक् आजीव असें म्हणतात.

सम्यक् व्यायामः- (सम्मा वायामो) इध भिक्खवे भिक्खु अनुप्पन्नानं पापकानं अकुसलानं धम्मानं अनुप्पादाय छन्दं जनेति वायमति, विरियं आरभति, चित्तं पग्गण्हाति पदहति। उप्पन्नानं पापकानं अकुसलानं धम्मानं पहानाय छन्दं जनेति वायमति, विरियं आरभति, चित्तं पग्गण्हाति पदहति। अनुप्पन्नानं कुसलानं धम्मानं उप्पादाय छन्दं जनेति वायमति, विरियं आरभति, चित्तं पग्गण्हाति, पदहति। उप्पन्नानं कुसलानं धम्मानं ठितिया असम्मोसाय भिय्योभावाय वेपुलाय भावनाय पारिपूरिया छन्दं जनेति वायमति, विरियं आरभति, चित्तं पग्गण्हाति पदहति। अयं वुच्चति भिक्खवे सम्मावायामो ॥ (दीघनिकाय, २२-२१).

भावार्थ :- आणि भिक्षुहो ! सम्यक् व्यायाम कोणता ? भिक्षुहो ! भिक्षु हा उत्पन्न न झालेले पापक अकुशल धर्म उत्पन्न होऊं नयेत अशी

अिच्छा धरतो, प्रयत्न करतो, वीर्यारंभ करतो, चित्त दृढ करतो आणि म्हणतो. उत्पन्न झालेले पापक अकुशल धर्म टाकून देण्याची अिच्छा करतो, त्यासाठीं प्रयत्न करतो, वीर्यारंभ करतो, चित्त दृढ करतो, आणि म्हणतो. त्याचप्रमाणें उत्पन्न न झालेले कुशल धर्म उत्पन्न व्हावेत अशी अिच्छा धरतो, त्यासाठीं प्रयत्न करतो, वीर्यारंभ करतो, चित्त दृढ करतो, आणि म्हणतो. उत्पन्न झालेले कुशल धर्म कायम रहावेत, पुसून जाऊं नयेत, वृद्धिगत व्हावेत, विपुल व्हावेत, त्यांची भावना व्हावी, ते परिपूर्ण व्हावेत अशी अिच्छा धरतो, त्यासाठीं प्रयत्न करतो, वीर्यारंभ करतो, चित्त दृढ करतो व म्हणतो. यास भिक्षुहो ! सम्यक् व्यायाम म्हणतात.

आतां येथपासून समाधी-प्रकरणास सुरुवात होते. अर्थात् प्रत्यक्ष समाधीचा विषय नसला तरी ती साध्य होण्यासाठीं प्रथम करावयाची जी पूर्व तयारी, तिच्या कथनास म्हणून हा सम्यक् व्यायाम व पुढील सम्यक् स्मृति हीं प्रकरणें जोडण्यांत आलीं आहेत. येथें व्यायाम म्हणजे प्रयत्न. सम्यक् व्यायाम म्हणून प्रयत्न. याचे एकंदर चार विभाग आहेत. संयम, प्रहाण, भावना व अनुरक्षण. याचा उद्देश हा कीं मुमुक्षु साधकानें असद्विचार व अकुशल वर्तन यांचा सर्वस्वी त्याग व निर्मूलन करून, त्या ऐवजी तेथें कुशल विचार व शुभवर्तन यांचें बीजारोपण करून, त्याचें संरक्षण, संपोषण व संवर्धन करावें.

अर्थात् त्याचें मन लोभमोहादि दुर्विकारांपासून मुक्त होऊन, तें निरंतर सद्विचारांत व सद्वर्तनांत रत होऊन राहील असें करावें. आणि हें घडून यावयास एकांतवास व वैराग्यवृत्ति जरूर असून, ती प्रथम अंगीं बाणली पाहिजे. त्यांच्या सहाय्यानेंच या अष्टांगिक मार्गाचे पुढील टप्पे साध्य होण्यासारखे आहेत. एकंदरींत चित्तशुद्धीसाठीं भगवंतांनी हा सम्यक् व्यायामाचा पाठ घालून दिला आहे, असें म्हटल्यास त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं. असो.

आतां सम्यक् व्यायामातील पहिला टप्पा म्हणजे 'संयम' प्रयत्न, त्याविषयीं दोन शब्द येथें लिहितो. मनामध्यें आतांपर्यंत रागलोभद्वेषादि

जे अकुशल विचार उत्पन्न झाले नसतील त्यांना उत्पन्न होऊं न देणें. अशा प्रकारें मन ताब्यांत ठेवून त्याचा संयम करणें. उदाहरणार्थ सुंदर रूप डोळ्याला दिसते. मधुर आवाज कानावर येतो. गोड गन्ध नाकाशी येऊन भिडतो. स्वादिष्ट पदार्थ जिभेवर खेळूं लागतात. सुखकर वस्तु अंगाला स्पर्श करतात, तेव्हां डोळ्याला त्या रूपसौंदर्यांत, कानाला त्या मधुर स्वर-सौष्ठवांत, जिभेला त्या रसमाधुर्यांत, नाकाला त्या सुगंधपरागांत, शरीराला त्या स्पर्शसुखांत रंगून बसण्यास अवसर न मिळेल, किंवा त्या वस्तूंवर प्रेम न जडेल, अशी खबरदारी घेऊन, मनावर ताबा बसवून त्याच्या करवीं प्रेम अिंद्रियांचा संयम म्हणजे निरोध करणें.

कारण अशा वेळीं अिंद्रियांचा संयम केला नाहीं, तर मनांत काम-राग-लोभादि अकुशल विचार उचल खाऊन, साधकास तीं अिंद्रियें आडमार्गास हटकून ओढून नेतात. अिंद्रियांना वळवणार आणण्याची, त्यांचा निग्रह करण्याची शक्ति मनांत असल्यामुळें, मनाला त्या विचारापासून अलिप्त ठेवल्यास अिंद्रियांची चळवळ-ओढ-थंड पडून, चित्त स्थिर राहते. तसें न झालें तर मन अिंद्रियांच्या स्वाधीन होऊन पुढें त्यापासून साधकाचा अधःपात खात्रीनें होतो ! ही आपत्ति टाळण्यासाठी हा संयम आहे. अर्थात् हा अिंद्रिय-संयम होय. हें साधण्यास नवीन अकुशल विचारास उत्पन्न होऊं न देणें हाच एक राजमार्ग होय.

आतां 'प्रहाण' प्रयत्न. याची झाली तरी तितकीच आवश्यकता आहे. ज्यावेळीं विषयसौंदर्यानें व विषय-माधुर्यानें मनांत त्याविषयीं भोगेच्छा उत्पन्न होते, त्यावेळीं मनाचा निग्रह करून, त्या भोगेच्छेला आळा घालणें, धुडकावून देणें, अिंद्रियांना तिकडे बहकूं न देणें, याला 'प्रहाण' व्यायाम असें म्हणतात. विषय समोर असतां, तिकडे धावणाऱ्या मनाचा निग्रह जर केला नाहीं तर चित्त विषयमोहानें चंचल होऊन, तेथील स्थिरता व एकाग्रता यास धक्का पोंचून समाधीला अडथळा होतो. भोगेच्छा उत्पन्न झाली आणि तिचा निरोध न केला तर ती पुढें प्रबळ होऊन तिचें केव्हां प्रेमांत तर केव्हां द्वेषांत रूपांतर होतें. असें झालें म्हणजे साधकाच्या

मार्गात अडथळा उत्पन्न होऊन, पुढें त्याचा प्रगतीचा मार्ग खुंटतो. ही आपत्ति टाळण्यासाठीं तसे अकुशल पाप विचार उत्पन्न होतांच त्यांना जागच्या जागींच चेंपून टाकून, निर्वीर्य करणें किंवा त्यांना अंतःकरणातून तावडतोब हुसकावून देणें, या शिवाय चित्तशांतीला दुसरा मार्ग नाहीं. आणि हें घडून आणण्यासाठींच हा प्रहाण प्रयत्न आहे.

ही गोष्ट कशी साध्य करून घ्यावी अगर घेता येते, याविषयी मज्झिमनिकायांत तोड सांगितली आहे, ती अशी :–

( १ ) मनांत कोणत्यातरी विषयावर अगर वस्तूवर विचार करीत असतांना त्यापासून अंतःकरणात तृष्णा, द्वेष, मोह यांनी दूषित अशा पापमय अकुशल विचाराच्या लहरी उसळूं लागल्यास त्या शमविण्यासाठीं त्याच्या जागीं तद्विरुद्ध कुशल विचाराची स्थापना करून, त्यावर चिंतन करावें. म्हणजे ते अकुशल विचार आपोआप निःसत्व होऊन, जेथल्या तेथेंच जिरून जातात.

( २ ) किंवा त्या पापमय विचाराचे दुष्परिणाम ध्यानांत आणून, त्याची सदोषता नीट मनांत बिंबवावी.

( ३ ) किंवा तशा पापमय विचारांना मनांत मुळींच थारा देऊं नये.

( ४ ) अथवा दांतावर दांत ठेऊन, जीभ टाळूला लावून चित्ताचा निग्रह करावा.

असें केल्यानें तृष्णा, द्वेष, मोह इत्यादि अकुशल मनोवृत्ति दाबिल्या जाऊन, चित्त स्थिर व शांत होतें. अशा रीतीनें प्रयत्न करून उत्पन्न झालेले अकुशल पापमय मनोवृत्तीचे निर्मूलन करणें यास 'प्रहाण' प्रयत्न असे म्हणतात.

हे वरील दोन प्रयत्न अशुभ मनोवृत्तीचा प्रतिकार कसा करावा, अगर त्याचें उच्चाटण कसें करावें, याविषयीं झालें. आतां पुढील प्रयत्न

शुभ मनोवृत्तींचें उत्पादन, संरक्षण व संवर्धन कसें करावें या विषयीचे आहेत. त्यांत पहिला प्रयत्न भावना-उत्पादन या विषयीं आहे. तो म्हणजे असाः– आपल्यामध्यें जे कुशल विचार नसतील ते आणण्याचा प्रयत्न करणें. हे कुशल विचार म्हणजे सत्यज्ञानास पोषक व उपकारक अशा गोष्टींचें चिंतन. यास बोध्यंग असें नांव असून, त्यांत स्मृति, धर्म-विचय, वीर्य, प्रीति, प्रश्रब्धि, समाधि व उपेक्षा या सात अंगांचा समावेश होतो. ज्ञानोत्पादनास या गोष्टी अवश्य असल्यामुळें भिक्षूनें सतत त्याचा अभ्यास करणें हे अत्यंत जरूर आहे. या बोध्यंगाच्या सतत अभ्यासापासून मनांत कुशल व कल्याणमय विचारांची उत्पत्ति होऊन ते वाढीस लागतात व त्यापासून धर्मक्षेत्रांत प्रगति होण्यास व ज्ञानवृद्धीस मदत होते. अशा प्रयत्नास भावना प्रयत्न असें नांव आहे. सम्यक् व्यायामाचा हा तिसरा प्रकार होय,

•

आतां अनुरक्षण प्रयत्न म्हणजे काय हें पाहूं. आपल्या जीवन-चारित्र्यांत ज्या चांगल्या गोष्टी घडल्या असतील व उत्तम सवयी जडल्या असतील त्या नष्ट न होतां, उलट उत्तरोत्तर वाढीस लागतील, विकास पावतील असा सतत प्रयत्न मनःपूर्वक करीत राहणें, यास अनुरक्षण प्रयत्न असें म्हणतात. या सम्यक् व्यायामापासून समाधीला ज्या आवश्यक व उपकारक गोष्टी आहेत, त्यांचें संरक्षण केलें जातें. एवंच सांगावयाचा मथितार्थ हा कीं ज्या ज्या उत्तम, हितकर व कल्याणमय गोष्टी मानवी प्रयत्नानें, सामर्थ्यानें, पराक्रमानें साध्य करून घेतां येण्यासारख्या आहेत, त्या सर्व गोष्टी प्राप्त झाल्याशिवाय, प्राप्त करून घेतल्याशिवाय मी कदापि स्वस्थ बसणार नाहीं, काय वाटेल ते होवो, कितीहि श्रम पडोत, अडचणी येवोत, आयास होवोत, किंबहुना अंगातील रक्त आटून जावो किंवा मांस सुकून जावो, सर्व शक्य तेवढे प्रयत्न करून-भगीरथ प्रयत्न करून-मी सर्व सदाचार व सद्गुण संपादन करून त्यांची वाढ व विकास अवश्य करीनच करीन, या मनोनिश्चयाला व तदनुसार प्रयत्नाला सम्यक् व्यायाम-अनुरक्षण व्यायाम-हें नांव आहे. यालाच वैदिक भाषेंत तपश्चर्या हें नांव आहे. तपश्चर्या म्हणजे दुष्ट सवयींचें उच्चाटण व सुष्ट

गोष्टीचें संपादन करण्यासाठीं करावयाचें कडकडीत व्रत. 'हें साध्य करून घेतलेला तपस्वी जगज्जेता होतो - तपसा वै लोकं जयति - असें याज्ञयल्क्यांनी स्वानुभवावरून बोलून दाखविलें आहे व भगवान बुद्ध झाले तरी तोच भावार्थ सम्यक् व्यायामांत ग्रथित करून ठेवतात. असो.

सम्यक् स्मृति ( सम्मा सति )– 'अिध भिक्खवे भिक्खु काये कायानुपस्सी विरहति. आतापी सम्पजानो सतिमा विनेय्य लोके अभिज्झादोमनस्सं, वेदनासु....पे०....चित्ते...पे०....धम्मेसु धम्मानुपस्सी विहरति आतापी सम्पजानो सतिमा विनेय्य लोके अभिज्झादोमनसं । अयं वुच्चति भिक्खये सम्मासति ।।' ( दीघनिकाय, २२–२१ ).

भावार्थ :– आणि भिक्षुहो ! सम्यक् स्मृति कोणती ? भिक्षुहो ! भिक्षु शरीराकडे शरीर या दृष्टीनें पाहणारा, वेदनाकडे वेदना या दृष्टीनें पाहणारा, चित्ताकडे चित्त या दृष्टीनें पाहणारा, धर्माकडे धर्म या दृष्टीनें पाहणारा, त्याचप्रमाणें उद्योगी जागृत, स्मृतिमान होतसाता अभिध्या म्हणजे लोभ व दौर्मनस्य म्हणजे दुःख टाकून देऊन या जगांत विहार करतो, यास भिक्षुहो ! सम्यक् स्मृति म्हणतात.

बुद्ध भगवंतांनी जो धर्म उपदेशिला, त्याचे परम-साध्य म्हणजे परमसुखस्वरूप असें मंगल निर्वाणपद हें होय. आणि वैदिक ऋषींनी सांगितलेल्या आर्यधर्माचें अंतिम ध्येय झालें तरी सच्चिदानंदस्वरूप असें ब्रम्ह म्हणजे मोक्ष. भगवंताचें निर्वाण व वैदिक ऋषींचें ब्रम्ह यांत साम्यविरोध काय आहे हें आम्ही पुढें दाखविणार आहोच. आतां येथें फक्त सांगावयाचें अितकेंच कीं बुद्ध-कथित निर्वाण प्राप्तीचा मार्ग व ऋषिप्रणीत मोक्षप्राप्तीचा मार्ग या दोहोंत तत्त्वतः म्हणण्यासारखा फरक नाहीं. दोन्ही समान्तरानें-जोडीनें-जात आहेत. भगवंताचा निर्वाण प्राप्तीचा जो मार्ग, त्याला अष्टांगिक मार्ग हें पारिभाषिक नांव असून, त्यांत सम्यक् दृष्टीपासून सम्यक् समाधिपर्यंत आठ अंगांचा समावेश होतो आणि ऋषिप्रणीत जो आत्मसाक्षात्कारांचा मार्ग आहे, तो मुख्यतः चार टप्प्यांचा असून, त्याची रूपरेखा याज्ञयल्क्यांनी शतपथांत नमूद केलेली आहे.

हा विषय योगीश्वरानी आपल्या भार्येला म्हणजे मैत्रेयीला आत्मोपदेश करतांना हाताळलेला असून, त्याचें स्वरूप आहे तें असें-

'आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेय्यात्मनो वा अरे दर्शनेन श्रवणेन मत्याविज्ञानेनेदं सर्वं विदितम्'॥ ( श. प. १४-५-४-५ ). अगे मैत्रेयि! हा जो सर्वव्यापी आत्मा आहे, *त्याला ओळखलें पाहिजे. त्याचे श्रवण केले पाहिजे, त्याचे मनन केलें* पाहिजे. आणि त्याचें सतत ध्यान म्हणजे चिंतन केलें पाहिजे. कारण मैत्रेयि! या आत्म्याचें दर्शन, श्रवण, मनन व निदिध्यान केल्यानेंच या सर्व *विश्वाचे-अर्थात् आत्मस्वरूपाचें त्याला मंगलज्ञान व साक्षात्कार होतो.* अर्थात् मनुष्य या संसारातून-जन्ममृत्यूच्या भवचक्रांतून -- मुक्त होतो.

या दोन्ही वचनावरून जरासूक्ष्म दृष्टि फिरविली व थोडा विचार केला तर योगीश्वर प्रणीत मोक्षमार्ग व बुद्धकथित निर्वाणमार्ग या दोहोंत *किती सुंदर साम्य व मेळ आहे, हें पाहून मनाला क्षणभर आनंद व* कौतुक वाटल्यावाचून रहाणार नाहीं, अशी आमची समजूत आहे. येथें आम्हांस स्पष्ट सांगावेसें वाटतें की बुद्ध भगवान योगीश्वर याज्ञवल्क्यास वाट पुसत पुसतच त्यांनी आपल्या धर्माचा मार्ग आखला व आक्रमिला आहे, यांत यत्किंचित्हि अतिशयोक्ति नाहीं. आणि याची वाचकांसहि प्रचीति हा ग्रंथ वाचतां वाचतां ठिकठिकाणी येत जाईल.

फार लांब नको. येथेंच पहा. याज्ञवल्क्यांनी आत्मज्ञानाचे जे चार टप्पे सांगितले आहेत त्याचेंच अनुकरण, व विशदीकरण बुद्ध भगवंतानी आपल्या धर्माला सुसंगत अशा आठ टप्प्यांत केलें आहे, हें सूक्ष्म दृष्टीला तेव्हांच दिसून येईल. योगीश्वरांच्या आत्मबोधातील 'दर्शन', 'श्रवण', 'मनन' व ध्यान ( द्रष्टव्यः, श्रोतव्यः, मंतव्यः, व निदिध्या-*सितव्यः ) या मुख्य चतुःसूत्रीचें भगवंतानी आपल्या अष्टांगिक मार्गातील सम्यक्* दृष्टि ( 'द्रष्टव्यः' ), सम्यक् संकल्प, सम्यक् स्मृति ( मंतव्यः' ) व सम्यक् समाधि ( निदिध्यासितव्यः' ) या चार मुख्य

अंगांत किती बेमालूम व सफाईदार उतरविलें आहे, हें पाहून वाचकांना अचंबा वाटल्यावाचून रहाणार नाहीं.

आतां याज्ञवल्क्यांचा सगळा रोख आत्मवर्णनपर असल्यामुळें व तें ऐकणारी मैत्रेयी ही सुबुद्ध विदुषी असल्यामुळे त्यांनी तो उपदेश थोडक्यांत केला, हें ठीकच झालें पण बुद्धाची गोष्ट अशांतली नव्हती. त्यांचा भिक्षुवर्ग सगळा सामान्य बुद्धीचा असल्यामुळे व त्यांचा विषयहि निराळा असल्यामुळें त्यांना त्या चतुःसूत्रीची फोड करून श्रोत्यांना समजेल व विषयाला साजेल अशा बेतानें आठ टप्प्यांत त्यांना त्याचें व्याख्यान करावें लागलें, अितकेंच. दोघांची शिकवण रूपतः भिन्न असली तरी तत्त्वतः *एकच व सारखीच आहे, हें पाहून कोणाला कौतुक वाटणार नाहीं ?* याज्ञवल्क्य व बुद्ध ही जोडी कशी समांतरानें-जोडीनें-चालत आहे हें पुढें आम्ही 'निर्वाण' प्रकरणांत स्पष्ट करून दाखविणार आहों. हें सर्व सांगण्याचा उद्देश अितकाच कीं बुद्ध भगवान हे याज्ञवल्क्यांच्या पावलावर पावलें टाकीतच त्यांनी आपल्या धर्माची मांडणी व उभारणी केली याची वाचकांनी दखलगिरी घ्यावी. असो. आतां प्रकृत विषयाकडे वळूं.

जग हें दुःखमय असून त्यांतून सुटका व्हावयाची तर अविद्येचा निरास केला पाहिजे-म्हणजे चार आर्य सत्यें ओळखिलीं पाहिजेत-हा पाठ 'सम्यक् दृष्टि' या सदरांत सांगून, पुढें तेथून अष्टांगिक मार्गाचें पायरी पायरीनें वर्णन करीत करीत अखेर तो पाठ समाधिपर्यंत भगवंतानी आणून सोडला आहे. अर्थात् समाधि ही शेवटची पायरी असून, ती यशस्वी व प्रभावी व्हावयाची तर प्रथम शील शुद्ध व पवित्र असावयास पाहिजे, हेंहि त्याबरोबरच सांगून टाकले आहे. कारण समाधि सफल व्हावयाला प्रथम शील सुधारणेची गरज असून, त्याशिवाय समाधीची भूमिका तयार होऊं शकत नाहीं.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे शील परिशुद्ध झालें म्हणजे समाधि सफल होते आणि समाधि साध्य झाली म्हणजे प्रज्ञा उजळते. प्रज्ञा उजळली म्हणजे तेथें सत्यज्ञानाचा प्रकाश खुलतो आणि सत्य ज्ञानाचा

प्रकाश खुलला म्हणजे आनंदमय निर्वाणाची प्रचीति येते. येथें मुमुक्षु दमय दुःखमुक्त होऊन त्याचा संसार चुकला असें होतें. बुद्ध भगवंताची ही-अशी निर्वाणप्राप्तीची-शाश्वत सुखलाभाची-सरळ मांडणी असून साधकानें त्या रोखानें वाटचाल करावी असा त्यांचा आग्रहपूर्वक उपदेश आहे.

प्रस्तुतचा विषय-म्हणजे सम्यक् स्मृति-याचा अंतर्भाव अष्टांगिक मार्गातील मुख्य तीन सदरांपैकीं शेवटच्या म्हणजे समाधि सदरांत येतो, हें मार्गे सांगण्यांत आलेंच आहे. प्रथम प्रज्ञा, नंतर शील आणि अखेर समाधि हा असा अनुक्रम असून प्रज्ञा व शील यांचें विवेचन आतां पर्यंत करण्यांत आलें असून, येथपासून पुढें समाधीला प्रारंभ होणार आहे. शील सुधारणेचा व संवर्धनाचा उद्देश हा कीं, अकुशल मनोविकारांचें-पाप-वृत्तीचे-समूळ उच्चाटण व्हावें आणि समाधीचा हा कीं मनांत कुशल चित्तवृत्तीची-सत्प्रवृत्तीची-जोपासना व समृद्धि साधावी अकुशल मनोवृत्तीचें निर्दालन-निर्मूलन-कसें करावें व कसें करतां येतें, हें सम्यक् वाणी, सम्यक् कर्मांत व सम्यक् आजीव या तीन सदराखालीं दाखविण्यांत आलें असून कुशल मनोवृत्तीची वाढ व विकास करण्याची खुबी सम्यक् व्यायाम व सम्यक् स्मृति या दोन सदरांत सांगून, अखेरच्या म्हणजे सम्यक् समाधि या सदरांत चित्ताची एकाग्रता कशी साधावी व साधली पाहिजे, याचा ऊहापोह करण्यांत आला आहे.

हें सर्व एकच वाक्यांत सांगावयाचें म्हणजे सर्व पापवृत्तीचें उच्चाटण कुशलवृत्तीचें संगोपन व चित्ताची एकाग्रता यांचें विवेचन प्रज्ञा, शील व समाधि या सूत्रत्रयींत भगवंतांनी फार सुंदररीतीनें, अत्यंत सावधगिरीनें मोठ्या कुशलतेनें सांगून त्यांचें सार पुढील गाथेत गोवून ठेविलें आहे. ती गाथा म्हणजे अशी–

सब्ब पापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा।
सचित्तपरियोदपनं एतं बुद्धान सासनं॥
(ध. प. १४–५).

कुशल मनोवृत्तीचें संवर्धन कसें करावें याविषयीं कांही गोष्टींचा खुलासा वर सम्यक् व्यायामाचें विवेचन करतांना येऊन गेलाच आहे.

आतां त्याच्या पुढील टप्पा प्रस्तुत स्थळीं विचारांत घ्यावयाचा आहे. या सम्यक् स्मृतीचे एकंदर चार भाग पाडण्यांत आले असून त्यांना अनुक्रमें आनापान स्मृति, कायगता स्मृति, वेदनानुस्मृति, व धर्मानुस्मृति अशीं नांवें देण्यांत आलीं आहेत. त्यांत प्रथम आनापान स्मृति म्हणजे काय, यांचे दोन शब्दांत दिग्दर्शन करतो.

आनापान स्मृति :– आनापान स्मृति म्हणजे जागृत राहून श्वासोच्छ्वास करणें. म्हणजे अश्वास व प्रश्वास यावर चित्ताची एकाग्रता करणें व राखणें. पण ही गोष्ट कांही सोपी नाहीं. ती दीर्घ अभ्यासानेंच साध्य होणारी आहे. कारण चित्त हें भारी चंचल आहे. क्षणभर देखील तें स्थिर राहूं शकत नाहीं. अरण्यातील मर्कटाप्रमाणें तें इकडे तिकडे सारखें धांवपळ करीत असतें. त्याला कह्यांत धरून एकाच ठिकाणीं अडकवून ठेवणें हें फार कठीण असून, फक्त प्रदीर्घ अभ्यासानेंच ती गोष्ट साध्य झाली तर होते. आणि हा अभ्यास साधण्यासाठींच प्रथम पाठ म्हणून या आनापान स्मृतीचा प्रयोग सांगितला आहे. याचें विधान दीघनिकायांत भगवंतांनी महासतिपठ्ठान सुत्तांत सांगितलें आहे, त्याचा अनुवाद येथें करतो म्हणजे झालें.

भगवान म्हणतात – ' भिक्षुहो ! भिक्षु हा कायामध्यें जागृत होऊन व राहून कशा प्रकारें विहार करतो ? भिक्षुहो ! तो अरण्यांत अगर एखाद्या झाडाखाली किंवा एकांत घरांत आसन मांडी घालून शरीर सरळ ठेवून चित्त समोर ठेवून बसतो. तो श्वास घेत असला तर मी श्वास घेत आहे, हें तो जाणतो. प्रश्वास सोडीत असला तर प्रश्वास सोडीत आहे, हें तो जाणतो. दीर्घश्वास घेत असला तर दीर्घश्वास घेत आहे आणि दीर्घ प्रश्वास सोडीत असला तर दीर्घ प्रश्वास सोडीत आहे, ही जाणीव त्यास असते, ऱ्हस्व श्वास घेत असला तर ऱ्हस्व श्वास घेत आहे आणि ऱ्हस्व प्रश्वास सोडीत असला तर ऱ्हस्व प्रश्वास सोडीत

आहे, ही स्मृतिहि त्यास असते. सर्व देहाचा अनुभव घेत असतांना जागृत राहून अश्वास व प्रश्वास करण्याचा तो अभ्यास करतो. तसेच कायसंस्कार शांत करून अश्वास व प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो याप्रमाणें आपल्या शरीरांत कायानुपश्यी होऊन तो विहार करतो. त्याच प्रमाणें दुसऱ्याच्या कायांतहि कायानुपश्यी होऊन विहार करतो. तसेंच आपल्या व दुसऱ्याच्या कायांत कायानुपश्यी होऊन विहार करतो.

आणि त्याचप्रमाणें शरीरांत उत्पत्ति-धर्म पाहून, विहार करतो. तसेंच तेथील विनाश-धर्म पाहून विहार करतो. 'शरीर आहे' हें जाणून, त्याची स्मृति ही ज्ञान व प्रतिस्मृति-प्राप्त्यर्थ सदैव उपस्थित म्हणजे जागृत राहते. असा भिक्षु अनाश्रित होऊन विहार करतो. जगातील कोणत्याहि वस्तूचें 'मी व माझें' या अहंकार व ममत्वबुद्धीनें ग्रहण करीत नाहीं. भिक्षुहो ! याप्रमाणें तो शरीरामध्यें कायानुपश्यी म्हणजे शरीराची आठवण ठेवून विहार करतो.

पुनः आणखी, भिक्षुहो ! तो भिक्षु चालत असतां 'मी चालत आहे' याची जाणीव ठेवतो. उभा असतां मी उभा आहे, बसला असतां 'मी बसलो आहे', अंथरूणावर पडला असतां 'मी अंथरूणावर पडलो आहे' हें सर्व तो जाणतो. म्हणजे शरीर हें ज्या ज्या अवस्थेंत असेल, त्या त्या अवस्थेंत तें आहे याची जाणीव त्यास असते.

तसेंच भिक्षुहो ! तो ( भिक्षु ) जात येत असतां, इकडे तिकडे पहात असतां, संघाटी, पात्र, चीवर इत्यादि धारण करीत असतां, खातपीत असतां, मलमूत्रादिकांचा उत्सर्ग करीत असतां, चालत असतां, उभा असतां, बसला असतां, जागत असतां, बोलत असतां, गप्प बसला असतां या सर्व अवस्थांमध्यें तो जागरूकतेनें वागतो.

याप्रमाणें या सर्व गोष्टी आनापान स्मृतीमध्यें मोडत असून, शरीराच्या सर्व क्रिया व सर्व अवस्था या सर्वांची त्यास पूर्ण जाणीव असते. आणि

म्हणून प्रपंचाकडे धांवणारे त्याचे सर्व संकल्प म्हणजे विचार जेथल्या तेथेंच थिजून जातात व चित्ताची एकाग्रता साधते. (दीघनिकाय २२–२१)

सर्व स्मृतींमध्यें ही आनापान स्मृति प्रथम व प्रमुख असून, ती साध्य झाली म्हणजे मोठी फलदायक होते. या स्मृतीची भावना केल्यावर पुढे चार स्मृतिप्रस्थान पूर्ण करण्यास मदत होते. आणि स्मृतिप्रस्थानाची भावना परिपूर्ण झाली म्हणजे सात बोध्यंगें यांची भावना साध्य होते. सात बोध्यंगापासून अविद्या नष्ट होऊन विद्या प्राप्त होतें. आणि विद्या प्राप्त झाली म्हणजे विमुक्ति ही ठेविलेलीच. असा या आनापान स्मृतीचा प्रभाव आहे. ( मज्झिमनिकाय, सू. ११८ ) आणि ही आनापान स्मृति साध्य झाल्यावर मग भिक्षूने कायगतास्मृतीकडे वळावें. आणि वळलें तर त्या कायानुदर्शनापासून हित व कल्याण होतें. या कायगतास्मृतीचें पुढील प्रमाणें थोडक्यांत विधान आहे.

कायगतास्मृतिः—कायगतास्मृति म्हणजे आपल्या शरीरांतील घटक द्रव्याचें सूक्ष्मबुद्धीनें निरीक्षण करून, त्यांची अशुभता, अमंगलता जाणून, त्यावर ध्यान करणें. याविषयीं दीघनिकायांत माहिती आहे ती अशी :— एखादा भिक्षु हा अरण्यांत अगर वृक्षाखालीं अगर दुसऱ्या एखाद्या एकांत स्थळीं आसन-मांडी घालून, शरीर सरळ करून व चित्त जागृत ठेवून पुढील प्रमाणे विचार करतो. डोक्याच्या केंसाखालीं व पायाच्या तळव्यावर आणि सर्वत्र त्वचेनें वेढलेला असा हा जो देह आहे, त्यांत काय काय पदार्थ आहेत हें तो जाणतो. अर्थात् त्या देहांत केंस, लोम, नखें, दांत, त्वचा, मांस, स्नायू, हाडें, अस्थि, मज्जा रक्त, वृक्क, हृदय, यकृत्, क्लोम, प्लीहा, फुफ्फुस, आंतडें, आंतड्याची दोरी, औदर्य, विष्ठा, पित्त, कफ, स्वेद, मेद, आसवे, वसा, थुंकी, शेंबूड, लाळ, मूत्र, इत्यादि पदार्थ आहेत, हें तो पाहतो. उदारणार्थ, भिक्षुहो ! दोन्ही बाजूला तोंड असलेली एक पिशवी असून ती नानाप्रकारच्या धान्यांनी म्हणजे शाळी, व्रीहि, मूग, उडदी, तीळ, तांदुळ, इत्यादि धान्यांनी भरून ठेविली आहे. डोळस मनुष्य ती उघडून त्यांत या शाळी आहेत, या व्रीही आहेत, हे मूग

आहेत, हे उडीद आहेत, हे तीळ आहेत, हे तांदुळ आहेत, – हे सर्व पदार्थ तो जसे वेगळे वेगळे पाहतो, तद्वत हा स्मृतिमान भिक्षु झाला तरी देहांतील हे दुर्गंध पदार्थ वेगळे वेगळे पाहतो आणि तो देह त्या गलिच्छ - अशुभ-पदार्थांनी पूर्ण भरलेला आहे, याचीहि पण तो दखलगिरी घेतो.

त्याचप्रमाणें त्या देहाची स्थिति च रचना कशी काय आहे, हेंही तो जाणतो. म्हणजे तो देह पृथ्वी महाभूत, जलमहाभूत अग्नि महाभूत व वायू महाभूत या अशा चार महाभूतांच्या मिश्रणानें झाला आहे, याची त्यास जाणीव होते. खाटीक गाईस मारून तिचे अवयव वेगळे वेगळे करून ते चौकावर निरनिराळे मांडून बसतो, त्याप्रमाणें हा भिक्षु देहांतील पदार्थांकडे पृथक् पृथक् पहातो.

पुनः आणखी, तो स्मशानांत जाऊन मरून एक दिवस झालेलें, दोन दिवस झालेलें, तीन दिवस झालेलें, सुजलेलें प्रेत, नीळें पडलेलें प्रेत, पूने भरलेलें प्रेत, कावळे, गिधाड अित्यादि प्राणी तोड तोडून खात असलेलें प्रेत, रक्तामांसानें माखलेलें प्रेत, नुसता हाडांचा सांगांडा झालेलें प्रेत, किंवा हाडें विसकटून अिकडे तिकडे पसरून पडलेलें प्रेत, अथवा ती हाडें चूर्ण विचूर्ण झालेलीं असा अभद्र देखावा पाहतो.

हें दृश्य भिक्षूच्या डोळ्यासमोर स्पष्ट उभें राहिलें, म्हणजे तो मग असा विचार करू लागतो कीं, हें जें माझें शरीर आहे, तें देखील त्याच स्वभावाचें असून मरणोत्तर त्याची तशीच अवस्था होणार आहे. त्यापासून सुटका अगर बचाव होणेंसारखा मार्ग अगर उपाय नाहीं. याप्रमाणें सावधानपणें व लक्षपूर्वक कायानुपश्यी होऊन विहार करणाऱ्या भिक्षूचें चित्त मग प्रपंचाकडे ओढ घेत नाहीं. त्याची सर्व कामभोगेच्छा-अिंद्रियतर्पणबुद्धि - विषयलालसा-अस्त पावून, पुढें अभ्यासानें समाधि साधून तो एकाग्रचित्त बनतो या कायगतास्मृतीचा अभ्यास करून ज्यानें ती साध्य करून घेतली, त्याला पुढील दहा फायदे मिळतात. याचा उल्लेख मज्झिमनिकायांत ११९ व्या सुत्तांत आढळतो तो असा :–

( १ ) तो अरति - रतिसह म्हणजे उदासी होतसाता पुढें धैर्यानें उभा राहणारा असा होतो. उदासी त्यास पराभूत करूं शकत नाहीं. आणि उत्पन्न झालेल्या अरतीला दाबून तो भिक्षु विहार करूं लागतो.

( २ ) तो भयभैरवासह असणारा असा होतो. त्यास भयभैरव परास्त करूं शकत नाहीं. आणि उत्पन्न झालेल्या भय भैरवाला दाबून तो विहार करणारा होतो.

( ३ ) शीत–उष्ण, भूक–तहान, नांगी मारणारे जीव, मच्छर, ऊन–वारा, सरपटणाऱ्या जीवाणूंचा दंश, अित्यादिकांची त्यास बाधा अगर पीडा होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें निंदा व दुर्भाषण, दुःखकारक, तीव्र, कटु, प्रतिकूल, प्राणहारक अशी शारीरिक पीडा तो सहन करूं शकतो.

( ४ ) सुखानें विहार करतां येण्याला उपयोगी अशीं चार चैतसिक ध्यानें याच जन्मीं त्याला आयासाशिवाय प्राप्त होतात.

( ५ ) त्याला अनेक प्रकारच्या ऋद्धि प्राप्त होतात.

( ६ ) तो अमानुष, विशुद्ध व दिव्य श्रोत्राच्या सहाय्यानें दिव्य शब्द व मानुष शब्द आणि दूरचा शब्द, त्याचप्रमाणें जवळचा शब्द, ऐकण्यास समर्थ होतो.

( ७ ) तो मनुष्याचें व अितर प्राण्याचें चित्त ओळखूं शकतो.

( ८ ) तो आपले मागील अनेक जन्म आठवूं शकतो.

( ९ ) तो अतिमानुष, विशुद्ध व दिव्य दृष्टीच्या सहाय्यानें चांगले-वाईट, सुवर्ण–दुर्वर्ण, सद्गतिप्राप्त व दुर्गतिप्राप्त प्राण्यांना जाणूं शकतो. व त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार पुढें लाभणारा पुनर्जन्महि तो ओळखूं शकतो.

( १० ) आश्रव ( आसव ) म्हणजे चित्तदोष, त्यांच्या क्षयानें सापडणारी चित्ताची जी विमुक्ति, प्रज्ञेची विमुक्ति ती या जन्मींच जाणून अनुभवून, प्राप्त करून घेऊन विहार करतो. ( मज्झिमनिकाय, कायगता-सति, सुत्त. ११९ ).

असे हे दहा फायदे कायानुपश्यी भिक्षूला प्राप्त होतात. असें भगवंताचें सांगणे आहे. धम्मपदांत याविषयीं त्यांची गाथा आहे ती अशीः–

'येसञ्च सुसमारद्धा निच्चं कायगतासति ।
अकिच्चं ते न सेवन्ति किच्चे सातच्चकारिनो ।
सतानं सम्पजानानं अत्थं गच्छन्ति आसवा ॥'

( ध. प. २१–४ )

भावार्थ :– ज्याची नित्य कायगता स्मृति जागृत असते, तो अकर्तव्य करीत नाहीं व कर्तव्य निरंतर करीतच राहतो. त्या स्मृति व संप्रजन्य युक्त पुरुषाचे आश्रव–दोष अस्त होऊन जातात.

*वेदनानुस्मृति–:* यानंतर वेदनानुस्मृतीचें अनुष्ठान कसें करावें, याची थोडक्यांत कल्पना देतो. भिक्षु हा सुखवेदनांचा अनुभव घेत असतां मी सुख-वेदना अनुभवीत आहे, हें तो जाणतो. दुःख-वेदना अनुभवीत असतां मी दुःख-वेदना अनुभवीत आहे, हें जाणतो. असुख-अदुःख-वेदना अनुभवीत असतां मी असुख-अदुःख-वेदना अनुभवीत आहे, हें तो जाणतो. भोगपदार्थ-युक्त सुख-वेदना, भोगपदार्थरहित सुखवेदना, भोगपदार्थयुक्त दुःखवेदना, भोगपदार्थरहित दुःखवेदना, भोगपदार्थयुक्त असुख-अदुःख-वेदना, भोगपदार्थ रहित असुख-अदुःख-वेदना अनुभवीत असतां ती ती वेदना मी अनुभवीत आहे, याची त्यास जाणीव असते.

याप्रमाणें आपल्या आंतील वेदना व बाहेरील वेदना यांत तो वेदतानुपश्यी होऊन विहार करतो. त्या वेदनांतील उत्पत्तिधर्म, व्ययधर्म, समुदय-धर्म हे तो पाहतो. वेदना आहे असें समजून तिचीस्मृति,-ज्ञान व प्रति-स्मृतीच्या प्राप्तीसाठीं-जागरूक राहते. असा हा भिक्षु अनाश्रित होऊन विहार करतो. जगातील कोणत्याहि वस्तूंवर या वेदनानुस्तृतीमुळें ' हें माझें, हें माझें ' अशी ममत्वबुद्धि ठेवीत नाहीं.

याप्रमाणे भिक्षहो! भिक्षु हा वेदनांमध्ये वेदनानुपश्यी होऊन विहार करतो. याला म्हणतात वेदनानुस्मृति.

(दीघनिकाय, २२-२१)

चित्तानुस्मृति :— या चित्तानुस्मृतिचें विधान पुढीलप्रमाणें आहे. चित्र हें सराग असेल तर तें सराग आहे, हें तो भिक्षु जाणतो आणि रागरहित असेल, तर तें रागरहित आहे, हेंहि जाणतो. त्याचप्रमाणे तें सद्वेष असेल अगर द्वेषरहित असेल तर तें सद्वेष अगर द्वेषरहित आहे, हें तो जाणतो. तसेंच तें समोह अगर मोहरहित असेल तर तें तसें आहे, हेंहि तो जाणतो. शिवाय आणखी तें स्थिर असल्यास, अनुत्तर (उत्तम) असल्यास, एकाग्र असल्यास अगर एकाग्रतारहित असल्यास, विमुक्त असल्यास अगर अविमुक्त असल्यास तें त्या त्या स्थितींत आहे, याची त्यास जाणीव असते.

याप्रमाणें आंतर चित्तांत चित्तानुपश्यी होऊन तो विहार करतो. बाह्यचित्तांत चित्तानुपश्यी होऊन विहार करतो. तो चित्तांत उत्पत्ति (धर्म), व्यय (धर्म) व उत्पत्ति-व्यय (धर्म) हें सर्व पहात असतो. चित्त आहे, याचें भान ठेवून, त्याची स्मृति ही ज्ञान व प्रतिस्मृति यांच्या प्राप्ती–साठीं जागरूक असते. याप्रमाणें भिक्षु हा चित्तामध्यें चित्तानुपश्यी होऊन विहार करतो. याला म्हणतात चित्तानुस्मृति. (दीघनिकाय २२-१२)

धर्मानुस्मृति :— भिक्षु हा धर्म म्हणजे मनाचे विषय त्यांत पुढील प्रमाणें पाहतो. मनाची एकंदर पांच बंधनें (नीवारणें) आहेत. तीं विद्य–मान असतां त्यांस तो जाणतो. म्हणजे कामुकता (कामच्छंद) उत्पन्न झाली असल्यास कामुकता आहे, हें तो जाणतो. नसल्यास नाहीं हेंहि जाणतो. ती कशी उत्पन्न होते आणि कशी नाश पावते, हेंहि तो जाणून असतो. त्याचप्रमाणे क्रोध (व्यापाद), आलस्य (स्त्यानमृद्ध), उद्धटपण (औद्धत्य), पश्चात्ताप (कौकृत्य) आणि संशय (विचिकित्सा) हीं मनांत विद्यमान असल्यास तीं विद्यमान आहेत व नसल्यास तीं नाहींत याची त्यास जाणीव असते.

पुनः आणखी, पांच उपादान-स्कंध धर्मांत तो धर्मानुपश्यी होऊन विहार करतो. तो चिंतन करतो कीं हें रूप आहे, हा रूपाचा समुदय आहे, या रूपाचा अस्त होणेचा आहे, ही वेदना आहे, हा वेदनेचा समुदय आहे, या वेदनेचा अस्त होणेचा आहे, ही संज्ञा आहे, हा संज्ञेचा समुदय आहे, या संज्ञेचा अस्त होणेचा आहे. अशाच तऱ्हेनें तो संस्कार व विज्ञान यासंबंधीं चिंतन करणारा होतो. ..(दीघनिकाय २२–१४)

त्याचप्रमाणें तो आंतील व बाहेरील इन्द्रियांमध्यें धर्मानुपश्यी होऊन विहार करतो. म्हणजे तो चक्षु जाणतो, रूप जाणतो, चक्षु व त्याचा विषय यापासून उत्पन्न होणारें जें रूपज्ञान ( संयोजन ) तेंहि तो जाणतो. त्या संयोजनाची उत्पत्ति व नाश कसा होतो हेंहि जाणतो. अशाचप्रकारानें श्रोत्र, शब्द व तज्जन्य शब्दज्ञान, त्या शब्दज्ञानाची उत्पत्ति व नाश हेंहि तो जाणतो. अशीच गोष्ट जीभ, रस व रसज्ञान, त्याची उत्पत्ति व नाश, नाक, गंध व गंधज्ञान, त्याची उत्पत्ति व नाश, देह, स्पर्श, स्पर्शज्ञान, त्याची उत्पत्ति व नाश, मन, धर्म ( विषय ) व धर्मज्ञान, त्याची उत्पत्ति व नाश या सर्वांची तो जाणीव ठेवणारा होतो. ( दीघनिकाय २२–१५ )

तसेंच व त्याबरोबरच ज्ञानाची जी सात अंगें आहेत– म्हणजे स्मृति, धर्मविचय ( विवेक ), वीर्य ( उत्साह ), प्रीति ( आनंद ), प्रश्रब्धि ( शांति ) व उपेक्षा ( औदासीन्य ) हीं हजर असतां तीं हजर आहेत व नसतां हजर नाहींत, हें तो ओळखतो. आणि त्यांची उत्पत्ति कशी होते हेंहि तो जाणतो ( दीघनिकाय २२–१६ )

सम्यक् स्मृतीची ही अशी एकंदरीत माहिती आहे. आणि तिचें महत्व भगवान वर्णन करतात तें असें:–

> ' एकायनो अयं भिक्खवे मग्गो सत्तानं विसुद्धिया सोकपरिद्दवानं समतिक्कमाय दुक्खदोमनस्सानं अत्थंगमाय ञायस्स अधिगमाय निब्बाणस्स सच्छिकिरियाय, यदिदं चत्तारो सतिपट्ठाना '
> ( महासति पट्ठान सुत्त २२–१ )

भावार्थः– भिक्षूंहो ! प्राण्यांच्या विशुद्धीसाठीं, शोक व कष्ट यांच्या उपशमनासाठीं, दुःख व दौर्मनस्य यांच्या नाशासाठीं, ज्ञान प्राप्त व्हावें म्हणून व निर्वाणाचा साक्षात्कार घडावा एतदर्थ या चतुर्विध स्मृति–उपस्थानाचा अवतार असून, तोच तेवढा मार्ग आहे. यावरून या सम्यक् स्मृतीचें महत्व व प्रभुत्व केवढें आहे, हें कळून येतें. असो.

सम्यक्–समाधि ( सम्मा समाधि ) 'इध भिक्खवे भिक्खु विविच्चे' व कामेहि विविच्च अकुसलेहि धम्मेहि सवितक्कं सविचारं विवेकजं पीतिसुखं पठमज्झानं उपसम्पज्ज विहरति । वितक्कविचारानं वूपसमा अज्झत्तं सम्पसादनं चेतसो एकोदिभावं अवितक्कं अविचारं समाधिजं पीतिसुखं दुतियज्झानं उपसम्पज्ज विहरति । पीतिया च विरागा उपेक्खो विहरति सतो च सम्पजानो, सुखंच कायेन पतिसंवेदेति यं तं अरिया आचिक्खन्ति–'उपेक्खको सतिमा सुखविहारी' ति ततियज्झानं उपसम्पज्ज विहरति । सुखस्स च पहाना दुक्खस्सच पहाना पुब्बेव सोमनस्सदोमनस्सानं अत्थङ्गमा अदुक्खं असुखं उपेक्खासतिपारिसुद्धिं चतुत्थज्झानं उपसम्पज्ज विहरति । अयं वुच्चति भिक्खवे सम्मासमाधि । इदं वुच्चति भिक्खवे दुक्खनिरोधगामिनी पटिपदा अरियसच्चं ॥ ( दीघनिकाय २२–२१ )

भावार्थः– येथें म्हणजे या समाधि मार्गांत भिक्षु हा विषय सुखापासून अलग राहतो. दुष्कर्मापासून म्हणजे अकुशल आचरणापासून अलिप्त राहतो. वितर्क व विचारयुक्त विवेकापासून उत्पन्न होणारा जो आनंद त्या आनंदानें युक्त होत्साता प्रथमध्यान साध्य करून घेऊन, त्यांत विहार करतो. नंतर त्या प्रथमध्यानातून द्वितीयध्यान, द्वितीयध्यानातून तृतीयध्यान व तृतीयध्यानातून चतुर्थध्यान, याप्रमाणे उत्तरोत्तर श्रेष्ठध्यान प्राप्त करून घेतो. भिक्षू हो ! याला म्हणतात सम्यक् समाधि. दुःखनिरोधगामिनी पटिपदा आर्यसत्य असेंहि त्याचें नांव आहे.

अष्टांगिक मार्गातील समाधि ही अगदी शेवटची पण अत्यंत महत्वाची अशी श्रेष्ठ पायरी असून, तिचा उपयोग कुशल मनोवृत्ति वाढवून त्यांत

मनाची स्थापना व स्थिरता करणें हा आहे. राग, द्वेष, मोह इत्यादि विकार यांची गणना अकुशल मनोवृत्तींत होत असून, त्या संसारप्रवर्तक म्हणजे दुःखोत्पादक मनोवृत्ति आहेत. या दुष्ट मनोवृत्तींचें निर्दालन करून, तेथें कुशल मनोवृत्तींची–म्हणजे सुखोत्पादक मनोवृत्तींची–स्थापना केल्यावर तेथें चित्ताची एकाग्रता–स्थिरता साधणें हें समाधीचें प्रमुख कार्य आहे. सम्यक् व्यायाम ही समाधीची सामग्री असून, स्मृति–उपस्थान हें तिचें निमित्त आहे. या कुशल धर्माचें सेवन करणें, भावना करणें आणि वर्धन करणें याला म्हणतात समाधि भावना.

( माज्झिमनिकाय, चूलवेदल्लसुत्त, ४४ )

' समं सम्मा च आधानं समाधि ' - चित्ताची एकाच ठिकाणीं सारखी व संपूर्ण स्थापना करणें याचें नांव समाधि-असें अभिधम्मांत म्हटलें असून, ' कुशलचित्त एकग्गता समाधि '- कोणत्यातरी एका शुभ गोष्टीवर चित्ताची एकाग्रता साधणें म्हणजे समाधि-अशी बुद्धघोषाचार्यांनी विसुद्धमग्गांत समाधीची थोडक्यांत पण सुंदर व सुस्पष्ट व्याख्या केली आहे. पण याच समाधीची आणखी एक व्याख्या आढळते ती अशीः–

> ' आरम्मणे चित्तं समं आधियति, सम्मा वा आधियति समाधानमत्तमेव वा एतं चितस्साति समाधि '
>
> ( विसुद्धमग्ग १४–१३९ )

भावार्थः– जो प्रथमारंभी चित्त सम राखतो अथवा चांगलें ठेवितो अथवा समाधानवृत्ति ठेवितो, याला चित्ताची समाधि असें म्हणतात.

बुद्धाच्या या *' समाधि '* शब्दाचा प्रतिशब्द *वैदिक धर्मांत योग* असा असून, त्याची व्याख्या *' योगश्चित्तवृत्तिनिरोधः–' चित्तवृत्तीचा निरोध म्हणजे योग– या सूत्रवचनांत निर्दिष्ट करण्यांत आली आहे.*

' समं सम्माच आधानं सामाधि ' ही व्याख्या व ' योगश्चित्तवृत्तिनिरोधः' ही व्याख्या दोन्ही जवळ जवळ सारख्याच अर्थाच्या आहेत, असें सूक्ष्म

दृष्टीनें पाहणाऱ्याला तेव्हांच दिसून येईल. मनाच्या बाह्यप्रवृत्तीला चित्त हें नांव असून, त्याचा निरोध करून तें अंतर्मुख करणें व तेथें त्याला स्थिर करून ठेवणें, याला योग असे म्हणतात. 'चित्ताची एकाग्रता म्हणजेच समाधि' असा समाधीचा संक्षेपार्थ (म. नि. सुक्त ४४) 'सम्यक् समाधि' कशाला म्हणतात, त्याचें स्पष्टीकरण बुद्धघोषाचार्यांनी केलें आहे तें असें:--

> 'एवं अनुत्तराय सतिया संरक्खियमानचित्तस्स तं सम्पयुत्ता व मिच्छासमाधिविद्धंसिका चित्तेकग्गता सम्मा समाधि नाम।
> स अविक्खेपलक्खणो, समाधानरसो, मिच्छासमाधिप्पहान पच्चुपट्ठानो' ति ॥ (विसुद्धिमग्ग १६–८३)

भावार्थ:- जो उपर्युक्त सम्यक स्मृतीनें युक्त आहे, अशा संरक्षित-चित्तवाल्याची मिथ्यासमाधीचा नाश करणारी अशी जी चित्ताची एकाग्रता ती सम्यक् समाधि होय. तिचें लक्षण म्हणजे निश्चल राहाणें व कार्य म्हणजे ध्येय वस्तूवर चित्त दृढ व स्थिर ठेवणें, असें आहे.

मनुष्याची बुद्धि निवळून तेथें सत्यज्ञानाचा मंगल प्रकाश उजळावयाचा तर मनांतील सर्व दुष्ट व नष्ट विचारांचें व विकारांचें प्रथम निर्मूलन झालें पाहिजे. पण एवढ्यावरच सर्व भागण्यासारखें नाहीं. त्याच वेळेला व त्याबरोबरच कुशल मनोवृत्तींचें व सत्प्रवृत्तींचें बीजारोपण होऊन त्यांची वाढ व विकास होणें हेंहि अत्यंत जरूर आहे. त्याशिवाय मन निवळून शांत व समाधान होणार व राहणार नाहीं. आणि मन शांत व समाधान नसेल तर बुद्धि निवळणार नाहीं. बुद्धी निवळून स्थिर राहिली नाहीं तर अंतःकरणांत सत्यज्ञानाचा प्रकाश खुलणार नाहीं आणि जेथें सत्यज्ञान नाहीं, तेथें विमुक्तीची अर्थात् निर्वाणप्राप्तीची--मग गोष्ट काढा कशाला! त्याचें नांवच नको! म्हणून बुद्ध भगवंतांनी अकुशल विचारांचें उच्चाटण, कुशल विचारांचें संगोपन व चित्ताचें विशुद्धीकरण या तीन महत्वाच्या गोष्टींवर सगळा भर दिला आहे.

'सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा। सचित्तपरियोदपनं एतं बुद्धान सासनं' ( ध. प. १४–५ ) या गाथेंत बुद्धधर्माचें एकंदर सार आलें आहे. याचें कारण अगदी उघडच आहे. जोपर्यंत अकुशल मनोवृत्ति-म्हणजे राग, लोभ, मोह इत्यादि दुष्ट विकार-अंतःकरणांत दबा धरून बसले आहेत तोपर्यंत चित्त निवळून तेथें सत्यज्ञानाचा दिव्य प्रकाश चमकेल, ही गोष्ट निंबापासून आंब्याची अपेक्षा करण्याइतकीच समंजसपणाची आहे.

अतएव अकुशल मनोवृत्ति–म्हणजे संसारप्रवर्तक व दुःखोत्पादक मनोवृत्ति-यांचा समूळ निरोध करून, सर्वस्वी निर्मूलन करून, चित्तशुद्धि साधल्याशिवाय, मन एकाग्र केल्याशिवाय, हृदयांत शांति रुजल्याशिवाय, बुद्ध धर्मांत काय अगर कोणत्याहि धर्मांत काय प्रापंचिक दुःखाचें-संसार तापत्रयाचें-उपशमन होऊन, शाश्वत सुखशांतीचें परमोच्च स्थान हातीं लागेल ही आशा फक्त वेड्यांनाच शोभण्यासारखी आहे.

आतां हें चित्तस्थैर्य ऊर्फ समाधि साध्य व सुफल व्हावयाची तर प्रथम साधकाचें शील शुद्ध व पवित्र असावयास पाहिजे. कारण शील शुद्ध नसेल तर समाधि साधणें दुर्घट आहे. समाधि साधली नाहीं तर प्रज्ञा निवळणार नाहीं, प्रज्ञा निवळली नाहीं तर अविद्येची उचलबांगडी होणें शक्य नाहीं आणि जोपर्यंत अविद्येची मगरमिठी सुटली नाहीं, तोपर्यंत भवचक्रांतून सुटका होईल याचें नांवच काढावयास नको ! अतएव ज्याला धर्मक्षेत्रांत शिरावयाचे आहे त्यानें प्रथम आपलें शील सुधारलें पाहिजे. या शीलाचें महत्व बुद्धधर्मांत फार असून, त्याची प्रशंसा ठिकठिकाणी करण्यांत आली आहे. संयुत्तनिकायातील हें पुढील वचन मननीय आहे.

'सब्बदा सीलसंपन्नो पञ्ञावा सुसमाहितः।
आरद्धविरियो पहितत्तो ओघं तरति दुत्तरं ॥
( सु नि. १–९–२२ )

भावार्थः– सदा सीलानें युक्त, ज्ञानवान्, एकाग्रचित्त, अध्यात्म चिंतनांत रत, स्मृतिमान असा जो आहे, तो या दुस्तर तृष्णारूपी, महा ओघाला

तरून जातो. यावरून शीलसंपन्नतेची धर्म क्षेत्रांत केवढी अवश्यकता आहे, हें स्पष्ट दिसून येईल. बुद्ध भगवंताचें असें भिक्षूंना सांगणें आहे कीं, जोपर्यंत मनुष्य शीलसंपन्न होत नाहीं, तोपर्यंत त्याला समाधि साधणें शक्य नाहीं. आणि ज्याला समाधि साधली नाहीं, त्याचा प्रज्ञोत्कर्ष होणें शक्य नाहीं. प्रज्ञोत्कर्ष झाला नाहीं तर अविद्येचा नाश शक्य नाही. आणि अविद्येचा नाश नाहीं तर आनंदमय निर्वाणाची गोष्टच बोलूं नये. तेव्हा निर्वाणेच्छु साधकानें आपलें शील सुधारण्याचा अगोदर प्रयत्न करून, मग समाधीच्या मागें लागावें, हें सांगण्याचा भावार्थ.

अष्टांग मार्गातील शेवटची पायरी म्हणजे ही समाधि होय. ती ज्यानें साधली त्याचा पुढील मार्ग पुढें सरळ व सोपा झाला. पण मौज ही कीं ती तशी सहज साधेल, हें मात्र सोपें नाहीं. मनुष्याचें मन हें मोठें विलक्षण आहे. क्षणभर सुद्धा तें स्थिर राहिलें, असें सहसा होत नाहीं व झालें नाहीं. जगांत बाहेर पडून नसत्या उनाडक्या करण्यास सोकलेल्या या खोडसाळ मनाला एकें ठिकाणी आणून तेथें डांबून ठेवणें हें काम बोलण्या-इतकें सोपें नाहीं. वाऱ्याला धरून एके ठिकाणीं कोंबून ठेवणें अगर वाळूंतून तेल काढणें हें कदाचित शक्य व साध्य होईल. पण विद्युल्लतेप्रमाणें चळवळ करणाऱ्या चंचल चित्ताला एकाच ठिकाणी क्षणमात्र रोखून धरणें हें खरोखर कठिणातील मोठें कठीण काम आहे, असें मांगितल्यास त्यांत अतिशयोक्तीचा मुळींच भाग नाहीं. आणि ही गोष्ट लक्षांत घेऊन 'मनो हि चंचलं राम संसारवनमर्कटम्'– रामा! मन हें खरें म्हणशील तर संसार-वनातील मर्कटाप्रमाणें महाचंचल आहे– असें वसिष्ठांनी श्रीरामचंद्रास मनाला उद्देशून म्हटलें आहे, तें वस्तुस्थितीस पूर्ण धरूनच आहे. अरण्या-तील माकडाच्या चेष्टा ज्यांनी पाहिल्या असतील त्यांना वरील वसिष्ठ-वचनाची सत्यता खात्रीनें पटल्याशिवाय राहणार नाहीं.

वनातील माकड असा टोला लगावला आहे. महर्षि वसिष्ठ व भगवान बुद्ध यांनी चित्ताला दिलेली वानराची उपमा यथार्थ नाहीं असें कोण म्हणेल? शिवाय त्याच भगवंतांनी धम्मपदांत 'फंदनं चपलं चित्तं दुक्खं दुन्निवारयं' (ध. प. ३-१)—चित्त हें चंचल व तितकेंच चपल असून, निग्रह करण्यास अति दुष्कर—असें म्हटलें आहे व तोच भावार्थ, 'चंचलं हि मनः कृष्ण' असें उद्‌गार गीतेंत अर्जुनानेंहि काढलें आहेत. असो. एकंदरींत येथें सांगावयाचा मथितार्थ काय तर मनाची एकाग्रता व स्थिरता साधणें ही फार कठीण गोष्ट असून, त्याला तसा दृढ व दीर्घ अभ्यासच पाहिजे.

आणि हा अभ्यास साधावयाचा झाला तर त्याला तशी अनुकूल परिस्थिति असावी लागते. वाटेल ती जागा समाधीला चालत नाहीं. हेंच अधिक स्पष्ट करून सांगावयाचें झालें तर मनाला बाहेर भटकावयास सवड व संधि न मिळेल अशी शांत व एकांत जागा शोधून तेथें त्याला यठणीवर आणण्याचा प्रयत्न केल्यास तो यशस्वी होण्याचा संभव आहे. एकूण सांगावयाचा भावार्थ असा कीं, समाधीला प्रथम योग्य व अनुकूल स्थान निवडून, तें पसंत केलें पाहिजे. प्रतिकूल स्थान उपयोगी नाहीं.

म्हणून समाधीला प्रतिकूल नि वावडघा गोष्टी कोणत्या याचें थोडक्यांत दिग्दर्शन करून मग पुढील चर्चेस लागतो. विसुद्धिमग्गांत याविषयीं वचन आढळतें तें असें:—

> 'आवासंच कुलं लाभो गणो कम्मं च पंचमं।
> अद्धानं ञाति आबाधो गन्धो इद्धी'ति ते दस ॥'
> (वि. म.)

आवास म्हणजे राहण्याचें स्थळ, कुल म्हणजे आईबाप, बायकामुलें, भाऊबंद इत्यादि गणगोत, लाभ म्हणजे सत्कार व द्रव्यलाभ, गण म्हणजे अनुयायी संघ, कम्म म्हणजे नवीन नवीन काम, अद्धान म्हणजे प्रयास, ञाति म्हणजे आप्तइष्ट, सगेसोयरे, स्नेहीसोबती व ज्ञातिबांधव

वगैरे, आवाध म्हणजे रोग, आधिव्याधि इत्यादि, गंय म्हणजे वाचनाभिरुचि, आणि इद्धि म्हणजे योगसिद्धि, असे हे दहा विषय समाधि मार्गांत व्यत्यय आणणारे असल्यामुळें यांचा उपसर्ग न पोंचेल असें स्थान शोधून, तें पसंत करण्यांत यावें.

शिवाय पुढील गोष्टींहि टाळण्याचा प्रयत्न करावा. निवासस्थान, शेजारचा गांव, फाजील भाषण, अनिष्ट व्यक्ति, नावडतें भोजन, प्रतिकूल ऋतुमान, व प्रवास अशा या सात गोष्टींपासूनहि अलिप्त राहण्याचा प्रयत्न करावा. यावरून निष्कर्ष असा निघतो कीं समाधिस्थान हें एकांत, निर्भय, निर्जन, निरुपद्रवी, व निसर्गसुंदर असावें. असेंच स्थान समाधीला उपकारक व संपोषक होऊन, अभ्यासास मोठें हितावह व सुखावह होतें.

त्याचप्रमाणे समाधि साधण्याला सीलाची अत्यंत आवश्यकता आहे. त्याशिवाय समाधि साधत नाहीं. या पुढील पांच गोष्टी समाधीला उपकारक व प्रपोषक आहेत. प्राणघातापासून निवृत्ति म्हणजे अहिंसा, चौर्यापासून निवृ , ( म्हणजे अस्तय ) अब्रम्हचर्यापासून विवृत्ति, (इंद्रियनिग्रह ), असत्य भाषणापासून निवृत्ति, ( अनृत त्याग ) व मादक पदार्थापासून निवृत्ति अशा या पांच गोष्टी समाधी साधण्याला अवश्य असून, त्यांना बौद्धधर्मात सील असें म्हणतात. आपल्या योगशास्त्रांतहि योग साधण्याला याच गोष्टींची अवश्यकता सांगितली आहे.

'अहिंसासत्यमस्तेयं ब्रम्हचर्यापरिग्रहा यमाः ॥

अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रम्हचर्य व अपरिग्रह असे हे पांच यम आहेत. ( योगसूत्र ) अर्थात् योग्याला काय किंवा भिक्षूला काय समाधि साधावयास शीलाचें अवश्य रक्षण करावें लागतें.

येथपर्यंतचें विवेचन हें बाह्यस्थितीविषयीं झालें. आतां व्यक्तिगत कांहीं दोषांचा विचार करूं. समजा, बाहेरची स्थिति सर्वस्वी अनुकूल आहे, तरी तेवढ्यावरच समाधीचा सगळा प्रश्न सुटला असें होत नाहीं.

जोपर्यंत चित्त शांत नाहीं, प्रसन्न नाहीं, निश्चित नाहीं, तोपर्यंत बाह्य परिस्थिति अनुकूल असूनहि समाधि साधणें शक्य नाहीं. चित्ताची शांति अगर प्रसन्नता ढळायला व बिघडायला भगवान हीं पांच कारणें देतात. यांस नीवारणें असें बौद्धधर्मातील पारिभाषिक नांव आहे.

तीं कोणतीं म्हणाल तर तीं हीं:–१) कामच्छंद म्हणजे विषयासक्ति, २) व्यापाद म्हणजे क्रोध, ३) स्त्यानमिद्ध म्हणजे आळस, ४) उद्धच्च म्हणजे भ्रांति, आणि विचिकित्सा म्हणजे संशय, अशीं हीं पांच नीवारणें असून, तीं जोपर्यंत मनांत ठाण मांडून बसलीं आहेत, तोपर्यंत चित्ताला शांति व स्थैर्य लाभणें शक्य नाहीं. आणि जोपर्यंत चित्त शांत झालें नाहीं तोपर्यंत तें स्थिर राहील व तेणेंकरून समाधि साधेल हें कसें शक्य आहे? तेव्हां साधकानें वरील पांच नीवारणें नाहींशी करण्याचा कसून प्रयत्न करून मग समाधीच्या उद्योगास-अभ्यासास-लागावें, हें सांगण्याचें तात्पर्य.

याप्रमाणें समाधीला प्रतिबंधक व अपायकारक अशा कांहीं वावड्या गोष्टींचें थोडक्यांत निरूपण केल्यावर आतां त्या समाधीला परिरक्षक व परिपोषक अशा कांहीं गोष्टी सांगणें, हें अर्थतःच प्राप्त झालें. किल्ल्यासभोंवती खोदलेले खंदक जसे त्या किल्ल्याच्या संरक्षण-कामीं उपयोगी असतात व उपयोगी पडतात, तद्वत समाधीच्या भावनेसाठी व परिशुद्धीसाठीं कोणत्या गोष्टी पोषक व उपकारक आहेत, याविषयीं दीघनिकायांत पुढीलप्रमाणें उल्लेख आढळतो. तो असा :–

सत्त समाधिपरिक्खारा सम्मासमाधिस्स भावनाय समाधिस्स पारिपूरिया। कतमे सत्त? सेय्यथिदं - सम्मादिट्ठि, सम्मासंकप्पो, सम्मावाचा, सम्मा कम्मन्तो, सम्मा आजीवो, सम्मावायामो, सम्मासति।
या खो भो इमेहि सत्त अङ्गेहि चित्तस्सेकग्गता परिक्खता, अयं वुच्चति भो अरियो सम्मासमाधि, स-उपनिसो इति पि सपरिक्खारो इति पि।

(दी. नि. १८-२७)

सम्मासमाधीचे सात परिष्कार आहेत, ते असेः– सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक्, कर्मांत, सम्यक्-आजीव, सम्यक् व्यायाम, व सम्यक् स्मृति. या सात अंगांनी युक्त अशा परिष्कारांबरोबर चित्ताची– एकाग्र चित्ताची परिष्कृति आहे. तिलाच सम्यक् समाधि असें म्हणतात. याचें स्पष्टीकरण पुढें करण्यांत आलें आहे, तें असेः– सम्यक दृष्टि प्राप्त झाली म्हणजे मनुष्य हा सम्यक् संकल्प करण्यास समर्थ होतो. सम्यक् संकल्प प्राप्त झाल्यावर त्याच्यापासून पुढें सम्यक वाक् प्राप्त होते. सम्यक वाचे-पासून सम्यक् कर्मांत, सम्यक् कर्मांतापासून सम्यक् आजीव, सम्यम आजीवा-पासून सम्यक् व्यायाम, व सम्यक् व्यायामापासून सम्यक् स्मृति प्राप्त होते आणि सम्यक् स्मृति लाभली म्हणजे पुढें तिच्यापासून सम्यक् समाधि प्राप्त होते. याप्रमाणे सम्यक् समाधि लाभली म्हणजे पुढें तिच्यापासून सम्यक् ज्ञान व सम्यक् ज्ञानापासून सम्यक् विमुक्ति प्राप्त होते. सम्यक् समाधीचा असा हा महिमा व फायदा आहे. असो.

या सम्मासमाधीचे बुद्ध धर्मांत एकंदर चार टप्पे सांगितले असून, त्या टप्प्यांचीं अनुक्रमे प्रथम ध्यान, द्वितीय ध्यान, तृतीय ध्यान व चतुर्थ ध्यान अशीं नांवें आहेत. या प्रत्येक ध्यानांत काय काय प्रकार घडतात हें आतां पाहूं. प्रथम ध्यानांत साधकाची स्थिति होते ती अशीः–

'इध भिक्खवे भिक्खु विविच्चे' व कामेहि विविच्च
अकुसलेहि धम्मेहि सवितक्कं सविचारं विवेकजं पीतिसुखं
पठमज्झानं उपसम्पज्ज विहरति' (दी. नि. २२-२१)

भावार्थः– येथें म्हणजे या समाधिमार्गांत भिक्षु हा कामसुखापासून म्हणजे विषय सुखापासून विन्मुख राहतो व दुष्कर्मापासून म्हणजे अकुशल आचरणापासून अलिप्त राहतो. असें झाले म्हणजे पुढें वितर्क व विचार युक्त विवेकापासून उत्पन्न होणारा जो आनंद त्या आनंदानें युक्त होत्साता प्रथम ध्यान साध्य करून घेवून विहार करतो.

म्हणजे साधक हा प्रथम ध्यानाचा अभ्यास करीत असतांना त्याच्या या पांच गोष्टी म्हणजे काम, क्रोध, आलस्य, भ्रांति व संशय-यांस पंच

६

नीवारणें म्हणजे बंध हें नांव आहे–हीं हळुहळू विरघळत जाऊन तें ध्यान साध्य झालें म्हणजे समूळ नष्ट होऊन जातात. अर्थात् मनाचे दुष्ट विकार अस्त पावतात. पण वितर्क, विचार, प्रीति, सुख व एकाग्रता या गोष्टी राहतात. त्यांचा नाश होत नाहीं. समाधीतील प्रथम ध्यानाचा हा असा फायदा आहे. येथें वितर्क म्हणजे समाधीच्या विषयांत चित्ताचा प्रथम प्रवेश होय. त्या विषयात अनुमज्जन करणें यास विचार म्हणतात. त्यापासून जो आनंद होतो ती प्रीति, त्या प्रीतीपासून शरीराला जें समाधान लाभतें तें सुख आणि त्या विषयांत चित्ताची जी तल्लिनता ती एकाग्रता. याप्रमाणें प्रथम ध्यानांत साधकाचा हा असा फायदा होतो.

आता द्वितीय ध्यानांत काय प्रकार होतो हें पाहूं. याविषयीं भगवान सांगतात तें असें:–

'वितक्क विचारानं वूपसमा अज्झत्तं सम्पसादनं चेतसो
एकोदिभावं अवितक्कं अविचारं समाधिजं प्रीतिसुखं
दुतियज्झानं उपसम्पज्ज विहरति ' (दी. नि. २२-२१)

भावार्थः– तो म्हणजे भिक्षु वितर्क व विचार शांत झाल्यावर आंतील प्रसन्नता, व चित्ताची एकाग्रता यांस प्राप्त होतसाता वितर्क-विचार-रहित समाधीपासून प्राप्त झालेला प्रीति-सुखाचा अनुभव घेत द्वितीय ध्यान प्राप्त करून घेऊन विधी करतो. अर्थात् या द्वितीय ध्यानांत वितर्क व विचार हे उपशमन पावतात. म्हणजे त्यांचा अस्त होतो. मात्र मनाची एकाग्रता, समाधिपासून उत्पन्न होणारी प्रीति म्हणजे प्रसन्नता व सुख हीं तेवढीं शिल्लक राहतात. हेंच दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें म्हणजे ज्याला द्वितीय ध्यान साध्य झालें, त्याच्यांत प्रसन्नता, सुख व चित्ताची एकाग्रता ही मागें शिल्लक राहून वितर्क व विचार यांचा तेवढा लोप होतो. म्हणजे अस्त होतो.

याप्रमाणें द्वितीय ध्यान सिद्ध झाल्यावर साधक मग तृतीय ध्यानात प्रवेश करतो. तेथें त्याची पुढील प्रमाणें स्थिति होते.

' पीतिया च विरागा उपेक्खो विहरति सतो च सम्पजानो,
सुखं च कायेन पतिसंवेदेति यं तं अरिया आचिक्खन्ति :-

उपेक्खो सतिमा सुखविहारी'ति ततिय ज्झानं उपसम्पज्ज विहरति।'

भावार्थ–प्रीतिपासून विरक्त होऊन उपेक्षावान म्हणजे उदासीन होत्साता शरीरानें सुखाचा अनुभव घेत राहतो. अशाला पंडितजन 'उपेक्षावान्, स्मृतिमान व सुखपूर्वक विहार करणारा' असें म्हणतात. ज्यास हें तृतीय ध्यान साध्य झालें तो याप्रमाणें विहार करतो. अर्थात् या तृतीय ध्यान साध्य करून घेतलेल्या भिक्षूंमध्यें वितर्क, विचार व प्रीति हीं राहत नाहींत. फक्त सुख व एकाग्रता हीं तेवढीं राहतात

हें झाल्यावर चतुर्थ ध्यानांत काय घडतें हें पाहूं. येथें भगवंतानी आपला अनुभव सांगितला आहे तो असाः–

'सुखस्स च पहाना दुक्खस्स च पहाना पुब्बेव सोमनस्स-
दोमनस्सानं अत्यङ्गमा अदुक्खं असुखं उपेक्खासतिपरिसुद्धि
चतुत्य-ज्झानं उपसम्पज्ज विहरति'

सुख व दुःख हीं दोन्हीहि सोडून दिल्यानें व तत्पूर्वीच सौमनस्य व दौर्मनस्य यांचा अस्त झाला असल्यानें साधकास चतुर्थ ध्यान प्राप्त होतें. या ध्यानाची प्राप्ति झाली म्हणजे त्या स्थितींत दुःखहि राहत नाहीं व सुखही राहत नाहीं. फक्त उपेक्षा व स्मृति निवळून शुद्ध स्थितींत राहतात. अशाप्रकारचें चतुर्थध्यान प्राप्त करून घेऊन तो साधक–अर्थात् भिक्षु–जगांत विहार करूं लागतो. ही स्थिति प्राप्त झाली म्हणजे अष्टांगमार्गांतील सम्यक् समाधीचें कार्य संपलें. म्हणून भगवान पुढें लगेच म्हणतात कीं 'अयं वुच्चति भिक्खवे सम्मासमाधि' याला भिक्षूहो! सम्यक् समाधि असें म्हणतात. आणि 'इदं वुच्चति भिक्खवे दुक्खनिरोधगामिनी पटिपदा अरियसच्चं॥'– याला भिक्षूहो!, दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा आर्यसत्य। असें म्हणतात. यावरून हें उघड झालें कीं येथें समाधीचा विषयहि संपला व त्याबरोबरच अष्टांगिक मार्गाचें विवेचनहि पूर्ण झालें.

आतां या समाधीपासून काय फायदा होतो हें थोडक्यांत सांगून हा विषय हातानिराळा करतो. ज्यास उपरोक्त समाधि साध्य झाली, त्यास

एतम्हि तुम्हे पटिपन्ना दुक्खस्संतं करिस्सथ।
अक्खातो वे मया मग्गो अञ्ञाय सल्लसन्थनं ॥ ३ ॥

( धम्मपद, २०, २-३ )

सत्यज्ञानाच्या विशुद्धीसाठीं हा एकच मार्ग आहे. दुसरा नाहीं. या मार्गावर तुम्ही आरूढ व्हा. हाच मार्ग माराला मूर्छित करणारा आहे. या मार्गावर आरूढ झालात म्हणजे तुम्ही दुःखाचा अंत करून टाकाल. शल्यासमान असणाऱ्या या दुःखाचें निवारण स्वरूप निर्वाणाचें ज्ञान करून घेतल्यावरच मी तुम्हांस उपदेशिलें आहे

बुद्ध भगवंतानी जो धर्म आपल्या शिष्यगणांस उपदेशिला, त्या सद्ध-र्माचें-भिक्षूधर्माचें-सारसर्वस्व म्हणजे हीं चार आर्यसत्यें असून, त्याचा आम्ही या ग्रंथाचा विस्तार व आकार लक्ष्यांत घेऊन ठिकठिकाणीं हात आंखडून पण वाचकांना यथार्थ कल्पना येइल अशा बेतानें यथाशक्ति व यथामति क्रमशः विचार केला. त्यावरून बुद्ध भगवंताची विचारसरणी कशी वाहते, याचा अंदाज आतां सूज्ञ वाचकांना सहज करतां येईल, असा आम्हांस भरवसा वाटतो.

येथपर्यंतच्या प्रवासानें आम्हांस असें म्हणावेसें वाटतें कीं आतांपर्यंत वाचकांनी जो प्रांत नजरेखालीं घातला, तो हिंदुमनाला परकासा वाटेल असें निदान आमचें मन तरी आम्हांस सांगत नाहीं. उच्च वैदिकधर्माची जी तपश्चर्यानिष्ठ त्यागमय शिकवण, व जगाचें चंचल व नश्वर स्वरूप सतत डोळ्यापुढें ठेवून भगवंतांनी आपल्या धर्मांत त्याचा जास्तींत जास्त समावेश केला आहे. फक्त फरक आहे तो 'आत्मा व 'ब्रम्ह' या प्रश्ना-विषयीं आहे. त्याचाहि परामर्श पुढें यथाप्रसंग आम्ही करणारच आहो.

याप्रमाणें बुद्ध भगवंताच्या धर्मातील मुख्य भाग गणलीं गेलेलीं जीं चार आर्यसत्यें, त्यांचा येथेंपर्यंत विचार झाला. वैशाखपौर्णिमेच्या रात्रीं बोधिवृक्षाखालीं बसून, समाधिस्थ मनानें सूक्ष्म व खोल विचार करून, मानवकुलाच्या दुःखविमुक्तीच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या प्रश्नावर भगवंतानी आपल्यापरि जो उपाय शोधून काढला, त्याचा निष्कर्ष त्यांनी वरील चार

आर्यसत्यांत ग्रथित करून ठेविला. तें ज्ञान त्यांस झाल्यावर त्यांस जो अपूर्व आनंद झाला नि अनिर्वचनीय शांति लाभली, ती येथें लेखणीनें लिहून वाचकांचें समाधान करणें हें शब्दसृष्टीच्या बाहेरचें आहे. त्यावेळी त्या आनंदभरांत बुद्ध त्यांच्याच तोंडातून जे उद्गार निघाले ते येथें उद्धृत करून हा महत्वाचा विषय पुरा करतों.

' चतुन्नं अरियसच्चानं यथाभूतं अदस्सना
संसितं दीघम'द्धानं तासु तास्वेव जातिसु।
तानि एतानि दिट्ठानि भवनेत्ति समूहता
उच्छिन्नं मूलं दुक्खस्स नत्थि दानि पुनब्भवो ' ति ॥
(महापरिनिब्बाण सुत्त. १६, २-३)

भावार्थः– चार आर्य सत्यांचें यथार्थ ज्ञान न झाल्यामुळें आतांपर्यंत निरनिराळ्या जन्मांमध्यें सारखा फिरत राहिलों. पण तीं आतां दिसलीं, अर्थात् त्यांचें आतां पूर्ण ज्ञान झालें, भवनेत्री म्हणजे तृष्णा-तोडून टाकली! दुःखाचें मूळ उखडून सोडलें! आतां मला पुनर्जन्म नाहीं!!

या वचनाचा भावार्थ असा कीं ज्याला या चार आर्यसत्यांचें यथार्थ ज्ञान झालें त्याचा भगवंताप्रमाणेंच पुनर्जन्म चुकला! अर्थात् तो दुःखमुक्त होऊन–ही दुस्तर संसारनदी तरुन जाऊन–अखंड आनंदमय असें जें निर्वाण-पद त्याप्रत जातो!!

जातां जातां येथें हें सांगणें जरूर आहे कीं, बुद्धाचें हें जें निर्वाण आहे तें ज्याचें त्यानेंच मिळविलें पाहिजे. आयतें तें कोणालाच मिळणार नाहीं. दुसरे कोणीहि तें मिळवून देणार नाहींत. फार काय, भगवंताना देखील तें देतां येण्यासारखें नाहीं. ते तसे देऊं शकणार नाहींत. फार तर, ते मार्ग दाखवूं शकतील. उपाय सुचवूं शकतील. पण त्याची प्राप्ति ही ज्याची त्यानेंच करून घेतली पाहिजे. बुद्ध फक्त मार्गदर्शन करील. तुमचा उद्धार तुम्हीच करून घेतला पाहिजे. आणि ही गोष्ट भगवंतानी आनंदास अगदी स्पष्ट करून सांगितली आहे. ' अत्तदीपा विहरथ अत्तसरणा

अनञ्ञसरणा'- आनंदा! तुझा तूंच प्रकाश होऊन विहार कर! तूझा तूंच आश्रय हो! दुसऱ्याचा आश्रय करून भागणार नाहीं. (दी. नि. १६-२-२६) एवंच तात्पर्य काय बुद्ध धर्मांत हिंदुधर्माप्रमाणे आयतोबा होऊन चालत नाहीं. तेथें ज्याचें त्यानेंच स्वतः खपून मिळविलें पाहिजे ! ही गोष्ट भगवंतानी पुढील गाथांत अगदी स्पष्ट केली आहे.

'एसो व मग्गो नत्थ' ञ्ञो दस्सनस्स विसुद्धिया ।
एतम्हि तुम्हे पटिपज्जथ मारस्सेतं पमोचनं ॥ २०-२ ॥
एतम्हि तुम्हे पटिपन्ना दुक्खस्सन्तं करिस्सथ ।
अक्खातो वे मया मग्गो अञ्ञाय सल्लसंन्थनं ॥ २०-३॥
तुम्हेहि किच्चमातप्पं आक्खातारो तथागता ।
पटिपन्ना पमोक्खन्ति झायिनो मारबंधना ॥ २०-४॥
एतमत्थवसं ञत्वा पन्डितो सीलसंवुतो ।
निब्बानगमनं मग्गं खिप्पमेव विसोधये ॥ २०-१७॥

भावार्थः- दर्शनाच्या म्हणजे ज्ञानाच्या विशुद्धतेसाठीं हाच एक एवढा मार्ग आहे. दुसरा नाहीं. भिक्षूहो! यावर तुम्ही आरूढ व्हा! हाच माराला मूर्छित करणार आहे. ( २०-२ ); या मार्गावर आरूढ झाला म्हणजे तुम्ही दुःखाचा अंत करूं शकाल. हा मार्ग मी स्वतः जाणून शल्यासमान टोचणाऱ्या दुःखाचे निवारण करणाऱ्या मार्गाचा उपदेश केला आहे. ( २०-३ ) कार्यासाठीं तुम्ही उद्योग करावयाचा आहे. तथागताचें काम फक्त उपदेश देण्याचें आहे. त्याप्रमाणे मार्गावर आरूढ व्हा. ध्यानांत रत झालेला पुरुष माराच्या बंधनातून मुक्त होऊन जातो. (२०-४) ही गोष्ट समजून घेऊन शहाण्यानें शीलवान होऊन निर्वाणाकडे नेणाऱ्या मार्गाला शीघ्र साफ करावें. (२०-१७)

---

प्रकरण ५ वें

# प्रज्ञोत्कर्ष

समाधिपरिभाविता पञ्ञा महप्फला होति महानिसंसा,
पञ्ञाभावितं चित्तं सम्मदेव आसवेहि विमुच्चति ॥
( दीघनिकाय १६-१२ )

भावार्थः- समाधीनें युक्त अशी जी प्रज्ञा, ती महाफलदायक होते आणि तशीच ती मोठी श्रेयस्करहि होते. त्याचप्रमाणें जें चित्त प्रज्ञासंपन्न असतें, तें सर्व दोषांपासून-सर्व मलांपासून-विमुक्त होतें.

अष्टांगिक मार्गाचा मुख्य उद्देश हा कीं, प्रज्ञा उर्फ विवेकबुद्धि जागृत करून, तिला उजळा देऊन, ती निर्वाणक्षम करणें. तिला दुःखमार्गावरून-असत्पथावरून काढून, सत्पथावर आणून सोडणें. मनुष्याचें मन हें स्वभावतःच विषयलोलुप-सुखलोलुप-असल्यामुळें त्याची ओढ सदानकदा देहतर्पणाकडे-प्रापंचिक सुखाकडे-सारखी लागलेली असते. आणि म्हणून मनुष्य हा त्या विषयसुखाला भुलून पदोपदीं दुःखसागरांत बुडून सारखा गटंगळ्या खात असतो. जगांतील चंचल विषयांच्या क्षणभंगुर उपभोगानें प्रथम अमृत-सदृश गोड व आल्हादजनक वाटणारे व परिणामीं दुःखास नेमके कारण होणारे हे जागतिक विषय मनाला मोह घालून-भुरळ पाडून-त्याला सत्पथावरून ओढून सरळ आडमार्गावर नेत असतात. व हा विषयमुग्ध व विषयलंपट प्राणी त्याच्या भजनीं लागून, शाश्वत सुखानंदाला मुकून, पुनः पुनः भवचक्रामध्यें सांपडून, चांगला रगडला जातो. ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे.

ही आपत्ति त्याला अज्ञानामुळें,-वस्तुस्थितीचें सम्यग् ज्ञान-यथार्थ ज्ञान-नसल्यामुळें प्राप्त होत असून त्यांतून सुटून, अखंड आनंदमय स्थानाकडे पोंचण्याचा मार्ग असूनहि त्यास तो दिसत नाहीं, दिसला तरी उमजत

नाहीं, उमजला तरी पटत नाहीं व पटला तरी रुचत नाहीं, हें त्याचें दुर्दैवच म्हटलें पाहिजे. असें जरी असलें तरी त्याला मागेंपुढें केव्हांतरी या विषयसुखाचा वीट येऊन, शाश्वत सुखाची तहान लागते. पण अज्ञानामुळें त्यास मार्ग दिसत नाहीं. तथापि वेळेवर शुद्धीवर येऊन योग्य प्रयत्न करील, तर त्यास विवेक सुचून दुःखमुक्तीचा मार्ग दिसूं लागतो, असा श्रेष्ठ पुरुषांचा गोड अनुभव आहे. आणि अज्ञ जनांचा उद्धार व्हावा, त्यास शाश्वत–सुखानंदाचें शिखर दिसावें म्हणून त्यांनी जगास धडा घालून दिला कीं, प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत सुप्त असलेली दिव्य शक्ति जागृत केल्यास ती त्यास योग्य मार्गदर्शन करून, त्याला दुःखाच्या वणव्यांतून बाहेर काढून, अखंड आनंदमय दिव्य स्थानाकडे–शाश्वत शांतिसुखाकडे नेमकी घेऊन जाते. आणि ती दिव्य शक्ति म्हणजे प्रज्ञा–विवेकबुद्धि–ही होय. या देवतेला जो कौल लावून त्याप्रमाणें वाटचाल करील, तर त्याला सर्व दुःखांतून–या संसारचक्रांतून–भवसागरांतून–पार होऊन जाण्यास योग्य मार्ग मिळून, तो प्राणी धन्य झाला म्हणून समजण्यास कसलीच हरकत दिसत नाहीं. असो.

जगाच्या इतिहासांत मधून मधून असा एक काळ येतो कीं, त्यावेळीं अलौकिक बुद्धीचे–प्रतिभेचे–असे महापुरुष निर्माण होऊन, तत्कालीन हताश झालेल्या जगाला नवीन मार्गदर्शन करून, अज्ञानपंकात रुतून धडपडणाऱ्या मानव जातीचें दुःख हलकें करण्याकरतां नवीन ज्ञानाचा प्रकाशझोत पाडून, मानवांचा उद्धार करण्यास अहोरात्र झटत असतात. असे महात्मे थोडे–फारच थोडे–पण असतात, हें कांहीं खोटें नाहीं. यांचें सर्वच चारित्र्य कांही विलक्षण व अद्भुतच असतें. त्यांची पुढें अवतारी पुरुषांतच गणना केली जाते. हे महात्मे जन्मतःच जागृत राहून चंचल संसाराच्या विश्वपसाऱ्यांत व विषयसुखाच्या निबिड जंजालांत अडकून न पडतां स्वतःच्या सुखसोयीवर पाणी सोडून, अपरमित हाल व कष्ट सोसून, मानवांचें दुःख हलके होण्याचे उपाय शोधून काढण्याच्या प्रयत्नांत अहोरात्र गढून गेलेले असतात. केवढी त्यांची तपश्चर्या ! आणि काय तें खडतर व्रत !! ऊन तर ऊन, वारा तर वारा, थंडी तर थंडी, पाऊस तर पाऊस,

या सर्वांचे खडतर आघात संतोषानें सहन करून, निर्जन अशा एकांतवासांत राहून, योगस्थ मनानें शाश्वत सुखाचें गूढ रहस्य नेमकें शोधून काढण्यांत सुयश मिळवून, मानवांच्या इतिहासांत अविस्मरणीय असें अजरामर स्थान पटकावून बसतात ! अशा थोर व महा विभूतींपैकींच भगवान बुद्ध हेहि एक आहेत ! त्यांच्या विषयीं कांहींचा जो गैरसमज झालेला दिसतो, तो अनाठायीं असून, त्यांची भूमिका यथार्थ न समजून घेतल्याचा तो परिणाम आहे, अशी आमची समजूत आहे. आणि आमचें हें बुद्ध-दर्शन वाचून झाल्यावर त्यांचा झालेला पूर्वग्रह खात्रीनें निवळेल अशी आम्हांस आशा आहे.

बुद्ध भगवंताचें परमोच्च आनंदशिखर असें जें निर्वाण, तें प्राप्त करून घेण्यास अष्टांगिक मार्ग सांगितला असून, त्याचें प्रज्ञा, शील व समाधि असे तीन विभाग पाडण्यांत आले आहेत. त्यांपैकी पहिल्या भागांत म्हणजे प्रज्ञेंत आर्यसत्याचें ज्ञान अवश्य म्हणून सांगितलें असलें तरी तें ज्ञान अंतःकरणांत चांगलें रुजून मुळी धरून राहण्यास त्या प्रज्ञेचें स्वरूप काय असावें व ती तेजस्वी व प्रभावी कशानें होतें, हें मात्र तेथें सांगण्यांत आलेलें नाहीं, म्हणून तो खुलासा येथें करण्यासाठीं प्रस्तुत प्रकरण हातीं घेतलें आहे.

आम्ही वैदिक लोक प्रज्ञप्तीला प्रज्ञा असें म्हणतो. म्हणजे दुसऱ्या अर्थानें तिलाच 'धी' अगर 'बुद्धि' या नांवानें ओळखितो. आणि बुद्ध तिलाच पञ्ञा असें म्हणतात. सदसद्विवेक, नित्यानित्य वस्तूची पारख' सारासारविचार करण्याची जी अंतःप्रवृत्ति तिलाच बौद्ध धर्मांत प्रज्ञा अशी संज्ञा आहे. 'सारञ्च सारतोञत्वा असारञ्च असारतो। ते सारं अधिगच्छन्ति सम्मा संकप्पगोचरा॥' (ध. प. १-१२)

भावार्थ :– जे साराला सार नि असाराला असार समजतात ते सद्विवेकी पुरुष साररूपी निर्वाणाप्रत जातात. म्हणजे सार कोणतें आणि असार कोणतें, हें जाणणारी जी अंतःशक्ति तीच प्रज्ञा होय. याच भावार्थाचा दुसरा आणखी एक श्लोक आहे, तो असा :– 'वज्जञ्च वज्जतो ञत्वा अवज्जञ्च अवज्जतो। सम्मादिट्ठि समादाना सत्ता गच्छन्ति सुग्गतिं॥'

(ध. प. २२-१४)

जें वर्ज्यं म्हणजे असत्य आहे, तें त्याज्य व जें अवर्ज्य म्हणजे सत्य आहे, तें ग्राह्य हें जे यथार्थतया पाहतात, ते विवेक दृष्टीचे लोक मुगतीस म्हणजे निर्वाणाप्रत जाऊन पोंचतात. वरीलपैकी पहिल्या श्लोकांत सम्यक्-संकल्प व दुसऱ्या श्लोकांत सम्यक् दृष्टि यांचा समावेश झाला असून, त्या दोहोस मिळूनच प्रज्ञा ही संज्ञा आहे हें स्पष्ट आहे.

याचा स्पष्टार्थ असा कीं सत्य कोणतें– असत्य कोणतें, नित्य कोणतें– अनित्य कोणतें, ग्राह्य कोणतें-त्याज्य कोणतें, याचा विवेक करून ठाम निर्णय देणारी बुद्धि, ती प्रज्ञा होय. अर्थात् ही बुद्धि उर्फ प्रज्ञा जितकी शुद्ध, पवित्र, निर्मल व स्वतंत्र असेल, तितकी ती तीक्ष्ण व तेजस्वी बनून, यथायोग्य निर्णयाचें व सत्यमार्गदर्शनाचें काम चोख बजावूं शकते. म्हणून तिला तीक्ष्ण बनविणे, कार्यक्षम करणें, प्रभावी बनविणें हें साधकाचें आद्य कर्तव्य आहे. आणि म्हणूनच अष्टांगिक मार्गांतली ती पहिली व प्रमुख पायरी असून, ती चढल्याशिवाय पुढील पायऱ्या चढता येणें हें सुकर नाहीं, म्हणून प्रज्ञेचें महत्व एवढें श्रेष्ठ आहे.

आतां या प्रज्ञेचें स्वरूप वा लक्षण काय सांगितलें आहे, हें थोडक्यांत अगोदर सांगून, मग ती तीक्ष्ण व तेजस्वी कशी बनते व बनवावी याचें दिग्दर्शन करतो. या प्रज्ञेचें लक्षण समजण्यास प्रथम वैदिक धर्मातील प्रज्ञेचें लक्षण समजणें जरूर आहे. कारण बौद्ध धर्मातील शब्दसंपत्ति ही सगळी वैदिक धर्मांतूनच उसनवार घेतलेली आहे. म्हणून वैदिक धर्म प्रज्ञेचें काय लक्षण देतो, हें आतां पाहूं. वैदिक धर्मांत प्रज्ञेला ब्रम्ह असें म्हटलें आहे. ('प्रज्ञानं ब्रम्ह' ऐ. उ. ३–५–३ ) आणखी एके ठिकाणी प्रज्ञा म्हणजे प्रज्ञप्ति असा अर्थ दिला आहे. प्रज्ञप्ति म्हणजे ज्ञान, सत्यज्ञान, यथार्थ ज्ञान. त्याचे निरनिराळे पर्याय अर्थ होत असून, त्याचा तपशील ऐतरेय उपनिषदांत देण्यांत आला आहे, तो असा :– 'संज्ञानं (चेतनाभावः), आज्ञानं (ईश्वरभावः), विज्ञानं (कालादि परिज्ञानं), प्रज्ञानं (प्रज्ञप्तिः, प्रज्ञता), मेधा (ग्रंथ धारण सामर्थ्यं,) दृष्टिः (इंद्रियद्वारा सर्वविषयोपलब्धिः), धृतिः (धारणा), मतिः (मननं), मनीषा (तत्र स्वातंत्र्यं), जूतिः (चेतसो रुजादि दुःखित्वभावः), स्मृतिः (स्मरणं), संकल्पः (रूपादीनां संकलपनं),

ऋतुः (अध्यव्यवसायः), असु (प्रणादिजीवन-क्रियानिमित्ता वृत्तिः), कामः, तृष्णा (विषयाकांक्षा), वशः (स्त्रीव्यतिकरादि अभिलाषः), सर्वाण्येतानि प्रज्ञानस्य नामध्येयानि भवन्ति, (ऐ. उ. ३–६–३). यावरून वैदिकप्रज्ञेचें लक्षण - व्यापक अर्थ - लक्षांत येतो. थोडक्यांत प्रज्ञेचा सर्वसाधारण अर्थ म्हणजे सत्यज्ञान, तारतम्यज्ञान, यथार्थ ज्ञान मानण्यास हरकत नाहीं. हा वैदिकांचा प्रज्ञेचा अर्थ झाला.

आतां बौद्धधर्मांत या प्रज्ञेचें काय लक्षण सांगितलें आहे हें थोडक्यांत पाहूं. तेथें प्रज्ञेचें लक्षण असें सांगण्यांत आलें आहे, तें असें:—'

' धम्मसभावपटिवेधलक्खणा पञ्ञा धम्मानं सभावपटिच्छादक मोहन्धकारविद्धंसन रसा, असम्मोहपच्चुपट्ठाना ' ॥
( वि. म. १४–७ )

भावार्थः— धर्मस्वरूपाचें वास्तवज्ञान करून देणारी ती प्रज्ञा होय. धर्मस्वरूपाला आच्छादन करणाऱ्या मोहांधकाराचें विध्वंसन करणें हें तिचें कार्य व अज्ञान नष्ट करणें हें तिचें रूप. या प्रज्ञेचें आणखी एक लक्षण सांगण्यांत आलें आहें, तेंहि येथें देऊन ठेवतो. तें लक्षण हें असें:–

'कुसलचित्त सम्पयुत्तं विपस्सनाञाणं पञ्ञा–'

कुशल म्हणजे मंगलमनोवृत्तीनें युक्त असें अंतर्दृष्टी पासून होणारें जे यथार्थ वस्तुज्ञान, त्यास प्रज्ञा असें म्हणतात. यावरून सामान्य ज्ञानाला प्रज्ञेचें दिव्य स्वरूप प्राप्त व्हावयास त्याला कुशलमनोवृत्तीचा खंबीर पाठिंबा असावयास पाहिजे. तरच ती प्रज्ञा तीक्ष्ण व तेजस्वी बनून योग्य मार्गदर्शन करण्यास समर्थ होते.

अतएव कुशल मनोवृत्ति कशाला म्हणतात याचा खुलासा करणें, हें आतां ओघानेंच प्राप्त झालें. या कुशलमनोवृत्तींना–ज्ञानोपकारक व ज्ञान-संवर्धक–कुशल धर्मांना बौद्ध धर्मांत ' बोध्यंगे ' हें उपनांव असून, त्यांत पुढील गोष्टींचा अंतर्भाव होतो. त्याचा तपशील हा असा:—

' सत्त भोज्झङ्गा–सतिसंभोज्झङ्गो, धम्मविचयसंभोज्झङ्गो,
विरियसंभोज्झङ्गो, पीतिसंभोज्झङ्गो, पस्सद्धिसंभोज्झङ्गो
समाधिसंभोज्झङ्गो, उपेक्खासंभोज्झङ्गो '
( अभिधम्म १–७–४–३० )

भावार्थः– सतिसंभोज्झंग म्हणजे जागरूकता, धम्मविचय म्हणजे सत्यान्वेषण, विरिय म्हणजे उत्साह, पीति म्हणजे आनंद, पस्सिद्धि म्हणजे समाधान, समाधि म्हणजे चित्ताची एकाग्रता, उपेक्खा म्हणजे सुख, दुःखातीत भाव, म्हणजे वैराग्य उर्फ औदासीन्य. या मनोवृत्तींना संबोध्यंगें म्हणजे सत्यज्ञानाचीं सात अंगें असें नांव आहे.

आतां ही प्रज्ञा प्रभावी व तेजस्वी, तीक्ष्ण व सूक्ष्म व्हावयाला या सात मनोवृत्तींची जोपासना व संवर्धन हें अत्यंत जरूर आहे. त्याशिवाय ती ज्वाज्वल्य व प्रभावी बनणार नाहीं. आणि प्रज्ञा तीक्ष्ण व तेजस्वी झाल्याशिवाय आसवक्षय–संसारबंधनाचा नाश–होणार नाहीं. आसवक्षय नाहीं तर अविद्येचा नाश अशक्य आणि जोपर्यंत अविद्येचा वरचष्मा आहे, तोपर्यंत निर्वाण म्हणजे दुःखनाश व शांतिलाभ यांचें नांवच घ्यावयास नको! म्हणून प्रज्ञेला–अंतः–करणातील विवेकबुद्धीला–प्रज्वलित करणाऱ्या या सात संबोध्यगांचा अवश्यमेव संग्रह व विकास केला पाहिजे.

बुद्ध देवांनी निर्वाण प्राप्त्यर्थ कांहीं गोष्टी अवश्य सेवनीय आहेत म्हणून मोठ्या आग्रहानें प्रतिपादिलें आहे. तीं सर्व साधनें साधकानें अवश्यमेव हस्तगत करून घेतलीं पाहिजेत. त्यांच्या धर्मावर ज्यांची श्रद्धा व निष्ठा आहे, अशा जिज्ञासूंना त्या धर्माचा साक्षात्कार घ्यावयाचा झाला तर तो आयता तसा कोणाला मिळणार नाहीं. तत्प्राप्त्यर्थ फार मोठें दिव्य करावें लागतें. त्या धर्माची दीक्षा घेऊन ज्यांना निर्वाण साधावयाचें आहे, त्यांनी यापुढील वचनावर डोळ्यांत अंजन घालून, सतत आपली दृष्टि रोखून धरून, त्याप्रमाणें सक्त आचरण करावयास पाहिजे.

त्या आवश्यक गोष्टी कोणत्या म्हणाल तर त्या ह्याः–

'सेय्यथीदं चत्तारो सतिपट्ठाना, चत्तारो सम्मप्पधाना, चत्तारो इद्धिपादा, पञ्चिन्द्रियानि, पंच बलानि, सत्तबोज्झङ्गा, अट्ठङ्गिकमग्गो। इमे खो भिक्खवे धम्मा अभिञ्ञाय देसिता, ते वो साधुकं उग्गहेत्वा आसेवितब्बा भावेतब्बा बहुलीकातब्बा यथयिदं ब्रम्हचरियं अद्धनियं अस्सचिरट्ठितिकं, तदस्स बहुजनहिताय बहुजनसुखाय लोकानुकम्पाय अत्थाय हिताय सुखाय देवमनुस्सानं' ति।।' (दीघनिकाय, १६–३–५०)

भावार्थः– भिक्षूहो ! मी ज्या गोष्टी तुम्हांस आचारावयास सांगितल्या आहेत, त्या ह्याः– (१) चार स्मृतिप्रस्थान (२) चार सम्यक् प्रधान (३) चार ऋद्धिपाद (४) पांच इंद्रियें (५) पांच बलें (६) सात बोध्यंगें व (७) अष्टांगिक मार्ग, हे धर्म मी तुम्हांस उपदेशिले आहेत. ते उत्तम तऱ्हेनें ग्रहण करून, त्याप्रमाणें तुम्हीं आचरण करावें. त्यांची भावना करावी, व ते वाढवावेत, की ज्यांत ब्रह्मचर्य स्थिर होईल. हा माझा धर्म बहुजन-हितार्थ, बहुजनसुखार्थ, लोकानुकंपार्थ, देवमानवांच्या सुखार्थ, व हितार्थ म्हणजे या सर्वांच्या हितास व सुखास कारणीभूत होईल.

आतां हीं वरील स्मृत्युपस्थानें, सम्यक् प्रधानें, ऋद्धिपाद, इंद्रियें, बलें, बोध्यंगे व अष्टांगिक मार्ग याविषयीं थोडीशी येथें माहिती देणें जरूर आहे. त्याशिवाय वाचकांना कांहीच बोध होण्यासारखा नाहीं. वरील सात गोष्टींपैकीं स्मृत्युपस्थान, अष्टांगिक मार्ग व संबोध्यंगें यांची अवश्य तेवढी माहिती वर देऊन गेलीच आहे, व ती वाचकांच्या आठवणींत असेलहि. म्हणून बाकीच्यासंबंधी फक्त नामनिर्देश करण्यापलीकडे अधिक विस्तार करण्याच्या भरीस पडत नाहीं. वरील सात गोष्टींचा तपशील म्हणजे तो असा:–

(१) स्मृत्युपस्थानः– यांत कायगतास्मृति, वेदनानुस्मृति, चित्तानुस्मृति, व धर्मानुस्मृति, यांचा समावेश होतो. यांचें विवेचन मागें 'सम्यक् स्मृति' यांत आलेंच आहे.

(२) सम्यक् प्रधानें:– वर्तमानकाळीं उत्पन्न न झालेल्या अकुशलधर्मांना उत्पन्न न करणें, उत्पन्न झालेल्या अकुशलधर्मांचा नाश करणें, अनुत्पन्न कुशल धर्मांना उत्पन्न करणें व उत्पन्न कुशल धर्मांचें रक्षण, वाढ व भावना करणें. यांस सम्यक् प्रधान म्हणतात.

(३) ऋद्धिपादः– चत्तारो इद्धिपादा–छन्दिद्धिपादो, चित्तिद्धिपादो, वरियिद्धिपादो, विमंसिद्धिपादो' (अभिधम्म १–७–४–२७)

भावार्थः– सत्कर्मप्रवृत्ति, विचार, उत्साह व तत्वान्वेषणेच्छा, यामाणें या चार योगिक शक्ति आहेत.

(४) पांचबलें:– 'पंच बलानि - सद्धाबलं, विरियबलं, सतिबलं, समाधिबलं, पञ्ञाबलं' (अभिधम्म १-७-४-२९) श्रद्धा, उत्साह, समाधि, स्मृति, व प्रज्ञा अशीं हीं पांच बलें आहेत.

(५) पांच इंद्रियें:– 'पञ्चिन्द्रियाणि - सद्धिन्द्रियं, विरियिन्द्रियं, सतिन्द्रियं, समाधिन्द्रियं, पञ्ञिन्द्रियं; (अभिधम्म. १-७-४-२८) श्रद्धा, उत्साह स्मृति, समाधि व प्रज्ञा हीं पांच धर्मक्षेत्रातील मार्गदर्शक मानसिक सामर्थ्ये आहेत.

(६) सात संबोध्यंगें:– 'सत्त भोज्झङ्गा–सतिसंभोज्झंगो, धम्मविचयसंभोज्झंगो, विरियसंभोज्झंगो, पस्सद्धिसंभोज्झंगो, समाधिसंभोज्झंगो, उपेक्खा–संभोज्झंगो,' (अभिधम्म, १–७–४–३०) स्मृति, सत्यान्वेषण, उत्साह, प्रीति, शांति, समाधि व उपेक्षा उर्फ वैराग्य अशीं हीं सात ज्ञानोत्पादक अंगें आहेत.

(७) अष्टांगिक मार्गः– सम्यक्दृष्टि, सम्यक्संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्म, सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति व सम्यक् समाधि, अशीं हीं सात दुःखविमुक्तीचीं साधनें आहेत.

वरील सातहि कलमांचा निष्कर्ष काढला तर श्रद्धा, उत्साह, स्मृति, समाधि, प्रज्ञा, सत्यान्वेषण, तत्वचिकित्सा, शांति, सत्कर्मप्रवृत्ति, इंद्रियनिग्रह इत्यादि गोष्टींचें बौद्धधर्मांत महत्व केवढें आहे, हें दिसून येतें आणि या गोष्टी अवश्य आचरणांत आणल्या पाहिजेत, असें भगवान जीव तोडून भिक्षूंना खणखणीत सांगताहेत. या गोष्टींचें महत्व केवळ बुद्ध धर्मांतच आहे असें नसून, ब्राम्हणधर्मांतहि त्याच्याहि पूर्वीपासूनच आहे. आमच्या वाचकांना त्या नव्या आहेत अशांतला भाग नाहीं. वरील विषयांचा अंतर्भाव याज्ञवल्क्यांनीं कमीअधिक प्रमाणानें 'वेदवचन, ब्रम्हचर्य, तपानुष्ठान, श्रद्धा, देवोपासना व त्यागवृत्ति' या सहा व्यापक गोष्टींत सूत्रमय शब्दांत करून दाखविला आहे. (श. प. १४–७–२–२५) वैदिक काय, बौद्ध काय, जैन काय किंवा इतर धर्म झाले तरी काय, धर्मक्षेत्रांत कोठें झालें तरी वरील तत्वांना कमी अधिक मानानें प्राधान्य व महत्व हें आहेच आहे. वरील गुण अंगीं बाणल्याशिवाय कोणालाहि कुठल्याहि धर्मांतील अत्युच्च

श्रेष्ठ तत्वाचा साक्षात्कार होणें हें शक्य नाहीं आणि वरील सद्गुण व सत्प्रवृत्ति ज्याच्यांत रुजून विकास पावल्या–मग तो कोणत्याहि धर्मांत जन्मलेला व वाढलेला असो–त्याला इतर धर्मांशी भांडण्याचें व झुंजण्याचें कारणच राहात नाहीं, याची साक्ष हिंदु धर्मानें जगास पटवून दिली आहे. असो.

आतां येथें आणखी एक गोष्ट ठळक रीतीनें वाचकांच्या नजरेपुढें आणली पाहिजे, ती ही कीं पुष्कळ लोकांची समजूत अशी झालेली दिसते कीं बुद्धधर्म हा अगदी साधा व सोधा धर्म असून, तो बहुजन समाजाला झेंपणारा व मानवणारा असा आहे. हा समज पाश्चात्य पंडितांचा व त्यांचे ग्रंथ वाचून तेवढ्यावरच निर्वाह करणाऱ्या व संतुष्ट राहणाऱ्या आधुनिक भारतीय विद्वानांचा व अज्ञानामुळें व मत्सरामुळें चिडलेल्या, रुसलेल्या व वैतागलेल्या कांहीं अविचारी लोकांचा झालेला असून, आपल्या मताचें पुष्टीकरण म्हणून

'सब्ब पापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा ।
सचित्तपरियोदपनं एतं बुद्धान सासनं ॥
( १४–५ )'

हा धम्मपदातील श्लोक त्यांच्याकडून पुढें करण्यांत येतो.

पण हा समज भ्रामक व अगदी चुकीचा आहे. खोल विचार न केल्याची ती साक्ष आहे. बुद्ध भगवंताची शिकवण काळजीपूर्वक संपूर्ण न वाचल्याची ती कबूली आहे, असें स्पष्ट म्हटल्याशिवाय आमच्यानें पुढें जाववत नाहीं. खुद्द भगवंतास याविषयीं कौल लावून पाहिल्यास रंग कांहीं निराळाच दिसतो. म्हणून त्यांचें याविषयीं काय म्हणणें आहे, हें पाहणें क्रमप्राप्तच झालें. म्हणून त्यांच्या तोंडचेच उद्गार येथें देतो म्हणजे झालें.

वैशाख शुद्ध पौर्णिमेच्या रात्री भगवंतांना बोधि वृक्षाखालीं जेव्हां संबोधि प्राप्त झाली, त्यावेळीं त्यांना आपल्या धर्माविषयीं काय वाटलें यासंबंधी त्यांचे ते प्रत्यक्ष उद्गार हे असे आहेतः–

'अधिगतो खो मे अयं धम्मो गंभीरो दुद्दसो दुरनुबोधो सन्तो पणीतो अतक्कावचरो निपुणो पण्डितवेदनीयो। आलयरामा खो पना'यं पजा आलयरता आलय सम्मुदिता। आलय रामाय खो पन पजाय आलयरताय आलयसमुदिताय दुद्दसं इदं ठानं यदिदं इदपच्चयता पटिच्चसमुप्पादो। इदं पि खो ठानं दुद्दसं यदिदं सब्बसङ्खारसमयो सब्बूपाधिपटिनिस्सग्गो तण्हक्खयो विरागो निरोधो निब्बाणं। अहञ्चेव खो पन धम्मं देसेय्यं, परे च मे न आजानेय्युं ॥'

( दीघनिकाय १४–३–१ )

भावार्थः– भिक्षूहो। मला असें झालें कीं मी हा जो धर्म प्राप्त करून घेतला आहे, तो मोठा गंभीर, दुर्दर्श्य, दुर्ज्ञेय,' शांत, उत्तम, तर्काला अगम्य, निपुण आणि म्हणून फक्त पंडितांनाच गम्य आहे. पण काय, ही जनता पहावी, तर ती विषयोपभोगांतच रममाण होणारी असून, तो विषयसुखांतच रंगून त्यांतच आनंद मानणारी आहे. कामसुखांतच अखंड गुरफ पडलेल्या अशा सामान्य जनतेसाठीं हा जो माझा कार्यकारणरूपी प्रतीत्य–समुत्पाद आहे, तो आकलन करण्यास मोठा कठीण आहे. त्याच-प्रमाणें त्यांना सर्व संस्काराचें शमन म्हणजे काय, सर्व उपाधीत्याग म्हणजे काय, तृष्णाक्षय, त्याचप्रमाणें विराग, निरोध व निर्वाण इत्यादि गोष्टी समजणें दुर्घट आहे. मी उपदेश करीन पण तो त्यांस रुचणार व समजणार नाहीं. मला मात्र प्रयास व पीडा होईल !

यावरील वचनावरून लोकसमज कसा चुकीचा व अर्धवट ज्ञानाचा आहे हें सहज व स्पष्ट होतें. बुद्ध भगवंताचे तत्त्वज्ञान म्हणजे–दुःखोत्पत्ति व दुःखनिरोध–अर्थात् प्रतीत्यसमुत्पाद–हें नीट समजावयास व अंतःकरणांत पूर्ण उतरावयास व त्याचप्रमाणें निर्वाणाचा साक्षात्कार घडावयास मनाची स्थिरता व बुद्धीची तीक्ष्णता तशीच मोठी गंभीर व प्रखर असावयास

पाहिजे. त्याशिवाय त्या धर्मातील परमोच्च उत्कर्षबिंदु—म्हणजे अर्हतावस्था उर्फ जीवन्मुक्तस्थिति—प्राप्त होणें साध्य नाहीं.

हें शक्य होण्यास रात्रंदिवस विषयसुखाकडे सारख्या भरार्‍या मारणार्‍या चवचाळ इंद्रियांचा निग्रह साधला पाहिजे. तो साधावयाचा तर इंद्रियांच्या भरीस पडून त्यांच्यामागें धांवणार्‍या मनाला पायबंद घालून त्याला एकाच ठिकाणीं रोखून ठेविलें पाहिजे. हें व्हावयास प्रज्ञाचक्षूवर पडलेला अविद्येचा पडदा दूर सारून त्याला सत्यज्ञानाच्या प्रकाशांत आणलें पाहिजे. आणि हें झालें तरच ती डोळस बुद्धि मनाला योग्य मार्गदर्शन करून त्याला इंद्रियें स्वाधीन ठेवण्यास समर्थ करील. आणि मग सुगत-कथित निर्वाणाचा साक्षात्कार होऊन मानवजन्माचें सार्थक होईल.

अर्थात् हें सर्व सहजासहजी घडून येणारें नसून त्याला प्रदीर्घ अभ्यास, पराकाष्ठेचें वैराग्य व आटोकाट परिश्रम करावयास पाहिजेत, हें आतां निराळें सांगावयास नकोच. म्हणून तो धर्म झाला तरी समजण्यास व आचरण्यास ब्राम्हण धर्मा इतकाच दुर्बोध व दुर्घट, सूक्ष्म व गहन, ज्ञानप्रचुर व त्यागमय धर्म आहे, हें आतां उघड बोलून दाखविलेंच पाहिजे कीं काय ?

यानंतर वाचक आतां आम्हांस असा प्रश्न करतील कीं ‘अहो बुद्धीचा प्रकर्ष—प्रज्ञेचा प्रकर्ष—असें तुम्ही वारंवार म्हणतां तर त्याचा अर्थ काय ? व मनुष्यांत त्या प्रज्ञेचा प्रकर्ष झाला आहे, हें समजण्याचें चिन्ह अगर लक्षण कोणतें ? याविषयीं कांही खूणगांठ सांगाल कीं नाहीं ? कां नुसत्या शब्दावरच आम्ही तृप्त व चूप रहावें ? वाचकांचा हा प्रश्न ठीक आहे व त्यांचें समाधान करणें हें जरूर आहे. अतएव या प्रश्नाचा खुलासा प्रथम वैदिक दृष्टीनें करून मग भगवंताची कल्पना सांगितली तर ती वाचकांस नीटशी पटून त्यांचें पूर्ण समाधान होईल.

शिवाय येथें हेंहि सांगितलें पाहिजे कीं वैदिक व बुद्ध या धर्मांत याबाबतींत जवळ जवळ पूर्ण साम्य व मतैक्य आहे. साधकानें प्रज्ञेचा

उत्कर्षबिंदु गांठला आहे कीं नाहीं, हें समजण्यास त्याच्यांत पुढील लक्षण आढळतें कीं नाहीं, हें पाहिलें पाहिजे. तें लक्षण भगवान श्रीकृष्णजीच्या वचनांत सांगावयाचें झालें तर असें सांगता येईल.:–

' दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ '
( भ. गी. २–५६ )

ज्याचें मन दुःख प्राप्त झालें असतां उद्वेग पावत नाहीं व सुखाविषयीं निरीच्छ असतें अशा स्थिरबुद्धि मनुष्याला मुनी म्हणतात.

याचाच अधिक स्पष्ट खुलासा भगवान श्रीकृष्णदेव यापुढील तीन वचनांत करून दाखवितात. तो खुलासा असा–

' यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् । नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ( २–५७ ) यदा संहरते चायं कूर्मोंगानीव सर्वशः । इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा पतिष्ठिता ॥ ( २–५८ ) तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ( २–६१ )

सर्वत्र निर्लोभ राहून चांगला अगर वाईट प्रसंग आला, तरी जो चांगल्या प्रसंगानें हुरळून जात नाही व वाईट प्रसंगानें तोंड आंबट करीत नाहीं, त्याची बुद्धि स्थिर झाली म्हणजे तो स्थितप्रज्ञ झाला. तसेंच कासयाच्या अवयवाप्रमाणें जेव्हां तो आपलीं इन्द्रियें त्या त्या विषयापासून आवरून घेतो, तेव्हा त्याची बुद्धि म्हणजे प्रज्ञा स्थिर झाली ( असें समजावें ). पुनः आणखी, सर्व इन्द्रियांचें संयमन करून अशा स्थितप्रज्ञानें मत्परायण असावें. कारण हीं इंद्रियें ज्याच्या ताब्यांत आलीं त्याचीच बुद्धि प्रतिष्ठित झाली. म्हणजे तोच स्थिरप्रज्ञ झाला. हीच ब्राम्हीस्थिति–म्हणजे जीवन्मुक्तावस्था–' एषा ब्राम्हीस्थितिः '–होय, असा श्रीकृष्णांनी शेवटी निर्वाळा दिला आहे.

पाहिजे. त्याशिवाय त्या धर्मातील परमोच्च उत्कर्षबिंदु-म्हणजे अर्हतावस्था उर्फ जीवन्मुक्तस्थिति-प्राप्त होणें साध्य नाहीं.

हें शक्य होण्यास रात्रंदिवस विषयसुखाकडे सारख्या भराऱ्या मारणाऱ्या चवचाळ इंद्रियांचा निग्रह साधला पाहिजे. तो साधावयाचा तर इंद्रियांच्या भरीस पडून त्यांच्यामागें धांवणाऱ्या मनाला पायबंद घालून त्याला एकाच ठिकाणीं रोखून ठेविलें पाहिजे. हें व्हावयास प्रज्ञाचक्षूवर पडलेला अविद्येचा पडदा दूर सारून त्याला सत्यज्ञानाच्या प्रकाशांत आणलें पाहिजे. आणि हें झालें तरच ती डोळस बुद्धि मनाला योग्य मार्गदर्शन करून त्याला इंद्रियें स्वाधीन ठेवण्यास समर्थ करील. आणि मग सुगत-कथित निर्वाणाचा साक्षात्कार होऊन मानवजन्माचें सार्थक होईल.

अर्थात् हें सर्व सहजासहजी घडून येणारें नसून त्याला प्रदीर्घ अभ्यास, पराकाष्ठेचें वैराग्य व आटोकाट परिश्रम करावयास पाहिजेत, हें आतां निराळें सांगावयास नकोच. म्हणून तो धर्म झाला तरी समजण्यास व आचरण्यास ब्राम्हण धर्मा इतकाच दुर्बोध व दुर्घट, सूक्ष्म व गहन, ज्ञानप्रचुर व त्यागमय धर्म आहे, हें आतां उघड बोलून दाखविलेंच पाहिजे कीं काय ?

यानंतर वाचक आतां आम्हांस असा प्रश्न करतील कीं 'अहो बुद्धांचा प्रकर्ष-प्रज्ञेचा प्रकर्ष-असें तुम्ही वारंवार म्हणतां तर त्याचा अर्थ काय ? व मनुष्यांत त्या प्रज्ञेचा प्रकर्ष झाला आहे, हें समजण्याचें चिन्ह अगर लक्षण कोणतें ? याविषयीं कांही खूणगांठ सांगाल कीं नाहीं ? कां नुसत्या शब्दावरच आम्ही तृप्त व खूष रहावें ? वाचकांचा हा प्रश्न ठीक आहे व त्यांचें समाधान करणें हें जरूर आहे. अतएव या प्रश्नाचा खुलासा प्रथम वैदिक दृष्टीनें करून मग भगवंताची कल्पना सांगितली तर ती वाचकांस नीटशी पटून त्यांचें पूर्ण समाधान होईल.

शिवाय येथें हेंहि सांगितलें पाहिजे की वैदिक व बुद्ध या धर्मांत याबाबतींत जवळ जवळ पूर्ण साम्य व मतैक्य आहे. साधकानें प्रज्ञेचा

उत्कर्षबिंदु गांठला आहे कीं नाहीं, हें समजण्यास त्याच्यांत पुढील लक्षण आढळतें कीं नाहीं, हें पाहिलें पाहिजे. तें लक्षण भगवान श्रीकृष्णजींच्या वचनांत सांगावयाचें झालें तर असें सांगता येईल:-

' दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ '

( भ. गी. २-५६ )

ज्याचें मन दुःख प्राप्त झालें असतां उद्वेग पावत नाहीं व सुखाविषयीं निरीच्छ असतें अशा स्थिरबुद्धि मनुष्याला मुनी म्हणतात.

याचाच अधिक स्पष्ट खुलासा भगवान श्रीकृष्णदेव यापुढील तीन वचनांत करून दाखवितात. तो खुलासा असा–

' यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् । नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ( २-५७ ) यदा संहरते चायं कूर्मोंगानीव सर्वशः । इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा पतिष्ठिता ॥ ( २-५८ ) तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ( २-६१ )

सर्वत्र निर्लोभ राहून चांगला अगर वाईट प्रसंग आला, तरी जो चांगल्या प्रसंगानें हुरळून जात नाही व वाईट प्रसंगानें तोंड आंबट करीत नाहीं, त्याची बुद्धि स्थिर झाली म्हणजे तो स्थितप्रज्ञ झाला. तसेंच कासवाच्या अवयवाप्रमाणें जेव्हां तो आपलीं इंद्रियें त्या त्या विषयापासून आवरून घेतो, तेव्हा त्याची बुद्धि म्हणजे प्रज्ञा स्थिर झाली ( असें समजावें ). पुनः आणखी, सर्व इंद्रियांचें संयमन करून अशा स्थितप्रज्ञानें मत्परायण असावें. कारण हीं इंद्रियें ज्याच्या ताब्यांत आलीं त्याचीच बुद्धि प्रतिष्ठित झाली. म्हणजे तोच स्थिरप्रज्ञ झाला. हीच ब्राम्हीस्थिति– म्हणजे जीवन्मुक्तावस्था–' एषा ब्राम्हीस्थितिः '–होय, असा श्रीकृष्णांनी शेवटी निर्वाळा दिला आहे.

हेंच याज्ञवल्क्यजीच्या सूत्रमय भाषेत सांगावयाचें म्हणजे

' यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि स्थिताः ।
अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रम्ह समश्नुते ॥

( श. प. १४-७-२-९ )

हें वचन येथें पुढें करतां येईल. ' मनुष्याच्या अंतःकरणातील सर्व सुष्टदुष्ट वासना जेव्हां नाहींतशा होतील,' तेव्हा तो मर्त्याचा अमर होईल व या देहीं याच डोळां त्याला ब्रम्हसुखाचा अनुभव येईल, असा त्या वचनाचा भावार्थ आहे. ' एषा ब्राम्हीस्थितिः ' या शब्दाचे पर्याय शब्द म्हणजे ' अत्र ब्रम्हसमश्नुते ' हे असून दोन्ही जीवन्मुक्ताचाच अर्थ सूचित करतात. हाच प्रज्ञोत्कर्ष होय.

वैदिक लोक ज्याला स्थितप्रज्ञ म्हणतात त्यालाच बौद्धधर्मात अर्हत् ( अरहा ) हा शब्द वापरतात. ' अरहा ' या शब्दाची त्या धर्मात व्याख्या आढळते ती अशीः-

' अरहा-अयं वुच्चति पुग्गलो कामेसु च भवेसु च वीतरागो '

( अभिधम्म २-५-१ )

विषयसुखाविषयी व जीवनेच्छेविषयी जो रागरहित-तृष्णारहित-झाला आहे, त्या पुरुषाला अर्हत् असें म्हणतात. ' यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि स्थिताः ' हें जें वैदिक जीवन्मुक्ताचें लक्षण याज्ञवल्क्यांनी दिलें आहे, त्यांत व ' अरहा-अयं वुच्चति पुग्गलो कामेसुच भवेसुच वीतरागः ' या अभिधम्म वचनांत किती हुबेहूब अर्थसाम्य आहे, हें चाणाक्ष वाचकांच्या ध्यानांत आलें असेलच.

शिवाय ' वीतराग ' हा शब्द गीतेंत स्थितप्रज्ञाला व अभिधम्मांत ' अर्हताला लावल्यांत आलेला पाहून व एकंदर स्थितप्रज्ञ व अर्हत् यांचें लक्षण डोळ्यापुढें ठेवून विचार केला तर तेथें भिन्नता न दिसतां साम्यताच

आढळून येईल. बौद्धधर्मातील अर्हत् हा वैदिकांच्या स्थितप्रज्ञाप्रमाणेंच जीवनन्मुक्त असतो हें निराळें सांगण्याची गरज नाहीं. एकंदरीत तात्पर्यार्थ काय तर द्वंद्वातीत होणें हेंच प्रज्ञोत्कर्षाचें लक्षण आहे.

ही प्रज्ञा शुद्ध, तीक्ष्ण व सम करण्याचें कारण हें कीं, त्यामुळें चित्तावर सांठलेला मळ नाहींसा होऊन तें निर्मळ होतें. आणि तें निर्मळ झालें, सम झालें, म्हणजे सुखदुःख, शीतोष्ण, स्तुतिनिंदा, मानापमान इत्यादि द्वंद्वापासून निर्लेप राहून शांत व स्थिर बनतें याचा अर्थ असा कीं, मन जसें निवळत जाईल तशी बुद्धि उजळत जाते आणि बुद्धि जशी उजळत जाईल तसें मन निवळत जातें. ही गोष्ट बुद्धांनी वर मयळ्यात दिलेल्या वचनांत स्पष्ट केली आहे.

मन व बुद्धि—म्हणजे चित्त व प्रज्ञा—यांचा अन्योन्य संबंध असल्यामुळें एकाचा उत्कर्ष वा अपकर्ष तोच दुसऱ्याचा उत्कर्ष वा अपकर्ष, एकाची प्रगति वा अधोगति तीच दुसऱ्याची प्रगति वा अधोगति होय. आणि म्हणून भगवंतानी चित्त व प्रज्ञा दोन्ही स्थिर, शुद्ध, व निर्मल करण्याचा व राखण्याचा मोठचा कळकळीने उपदेश केला आहे. म्हणजे समाधि व विपश्यना —चित्तैकाग्र्य व अंतर्दृष्टि—यांचा परस्पर संबंध असून एक साधलें नाहीं तर दुसरेंहि साध्य होणें नाहीं आणि दोन्ही साध्य न झाल्यास निर्वाण लाभणे शक्य नाहीं, हा अनुभव पुढील गाथेंत चपक नमूद करून मिक्षूंस दोन्ही साधण्यास स्पष्ट बजावून ठेविलें आहे. ती गाथा म्हणजे अशीः—

' नत्थि झानं अपञ्ञस्स पञ्ञा नत्थि अज्झा यतो ।
यम्हि झानं च पञ्ञा च स वे निब्बाणसन्तिके ।।

( धम्मपद २५–१३ )

ज्याला प्रज्ञा नाहीं त्याला ध्यान ( समाधि ) नाहीं व ज्याला ध्यान नाहीं त्याला प्रज्ञा नाहीं. ज्याच्यांत ध्यान व प्रज्ञा हीं दोन्हीं आहेत, तोच निर्वाणाप्रत जाऊं शकतो.

येथपर्यंतच्या विवेचनावरून हें निर्विवाद आहे कीं, निर्वाणेच्छु साधकाला प्रज्ञेचा उत्कर्ष हा अत्यंत जरूर आहे. त्याशिवाय निर्वाणाचें नांवच काढावयास नको.

' पञ्ञा हि सेट्ठा लोकस्मि यायं निब्बेध गामिनी ।
याच सम्मा पजानाति जातिभवपरिक्खयं ॥

( इतिवुत्तक २-२-४ )

भावार्थः— या लोकीं निर्वाणाप्रत नेणारी प्रज्ञा हीच श्रेष्ठ आहे. कारण ही प्रज्ञाच जाति-भवाचा उच्छेद उत्तम तऱ्हेनें जाणते. आता या प्रज्ञेच्या सहायानें दुःखोत्पत्ति कशी होते व त्या दुःखाचा नाश कसा होतो, याची उपपत्ति भगवंतानी प्रतीत्यसमुत्पादांत फार उत्तमरीतीनें दाखविली असून, त्याची आतां वाचकांस ओळख करून देणें हें प्रवाहप्राप्तच झालें. म्हणून पुढील प्रकरणांत त्याचा परामर्श घेण्याचें योजिलें आहे.



प्रकरण ६ वें

# प्रतीत्य समुत्पाद
## ( पूर्वार्ध )
# दुःखोत्पत्ति

कतमो भिक्खवे पटिच्चसमुप्पादो ? अविद्यापच्चया, भिक्खवे, 'संखारा संखारपच्चया विञ्ञाणं, विञ्ञाणपच्चया नामरूपं, नामरूपपच्चयां सळायतनं, सळायतनपच्चया तण्हा, तण्हापच्चया उपादानं, उपादानपच्चया भवो, भवपच्चया जाति, जातिपच्चया जरामरणं, सोक-परिदेवदुक्खदोमनस्सुपायासा संभवति। एवमेतस्स केवलस्स दुक्खखन्दस्स समुदयो होति। अयं वुच्चति, भिक्खवे, पटिच्चसमुप्पादो ' ति ॥

( धम्मचक्क-पवत्तन सुत्त )

भावार्थः- भिक्षुहो ! प्रतीत्यसमुत्पाद कशाला म्हणतात ? त्याचें स्वरूप हें असें आहे. मूळ अविद्या असून तिच्यापासून संस्काराची उत्पत्ति झाली. त्या संस्कारापासून विज्ञान जन्मलें. विज्ञानापासून नामरूप, नामरूपापासून षडायतन, षडायतनापासून स्पर्श, स्पर्शापासून वेदना, वेदनेपासून तृष्णा, तृष्णेपासून उपादान, उपादानापासून भव, भवापासून जन्म, जन्मापासून जरामरण, शोक, रोदन, दुःख, मनस्ताप, अप्रिय वस्तूंचा संपर्क व प्रिय वस्तूंचा वियोग यांची क्रमानें उत्पत्ति होते. याला, भिक्षूहो, म्हणतात प्रतीत्य समुत्पाद. वरील वचनाचा हा असा भावार्थ आहे.

बुद्ध भगवंतानीं आपल्या धर्माची जी उभारणी व मांडणी केली आहे, त्याचा मूळ व मुख्य पाया म्हणजे हा प्रतीत्यसमुत्पाद होय. हा प्रतीत्यसमुत्पाद म्हणजे बुद्ध भगवंताच्या तत्त्वज्ञानाचा मुख्य गाभा म्हटला तरी चालेल. या प्रतीत्यसमुत्पादाचीं एकंदर दहा अंगें आहेत. तीं म्हणजे हीं- अविद्या, संस्कार, विज्ञान, नामरूप, षडींद्रियें, स्पर्श, वेदना, तण्हा,

उपादान, भव–जातिजरामरण इत्यादि. ( अभिधम्म, १–८–३–७ ) आणि हा समुत्पाद विकार नसून, हेतुप्रभव म्हणजे कार्यकारणरूप आहे. म्हणजे याचें स्वरूप जवळ जवळ विकासवादासारखें आहे, म्हटलें तरी चालेल. अर्थात् हें तत्त्वज्ञान बुद्धधर्माचें मुख्य उपनिषद् म्हटल्यास ते अधिक शोभेल. तेथें बुद्धांनी आपल्या धर्माला आधारभूत अशा या तत्त्वज्ञानाची स्वतंत्र व तर्कशुद्ध अशी व्यवस्थित व सुसंगत मांडणी करून दाखविली आहे. संबोधीच्यावेळीं त्यांनी जीं चार आर्यसत्यें शोधून काढलीं, त्याबरोबरच व त्याच बैठकींत दुःख कसें उद्‌भवतें व कां उद्‌भवतें व त्याचा निरोध कसा होतो, हें तत्त्वज्ञानहि त्याच वेळेस शोधून काढलें. या *तत्त्वज्ञानास–विचारप्रणालीस–बौद्धधर्मांत अत्यंत महत्वाचें स्थान असून,* त्यास पटिच्चसमुप्पाद–प्रतीत्यसमुत्पाद '–हें नांव आहे. शिवाय त्याला ' मध्यमा प्रतिपदा ' ' निदान ' ' पच्चयाकार ' अशीं दुसरीं नावें आहेत.

या प्रतीतसमुत्पादाचे मुख्य दोन भाग असून, एकास अनुलोम व दुसऱ्यास प्रतिलोम प्रतीत्यसमुत्पाद असें म्हणण्याचा प्रघात आहे. पहिल्या म्हणजे अनुलोम प्रकारांत दुःख कसें उत्पन्न होतें व दुसऱ्यांत त्याचा निरोध म्हणजे नाश कसा होतो, याची सयुक्तिक कार्यकारणपरंपरा दाखविण्यांत आली आहे. ' अमुक असेल तर अमुक होतें, किंवा अमवयावर अमुक अवलंबून आहे, हें दाखविणाऱ्या विचारसरणीस ' पटिच्चसमुप्पाद ' हें पारिभाषिक नांव आहे.

' इमस्मीं सति इदं होति, इमस्स उप्पादा, इदं उपज्जाति;
इमस्मि असति इदं न होति इमस्स निरोधा इदं निरुज्झति ।

( म. नि. महातण्हासंखयसुत्त ३८ )

भावार्थः– हें असेल तर तें होतें, हें उत्पन्न झालें तर ते उत्पन्न होतें. आणि हें नसेल तर तें होत नाहीं, अथवा हें बंद झालें तर तें बंद होतें. या विचारप्रणालीला बुद्धधर्मांत प्रतीत्यसमुत्पाद हें नांव आहे. हेंच सोप्या भाषेत सांगावयाचें म्हणजे दुःखोत्पत्ति व दुःखनाश याचें कार्यकारण-

भाव दाखविणाऱ्या विचारसरणीस प्रतीत्यसमुत्पाद हें नांव देण्यांत आलें आहे.

. अर्थात् बौद्धधर्माचा मुख्य आधारस्तंभ–तत्त्वज्ञानाचा केवळ गाभा–म्हणजेच हा प्रतीत्यसमुत्पाद. वर मथळ्यावर उद्धृत केलेलें वचन हें अनुलोम प्रतीत्यसमुत्पादाचें असून त्यांत दुःखाची उत्पत्ति कशी होते, हें सुसंगतपणें व समंजसपणें दाखविण्यांत आलें आहे. तेथें दुःखाची कार्यकारण-परंपरा दाखविली आहे ती अशीः– दुःखाला कारण मूळ अविद्या असें सांगून तिच्यापासून हा संसारवृक्ष अंकुरला असून, सर्व दुःखाची ती आद्य जननी आहे असें म्हटलें आहे. मात्र येथें हें सांगितलें पाहिजे की, अविद्येच्या पलीकडे काय आहे, हें बुद्ध सांगत नाहींत. याविषयीं त्यांनी गंभीर मौन धारण केले आहे !

या अविद्येच्या मागें काय आहे हें बुद्ध जरी सांगत नाहींत, तरी वैदिक ऋषी मात्र तिच्यामागें ब्रम्ह नांवाची एक अविनाशी अशी सद्वस्तु आहे, असें स्पष्ट व स्वच्छ सांगून टाकतात. 'आदित्यवर्णं तमसः परस्तात्'– अंधकाराच्या पलीकडे– म्हणजे अविद्येच्या पलीकडे–स्वयंप्रकाश असें ब्रम्ह आहे, असें श्वेताश्वतर उपनिषदांत म्हटलें आहे. ( श्वे. ३–८ ) 'तमसस्तु परंज्योतिः परमानंद लक्षणम्'– तमाच्या पलीकडे म्हणजे अविद्येच्या पलीकडे–परमानंदलक्षण अशी श्रेष्ठ ज्योति आहे. ( त्रि. म. न. ८ ) असें इतरत्र म्हटलें आहे. आणि 'तमसः परस्तात्' याचा अर्थ 'अविद्यायाः परतः' असा तेथें म्हणजे श्वेताश्वतर उपनिषद्भाष्यांत अर्थ करण्यांत आला असून, 'अविद्या वैतमः' असें श्रुतींत म्हटलें आहे. यावरून अविद्येच्यामागें स्वयंज्योति ब्रम्ह आहे, असें वैदिक धर्माचें स्पष्ट सांगणें आहे. आणि बुद्ध भगवंतानाहि पण हें सर्वस्वी अमान्य नाहीं, असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं. कारण *अविद्येच्यामागें–तिच्यापलीकडे–* त्रिकालाबाधित असें स्वयंभू निर्वाण आहे, असा त्यांचा स्पष्ट व स्वच्छ निर्वाळा आहे. याविषयी अधिक चर्चा पुढें करूं. असो.

'ब्रम्ह वा इदमग्र आसीत्' या वचनापासून जसा वैदिकांच्या तत्त्वज्ञानास प्रारंभ होतो, तद्वत् 'अविद्या वा इदमग्र आसीत्' या वाक्यापासून बौद्ध–तत्त्वज्ञानास म्हणजे प्रतीत्यसमुत्पादास सुरवात होते. बौद्ध–तत्त्वज्ञानाप्रमाणें मुळांत अविद्या असून, तिच्यापासून संस्काराची उत्पत्ति होते. पुढें संस्कारापासून विज्ञान, विज्ञानापासून नामरूप, नामरूपापासून षडिंद्रियें, षडिंद्रियांपासून स्पर्श, स्पर्शापासून वेदना, वेदनांपासून तृष्णा, तृष्णेपासून उपादान, उपादानापासून भव ( गर्भ ), भवापासून जन्म व जन्मापासून जरा, मरण, शोक, क्लेश, दुःख, उद्वेग व निराशा हीं सर्व उत्पन्न होतात. अर्थात् हा सर्व सृष्टिप्रपंच मूळ अविद्येपासून अंकुरून त्याची वाढ व विकास होत होत अखेर त्याचा शेवट दुःखांत होतो. जगांत दुःख कसें उत्पन्न होतें याची ही अशी कारणमीमांसा आहे.

अविद्याः– 'इदं खो पन भिक्खवे अरियसच्चं,' हें आर्यसत्य आहे हें प्रथम सांगून, त्या आर्यसत्याचें अज्ञान तीच अविद्या होय. आणि संसार दुःखाची आद्य जननीहि तीच आहे. आणि तें कसें हें प्रतीत्यसमुत्पादाच्या प्रथमारंभीच 'अविज्जापच्चया संखारा'– अविद्येपासून संस्कार–या वचनापासून सुरवात करून भगवान पुढें दुःखोत्पत्तीच्या कारण मीमांसेस–तत्त्वज्ञानप्रणालीस–विशद करूं पाहतात. अर्थात् हा जो संसारवृक्ष पालवला आहे, त्याच्या बुडाशीं या अविद्येचें पाणी खेळत असून, तेथें कर्माचें म्हणजे संस्काराचें बीज–रुजत घालण्यांत आलें आहे. अविद्या म्हणजे बुद्ध भगवंताच्या मतें वस्तुस्थितीचें अज्ञान, किंवा अयथार्थ ज्ञान, अथवा विपरीत ज्ञान. या सर्वांची गणना अविद्येंतच होतें.

जग हें अशाश्वत असतां त्यास शाश्वत समजणें, संसार हा दुःखमय असतां तो सुखमय मानणें, सर्व उत्पन्न झालेल्या वस्तु अनित्य असतां, त्या नित्य समजणें, यालाच अविद्या म्हणतात. अविद्येचा हा असा सर्वसामान्य अर्थ असला तरी विशुद्धिमग्गामध्यें त्याचें लक्षण सांगितले आहे तें असेंः–

'कतमो अविज्जा ? दुक्खे अञ्ञाणं....प....दुःखनिरोधगामिनिया पटिपदाय अञ्ञाणं पुब्बन्ते अञ्ञाणं अपरन्ते

अञ्ञाणं, पुब्बापरन्ते इदपच्चयता पटिच्चसमुप्पन्नेसु धम्मेसु अञ्ञाणं 'ति'। ( वि. म. १७–५८ व मज्झिमनिकाय ९ )

भावार्थः– भिक्षुहो, अविद्या कशाला म्हणतात व ती काय आहे ? ती म्हणजे ही. अज्ञान याला अविद्या म्हणतात. कशाविषयी अज्ञान, त्याचें स्पष्टीकरण आहे तें असें– दुःख व दुःखोत्पत्ति याविषयीं अज्ञान, त्या दुःखाचा निरोध व निरोधाचा मार्ग याविषयीं अज्ञान, गतकालीन गोष्टी विषयीं अज्ञान, भविष्यकालीन गोष्टीविषयीं अज्ञान, भूत व भविष्य या दोन्हीकालीन गोष्टीविषयीं अज्ञान, घडलेल्या गोष्टींच्या कार्यकारण भावाविषयीं अज्ञान. याला म्हणतात अविद्या. अर्थात् चार आर्य सत्या- विषयीं व कार्यकारण भावामुळें होणाऱ्या सृष्टि–धर्माविषयीं जें अज्ञान त्यालाच भगवान अविद्या असें म्हणतात.

आणि या अविद्येमुळेंच मनुष्य हा संसारांत पडून क्षणभंगुर सुखाच्या आमिषास भुलून, विषयामार्गें लागून दु.खाच्या डोहांत गटंकळचा खात असतो ! याचा अर्थ असा कीं मनुष्याच्या असंख्य, अपार व असह्य दुःख परंपरेस त्याचें अज्ञान–खऱ्या वस्तुस्थितीचें अज्ञान–चार आर्यसत्याचें अज्ञान–हेंच मुख्य कारण आहे. तें अज्ञान गेलें–नाहींसें केलें–म्हणजे मनुष्याचा संसार–जन्ममृत्यूचें भवचक्र–मग आपोआपच सुटतें. पण ती अविद्या तशी आपोआपच सुटेल, चुटकी सरशी सहज सुटेल–ही आशा मात्र व्यर्थ आहे. तशी ती सहज सुटणार नाहीं. सर्व मलांत–दोषांत–हा अविद्यामळ अत्यंत वाईट असून, तो काढून टाकणें हें मोठें प्रयासाचें काम आहे. भगवान धम्मपदांत हेंच सांगतात.

' मला वे पापका धम्मा । अस्मिं लोके परम्हि च ॥ ८ ॥
ततो मला मलतरं । अविज्जा परमं मलं । एतं मलं पहत्वान ।
निम्मला होथ भिक्खवो ॥ ९ ॥ ( ध. प. १८–८ व ९ )

पाप म्हणजे अकुशल विचार हा या लोकीचा व परलोकींचा म्हणजे उभय लोकींचा मळ आहे. त्यांच्यापेक्षांहि वाईट मळ म्हणजे ही अविद्या

होय. इतकेंच नव्हे, तर सर्व मळामध्यें ती अत्यंत वाईटांतील वाईट मळ आहे; म्हणून भिक्षूहो ! या अविद्या मलाचा सर्वस्वी त्याग करा ! आणि मोत्याप्रमाणें स्वच्छ व निर्मळ व्हा !!

याचें कारणहि अगदी उघडच आहे. या अविद्येमुळेंच प्राणी सगळे जन्ममृत्युरूपी संसारांत-दुःखमय प्रपंचांत-अडकून पडतात व पडले आहेत. आणि एका गतीपासून दुसऱ्या गतीस-एका जन्मातून दुसऱ्या जन्मास-सारखे प्राप्त होताहेत. त्याला खंड म्हणून नाहीं. आणि म्हणून ही अविद्या मोठी मायावी असून, अज्ञ लोकांवर तिची मोहिनी जबरदस्त पडलेली असते. तिच्या मोहजालांत अडकून बिचारे संसारांत पडतात व अखेर पस्तावतात. पण जे ज्ञानी आहेत-विद्यासंपन्न आहेत-ते मात्र अविद्येच्या मगरमिठींतून सुटून-संसारमुक्त होऊन-दुःखाच्या डोहांतून पार होऊन-शाश्वत सुखाच्या निर्वाणपदास जाऊन पोंचतात. अर्थात् सर्व दुःखाला व दुर्गतीला कारण ही अविद्याच आहे. हेंच दुसऱ्या तऱ्हेनें सांगायाचें म्हणजे सर्व दुःख हें अविद्यामूलकच आहे.

'या काचि' मा दुग्गतियो अस्सि लोके परम्हि च ।
अविज्जामूलका सब्बा इच्छा लोभ समुस्सया ॥ '

( इतिवुत्तक, २-२-३ )

भावार्थः- यालोकीं व परलोकीं जेवढ्या म्हणून दुर्गती आहेत, त्या सर्व अविद्यामूलक असून, इच्छा व लोभ यांच्या आश्रयानें राहतात. अशी ही अविद्या मोठी अनर्थकारी-मायावी राक्षसी-असून, ती सहजासहजी सुटण्यासारखी नाहीं.

ही अविद्येची मिठी सहज सुटण्याइतकी ढिली नाहीं. जवळ जवळ ती मगरमिठीच कां म्हणाना. तिच्या तावडींतून सुटण्यास तसे भगीरथ प्रयत्न करावे लागतात. तेव्हां कोठें तिचा निरास होतो. आणि तो मार्ग भगवंतानीं चौथ्या आर्यसत्यांत-म्हणजे अष्टांगिक मार्गांत-सविस्तर

सांगितला असून, त्याचा उहापोह मागें ४ थ्या प्रकरणांत करण्यांत आलाच आहे. आतां त्याचा येथें पुनरुच्चार करण्याचे कारण नाहीं.

तेव्हां येथें प्रस्तुत विषयास धरून सांगावयाचें तात्पर्य इतकेंच कीं *मूळ अविद्येमुळें प्रपंचाचा हा सगळा विश्वपसारा माजला असून, तो कसा* वाढत व विकसत गेला व जातो, हें व्याख्यान या अनुलोम पतीत्यासमुत्पादांत भगवंतांनी फार सुंदर रीतीनें गोवून दाखविलें आहे. येथें वाचकानीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट हो कीं बुद्ध भगवंतांच्या तत्त्वज्ञानास–दुःख परंपरेच्या कार्य कारण भावास–अविद्येपासून सुरवात होते. अविद्येच्या पलीकडे त्यांनी चक्क पडदा टाकला आहे. तेव्हां आम्हांस त्यापलीकडे-जाऊन पाहण्याचें येथें कारण नाहीं. असो.

संस्कार ( संखार ) – बुद्ध धर्मांत संसाराचा हा जो महावृक्ष वाढला आहे, त्याचें बीज अविद्येंत गर्भित आहे. या अविद्येपासून प्रथम संस्काराची ( संखाराचो ) उत्पत्ति होते. *पूर्वजन्मातील मनःप्रवृत्ति अगर मनोघटणा* याला संस्कार असें म्हणतात. संस्काराची उत्पत्ति कशी होते, हें भगवान स्वतः मज्झिमनिकायांत 'संखारोप्पत्ति' सुत्तांत सांगतात, तें असें:– 'भिक्षूहो ! तुम्हांला संस्कार-उत्पत्तीचा आतां उपदेश करीत आहे. तो नीट लक्ष देऊन ऐका व मनांत सांठवून ठेवा. येथें भिक्षु हा श्रद्धा, शील, विद्या, *त्याग व प्रज्ञा यांनी युक्त होत्साता, तो मनांत अशी इच्छा करतो कीं, मी* मेल्यावर क्षत्रिय कुळांत जन्मावें, अगर ब्राम्हण कुळीं जन्मावे, किंवा देवलोकीं जन्म घ्यावा. अशी इच्छा मनांत धारण करून, तिला चित्ताचें अधिष्ठान देतो व त्याची भावना करितो. त्याचा तो चित्तसंस्कार–मनोवृत्ति–पुढील जन्मास कारण होते. हा पुढील जन्माचा–पुनर्जन्माचा–मार्ग आहे.' ( म. नि. सुत्त १२० )

याचाच भावार्थ असा कीं पूर्वजन्मांतील वासना, इच्छा, मनःप्रवृत्ति, इलाच भगवान संखार असें म्हणतात. पुनर्जन्मास कारण होणारी पूर्व-*जन्मातील इच्छा, तिलाच संस्कार असें पारिभाषिक नांव आहे. बुद्धांनी ही* कल्पना वैदिक धर्मांतून उचललेली आहे. आधारच पाहिजे असल्यास

शतपथांतील योगीश्वर याज्ञवल्क्य प्रभूचें हें पुढील वचन पहा. मनुष्य मरतांना काय प्रकार घडतो, याचें पुढील वचनांत निरूपण आहे तें असें:— ' तमुत्क्रान्तं प्राणोऽनूत्क्रामति प्राणमनूत्क्रामन्तं सर्वे प्राणा अनूत्क्रामन्ति तं विद्याकर्मणी समन्वारभेते पूर्व प्रज्ञाच । ' ( श. प. १४-७-२३- )

भावार्थः— आत्मा निघून गेला म्हणजे त्याच्याबरोबर प्राणही जातो. प्राणाच्या मागोमाग सर्व इंद्रियेंहि बाहेर पडतात. त्या जीवात्म्याबरोबर विद्या म्हणजे ज्ञान, कर्म व पूर्व संकल्प उर्फ वासना म्हणजेच मन हींहि निघून जातात. ' या उताऱ्यावरून जीवाबरोबरच प्राण, इंद्रियें, ज्ञान, कर्म व वासना हींहि निघून जातात. म्हणजे कर्मप्रमाणें पुढील जन्माचे सोबती होतात. हा भावार्थ निष्पन्न होतो. याला लिंगदेह असें पारिभाषिक नांव आहे. हा जो लिंगदेह–सूक्ष्मदेह–आहे, तो शरीराबरोबर नाश पावत नाहीं. तर जोपर्यंत जीव हा अविद्यावश आहे, प्रकृतिवश आहे– तोपर्यंत तो लिंगदेह त्या जीवाला चिकटून असतो. व त्या लिंगदेहानुसार त्या जीवाला पुढील जन्म लाभतो. अशी ही वैदिक कल्पना आहे.

भगवान बुद्ध झाले तरी हाच भाव सांगतात. ते म्हणतात कीं श्रद्धा, शील, विद्या व प्रज्ञा यांनी मनुष्य युक्त होत्साता मरण पावतो व तत्कालीन मनोघटणेप्रमाणें–वासनेप्रमाणें–पुढील जन्म पावतो आणि वैदिकांच्या लिंगदेहांतहि बुद्धोक्त विद्या, कर्म व प्रज्ञा हेच शब्द अक्षरशः अंतर्भूत झाले आहेत. ' तं विद्याकर्मणी समन्वारभेते पूर्वप्रज्ञा च ' हें शतपथोक्त श्रुतिवचन उपरोक्त बुद्धवचनास तंतोतंत जुळत आहे, हें वाचकांस स्वच्छ कळून येण्यासारखें आहे. या सर्वांना म्हणजे विद्या, कर्म, श्रद्धा, शील, प्रज्ञा यांना एकत्र मिळवून त्यांच्या मिश्रणाला संस्कार शब्द लावण्यांत आला आहे. हेंच थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे वैदिकांचा वासनायुक्त जो कर्मविपाक तोच बुद्धांचा संसार. फक्त शब्दांतच तेवढा फरक, अर्थात व भावांत मुळींच नाहीं.

कोठें कोठें व केव्हां केव्हां संस्कार याचा अर्थ कर्म असाहि करण्यांत येतो. व तो एका अर्थी युक्तहि आहे. येथें कर्म म्हणजे वासना,

तदनुरूप कृति व तदनुसार फळ—म्हणजे वासना, कृति व फळ—या तीहींना मिळून कर्म असें व्यापक नांव आहे. वैदिकांचा अर्थही तोच आहे वासनात्मक कर्म हें व्यक्तीबरोबर नाश न पावतां, फलभोगापर्यंत तें जीवंत राहतें. कर्म तसें फळ अगर कर्म तसा भोग, या उक्तीवरून कर्माचें आयुष्य फळ भोगापर्यंत कायम असतें. व मनुष्य मधेंच मेला तर त्या कर्माप्रमाणें फल भोगण्यासाठीं त्यास पुनर्जन्म घ्यावा लागतो. हा झाला वैदिकांचा कर्म सिद्धांत.

आतां बौद्धधर्माचा पाहूं. तो झाला तरी वरील वैदिकाप्रमाणें आहे. फल भोगल्याशिवाय कर्माचा नाश होत नाहीं. ' न नस्सति कस्सचि कम्म '— कोणाचेंहि कर्म फळ भोगल्याशिवाय नाश पावत नाहीं—असा बौद्धांचाहि सिद्धांत आहे. ' *यथा यथाऽयं पुरिसो कम्मं करोति, तथा तथा पटिसंवेदिस्सति* '— म्हणजे मनुष्य ज्या ज्या प्रमाणें कर्म करतो, त्या त्या प्रमाणें फल अनुभवितो-असा त्याचा भावार्थ आहे. कर्माची पूर्ति फलभोगात आहे आणि हा फल—भोग त्याच जन्मांत लाभेल असा कांहीं भरंवसा नाहीं. कारण मरणाचें विघ्न मधें आले तर फलभोगार्थ नवीन जन्म—पुनर्जन्म— हा घेतलाच पाहिजे. सर्व कर्मांचा फल भोगून अंत झाला अगर ज्ञानाग्नीने त्याचा जळून नाश झाला, तरच निर्वाण—प्राप्ति. एरवी नाहीं. जो पर्यंत हें कर्मचक्र फिरत आहे, तो पर्यंत निर्वाणाचें नांवहि घ्यावयास नको! कर्म—भोगासाठींच पुनर्जन्माचा अवतार आहे हें येथें उघड सांगण्याचें कारण नाहीं. यावरून संस्कार म्हणजे पूर्वजन्मार्जित कर्म उर्फ मनोघटणा ही गोष्ट स्पष्ट होते.

बौद्ध धर्मांत संस्काराचें दोन प्रकार सांगितले आहेत. एक प्रतीत्य समुत्पादांतील संस्कार व दुसरा पंचस्कंधांतील संस्कार. प्रतीत्यसमुत्पादातील संस्कार हा पूर्वजन्मांतला कर्मविपाक आहे. तो अविद्येचा परिणाम असून, विज्ञाचें कारण आहे. व पंचस्कंधांतला संस्कार हा प्रस्तुत जन्मातील शरीराशीं संबद्ध आहे. त्याचा अर्थ इंद्रिय स्पर्शज्ञान उर्फ सुखदुःखाचा ठसा असा होतो. सुखदुःखाची जाणीव वेदनांपासून होते आणि ती क्षणभंगुर म्हणजे नश्वर आहे. मरणोत्तर त्या वेदनांचा म्हणजे स्कंधात्मक संस्काराचा नाश

होतो. पण प्रतीत्यसमुत्पादातील संस्काराची गोष्ट निराळी आहे. अविद्येचा नाश होऊन निर्वाण मिळेपर्यंत हा संस्कार कायम असतो. तो मरणोत्तर नाश पावत नाही. पंचस्कंधांतील संस्कार म्हणजे इंद्रिय विज्ञान हें मरणाबरोबर नाश पावतें. म्हणजे तें अनित्य आहे. नश्वर आहे. अध्रुव आहे. 'सब्बे संखारा अनिच्चा,' 'सब्बे संखारा अद्धुवा,' 'सब्बे संखारा दुःखा' असें जें धम्मपदांत म्हटले आहे, तें या पंचस्कंधातील संस्काराला उद्देशूनच. प्रतीत्यसमुत्पादातील संस्कार हे कायिक, वाचिक व मानसिक असे तीन प्रकारचे असून ते जन्मजन्मांतरींचे सोबती आहेत. आर्यसत्याचें ज्ञान झालें म्हणजे त्यांची इतिश्री होते. पंचस्कंधातील संस्कार हे फक्त बाह्य जगाचे मनावर उमटणाऱ्या ठशाचे द्योतक आहेत. असो.

सारांश संस्कार या शद्वाचे प्रसंगाप्रसंगानें अनेक अर्थ होऊं शकतात उदाहरणार्थ संस्कार याचा अर्थ कारणापासून उत्पन्न झालेले पदार्थ अगर वस्तू. तसेंच विविध वस्तूंचें मिश्रण, वासना, कृत, भव, गति, कर्म, भावना, मानसिक क्रिया, चेतना, जग व जगांतील यच्चयावत् पदार्थ, असे अनेक अर्थ विषयानुसार करण्यांत आले आहेत. याज्ञवल्क्यांनी जनक सभेंत अश्वमेध करणारे जनमेजय पारिक्षित कोठें गेले, असा प्रश्न त्यांच्या प्रतिपक्ष्यानें त्यांस विचारला असतां 'कर्म हैव तत्' कर्माप्रमाणे आपल्या कर्म लोकीं गेले, असें उत्तर दिलें आहे. याचा अर्थ असा की कर्माप्रमाणें पुनर्जन्म लाभतो. बौद्ध धर्मांतहि 'पुनब्भवजनकं कम्म' असें चक्क म्हटलें आहे. सामान्यतः वर म्हटल्याप्रमाणे संखार म्हणजे कर्म हाच मुख्यार्थ आहे आणि तो याज्ञवल्क्यांच्या उत्तराला अनुसरून आहे. असो. वरील सर्व अर्थांचा उहापोह येथें करून ग्रंथ वाढवूं इच्छित नाहीं. बुद्ध भगवंतांचा अर्थ म्हणजे पूर्व जन्मार्जित ज्ञान, कर्म, वासनाघटित मन उर्फ प्रकृति. हाच संस्काराचा खरा व मुख्यार्थ आहे, इतकें लक्षांत ठेविलें म्हणजे बुद्धोक्त संस्काराची वास्तव कल्पना येण्यास मदत होते. एवढें सांगून आतां पुढील मार्गाकडे वळतो.

---

विज्ञान (विञ्ञाणं, विजानाती ति विञ्ञाणं, वि. म. १७४८ ) :- पुढें जावयाच्या आधीं प्रथम एक सूचना आम्हांस करावीशी वाटते कीं बुद्धधर्माचें रहस्य समजावयाला अगोदर वैदिक धर्माची-विशेषतः उपनिषद् ज्ञानाची- पूर्ण माहिती असली पाहिजे. ज्यांना वैदिक धर्म व तत्त्वज्ञान यांचें सूक्ष्म, व पूर्णज्ञान झालें आहे, त्यांनाच बुद्धधर्माचें खरें हृद्गत, रहस्य व मर्म यांची वास्तव ओळख पटण्यास अडचण भासणार नाहीं. कारण बुद्ध-धर्म हा वैदिक धर्माचेंच अपत्य-बंडखोर अपत्य म्हणा पाहिजे तर-असून, तोंडवळा जरा निराळा दिसला तरी त्याची प्रकृति व कुलगोत्र हें कांही निराळें म्हणता येत नाहीं. बुद्धधर्माचे विचार, आचरणी, मांडणी व शब्दसृष्टि ही सगळी वैदिक ठशाचीच असून, वैदिक धर्माशीच त्याचें अधिक नातें व साम्य आहे. याचें कारण असें कीं बुद्धभगवंतांना त्या धर्मातील तत्त्वज्ञानाचे पूर्ण व सखोल आकलन झालेलें होतें. आणि वेदग्रंथावर त्यांची श्रद्धा व भक्ति नांव घेण्यासारखी होती. आणि म्हणून प्रस्तुत ग्रंथांत आम्ही वैदिक व बुद्ध तत्त्वज्ञानाचा तौलनिक दृष्टीनें क्रमशः व प्रकरणशः परामर्श घेण्याचें योजिलें आहे. त्यावरून बुद्ध-धर्माचें खरें रहस्य व साम्यविरोध वाचकांस समजण्यास व पटण्यास सोयीचें होईल.

उदाहरणार्थ प्रस्तुत विषयच घेऊं. बुद्धभगवंताचें हें विज्ञान म्हणजे दुसरें तिसरें कांही नसून, साक्षात् वैदिकांचा जीवात्माच होय ! कसें हें या पुढील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईल. वर संस्कार म्हणजे कर्म-अनुपभुक्त कर्म-पूर्वजन्माची विशिष्ट मनोघटणा-असा उलगडा करण्यांत आला असून, त्याचाच पुढचा भाग येथें हाताळण्यांत येत आहे. बुद्ध-धर्मांत कर्म हें मरणाबरोबरच नाश पावत नाहीं. तें मरणोत्तरहि जिवंत असतें. त्याचा फलभोग झाल्याशिवाय, त्याचा अंत होत नाहीं. जें नाश पावतें, तें फक्त पंचस्कंधात्मक शरीर होय. याची उत्पत्ति विज्ञानानंतरची असून, विज्ञान हें त्याहून भिन्न आहे. वैदिक धर्माप्रमाणें शरीर मरतें. जीव मरत नाहीं. ( 'जीवापेतं वाव किलेदं म्रियते, न जीवो म्रियते' छां ६-११-३ ) जीव म्हणजे अविद्या वश चिदंश. याला वैदिक धर्मांत जीवात्मा असें नांव

आहे. आणि बुद्ध-भगवान यालाच विज्ञान असें म्हणतात. कारण तेंहि अविद्यावशच आहे ! फक्त शब्दांत फरक, तत्त्वांत नाहीं.

आतां पुढें एक पाऊल टाकून वैदिक धर्मांत विज्ञानाचें स्वरूप काय आहे, हें थोडक्यांत तेथें डोकावून पाहूं. वैदिकांच्या तत्त्वज्ञानांत विज्ञान हें ब्रम्हच आहे ! ' विज्ञानं ब्रम्ह ' असें तैत्तिरीय उपनिषदांत (तै. उ.२-५) स्पष्ट म्हटलें असून, प्रश्नोपनिषदांत त्याला आत्मा-' विज्ञानात्मा '- असें संबोधिलें आहे. ब्रम्हाचें अगर आत्म्याचें स्वरूप ' सत्यं विज्ञान मनन्तं ब्रम्ह ( शांडिल्य २१२)-सत्य, विज्ञान, व अनंत-असें सांगण्यांत आलें असून, जीवात्म्याचें वर्णन शतपथांत सविस्तर सांगण्यांत आलें आहे तें असें :-

> ' स वा अयमात्मा ब्रम्ह, विज्ञानमयो, मनोमयः, प्राणमयश्च-क्षुर्मयः श्रोत्रमयः पृथ्वीमयः, आपोमयो, वायुमय, आकाश-मयस्तेजोमयोऽतेजोमयः, काममयोऽकाममयः, क्रोधमयोऽ-क्रोधमयो, धर्ममयोऽधर्ममयः, सर्वमयस्तद्यदेतदिदंमयोऽ-दोमय इति ' ( श. प. १४-७-२-६ ).

भावार्थः- तो हा आत्मा (जीवात्मा) ब्रम्ह आहे, विज्ञानमय आहे, मनोमय आहे, वाङमय, प्राणमय, चक्षुर्मय, श्रोत्रमय, आकाशमय, वायुमय, तेजोमय, आपोमय, पृथ्वीमय, क्रोधमय, अक्रोधमय, हर्षमय, अहर्षमय, धर्ममय, अधर्ममय सर्वमय असून, शिवाय तो प्रत्यक्षमय व अपरोक्षमय असा आहे. हें जीवात्म्याचें स्वरूप किती व्यापक आहे, विश्वंभर आहे, हें निराळें न सांगता वरील वचनावरून तें स्पष्ट व स्वच्छ प्रतीत होतें. अर्थात जीवात्मा हा पंचमहाभूतात्मक शरीर, पंचेंद्रियें, मन व बुद्धि यांचा बनला असून तोच हें सर्व जग प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष सर्वत्र व्यापून आहे. त्यांत प्रथमच त्याची गणना विज्ञानमयांत करण्यांत आली असून पुढें उतरत उतरत बुद्धि मन, इंद्रियें, पंचमहाभूतें यांत तो प्रविष्ट झाला आहे. विज्ञानानंतर बुद्धाच्या तत्त्वज्ञानांत मन, इंद्रियें व महाभूतें यांचा क्रमशः नंबर लागला असून, वैदिक धर्मांत आत्मा हा प्रथम विज्ञानदेहांतच प्रगट होतो. म्हणून त्याला

विज्ञानात्मा असें संबोधिलें आहे. देहाचे एकंदर पाच कोश असून, त्यांची नांवे अनुक्रमें आनंदमय, विज्ञानमय, मनोमय, प्राणमय व अन्नमय अशीं आहेत. त्यांत विज्ञानमय हा कोश जीवात्म्याला आत्मज्ञान होईपर्यंत जन्मोजन्मीं चिकटून असतो. आत्मज्ञान झालें कीं तो गळून जीव शेवटी आनंदमयकोशांत जातो. व पुढें तेथून ब्रम्हरूप होतो आणि ब्रम्हांतच विलीन होतो. अर्थात तोच मोक्ष आणि बुद्धाचें सांगणें झालें तरी तंतोतंत हेंच आहे.आर्यसत्याचें ज्ञान झालें म्हणजे अविद्येची पकड सुटून,पुढें निर्वाण प्राप्ति होते. म्हणजे मनुष्य जन्ममुक्त, दुःखमुक्त होतो. मग आतां वैदिक व बुद्धधर्मांत विसंगति अशी राहिली कोठें ?

आतां बुद्धाचें विज्ञान हें भगवंताच्या मतें काय चीज आहे, या प्रश्नाकडे जरासें वळू. प्रथम येथें हें सांगितलें पाहिजे कीं, बुद्ध हे वैदिकांच्या आत्म्याविषयीं अत्यंत मौनव्रत धारण करीत असले, तरी त्याचा अर्थ असा नव्हे कीं त्यांना वैदिकांचा आत्मा मुळींच मान्य नव्हता. आत्मा नाहीं, असें त्यांनीं कोठेंच स्पष्ट म्हटलें नाहीं. तसा ज्याचा समज झाला असेल, तो अगदी भ्रामक आहे. तो उथळ असून, निराधार आहे. फक्त इतकेंच कीं, या आत्मवस्तु विषयीं त्यांनी गंभीर मौन स्वीकारलें आहे. ‘ आत्मा नाहीं ’ असें त्यांनीं उघड कोठेंच बोलून दाखविलें नाही ! याविषयीं पुढें ‘ आत्मानात्म ’ विचारांत अधिक खोल व अधिक विस्तृतपणें निरूपण करण्यांत येईल. अतएव या आत्म्याचा प्रश्न येथें न काढतां त्याला बाजूला ठेवूनच प्रस्तुत विषयाची चर्चा आम्ही करूं इच्छितो.

शिवाय येथें आणखी एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. ती ही की वैदिकाप्रमाणेंच बुद्धांनाहि पूर्वजन्म-पुनर्जन्म, सर्वस्वी मान्य होता. त्यांच्या तोंडच्याच शब्दांत हें सांगावयाचें झालें, तर आम्हांस संबोधीकडे वळलें पाहिजे. त्यांना अश्वत्थवृक्षाखालीं संबोधीच्यावेळीं रात्रीच्या प्रथम यामांत जें ज्ञान झालें, तें त्यांच्या पूर्वजन्माचेंच होतें. यावरून त्यांना पूर्वजन्म मान्य होता, हें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें. आणि त्याच वेळीं, त्याच भरांत अखेर जे उद्गार निघाले, त्यांत ‘ मला आतां पुनर्जन्म नाहीं. ’—

'नत्थि दानि पुनब्भवो '- हें महावाक्य त्यांच्याच वाणीतून प्रगट झालें ! यावरून निष्कर्ष निघतो, तो असा कीं, संबोधिरहित- म्हणजे सत्यज्ञान-रहित- अशा अज्ञानी पुरुषाला मरणोत्तर पुनर्जन्म आहे. अविद्या नाशा-नंतर- म्हणजे ज्ञानोत्तर- त्याला निर्वाणाचा दरवाजा उघडला जातो. म्हणजे त्याला पुनर्जन्म नाहीं.

हा जो संसार-जन्ममरणाचें भवचक्र-हें अनादि आहे. म्हणजे तें केव्हां व कसें प्रारंभ झालें, हें समजणें व सांगणें हें मानवी विचारशक्तीला शक्य नाहीं, असें भगवंतांनी स्पष्ट व चकचकीत बोलून दाखविलें आहे. यावरून संसाराचा प्रारंभ केव्हां व कसा झाला-जगाची उत्पत्ति केव्हां व कशी झाली, हें त्यांना सांगता आलें नाही. त्या प्रश्नांत ते खोल शिरले नाहींत. तें मनुष्याला समजणें शक्य नाही असें ते म्हणाले, तरी 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' हें तत्त्व मात्र त्यांस पूर्ण मान्य होतें, याविषयीं वाद नाहीं. पूर्वजन्म व पुनर्जन्म हें गृहीत धरूनच त्यांनी आपल्या धर्माची आखणी व उभारणी केली आहे. पुनर्जन्म कसा लाभतो हें त्यांनी स्वच्छ-सांगितलें असून, त्याला कारण अविद्याजनित कर्म-संस्कार-असा निर्वाळा दिला आहे. पूर्वजन्मीच्या कर्माप्रमाणें, वासनेप्रमाणें, पुनर्जन्म लाभतो. आणि तो मनुष्याच्या कुशलाकुशल कर्मांवर-संस्कारावर-अवलंबून असतो. 'पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन' ही याज्ञवल्क्योक्ति त्यांना पूर्ण मान्य आहे. पूर्वजन्मीच्या कर्मालाच संस्कार ( संखार ) हें नांव आहे.

मनुष्य कर्म कां करतो यांचें उत्तर सुख या शब्दांत आहे. मनुष्य हा स्वभावतः सुखप्रिय व सुखलोभी प्राणी आहे. 'सुखाय कर्माणि करोति लोकः' हें सुभाषित प्रसिद्धच आहे. मनुष्याची सर्व धडपड सुखासाठींच आहे व असते. पण तें सहजासहजीं कोणाला प्राप्त होत नाही. त्याला कर्माची-प्रयत्नाची-अपेक्षा आहे. त्याचा जन्म होतो, तो अविद्या स्थितींत होतो. त्याला वस्तुस्थितीचें खरें व यथार्थ ज्ञान नसल्यामुळें विश्वाच्या मायावी पसाऱ्याकडे-प्रदर्शनाकडे-पाहून, तेथील प्रिय वस्तूंत सुख आहे असा समज करून घेऊन, तत्प्राप्त्यर्थ तो कर्म करण्याच्या भरीस पडतो.

अविद्येच्या तंद्रीत त्याला हें कर्म सहसा सुटत नाहीं व सोडवत नाहीं आणि कर्माचा प्रभाव असा आहे की, त्याचा फलभोग घेतल्याशिवाय मनुष्याची त्यांतून सुटका नाहीं. तें कर्म तसेंच नाश पावत नाहीं 'न नस्सति कस्सचि कम्मं' (सु. नि. ३६-१०) असें सुत्तनिपातांत चक्क सांगितलें आहे. आणि जोपर्यंत हें कर्म सुटत नाहीं, तोपर्यंत त्याचा फलभोगहि चुकत नाहीं. वासना-कर्म-भोग या त्रयीला मिळूनच कर्म हें नांव आहे.

या तीनहि गोष्टी-वासना, कर्म व भोग-एकाच जन्मांत घडून येतील, असा कांही भरंवसा नाहीं. आणि अविद्येच्या राज्यांत वासनेला म्हणजे तृष्णेला-अंत नाहीं. ती अनंत आहे. तिचा एकदा उगम झाला कीं, फलभोगापर्यंत ती गेलीच पाहिजे. एक वासना भोगून संपली कीं, तिचा अंत होतो हें खरें. पण लागोपाठ तिच्या जागीं दुसरी दत्त म्हणून उभी राहते ! ती संपली की पुनः तिसरी हजरच ! असा हा तृष्णाप्रवाह-कर्मचक्र - सारखें चालू राहतें. ही वासना उर्फ तृष्णा अज्ञानस्थितींत अमर आहे. मनुष्य मेला तरी ती कांहीं त्याच्या बरोबरच मरत नाहीं, मरणोत्तरहि ती जीवंत राहते. मनुष्य मेला म्हणजे त्याचा सगळा ग्रंथ आटपला-सगळा कारभार विलयास गेला-मागें काहींच रहात नाहीं, हें तत्त्व वैदिकांस काय व बुद्ध भगवानास काय दोघांसहि सारखेंच अमान्य आहे. 'भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः' या कट्टया नास्तिक मताचे ते कट्टे विरोधक आहेत. मनुष्य मेल्यावर मागें त्याचें काहींतरी शिल्लक राहतें, या आस्तिक मताचे ते आहेत.

तेव्हां आतां मनुष्याचें मरणोत्तर काय शिल्लक राहतें, हें सांगणें व पाहणें आतां क्रमप्राप्तच झालें. म्हणून त्याचा प्रथम उलगडा करून मग बुद्धाचें सांगतो. मरणोत्तर मनुष्याचें काय शिल्लक राहतें, याविषयीं याज्ञवल्क्य शतपथांत सांगतात तें असें:-

> 'तमुत्क्रान्तं प्राणोऽनूत्क्रामति प्राणमनूत्क्रामन्तं सर्वेप्राणा अनूत्क्रामन्ति संज्ञानमेवान्ववक्रामति स एप ज्ञः सविज्ञानो भवति तं विद्याकर्मणी समन्वारभेते पूर्वप्रज्ञाच ॥
>
> (श. प. १४-७-२-२)

भावार्थ– आत्मा हा शरीरांतून निघून गेला म्हणजे त्याच्या मागोमाग प्राणहि जातो. प्राणाच्या मागोमाग सर्व इंद्रियेंहि बाहेर पडतात. हा आत्मा विशेष ज्ञानयुक्त होत्साता बाहेर पडतो. तो विशेष ज्ञानयुक्त असतो. विद्या, कर्म व वासना हींहि त्याच्या मागोमागच जातात. या वचनावरून असें सिद्ध होतें कीं, मनुष्य हा मेल्यावर जीवात्मा शरीराबरोबर नाश न पावतां मागें स्वतंत्र राहत असून, त्याच्या बरोबर जिवंतपणी मिळविलेला ज्ञानसंग्रह, केलेलें कर्म व अतृप्त राहिलेली वासना हींहि निघून जातात. हा वैदिकांचा लिंगदेह होय. यांत पूर्वप्रज्ञा, कर्म व वासना यांची बौद्धधर्मांत संस्कारांत ( संखारांत ) गणना करण्यांत आली असून, स्थूल देहरहित जीवात्म्याला विज्ञानांत घालण्यांत आलें आहे. वरील शतपथवचनांत बुद्धांचा समुत्पादातील संस्कार व विज्ञान या दोहोंचाहि समावेश करण्यांत आला असून, बुद्धांनी त्याचे दोन भाग पाडले आहेत, इतकाच त्यांत फरक आहे.

यावरून हें उघड आहे कीं मनुष्य मेला तरी त्याचे संस्कार म्हणजे कर्म व वासना हीं नष्ट होत नाहींत. मरणोत्तर तीं सूक्ष्मरूपानें रहात असून, जीवात्म्याला चिकटून असतात. हाच भावार्थ जनकसभेंत ' मनुष्य मेल्यावर कोठें राहतो ?' या जारत्कारव आर्तभागाच्या प्रश्नाला याज्ञवाल्क्यांनी ' कर्म हैव तत् '– त्याची गति म्हणजे त्याचे तें कर्म होय– असें उत्तर दिलें आहे. आतां एवढें म्हणण्यास जागा झाली कीं विद्या, कर्म व वासना हीं जीवात्म्याबरोबरच चिकटून रहात असून देहाबरोबर तीं नाश पावत नाहींत. यालाच वैदिकधर्मात लिंगदेह असें म्हटले आहे.

आता यावर बुद्धाचें काय सांगणें आहे, याचा जरा कानोसा घेऊन पांहू. त्याच्या आधीं हें सांगितले पाहिजे कीं हा जो पुनर्जन्म लाभतो, तो प्रस्तुत जन्मीं केलेल्या बऱ्यावाईट कर्मांचा जो फलभोग घ्यावयाचा असतो त्याला अनुरूप पुढें जन्मणाऱ्या प्राण्याची मनोघटणा व बुद्धीची ठेवण बनते. यालाच बुद्ध संस्कार (संखार)–कर्मविपाक– असें म्हणतात. या संस्कारानुरूप पुढील जन्मी जीवात्म्याची जी मानसिक ठेवणे बनते, तेंच विज्ञान होय.

पुनः पुनः जन्मणारें तें हें विज्ञानच. वैदिक भाषेंत याला चिन्मय-कोश म्हणतात. मरण कालीं वासनायुक्त जें चित्, त्याला बुद्धधर्मांत 'पटिसंधि विञ्ञाणं'– हें नांव असून, जन्मोजन्मी तेंच पुनः पुनः जन्म पावतें. यालाच 'नंदि' अगर 'गंधर्व' अशीं दुसरीं नावें आहेत. हा जो गंधर्व तोच वैदिकांचा लिंगदेह असून, पुनर्जन्मास कारण होणारें जें कर्म तें फलोन्मुख झालें म्हणजे तो गंधर्वच विज्ञानरूपानें मातेच्या गर्भांत प्रवेश करून पंचस्कंधात्मक देह धारण करून जन्म पावतो. येथें विज्ञान म्हणजे जीव. आम्ही वैदिक ज्याला जीव म्हणतों त्याला बुद्ध विज्ञान म्हणतात.

याला भगवान दृष्टान्त देतात, तो मननीय आहे. ते आनंदाला मनुष्य कसा जन्मतो, हें पुढील वाक्यांत स्पष्ट करून सांगतात तें असें:–

'विञ्ञाणं' व हि आनंद मातु कुच्छिं न ओक्क-मिस्सय अपि नु खो नामरूपं मातु-कुच्छिस्मि समुच्छिस्सथा' ति ? नो हे 'तं भन्ते।' ( दि. नि. १५–२१ )

भावार्थ:– आनंदा, मातेच्या कुक्षींत विज्ञान प्रविष्ट झालें नाहीं, तर तेथें नामरूपात्मक शरीर निर्माण होईल काय ? त्याला आनंद उत्तरला– नाहीं भगवान !' यावरून हें उघड आहे कीं विज्ञान म्हणजे जीवात्मा हा होय. याला पुष्टि देणारें वचन मज्झिमनिकायांत आढळतें, तेंहि पाहण्या-सारखें आहे. तें वचन हें:– 'भिक्षूहो ! तीन एकत्र झाल्यानें गर्भधारणा होते. माता व पिता एकत्र येतात. माता ऋतुमती असते. व गंधर्व तेथें उपस्थित होतो. याप्रमाणें या तीघांचेंहि एकत्रित होण्याने गर्भधारणा होते. त्या गर्भाला माता ही नऊ महिने पर्यंत गर्भांत धारण करते. नंतर दहाव्या महिन्यांत त्याला जन्म देते' ( म. नि. महातण्हा - संखय सुत्त ३८–१३) येथें गंधर्व असें ज्याला उद्देशून म्हटलें आहे, तोच विज्ञानात्मा होय. हा गंधर्व बुद्ध मायादेवीच्या उदरीं जन्मावयाच्या आधीं बोधिसत्व स्थितींत असतां तुसित नांवाच्या देवलोकांत वास करून होता. ( हा वैदिकांचा लिंग देहात्मा होय. ) या सर्व विवेचनावरून विज्ञान ( विञ्ञाण ) म्हणजे

वैदिकांचा विज्ञानात्मा होय. याविषयीं आतां सूज्ञ मनुष्याच्या अंतःकरणांत संशयास जागा रहात नाहीं. म्हणून 'सङ्खारपच्चया विञ्ञाणं' असें वर समुत्पादांत सांगण्यांत आलें आहे.

नामरूप:- येथपर्यंत प्रतीत्यसमुत्पादाच्या तीन मुख्य अंगांचा-म्हणजे अविद्या, संस्कार व विज्ञान, या त्रयींचा-विचार करण्यांत आला. आतां चौथें अंग जें नामरूप त्याचा विचार कर्तव्य आहे. हें जें नामरूप-म्हणजे पंचस्कंधात्मक शरीर-तें विज्ञानापासून-पटिसंधिचित्तापासून-जन्मतें. येथें नाम म्हणजे मन व रूप म्हणजे पार्थिव देह. या दोहोंला मिळून नामरूप ही संज्ञा देण्यांत आली आहे. मनामध्यें वेदना, संज्ञा, चेतना, स्पर्श, तृष्णा या पांचाचा समावेश होतो. 'वेदना, सञ्ञा, चेतना, फस्सो मनसिकारो इदंवुच्चति नामम्' असें अभिधम्मांत म्हटलें आहे. (२-१-८)

आतां रूप कशाला म्हणतात हें सांगतो. बुद्ध धर्मांत तेज, वायु, आप व पृथ्वी या चार महाभूतांना उद्देशून रूप असें म्हटलें आहे. 'कतमंच भिक्खवे रूपं ? चत्तारो च महाभूता चतुन्नं च महाभूतानं उपादाय रूपं, इदं वुच्चति भिक्खवे रूपं' अशी रूप शब्दाची व्याख्या करण्यांत आली आहे. (अभिधम्म, २-१-८)

भावार्थः- तेज, वायु, आप व पृथ्वी हीं चार महाभूतें व त्या चार महाभूतांचें मिश्रण यांपासून रूप बनलें आहे. प्राण्याचें हें शरीर महाभूतांच्या मिश्रणापासून-म्हणजे रक्त, मांस, त्वचा, हाडें इत्यादि घटक द्रव्यांपासून-बनलेलें आहे. तेव्हा मनुष्य हा जडदेह, सूक्ष्ममन व विज्ञान या त्रयींचा मिळून झालेला आहे. हेच वैदिकांचे अन्नमय, मनोमय व विज्ञानमय कोश होत.

येथें विशेष सांगावयाचें हें की बुद्ध हे चारच महाभूतें मानतात. म्हणजे तेज, वायु, आप व पृथ्वी हीं चारच महाभूतें त्यांना मान्य आहेत. आकाश हें महाभूत त्यांना मान्य नाहीं. व तीं कशीं झालीं व केव्हां झालीं याचाहि खुलासा ते करीत नाहींत. पण त्याचें स्पष्टीकरण वैदिक धर्मांत आढळतें तें असें:-

'आत्मा या इदमग्र आसीत्' हें प्रथम सांगून 'तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः सम्भूतः। आकाद्वायुः। वायोरग्निः। अग्नेरापः। अद्भ्यः पृथिवी॥' (तै. उ. २-१)

असा पंच महाभूतांच्या उत्पत्तीचा क्रम सांगण्यांत आला आहे. आकाश तत्त्व हें महाभूतांपैकी आद्यतत्त्व आहे, हें आधुनिक विज्ञान शास्त्रज्ञांनाहि मान्य आहे. आणि बुद्ध तें कोठेंहि इनकार करीत नाहींत पण त्यांच्या मतें फक्त चारच महाभूतें असून तीं इंद्रियगम्य आहेत आणि त्यांच्या मिश्रणानें शरीराचीं घटक द्रव्यें बनलीं आहेत.

भगवान बुद्धांनी जगाचें प्रगट स्वरूप नामरूपांनी अभिव्यक्त झालें आहे, असें सांगितलें आहे आणि याज्ञवल्क्यहि तसेंच सांगताहेत. 'नामरूप' हा शब्द जसा बुद्धधर्मांत आढळतो, तसाच तो वैदिक धर्मांतहि आढळतो· तें वचन शतपथांत पुढीलप्रमाणें आहे.

'तद्धेदं तर्ह्यव्या-कृतमासीत्। तन्नामरूपाभ्यामेव व्याक्रियते ऽ सौनामा यमिदं रूप इति॥' (श. प. १४-४-२-१५)

भावार्थः– तें हें जगत् त्याकाळीं अव्याकृत म्हणजे अव्यक्त स्वरूपांत बीजरूपानें होतें. पुढें आत्मा स्वतःच 'याचें अमुक नांव व अमुक रूप अशा प्रकारें नाम व रूप यांनी जगत् व्याकृत म्हणजे अभिव्यक्त करता झाला. जगत् हें परमात्म्याचें व्याकृत रूप असून, जीव हा सूक्ष्म रूप आहे. नाम हें पदार्थ ओळखण्याकरतां व रूप हे पदार्थाच्या आकृति बद्दल योजण्यांत आलें आहे. अविद्या, संस्कार व विज्ञान हीं सूक्ष्म रूपांत असून, पुढील जगत् हें स्थूल रूपांत दृश्य सृष्टींतलें आहे.

बुद्धाच्या मतें मनुष्य हा पंच स्कंधाचा मिळून झालेला आहे. रूपउपादानस्कंध, वेदना–उपादानस्कंध, संज्ञा–उपादानस्कंध, संस्कार–उपादानस्कंध व विज्ञान–उपादानस्कंध असे हे पांच उपादानस्कंध असून, त्यांच्या एकत्री

करणानें मनुष्य देहाची उत्पत्ति होते. सारांश प्रतीत्यसमुत्पादातील विज्ञान व चोवीस तत्वांचा जड देह आणि सूक्ष्म मन या त्रयींचा संघात म्हणजेच मनुष्य, पैकीं या तीन्हींत विज्ञान मात्र मागें राहतें. आणि हेंच मरणोत्तर व पुढील जन्म यावयाच्या आधीं पटिसंधि रूपानें राहून पुढील जन्मांत पुनः विभंग होऊन प्रगट होतें. नामरूप मात्र नाश पावतें. विज्ञान मात्र नाश पावत नाहीं. अविद्या असेतोपर्यंत तेंहि विद्यमान असतें. सुख-दुःख भोगणारें व स्वर्ग-नरक यांत प्रवेश करणारें तें हें विज्ञानच. असो. नामरूपाची ही अशी कथा आहे. अतएव 'विञ्ञाणपच्चया नामरूपं' हा सिद्धांत घोषित करण्यांत आला. ही विचारसरणी जवळ जवळ विकास वादासारखी आहे.

षडिन्द्रियें (सळायतन)– 'आये तनोति आयतंच नयतीति आयतनं' अशी विसुद्धिमग्गांत आयतनाची व्याख्या दिली आहे. बुद्धधर्मांत हीं आयतनें-म्हणजे इंद्रियें-बारा आहेत, असें म्हटलें आहे. तीं अशीं:–

'द्वादसायतनानि–चक्खायतनं, सोतायतनं, घानायतनं जिव्हा-यतनं, कायायतनं, मनायतनं, रूपायतनं, सद्दायतनं, गंधायतनं, रसायतनं, फोट्ठब्बायतनं, धम्मायतनं.

(अभिधम्म, १–७–५–३८ व वि मं. १५–१)

भावार्थ–इन्द्रियें हीं बारा आहेत. त्यांचा तपशील तो असा-चक्षुरिन्द्रिय, श्रोत्रेंद्रिय, घ्राणेंद्रिय, जिव्हेंद्रिय, कायेन्द्रिय, मनेंद्रिय, रूपेन्द्रिय, शद्बेंद्रिय, गंधेंद्रिय, रसेंद्रिय, स्पर्शेंद्रिय, व धर्मेन्द्रिय. अशीं हीं बारा इन्द्रियें–आयतनें–आहेत.

अर्थात् या वचनाचें मूळ याज्ञवल्क्यांच्या बृहदारण्यांत-अर्थात् शतपथांत-आढळतें तें असें :–

स यथा सर्वासामपां समुद्र एकायनमेवं सर्वेषां स्पर्शानां त्वगे-कायनमेवं सर्वेषां गन्धानां नासिके एकायनमेवं सर्वेषां रसानां

जिव्हैकायनमेवं सर्वेषां रूपानां चक्षुरेकायनमेवं सर्वेषां
शद्वानां श्रोत्रमेकायनमेवं सर्वेषां संकल्पानां मन एकायनम्'
(बृ. २-३-११).

सर्व उदकांचें प्राप्तव्यस्थान म्हणजे आश्रयस्थान-जसा समुद्र, तद्वत सर्व स्पर्शांचें एकमेव केंद्रस्थान म्हणजे त्वक् (कातडें) हें होय. त्याचप्रमाणे सर्वगंधाचें नाक, सर्व रसाचें जीभ, सर्व रूपाचें चक्षु, सर्व शद्वाचें श्रोत्र व सर्व संकल्पाचें मन हें एकायतन - आश्रयस्थान-केंद्रस्थान- आहे.

हाच भावार्थ प्रश्नोपनिषदांत थोडक्यांत पण स्पष्ट रीतीनें सांगण्यांत आला आहे.

'चक्षुश्च द्रष्टव्यंच, घ्राणंच घ्रातव्यंच, रसश्च रसयितव्यंच
त्वक्च स्पर्शयितव्यंच, वाक्च वक्तव्यंच, मनश्च मंतव्यंच'
(प्रश्न ४-८)

येथें 'द्रष्टव्यं, श्रोतव्यं, घ्रातव्यं, रसयितव्यं, स्पर्शयितव्यं, वक्तव्यं, मंतव्य, असे जे शद्व आहेत, त्या ऐवजी बुद्धांनी रूप, शद्व, गंध, रस, स्पर्श व धम्म हे पर्याय शद्व उपयोगिले आहेत. पण वरील शतपथवचनाचें अगदी शद्वशः अनुकरण करण्यांत आलें आहे, हें अभिधम्म व शतपथ वचनें ताडून पाहिल्यास चाणाक्ष वाचकांच्या तत्काल ध्यानांत येईल.

आतां वैदिकांच्या दृष्टीनें सहाच इंद्रियें असून, त्यांचे विषयहि सहाच आहेत. अर्थात् इंद्रियें व त्यांचे विषय मिळून बारा होतात. बुद्धांनीहि तितकींच मानलीं आहेत. वर अभिधम्मांत बारा आयतनें सांगण्यांत आलीं असून, त्यांत वैदिकांचीं सहा इंद्रियें व त्याचे सहा विषय यांचा समावेश होतो. तेव्हां याबाबतींत वैदिक व बुद्ध यांच्या मतांत म्हणण्यासारखा फरक नाहीं. हीं जीं शरीरांत इंद्रियें आहेत, त्यांचा उपयोग असा आहे कीं, तीं मनुष्याला बाह्यजगाचें ज्ञान करून देतात. अर्थात् मनुष्याला जगाचें जें

ज्ञान होतें, तें या इंद्रियांकरवीं होतें. म्हणून त्यांना ज्ञानद्वारें असें म्हणण्यांत येतें. अस्तु. येथें घ्यावयाचा बोध हा की नामरूपापासून–शरीरापासून-इंद्रियांची उत्पत्ति आहे. अतएव ' नामरूपपच्चया पळायतनं ' असें म्हटलें आहे. हें झाल्यावर आता पुढील विषयाकडे वळूं.

स्पर्श (फस्स):- फुसती ति फस्सो-स्पर्शतें म्हणूनर पर्श) असें विसुद्धिमग्गांत म्हटलें आहे. (वि. म. १७–४८) शरीरामध्यें बाह्यजगाचें ज्ञान होणेसाठीं विविध इंद्रियें असलीं, तरी मनुष्याला त्याचें ज्ञान व्हावयास इंद्रियांचा व त्यांच्या त्यांच्या विषयाशी संबंध यावयास पाहिजे. इंद्रियांचा विषयाशी जो संबंध वा संपर्क त्याला स्पर्श असें म्हणतात. डोळ्याचा आणि रूपाचा संबंध आला म्हणजे त्यापासून मनुष्याला रूपस्पर्श होतो. या स्पर्शज्ञानाला चक्षुर्विज्ञान ' असें पारिभाषिक गांव आहे. त्याचप्रमाणे श्रोत्रांचा व जगाचा संबंध आला म्हणजे मनुष्याला शब्दस्पर्श होतो. आणि नाकामुळें गंधस्पर्श जिभेमुळें रसस्पर्श व त्वचेमुळें धातु स्पर्श होतो.

अर्थात हें ज्ञान –हें स्पर्शज्ञान–होण्याला एकंदर तीन गोष्टींची अपेक्षा आहे. उदाहरणार्थ, रूपज्ञान घेऊं. रूपाचें ज्ञान व्हावयाला, त्याचें इंद्रिय–जी दृष्टि–ती प्रथम निर्दोष असावयास पाहिजे. त्यानंतर तिचा व बाह्यवस्तूंचा संबंध यावयास पाहिजे. एवढ्यावरच रूपज्ञान होणार नाहीं. तर त्यावेळेला तेथें मनहि हजर असावयास पाहिजे. म्हणजे मन, डोळा व वस्तु या तीहींचा एकसमयावच्छेदेकरून जेव्हां संबंध घडेल, तेव्हांच मनुष्याला रूपज्ञान होईल. एरवीं नाहीं. हाच नियम इतर इंद्रियज्ञानालाहि लागूं आहे. अतएव या स्पर्शज्ञानाला मनाची अपेक्षा असल्यामुळें याज्ञवल्क्यांनी ' मनसा पश्यति मनसा श्रृणोति '– मनाच्या योगनें मनुष्य जगाचें रूप पाहतो व मनानेंच शद्ब ऐकतो असें म्हटलें आहे, तें अगदी शास्त्रशुद्ध असून भगवंतानाहि तें कबूल करणें भाग पडलें. तेव्हां लक्षांत ठेवावयाची गोष्ट ही कीं इंद्रियापासून स्पर्श संभवतो. हें तत्त्व ' पळायतनपच्चया फस्सो ' या वचनांत समाविष्ट करण्यांत आले.

वेदना :– वेदना म्हणजे स्पर्शज्ञान–बाह्यजगाचें स्पर्शज्ञान. 'वेदयति वेदयतीति खो आवुसो तस्मा वेदना ति वुच्चते' मनुष्य इंद्रियामार्फत जाणतो त्याला वेदना म्हणतात. असें विसुद्धिमग्गांत (१७–१२५) म्हटलें आहे. स्पर्शापासून जें जाणलें जातें–इंद्रियाला विषयसंपर्कानें होणारें जें ज्ञान–ती वेदना होय. म्हणजे विषय व इंद्रिय यांचा संयोग घडून आला, म्हणजे त्यापासून वेदना उत्पन्न होते.

'चक्खुसंपस्सजा सोतघाणजिव्हाकायमनोसंपस्सजा वेदना'

चक्षु, श्रोत्र, घ्राण, जिव्हा, काया व मन यांच्या विषय–संस्पर्शानें उत्पन्न होणारें जें इंद्रिय ज्ञान त्याला वेदना असें म्हणतात.

अर्थात् ही वेदना विषयस्पर्शापासून उत्पन्न होते आणि ती तीन प्रकारची आहे. 'तिविधा वेदना सुखं दुक्खं अदुक्खमसुखं चेति'–सुख, दुःख व उपेक्षा असे वेदनेचे तीन प्रकार आहेत. विषयाच्या स्पर्शापासून संयोगापासून–होणाऱ्या अनुकूल व इष्ट वेदनेला सुख, प्रतिकूल व अनिष्ट वेदनेला दुःख व सुखदुःख दोन्ही होत नसतील तर उपेक्षा असें म्हणतात. 'इट्ठफोट्ठब्बानुभवलक्खणं सुखं' व 'अनिट्ठफोट्ठब्बानुभवलक्खणं दुक्खं' अशी विसुद्धिमग्गांत बौद्धधर्माची व 'अनुकूल वेदनीयं सुखं, प्रतिकूल वेदनीयं दुःखं' अशी वैदिक धर्माची सुखदुःखाची व्याख्या असून, दोन्हींचें लक्षण जवळ जवळ एकच व सारखेंच आहे.

सारांश हा कीं, प्रिय वेदनेला सुख व अप्रिय वेदनेला दुःख हें नांव असून, इंद्रियें व बाह्य जग यांच्या संयोगानें सुखोत्पादक वा दुःखजनक अशा वेदना उत्पन्न होतात. अर्थात् या वेदनांना विषयस्पर्श हें कारण आहे, हें सांगण्याचा भावार्थ. या सुखदुःखादिवेदना अनित्य आहेत, क्षयधर्मी आहेत, व अखेर त्या नाश पावणाऱ्या आहेत, असें भगवानांनी या वेदनांना उद्देशून सांगितलें आहे. ते म्हणतात–

'सुखापि खो अग्गिवेसन वेदना अनिच्चा सङ्खता पटिच्चसमुप्पन्ना खयधम्मा वयधम्मा विरागधम्मा निरोधधम्मा'

(म. नि. ७४–३)

असो. सांगण्याचें तात्पर्य कायतर 'फस्सपच्चाया वेदना' हें आहे.

तृष्णा ( तण्हा )— पुढें या वेदनांपासून तृष्णा संभवते. ' परितस्सती ति तण्हा '—हवेसें वाटतें—विषयाची ओढ, चटक—लागते—म्हणून तिला तृष्णा असें म्हणतात. ( वि. म. १७–४८ ) तृष्णा म्हणजे सुखदायक विषयाची उपभोगेच्छा. ज्या ज्या वस्तूपासून अनुकूल वेदना होतात, सुखाच्या लहरी अंतः करणांत उठतात,- त्या त्या वस्तूवर त्या त्या इन्द्रियाचें प्रेम—आसक्ति—ममत्व जडून ती वस्तु आपणास हवीशी वाटून पुनः पुनः तिचा उपभोग घेण्याची मनांत प्रेरणा होऊन, ती जवळ करण्याची उत्कट वासना—प्रबल इच्छा - उत्पन्न होते. याला म्हणतात तृष्णा. भगवान या तृष्णेचें स्वरूप कथन करतात तें असें:—

> ' या' यं तण्हा पोनोभविका, नन्दिराग सहगता तत्र तत्राभिनन्दिनी, सेय्यथीदं कामतण्हा, भवतण्हा, विभवतण्हा '।
>
> ( दी. नि. २२–१९ )

भिक्षुहो ! येथें पुनः पुनः उद्‌भवणारी—राहून राहून उसळी मारणारी—राग व लोभ यांनी युक्त, जेथें तेथें सुखदायक वस्तूंमध्ये रममाण होणारी तृप्तीची इच्छा धरणारी—अशी जो मनोवृत्ति, ती तृष्णा होय. कामतृष्णा, भवतृष्णा व विभवतृष्णा अशी ती त्रिविध असून, सर्व दुःखाची ती मायकूस आहे.

उदाहरणार्थ, इंद्रियें हीं बहिर्दृष्टि असल्यामुळें तीं जगाकडे व जगातील विविध वस्तूंकडे धांवत असतात. तेथें सुंदर रूप दृष्टीस पडलें की त्यापासून डोळ्याला— हें रूप ग्रहण करण्याचें इंद्रिय आहे— सुख वाटून, हर्ष वाटून, त्या वस्तूवर डोळ्याची आसक्ति जडते, म्हणजे त्यावर प्रेम जडतें आणि तें सुंदर रूप सदैव डोळ्यापुढें असावें अगर पुनः पुनः इच्छे-प्रमाणें पहावयास मिळावें अशी मनांत वासना - इच्छा - उद्‌भवते, याला रूपतृष्णा ( रूपतण्हा ) असें म्हणतात. त्याचप्रमाणे बाहेर कोठें मधुर-ध्वनि अगर मंजुल आवाज ऐकूं आला, म्हणजे कान तेथें टवकारून राहतात व तो सुस्वर नाद पुनः पुनः ऐकण्याचा मोह सुटतो. याला शद्बतृष्णा ( सद्दतण्हा ) असें नांव आहे. याचप्रमाणे नाकाला गंधतृष्णा,

जिभेला रसतृष्णा, त्वचेला स्पर्शतृष्णा व मनाला संकल्पतृष्णा असे तृष्णेचे हे निरनिराळे पर्याय आहेत. आणि या मधुर विषय–सुखावर त्या त्या इंद्रियांची आसक्ति जडून - प्रेम जडून - तिकडे त्यांची सारखी ओढ लागून राहते. हीच तृष्णा होय.

मनुष्य हा संसारांत–विविधविषयांच्या सुखोपभोगांत–मोहजालांत–अडकून त्यांतच गुटमळून राहण्याची रात्रंदिवस इच्छा करीत असतो, ती या तृष्णेपायींच. जगांत ज्या ज्या म्हणून सुखकर, हितकर, आनंदकर, वस्तू आहेत, त्या सर्व प्रिय असून, त्यांचा सदैव सहवास व उपभोग घेण्याची प्रवृत्ति - अनिवार्य इच्छा - मनुष्यांत सदैव उत्कट व प्रबल होऊन राहते, त्या प्रवृत्तीला तृष्णा असें म्हणतात. ही जी सुखलालसा - विषय-सुखभोगेच्छा - ती कामतृष्णा होय. आणि ही कामतृष्णा शमविण्यासाठीं–विषयसुखाचा - जागतिक सुखाचा - उपभोग घेण्यासाठीं अधिकांत अधिककाल दीर्घकाल - जगण्याची आणि त्यासाठीं पुनः पुनः जन्म घेण्याची मनांत वासना - इच्छा उत्पन्न होते. तिला भवतृष्णा असें नांव आहे. इहलोक यात्रा संपवून परलोकांत गेल्यावर तेथेंदेखील सुखोपभोग मिळावा अगर पुढें जन्मच येऊ नये, अशी जी इच्छा ती विभवतृष्णा होय. याप्रमाणे तृष्णेचे हे असे तीन प्रकार असून त्यांचा उगम वेदनेपासून होतो. मनुष्य जोपर्यंत बहिर्दृष्टि असतो, आपलें सुख बाह्य जगांत आहे. अशा भ्रमांत असतो, तोपर्यंत या तृष्णेची मगरमिठी त्यास सुटता सुटत नाहीं. व सोडविता येत नाहीं. तृष्णेच्या जबड्यांत तो संपूर्ण गेलेला असतो. असें हें तृष्णामहात्म्य आहे. या तृष्णेला कारण इंद्रियें आहेत म्हणून 'षळायतन-पच्चाया तण्हा' असें भगवान सांगतात. असो. आतां पुढें चालूं लागूं–

उपादान– उपादान म्हणजे आसक्ति–विषयप्रेम. 'या वेदनासु नंदी तदुपादानं' (म. नि. ३८–१४)–वेदनावरील जें प्रेम–जी आसक्ति–तें उपादान होय. हें उपादान उर्फ आसक्ति तृष्णेमुळें होतें. ज्या वस्तूपासून सुखवेदना होतात, ती वस्तु मनांत आकर्षिली जाते. म्हणजे मन तेथें आसक्त होऊन–तेथें जडून–वसतें. या आसक्तिमुळें–प्रेमभावानेंमुळेंच–काम–वासना–भोगवासना

उभ्दवून, प्रबळ होऊन, इंद्रियें त्या वस्तूचा ध्यास घेऊन वसतात. तिकडे धावूं लागतात. अर्थात् हा ध्यास–ही आसक्ति–ही ओढ विषयांपासून जेव्हां सुख होईल, आनंद होईल, आल्हाद होईल तेव्हांच संभवते. एरवी नाहीं.

'यो खो आवुसो पञ्चुपादानखन्देसु छन्दरागो तं तत्थ उपादानं ति'
– पांच उपादानखंदामधील जें प्रेम, त्याविषयीं जी आसक्ति तिला, मित्रा उपादान असें म्हणतात. ( म. नि ४४–२२ )

सारांश पंच उपादान स्कंधाविषयी जें गाढप्रेम, दृढ आसक्ति म्हणजेच उपादान आणि याची उत्पत्ति तृष्णेपासून–सुखोपभोगेच्छेपासून–होते व आहे, हाच भावार्थ तण्हापच्चया उपादानं वचनांत गोवून ठेवला आहे.

भवः– ( 'भवति, भावयति चा ति भवो' ( वि. म. १७–४८ ) भव म्हणजे होणें–उत्पन्न होणें–जन्म देणें–अर्थात् गर्भात प्रवेश करणें. म्हणजे गर्भवास. सुखोपभोगाला पंच महाभूतात्मकाची म्हणजे पार्थिव शरीराची आवश्यकता आहे. शरीराशिवाय सुखोपभोग मिळणें नाही. आणि शरीर निर्माण होण्यास प्रथम गर्भप्रवेश व तेथे काही काल वास करणें हें अवश्य आहे. आणि हें कसें संभवतें याविषयीं भगवान सांगतात तें असेः–

'यतो च खो भिक्खवे मातापितरो च सन्निपाता होन्ति,
माताच उतुनी होति, गन्धब्बो च पच्चुपटिठ्तो होति,
'एवं तिण्णं सन्निपाता' गब्भस्सावक्कान्ति होति'.
( म. नि. ३८–१३ )

भावार्थः– भिक्षुहो ! हे तीन एकत्रित झाल्याने गर्भधारणा होते. म्हणजे माता व पिता यांचा संयोग, त्यावेळी माता ऋतुमती असणें आणि त्याप्रसंगीं गन्धर्व तेथें हजर असणें, हे तीन एकत्रित होण्याने गर्भधारणा होते. यालाच भव असें म्हणतात. येथें गन्धर्व हा शब्द वापरण्यांत आला आहे, तो जीवात्मा–विज्ञानात्मा–या अर्थी वापरण्यांत आला आहे. याला 'पटिसन्धि विज्ञान' हें नांव आहे. हें वाचकांनी लक्षांत ठेवावें. सारांश उपादानंपच्चया भवो' असा निर्णय घेण्यांत आला.

जातिः– ('जननं जाति' वि. म. १७–४८) मातेच्या गर्भातून बाहेर येणें याला जन्म हें नांव असून, जन्मालाच जात हा शब्द भगवातांनी वापरला आहे. भव म्हणजे गर्भोत्पत्ति व जाति म्हणजे गर्भप्रसूति. याविषयीं वचन आढळतें, तें असें:–

यं मातुकुच्छिस्मि पठमं चित्तं उप्पन्नं, पठमं विञ्ञाणं पातुभूतं, तदुपायं स वच्छ जाति' (वि. म. १६–३२)

मातेच्या गर्भांत प्रथम चित्त व विज्ञान यांचा प्रादुर्भाव होणें याला मनुष्याचा जन्म असें म्हणतात. आणि हें जन्मणें मोठें दुःखप्रद आहे. कारण मूल जन्मावयाच्या वेळीं तें सुखानें जन्मत नाहीं. त्यावेळीं त्याला मोठे कष्ट व दुःख होतें. अर्थात् बुद्धाच्या मते दुःखाला सुरवात होते, ती जन्मापासून होते. 'जाति पि दुक्खा' असें भगवंतानीं स्पष्ट घोषित केलें आहे.

जरा– ('जीरणं जरा' वि. म. १७–४८) जीर्ण होणें–निःसत्व होणें - याला जरा असें म्हणतात. अर्थात् जरा म्हणजे म्हातारपण. प्राण्याच्या एकंदर पांच अवस्था आहेत, उदय, वाढ, विकास, वृद्धता व विनाश. प्राणी जन्मतो, वाढतो, विकास पावतो, जीर्ण होतो व अखेर मरून जातो. प्राण्याच्या दुःखाला प्रथम जन्मापासून सुरवात होते. 'इदं खो पन भिक्खवे दुक्खं अरियसच्चं।'– भिक्षूहो ! हें सर्व दुःख आहे, काय दुःख आहे, तर भगवान त्याचा पुढें खुलासा करतात, तो असा– 'जाति पि दुक्खा, जरा पि दुक्खा, मरणं दुक्खं'– जन्म हें दुःख, म्हातारपण हें दुःख, मरण हें दुःख आहे. अर्थात् जन्माच्या नंतर दुःखाचा फार मोठा झटका म्हातारपणीं येतो. कारण त्यावेळीं शरीराची अवस्था मोठी नाजूक व केविलवाणी झालेली असते. विसुद्धिमग्गांत या वृद्धपणाचें वर्णन केलें आहे, तें मननीय आहे.

' अगानं शियलो भावा, इन्द्रियानं विकारतो ।
यौब्बनस्स विनासेन, बलस्स उपघाततो ॥
विप्पवासा सतादीनं, पुत्तदारेहि पत्तनो ।
अपसादनीयतो चेव, भिय्यो बालत्तपत्तिया ॥
पप्पोत्ति दुक्खं यो मच्छो कायिकं वाचिकं मानसं तया ।
सब्बमेतं जराहेतु यस्मा, तस्मा जरा दुक्खाति ॥ '

(वि. म. १६-४५)

भावार्थ, अवयवांची शिथिलता, इंद्रियांची दुर्बलता, यौवनाचा नाश, शक्तीचा ऱ्हास, विस्मरणशीलता, इतर अनेक दोष, स्त्रीपुत्रादिकांकडून अवहेलना व पाण-उतार व बुद्धिभ्रंश या सर्व गोष्टींमुळें मनुष्य शारीरिक, वाचिक व मानसिक दुःख अनुभवितो. आणि या सर्व अनर्थास म्हातारपण हेंच मुख्य कारण आहे. म्हणून म्हातारपण हें दुःख आहे आणि या म्हातारपणासारखें दुसरें दुःख नाही. या वयांत इंद्रियांचे सर्व खेळ थंडावतात व नाड्या आंखडतात, व शरीराची बांधणी खिळखिळीत होते.

प्रकृति ताळ सोडते, पाय लटपटतात, हात कांपतात,स्मरणशक्ति ऱ्हास पावते व बुद्धींत भ्रंश होतो, दिवसा चैन नाहीं व रात्रीं झोंप नाहीं. तशांत व्याधीची पीडा व मरणाची भीति !!! या सर्व आपत्तींचा विचार केला म्हणजे म्हातारपण हें अत्यंत दुःखदायक आहे, ही गोष्ट मान्य करावीच लागते. म्हणून भगवान म्हणाले, ' जरा पि दुक्खा ' आणि त्या दुःखाला जन्म कारण आहे. म्हणून ' जातिपच्चया जरा '

मरण—( मरन्ति एतेना ' ति मरणं )—शरीर नाश पावतें - शरीर व प्राण यांचा वियोग - तें मरण. हा सृष्टीचा नेम - क्रम - धर्मच—आहे कीं, जो जन्मला, तो मरणारच, ' दिसेल तितुकें नासेल ' हा सृष्टिधर्मच आहे. *अर्थात् जन्म तेथें मरण. ' जातस्यहि ध्रुवो मृत्युः ' हें तत्त्व त्रिकालाबाधित* सत्य आहे. म्हणून भगवंतानी ' मरणन्तं हि जीवितं ' असें स्पष्टच बोलून दाखविलें असून, ही आपत्ति मनुष्याला सर्वांत मोठी दुःखप्रद आहे. आणि

म्हातारपणीं तर या मरणाचें सतत भय असतें. 'निच्चं मरणतो भयं' ही भगवदुक्ति या वयांत सतत भेडसावीत असते. कारण तो प्रसंगच तसा कांही चमत्कारिक असतो. तो क्षण आला कीं जगाला व जगातील सर्व पदार्थांना-प्रिय वस्तूंना-पुत्र दारादि व इष्ट मित्र-सखी व प्रेमळ-जन यांना-कायमचें मुकावें लागतें! मग ती गोष्ट दुःखद व दुःसह नव्हे असें कोण म्हणेल ? *मरण - मग तें केव्हांहि व कोणालाहि येवो -* अत्यंत अप्रिय व म्हणून नावडती गोष्ट असून, तें येतें, त्याला हीं पुढील कारणें आहेत.

'आयुक्खयेन, कम्मक्खयेन, उभयक्खयेन, उपच्छेदक कम्मना चेति-चतुधा मरणमुप्पत्ति नाम' असें अभिधम्मांत सांगितलें आहे.
( अ. भि. १-५-८-३४ )

याचा भावार्थ असा कीं, आयुष्य संपलें म्हणजे, कर्मक्षय झाल्यावर, आयुष्य व कर्म या दोहोंचाहि क्षय झाल्यावर, अगर मध्येंच आयुष्य छेदक कर्मानें-अपघातानें-मरणाची उत्पत्ति होते. आणि हें मरण अप्रिय व दुःखद असून, *तें कोणालाहि नको असलें तरी तें कोणालाहि चुकवितां येत नाहीं.* झाड प्रथम रुजतें मग अंकुरतें, नंतर वाढतें, फुलतें, फळतें आणि अखेर सुकून-वठून-जातें, तद्वत् मनुष्याची सुद्धां गोष्ट आहे. तो प्रथम गर्भस्थ होतो. नंतर जगांत जन्मतो, पुढें वाढतो, नंतर संसारास लागतो, कालांतरानें म्हातारा होतो आणि अखेर मृत होऊन मातींत मिसळून जातो ! हा सृष्टीचा निष्ठुर पण अबाधित क्रम असून, त्याला अपवाद असा कोठेंच आढळत नाहीं. तेव्हां सांगावयाचें तात्पर्य काय तर जन्म व जरा याप्रमाणेंच मरण हेंहि अपरिहार्य असून तें दुःखद आहे. आणि भगवंतानी सुद्धां हेंच म्हणजे 'मरणं दुक्खं' असें सांगून, त्याला जन्म हेंच मूळ कारण आहे - 'जातिपच्चया जरामरणं' - असा निर्वाळा दिला आहे.

शोक-( सोक ) - 'सोक नाम ञातिब्यसनादीहि फुट्ठस्स चित्तसंतापो' ( वि. म. १६-४८ ) प्रियजनांच्या वियोगानें झालेला चित्तसंताप याचीहि दुःखांतच गणना करण्यांत आली आहे. या शोकाचें लक्षण सांगितलें आहे तें असें:—

सत्तानं हृदयं सोको विससल्लं तु तुज्जति ।
अग्गितत्तो व नाराचो भुसञ्च दहते पुन ॥
समावहति च व्याधि–जरा–मरण भेदनं ।
दुक्खम्पि विविधं यस्मा, तस्मा दुक्खोति वुच्चति ॥
( वि. म. १६-४८ )

भावार्थः– शोक हा विषारी शल्याप्रमाणे मनुष्यांच्या हृदयाला व्यथित करतो. त्याचप्रमाणें तापविलेल्या लोखंडी गोळ्याप्रमाणें तो पुनः पुनः भयंकर चटके देतो. तो रोग, जरा, मरण, नाश व इतर अनेक प्रकारचीं दुःखें देणारा असल्यामुळें, त्याची गणना दुःखांतच केली आहे. शोकाचा हा असा प्रभाव असून संसारांत अनेक प्रकारें तो मनुष्यांना सतावीत असतो. प्रिय वस्तूच्या नाशामुळें, अगर वियोगामुळें त्याची उत्पत्ति होत असून, तो प्राण्यांना फार हैराण करणारा आहे. म्हणून भगवानांनी त्याला ' जातिपच्चया सोको ' असें म्हटले आहे.

परिदेव–( ' परिदेवो नाम ञातिब्यसनादीहि फुट्ठस्स वचीलापो ' ( वि. म. १६–४९ ) परिदेव म्हणजे आक्रोश, रडणें–ओरडणें इत्यादि. आप्तस्वकीयांचा व इष्टमित्रांचा वियोग झाला, म्हणजे दुःखातिरेक होऊन मनुष्य हा स्फुंदत स्फुंदत रडूं लागतो. आक्रोश करूं लागतो. रडत रडत त्याचे गुणगान व स्वभाववर्णन करून वेड्याप्रमाणें ओरडत सुटतो.

दुःख– ( दुक्खं नाम कायिकं दुक्खं ) दुःख हें शरीराला पीडा देणारें व अस्वस्थ करणारें आहे. शोक व परिदेव हीं मानसिक व वाचिक दुःखें असून, दुःख हें कायिक आहे. त्याचें लक्षण पुढीलप्रमाणें सांगण्यांत आलें आहे, तें असें:–

पीळेति कायिक मिदं दुक्खं दुक्खंच मानसं भिय्यो ।
जनयति यस्मा तस्मा दुक्खं ति विसेसतो वुत्तं ॥
( वि. म. १६–५० )

भावार्थः– दुःख हें शरीराला व्यथा देणारें असून, पुढें त्या शारीरिक व्यथेंत मानसिक व्यथाहि निर्माण करणारें आहे. अर्थात् हें दुःख शारीरिक व मानसिक असें दोन्ही प्रकारचें असतें. आणि याची उत्पत्ति जन्मापासून आहे. म्हणून 'जातिपच्चया दुक्खं' असें म्हटलें आहे.

दोमनस्सं– 'दोमनस्सं नाम मानसं दुक्खं' (वि. म. १६–१५) दोमनस्स हें मानसिक दुःख आहे. ही मानसिक व्यथा ज्याला झाली आहे, तो ओक्साबोक्शी रडूं लागतो. जमीनीवर गडबडा लोळूं लागतो, हाताने छाती बडवून घेत फिरतो. खाली पडतो, वर उठतो, थैं थैं नाचतो, काय नाना तऱ्हा करतो. यावेळी तो दुःखानें बेहोष झालेला असून, केव्हां केव्हां तो तें दुःख सहन न होऊन वीष खातो, अग्नींत पडतो, विहिरी–तळयांत बुडतो, गळयाला फांस लावून घेतो. आणि अशा प्रकारें अनेक तऱ्हा करून दुःख–भागी होतो. आणि हें सर्व जो जन्मला, त्याच्याच मागें लागतें.

उपायासः–उपायास म्हणजे विषाद, मनाचा उद्वेग व उद्रेक. अिन्द्रियांचा व अनिष्ट व्यक्ति, वस्तु अगर गोष्ट यांच्याशी संबंध आला म्हणजे मनाची जी उद्वेगजनक स्थिति होते, तिला उपायास हें नांव आहे. मानसिक व शारीरिक दुःख यांचा यांत समावेश होतो. मानसिक त्रास हें याचें कार्य व विषाद वा उद्रेक हें त्याचें प्रकट स्वरूप, असेंच असून याचें लक्षण सांगितलें आहे, तें असें:– 'चित्तस्सच परिदहना कायस्स विसादनाच अधिमत्तं। यं दुक्खमुपायासो जनेति, दुक्खो ततोवुत्तो ति ॥ (वि. म. १६–५२) अप्रिय गोष्टीचा संपर्क घडला म्हणजे मनाला जो ताप होतो व शरीराला जें दुःख होतें तें उपायासामुळें होतें. आणि म्हणून त्याची गणनाही दुःखांतच केली आहे. प्रिय व्यक्ति अगर वस्तूच्या वियोगामुळे जो मानसिक त्रास अगर उद्वेग होतो, त्याला शोक व अप्रिय वस्तूच्या अगर व्यक्तीच्या संपर्कामुळे जो मानसिक त्रास होतो, त्याला उपायास अशी संज्ञा आहे.

प्रतीत्य समुत्पादाचा हा पूर्वार्ध असून यांत दुःखोत्पत्तीचा तर्कशुद्ध विचार करण्यांत आला असून या विचार–सांखळीतील हीं दुःखे एकमेकांस

परस्परांवर अवलंबून अशीं आहेत. हा भगवंताचा प्रतीत्यसमुत्पाद प्रथम वाचल्या बरोबरच आम्हांस उपनिषदांतील एका वचनाची आठवण झाली. तेथेंहि अशाच प्रकारची विचारसरणी गोवून ठेविलेली आमच्या नजरेस आली. तेथील वचन म्हणजे हें असें आहे. सृष्टि उत्पत्तीची ती कथा आहे. तें वचन हें–

> तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः सम्भूतः । आकाशाद्वायुः
> वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या
> ओषधी ओषधीभ्योऽन्नम् । अन्नात्पुरुषः ।। ( तै. उ. १–१ )

भावार्थ– त्या ह्या 'सत्यज्ञानमनंत' ब्रम्हरूपी आत्म्यापासून आकाश उत्पन्न झालें, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नीपासून आप, आपापासून पृथिवी, पृथ्वीपासून ओषधी, ओषधीपासून अन्न व अन्नापासून पुरुष झाला.

यांत जो विचारमालिका गुंफिली आहे, तशीच अगर त्याच मासल्याची विचारसरणी वरील समुत्पादांत स्वीकारली आहे, हे वैदिकांच्या लक्ष्यांत तेव्हांच भरून आल्याशिवाय रहात नाहीं. असो. बुद्धाचा समुत्पाद हा दुःखप्राप्ति व दुःखमुक्ति कशी होते हें सांगतो, तर वैदिकांचा समुत्पाद हा मरणधर्मी जीवोत्पत्ति व त्याला आनंद प्राप्ति कशी होईल, हें शिकवितो. असो.



## प्रकरण ७ वें
## प्रतीत्यसमुत्पाद
## (उत्तरार्ध)
# दुःखनिरोध

अविज्जाय त्वेव असेसविरागनिरोधा संखारनिरोधो. सङ्खारनिरोधा विञ्ञाणनिरोधो। विञ्ञाणनिरोधा नामरूपनिरोधो। नामरूपनिरोधा सळायतननिरोधो। सळायतननिरोधा फस्सनिरोधो। फस्सनिरोधा वेदनानिरोधो। वेदनानिरोधा तण्हानिरोधो। तण्हानिरोधा उपादाननिरोधो। उपादाननिरोधा भवनिरोधो। भवनिरोधा जातिनिरोधो। जातिनिरोधा जरामरणं सोकपरिदेव-दुक्खदोमनस्सुपायास-निज्झन्ति। एवमेतस्स केवलस्सा दुक्खखन्दस्स निरोधो होती ' ति.

( धम्मचक्क-पवत्तन सुत्त )

भावार्थः– भगवान बुद्धांनी ' यदनिच्चं तं दुखम् ' असें घोषित केलें. पण त्यांच्या पश्चात् त्यांच्या मताभिमानी आचार्यांनी त्याचा अर्थ ' सर्वंदुःखं सर्वं क्षणिकं ' असा करून, टीकाकारांना त्यावर नसता आक्षेप घेऊन झोड उठविण्यास मात्र जागा करून दिली. ' सर्वं क्षणिकं सर्वं दुःखं ' हें वाक्य बौद्ध आचार्यांनी जगाच्यापुढें ठेविल्यामुळें हा प्रश्न सहजच उभा राहतो कीं जगांत सर्वत्र व सर्वकाळीं दुःखच दुःख भरलें आहे काय? आणि भरलें असेल– हाः हाःकाराचा डोंब उसळलेला असेल–तर हा मनुष्यप्राणी मग आतांपर्यंत जगला तरी कसा व तो पुढें जगून राहील तरी कसा? आणि ही वस्तुस्थिति जर खरी असेल, तर दुःख हेंच मग मनुष्याचें जीवन असेंच म्हटलें पाहिजे. नाहीं का? आणि तसें जर असेल तर तो त्या दुःखाला इतका बुजतो –इतका घाबरतो- तो काय म्हणून? खरें म्हटलें तर त्यानें त्यास उराशी धरून कवटाळून बसावयास पाहिजे. खरें कीं नाहीं? मग खरा प्रकार काय आहे? ज्या अर्थी तो दुःखाला इतका बुजतो, घाबरतो, उद्विग्न होतो,

त्याला दूर लोटून देतो, त्याअर्थी तें त्याचें जीवन नव्हे, हें खास ! मग आता तें जीवन कोणतें ! दुःख हें त्याचें जीवन नव्हे, हें स्पष्ट झाल्यावर मग तो जगतो हें कशाच्या जिवावर ? तें काय आहे ? हे व असले प्रश्न विचारी वाचकांच्या मनाला चाटून जाणें हें साहजिकच आहे.

आतां खरी वस्तुस्थिति सांगावयाची म्हणजे मनुष्य जगतो व जगला तो सुखावर, दुःखावर नव्हे. आणि बुद्ध भगवानहि असें म्हणत नाहींत कीं, जगांत सर्वत्र व सर्वकाळीं दुःखाचा वणवाच भडकून राहिला आहे. तेथें मधुर सुखाचे मनोल्हादकारक वारे वाहत आहेत, हें खरें. पण ते कायमचे नव्हेत, असा त्यांचा कटाक्ष आहे. ते अनित्य व म्हणून चंचल आहेत. ते आज आहेत तर उद्या नाहींत. आतां आहेत तर पुढे क्षणांत नाहींत. इतकें ते कालभंगुर आहेत. अर्थात त्याना अंत आहे, नाश आहे ! म्हणजेच ते क्षयधर्मी आहेत. या मानवीजीवनांत सुखाचे नंदनवन कांहीं काल फुलून, बहरून राहलें हें खरें, पण तसेंच तें मागेपुढें केव्हांतरी कोमेजून आणि अखेर झडूनहि जाते, हें कांहीं खोटें नाहीं. सुखाच्या वेळीं मनुष्य बेहोष असतो, पण तें अंतर्धान पावलें म्हणजे हाय हाय करून ऊर पिटवूं लागतो! तें सुख गेलें म्हणजे तो दुःखानें वेडा होतो ! बेचैन बनतो नि उदास होतो! पुढे त्याला जगणें देखील कंटाळवाणें व जड वाटतें !

खरी गोष्ट अशी आहे कीं, सामान्यजन–अज्ञजन–पृथग्जन–ज्याला सुख सुख म्हणून उराशी धरून कवटाळून बसतात, तें सुख–तें इंद्रियसुख–तें विषयसुख–हें खरें सुख नव्हें ! तें स्थिर व शाश्वत सुख नव्हे; चंचल व नश्वर आहे ! कालभंगुर आहे ! आतां आहे तर पुढें क्षणांत नाहीं, आज आहे तर उद्या नाहीं ! अशा क्षणभंगुर - कालभंगुर - सुखाला मग सुख म्हणावें तरी कसें ? अशा अनित्य व अस्थिर सुखाला कोण शहाणा सुख समजेल ? जें चंचल, क्षणभंगुर नश्वर, केव्हां दगा देईल याचा नेम नाहीं, अशा ढिसूळ सुखावर विश्वास ठेवून, त्याला हिशोबांत धरून त्यालाच अखंड व उदंड कवटाळून बसणें, हें विचारवंतांस मानवण्यासारखें नाहीं. सामान्यजन त्यांतच रंगून बसतात हें खरें. पण विचारवंतांस तें तितकें स्पृहणीय व प्रलोभनीय वाटत नाहीं.

याचें कारण असें कीं जें अनित्य, चंचल व नश्वर, जें उत्पन्न होतें व नाश पावतें, तें वस्तुतः सुखच नव्हें ! तर केवळ सुखाभास ! तें तृषा शांत करणारें अमृत नव्हे ! तर तृषेला भडकविणारें मृगजल होय !! आणि जगांत व जगांतील सर्व वस्तूंत जेवढें म्हणून सुख आहे, तें सर्व या ठशाचें असल्यामुळें तात्विक दृष्टया त्याची गणना सुखांत करणें हें शहाणपणाचें होणार नाहीं. ज्या सुखाचा अंत होतो,– आणि मागेंपुढें तो तसा केव्हांतरी होणारच– त्याला सुख समजण्यापेक्षा दुःख समजणें हेंच शहाणपणाचें होईल. मनुष्याला सुख पाहिजे आहे. तो सुखाचा चाहता व भोक्ता आहे, हें खरें, पण तें चंचल व नश्वर नसावें; नित्य व शाश्वत असावें, असें त्यास वाटतें. बुद्धभगवंतानाहि सुख हवें होतें. पण तें नित्य व शाश्वत हवें होतें. म्हणजे परम सुख हवें होतें ! पण तसें सुख त्यास जगांत व जगांतील पदार्थांत कोठेंच दिसलें नाहीं, आढळलें नाहीं. तेथें सर्व अनित्य व नश्वर वस्तूंचाच बाजार–बुजबुजाट–माजला असल्यामुळें व त्यांचा सहवास हाच अखेर दुःखास कारणीभूत होत असल्यामुळें त्या दृष्टीनें त्यांनी जगावर दुःखाचा शिक्कामोर्तब केला व तो एका अर्थी योग्यच म्हटला पाहिजे.

कारण मनुष्याची सर्व धडपड शाश्वत सुखाकरतां आहे, व असते. आणि बुद्ध भगवान झाले तरी याच सुखासाठीं त्यांनी आपल्या जिवाचें रान केलें. पण जगाची मांडणी–घटणा–रचनाच–अशी कांही विचित्र व विलक्षण आहे कीं, तेथें नित्य व शाश्वत वस्तूचें नांवच घ्यावयास नको ! त्यासाठीं जगांत कितीहि प्रयत्न केले– आकाशपाताळ हलवून पाहिलें– विश्वाचा कानाकोपरा धुंडाळून पाहिला– तरी त्याचें तेथें दर्शन घडेल - सुगावा लागेल, ही आशा अगदी निर्मूल आहे. म्हणून भारतीय तत्वतेत्ते व धर्म प्रणेते हे सर्व एकजात अशा जागतिक सुखाला–डिसूळ सुखाला–सुख मानीत नाहींत. व तत्प्राप्त्यर्थ मानवजन्म झिजवीत व खर्ची घालीत नाहींत. शाश्वत सुखालाच - अक्षर व अक्षय सुखालाच–ते सुख मानतात व म्हणतात. पण तें सुख जगांत नाहीं, जगांतील पसाऱ्यांत नाहीं, इंद्रियतर्पणांत नाहीं, विषयभोगांत नाहीं, संपत्तिसंग्रहांत नाहीं, सत्ता गाजविण्यांत नाहीं, राज कारण खेळण्यांत नाहीं, राज्य कमावण्यांत नाहीं. कोठेंच तें दिसणार नाहीं व

कोठेंच तें सांपडणार नाहीं. अगदींच नाहीं म्हणावें तर फक्त एकच ठिकाणीं तें आहे. आणि तें ठिकाण म्हणजे वैदिकांचें ब्रम्ह ! बुद्धाचें निर्वाण ! आणि श्रीकृष्णजीचें ब्रम्हनिर्वाण !! येथें मात्र त्या सुखाचा नित्य व अखंड निवास आहे ! तेथें उदंड आनंद आहे ! शाश्वत शांति आहे !! आणि तत्प्रात्यर्थ स्वतःचे शरीर झिजवून अनेक हाल अपेष्टा सोसून, जो ज्ञानगर्भ तपश्चर्या करील, प्रपंचनिवृत्त होऊन योगस्थ मनानें तत्त्व चिंतन करील, त्याची - फक्त त्याचीच - ती मिरासदारी आहे !! त्या ज्ञानी मनुष्याचीच ती दिव्य दौलत आहे !!!

हें सर्व सांगण्याचा मथितार्थ इतकाच कीं, जागतिक सुख - विषयसुख - इंद्रियसुख - हें खरें सुख नसून - नित्य सुखनसून - शाश्वत सुख नसून, कालांतरानें तें नाश पावणारें - भंगपावणारें - असें ढिसूळ सुख आहे. आणि म्हणून बुद्ध भगवंतानी त्याला सुख न म्हणतां, त्याची गणना दुःखांतच केली असून ती दिव्य घोषणा म्हणजे 'यदानिच्चं तं दुःखं' अशी केली, त्यांत चुकलें कोठें ? ते स्पष्टच बोलून गेले आहेत कीं,

'यं किंचि समुदयधम्मं सव्बं तं निरोध धम्मं' ( म नि.५६–१३ )

जें जन्मतें, तें सर्व नाश पावतें, आणि वास्तव 'यदनिच्चं तं दुक्खम्'- जें अनित्य म्हणजे नाशवंत, तें सगळें दुःखच होय, हें त्यांचें म्हणणें सत्य नाहीं, असें कोण म्हणेल ? अनित्य गोष्टीला ते दुःख मानतात व म्हणतात. आणि क्षणभंगुर सुखाला ते सुख मानीत नाहींत.

आतां ही गोष्ट येथें स्पष्ट व जरूर सांगितली पाहिजे कीं, मनुष्याला दुःखांत लोटणारा नरकासुर या शरीरांतच दबा धरून बसला असून, त्याला ( मनुष्याला ) स्वर्गाकडे - नित्य सुखाकडे - नेणारी दिव्य शक्तिहि–महिषासुर मर्दिनीहि–तेथेंच वास करून आहे ! मात्र हें रहस्य ओळखिलें पाहिजे आणि तें आजपर्यंत फक्त भारतीय तत्त्ववेत्त्यांनी व धर्मवेत्त्यांनीच जाणलें आहे, असा जगातील तत्त्वज्ञानाचा इतिहास कंठरवानें सांगत आहे. मनुष्य बहिर्दृष्टि झाला - विश्वपसाऱ्यांत गुंतला व रंगला–म्हणजे तो हळुहळु दुःखाच्या

डोहाकडे ओढला जातो व अंतर्दृष्टि झाला म्हणजे तो सुखाच्या नंदनवनाकडे वळतो ! सुखदुःखाचें मूळ या दृष्टीमध्यें आहे. बुद्ध भगवंताचा जो धर्म आहे, तो बहिर्दृष्टि मनुष्याकरतां आहे. आणि त्या धर्मांचा रोख सगळा मनुष्याला दुःखमुक्त करण्याकरतां आहे. तेव्हां मनुष्य हा दुःखमुक्त कसा व केव्हां होईल, हा मार्ग भगवान या समुत्पादाच्या उत्तरार्धांत सांगतात. त्याचें विवेचन हें असें आहे.

हें दुःख कसें टाळावयाचें आणि कसें टाळता येईल, याचा उलगडा भगवान बुद्ध या प्रतिलोम समुत्पादांत करून दाखवितात तें असें. मनुष्याला सर्वांत मोठें दुःख म्हणजे हें मरण. अर्थात् जन्म तेथें मरण. दिवस तेथें रात्र, तसें जन्म तेथें मरण. ही दुक्कल अविभाज्य आहे. जो जन्मला, त्याला मरण हें केव्हांहि व कोठेंहि चुकणार नाहीं. तें आज नाही उद्या-पुढें केव्हातरी-वत म्हणून गांठणारच ! तें कोणालाहि चुकलें नाहीं व कोणालाहि चुकवितां आलें नाहीं व पुढें येणार नाहीं !! हा सृष्टीचा अबाधित धर्म आहे. जीविताचा अंत अखेर मरणांतच होतो, ही गोष्ट स्पष्ट झाल्यावर विषयमूढ अज्ञानी मनुष्य त्यास बुजतो, हें स्वाभाविकच आहे. त्याला तें मोठें भयप्रद व दुःखद वाटतें. म्हणून 'मरणान्नास्ति दुःखतरं' असें जें शास्त्रकारांनी म्हटलें आहे, तें अन्यथा म्हणतां येणार नाहीं. पण असें हें दुःखप्रद मरण चुकवितां आलें-टाळतां आलें-तर काय मौज होईल ? वस्तुस्थितीस धरून बोलावयाचें म्हणजे मरण हें कोणालाच नको ! जो तो त्याला बुजतोच !

पण दुर्दैव हें कीं तें कोणालाच चुकत नाहीं. तें कोणालाच चुकलें नाहीं. खुद्द भगवंतांना देखील अखेर त्यानें येऊन गांठलेंच ! त्यांनाहि तें चुकलें नाहीं !! आमचे रामकृष्णादि देवहि त्याला वश झाले ! म्हणून श्रीकृष्णजी बोलले कीं 'जातस्य हि ध्रुवो मृत्युः' आणि भगवान बुद्धदेवांनी तीच री ओढली की 'मरणान्तंहि शरीरं' ! पंच महाभूतात्मक शरीर-बुद्धाच्या भाषेंत पंचस्कंधात्मक शरीर-हें मागें पुढें केव्हांतरी पडणारच ! त्याला उपाय नाहीं. ती गोष्ट गृहीत धरूनच पुढें घालतें

पाहिजे. तेव्हा सांगायवयाचें तात्पर्य काय, तर मरण चुकवितां येत नाहीं पण त्यापासून होणारें दुःख मात्र चुकवितां येतें ! भगवान् हमी घेतात ती दुःख चुकविणेची. मरण चुकविणेची नव्हे. पण पुढील जन्मीचें मरण मात्र चुकवितां येतें, असें त्यांचा धर्म सांगतो. ती खुबी मात्र भगवंतांनी अचूक शोधून काढली आहे, आणि जे त्या मार्गाचा अवलंब करतील, त्यांना पुनः मरण येणार नाहीं, असा निर्वाळाहि पण ते देतात.

ते सांगतात कीं मरण कां येतें, तर मनुष्य जन्मला–जन्मतो–म्हणून. जेथें जन्म तेथें मरण ! आणि जन्मच जर चुकविला–चुकविता आला,– तर मग मरण तरी कोठून येणार ? जन्म नाहीं तर मरणहि नाहीं ! 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' हें जें भवचक्र आहे, तें सारखें एरवी चालूंच राहणार. तें आपोआप थांबणार नाही. पण त्याला, मर्यंच खीळ घातली तर मात्र तें थांबेल, एरवी नाहीं. हा सृष्टिनियमच आहे. पण त्यांतून योग्य प्रयत्न केल्यास मात्र निसटतां येतें ! तोच युक्तिवाद व प्रयत्नवाद बुद्ध सांगतात. मरण व तज्जन्य दुःख चुकवितां येतें, पण तसें घडून येण्यास जन्मास खो दिला पाहिजे. म्हणजे जन्म चुकला पाहिजे. तो चुकला म्हणजे त्यापासून उद्भवणारें जरामरण, शोक दुःख, इत्यादि सर्व उपाधि आपोआपच नाहींशा होतात. ही गोष्ट भगवंतांनी 'जातिनिरोधा जरामरणं सोकपरिदेव दुक्खदोमनस्सुपायासा निरुज्झन्ति।' या वचनांत स्पष्ट बोलून दाखविली आहे.

ठीक आहे. हा युक्तिवाद छान आहे. जन्म नाहीं तर मरण नाहीं, हें स्पष्ट आहे. पण अडचण ही कीं, हा जन्म चुकायचा, चुकवायाचा कसा ? याला उपाय काय ? याला भगवानांचें उत्तर असें कीं, गर्भवास चुकला म्हणजे जन्म चुकतो. जन्म होतो तो गर्भापासून. गर्भच नाहीं तर जन्म तरी कोठून ? आणि जन्मच नाहीं तर जरामरण तरी कोठून ? आणि हा गर्भवास चुकवावयाचा झाला तर जीवनेच्छा म्हणजे भवतृष्णा चुकविली पाहिजे. म्हणजे भगवंताच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे भव चुकला म्हणजे जन्म चुकतो. ही गोष्ट त्यांनी 'भवनिरोधा जातिनिरोधो' या वचनांत गोवून दाखविली आहे.

मग आतां हा भव चुकावयाचा कसा ? भव होतो, त्याला कारण सुखासक्ति–सुखवासना–मधुर सुखेच्छा हें होय. याला भगवान उपादान असें म्हणतात. सुखवेदनांवरील आसक्ति–प्रेम–वासना–यामुळें भव होतो. 'या वेदनासु नंदि तदुपादानं'–वेदनांवरील आसक्ति याला उपादान असें म्हणतात (मज्झिमनिकाय ३८–१४). तेव्हां वेदनांवरील आसक्ति, प्रेम म्हणजे सुखेच्छा–सुटली तर भव चुकतो. म्हणून 'उपादान निरोधा भवनिरोधो' असें भगवंतांनी घोषित केलें.

पण हें उपादान–ही विषयासक्ति–सुटावयाची कशी ? ती कांहीं अशी चुटकीसरशी सुटणार नाहीं. कारण या उपादानामागें फार मोठी शक्ति उभी आहे. तिचा पाडाव केल्याशिवाय हें उपादान–हें विषयप्रेम–हा प्रापंचिक मोह–उखडला जाणारा नाहीं. आणि ती शक्ति म्हणजे कोण ?, तर ही तृष्णा ! कामभोगेच्छा ! विषयभोगलालसा ! या तृष्णेमुळेच–सुखेच्छेमुळेच–हा पुरातन संसारवृक्ष पालवला व फोंफावला आहे. हेंच निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे तृष्णा–विषयसुखभोगेच्छा–हेंच संसारवृक्षाचें मूळ आहे ! आणि त्या मुळाला अविद्येचें पाणी सतत मिळत असल्यामुळें ती इतकी मस्तावली आहे. हें अविद्येचें पाणी–तृष्णेचें मूळ–उखडून बाहेर फेकून दिलें नाहीं, तर हा संसार-वृक्ष वठून जाण्याची मग आशाच नको. आणि तो जर वठून जाणार नाहीं, तर मनुष्याच्या मागें लागलेलें हें भवचक्र–हा जन्ममृत्यूचा फेरा–ही दुःखपरंपरा–मग कांहीं करूनहि सुटणार नाहीं व चुकणार नाहीं आणि कोणाच्या ब्रह्मदेवालाहि तें चुकवितां येणार नाहीं ! म्हणून भवचक्रांतून सुटण्यासाठीं तृष्णेचा निरोध–उच्छेद–हा केलाच पाहिजे. तरच उपादानाचा निरोध–नाश होतो. हें गोष्ट भगवंतांनी प्रतीत्यसमुत्पादांत 'तण्हानिरोधा उपादान-निरोधो' ह्या वचनांत उद्धृत करून ठेविली आहे.

लुटमार, संप–सत्याग्रह इत्यादिकांचा सुळसुळाट माजला आहे, त्या सर्वांना फूस देणारी ही महामाया तृष्णा पूतनाच होय ! हिला नामोहरम करणे हें कांहीं सोपें काम नव्हे ! वैदिक ऋषी झाले तरी इच्या नांवानें सारखे खडे फोडीतच आहेत ! 'दुःसाध्यो वासनात्यागो' असें श्रीवसिष्ट महर्षि श्रीरामचंद्रास उपदेश करतांना स्पष्ट सांगत आहेत ! मग या राक्षसीचें निर्दालन करावयाचें कसें ? याला तोड काय ? पण समाधानाची गोष्ट ही कीं यालाहि भगवान बुद्धांनी तोड–उपाय–सांगितला आहे. तो म्हणजे वेदना विरोध ! तृष्णेला चैतन्य देणारी मायकूस म्हणजे ही वेदना ! सुखसंवेदना ! तृष्णेला इतराप्रमाणेंच आदि म्हणजे जन्म आहेच. जन्म म्हटला की तेथें नाश–अंत–हा ठेवलेलाच. अर्थात् तिलाहि अंत आहेच आणि तिचा जर नाश करावयाचा तर तिला जेथून अंकुर फुटतात, ती जागाच खणून काढली पाहिजे. म्हणजे तिला जन्म देणाऱ्या वेदनेचा नायनाट केला पाहिजे. तरच तृष्णेची चळवळ गारठून ती जेथल्या तेथें आखडून पडेल ! हें मर्म भगवंतानी जाणून मुमुक्षूला उपदेशिलें कीं 'वेदनानिरोधा तण्हा निरोधो'

१ वेदनांचा निरोध झाला म्हणजे तृष्णेचा खेळ थंड पडतो असें भगवंतांनी सांगितलें, तें मान्य केलें, तरी पुढें मग हा प्रश्न उद्‌भवतो की, या वेदनेचा निरोध साधावयाचा कसा ? या प्रश्नाचा निकाल करावयाचा झाला तर ती कां उद्‌भवते, याचा छडा घेतला पाहिजे. बुद्धांनी तो घेतला आणि सांगितलें कीं वेदनांचें मर्मस्थान स्पर्शांत आहे. स्पर्शाला अडसर घातला कीं, वेदनेचा अवतार संपलाच ! अर्थात् वेदनांचें उगमस्थान स्पर्शांत आहे. म्हणजे बाह्यजग व त्यांतील पदार्थ आणि इंद्रियें हीं एकत्र येऊन त्यांचा संबंध–संयोग–घडला म्हणजे त्याला स्पर्श असें म्हणतात. आणि या स्पर्शामुळें–इंद्रियें व विषय यांच्या संपर्कामुळें–त्या पदार्थांचें जें सुखदुःखात्मक ज्ञान होतें, त्या ज्ञानाला वेदना अशी संज्ञा आहे. आणि हें ज्ञान स्पर्शामुळें होत असल्यामुळें, त्याचा निरोध झाला म्हणज वेदनांचा-हि निरोध होतो. म्हणून भगवान म्हणाले की 'फस्सनिरोधा वेदना निरोधो.'

पण वरील चमत्कार घडून यायला स्पर्शाचा निरोध झाला पाहिजे. तो व्हावयाचा तर जगाचा संबंध सुटला पाहिजे. आणि त्यासाठीं इंद्रियांचा निरोध अवश्य आहे. कारण स्पर्शज्ञान होण्यास इंद्रियांची आवश्यकता आहे. त्यांचा निरोध झाला म्हणजे स्पर्शाचा खेळ बंद पडतो. म्हणून भगवान उद्गारले की ' इन्द्रियनिरोधा फस्सनिरोधो '

याप्रमाणें स्पर्शांचा निरोध साधावयास इन्द्रियांचा निरोध करणें अवश्य असलें तरी इन्द्रियांची उचलबांगडी करावयाची कशी ? तें साधलें नाहीं तर वरील सर्व गोष्टींवर विरजण पडणार. मग काहींच साधावयाचें नाहीं. इन्द्रियें मोकाट सुटलीं म्हणजे स्पर्शाला चैतन्य लाभतें. स्पर्श चुळवळू लागला म्हणजे वेदना नाचूं लागतात. वेदनांच्या साम्राज्यांत तृष्णेची चंगळ होते. याप्रमाणें वरपर्यंत असेंच नाटक रंगतें. तेव्हां हा सर्व धांगडधिंगा थांबवावयाचा तर इन्द्रियनिरोध साधला पाहिजे. या इन्द्रियांचा अस्त झाला म्हणजे त्याच्या पुढची सर्व परंपरा मग आपोआपच कोलमडून पडते !

आतां या इन्द्रियांचा निरोध साधावयास काय केलें पाहिजे, या विषयीं भगवान असें सांगतात की, या इन्द्रियांचें अधिष्ठान जें शरीर–नामरूप–त्या नामरूपाचा निरोध केला पाहिजे. म्हणजे त्यांचा आधारच उखडून काढला पाहिजे. असें झालें म्हणजे मग त्यांना आसरा राहत नाहीं. अर्थात् तीं निरुद्ध होतात. हीं गोष्ट ' नामरूप निरोधा सळायतन निरोधो ' या वचनांत ग्रथित करून ठेविली आहे.

यानंतर पुढचा प्रश्न असा उद्‌भवतो कीं, शरीर म्हणजे नामरूप चुकवावयाचें कसें ? त्याचें समाधान असें कीं, त्यासाठीं विज्ञानाचा निरोध अवश्य आहे. या विज्ञानामुळेंच पंचस्कंधात्मक नामरूपाची उत्पत्ति आहे. जोपर्यंत विज्ञान नष्ट होत नाहीं, तोपर्यंत नामरूपाची परंपरा नष्ट होत नाहीं. अर्थात् विज्ञान हेंच नामरूपाला जन्म देणारें आहे. म्हणून नामरूपाचा निरोध साधावयाचा तर विज्ञानाचा निरोध अवश्य आहे ही गोष्ट ' विञ्ञाणनिरोधा नामरूपनिरोधो ' या वचनांत गोवून दाखविली आहे.

' तेव्हां या विज्ञानाचा निरोध साधावयाचा तर संस्काराचा निरोध अवश्य आहे. संस्कार म्हणजे संसारोत्पादक कर्म–सकामकर्म–एक प्रकारची पूर्व जन्मातील विशिष्ट मनोघटणा. अर्थात् संस्काराचा निरोध झाला म्हणजे विज्ञान निरुद्ध होते. म्हणून 'संस्कारनिरोधा विञ्ञाणनिरोधो' असें म्हटलें आहे.

संस्काराची उत्पत्ति अविद्येमुळें होत असल्यामुळें अविद्येला घालविली म्हणजे संस्काराचे चाळे बंद पडतात आणि संस्कार निरुद्ध झाला म्हणजे पुढील सर्व अनर्थास मूठमाती मिळते. पण ही अविद्या घालवावयाची कशी ? तिच्यामुळेच सर्व संसाराचा पसारा माजला आहे. आणि सर्व-संसारदुःखाला कारणहि तीच आहे व मनुष्याच्या सर्व दुर्गतीला जबाबदारहि तीच आहे !

' या काचि ' मा दुग्गतियो अस्मिंलोके परम्हिच ।
अविञ्जामूलका सब्बा इच्छालोभसमुस्सया ॥ '

( इति वृत्तक २–२–३ )

भावार्थ– या लोकीं व परलोकीं ज्या कांही दुर्गती आहेत–म्हणजे दुःख आहे–तें सर्व अविद्यामूलक आहे. आणि त्याची उत्पत्ति इच्छा–लोभ–मोहामुळें आहे. अर्थात् सर्व अनर्थाचें मूळ म्हणजे ही अविद्या.

या अविद्येचा नाश झाल्याशिवाय संसाराचें चक्र चुकत नाहीं. तिचा नाश झाला तरच संसारनाश आणि संसारनाश म्हणजे दुःखनाश ! हें सर्व घडून येईल. पण केव्हा ? अविद्येचा नाश झाल्यावर. पण तें तितकें सोपें नाहीं. या अविद्येचा नाश महा कठीण आहे. त्याला फार मोठी तपश्चर्या लागते. राग–द्वेष–मोहादि सर्व अकुशल मनोवृत्तींना समूळ फाटा द्यावा लागतो. आणि विषयसुखासाठीं पूर्ण. वैराग्यवृत्ति अंगी बाणून, शास्त्रोक्त अष्टांगिक मार्गाचें अवलंबन करून, सत्यज्ञान–निर्वाणज्ञान–करून घेतलें पाहिजे. तरच अविद्येचा नाश होईल. आणि अविद्येचा नाश झाला म्हणजे हें भवचक्र सुटून मनुष्य नित्यानंदांत–परमसुखांत–शाश्वत शांति समाधानांत–विलीन होऊन जातो ! हेंच जिज्ञासूचें–मुमुक्षूचें–अंतिम ध्येय ! हीच परमगति !! बुद्ध भगवंताचें निर्वाण तें हेंच !!!

बुद्ध भगवंताचें अंतिम ध्येय साधण्याचें–निर्वाण गांठण्याचें–श्रेष्ठ तत्त्वज्ञान तें हेंच. हें प्रतीत्यसमुत्पाद ! हें ज्ञान झालें म्हणजे मनुष्य संसारमुक्त होतो. मग त्याला जन्महि नाहीं, मरणहि नाहीं ! दुःखहि नाहीं, क्लेशहि नाहीं ! सर्वत्र आनंद, समाधान व शांति ! ! हा सर्व ज्ञानाचा प्रभाव आहे ! ! ! 'य तद्विदुरमृतास्ते भवन्ति' किंवा 'ज्ञानेन सर्वदुःखानां विनाश उपजायते' ही वैदिक धर्माची शिकवण बुद्ध भगवंतानीहि स्वीकारली आहे.

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून प्रतीत्यसमुत्पादाचें स्वरूप व तत्त्वज्ञान याची वाचकांना आतां थोडी बहुत ओळख झाली असेल. मनुष्याला दु:ख कां व कसें होतें, व तें कसें चुकतें व चुकवितां येतें, याची सोपपत्तिक विचारपरंपरा दाखविणारें जे तर्कशुद्ध तत्त्वज्ञान, तें बुद्ध भगवंतांनी या प्रतीत्यसमुत्पादांत उत्तम तऱ्हेनें, सुसंगत पद्धतीनें व मोठ्या चातुर्यानें गोंवून दाखविलें आहे. पण हें सामान्यजनांस सहज समजण्यास तितकेंसें सोपें नाहीं. तें फक्त तीक्ष्ण व सूक्ष्म बुद्धीच्या चतुरस्र पंडितांनाच अजमावण्यास सुलभ व सुगम आहे. हें आम्हींच म्हणतो असें नव्हे. तर खुद्द भगवानच तसें स्पष्ट बोलून दाखवितात. हें पहा तें त्यांचें प्रत्यक्ष वचनच. ते याविषयी भिक्षूंना सांगतात तें असें:–

'अथ खो भिक्खवे विपस्सिस्स भगवतो अरहतो सम्मासम्बुद्धस्स एतद' होसि–' अधिगतो खो मे अयं धम्मो गंभीरो दुद्दसो दुरनुबोधो सन्तो पणीतो अतक्कावचरो निपुणो पण्डितवेदनीयो। आलयरामा खो पना' यं पजा आलयरता आलयसम्मुदिता। आलयरामा खो पन पजाय आलयरताय 'आलयसम्मुदिताय दुद्दसं इदं ठानं यदिदं इदप्पच्चयता पटिच्चसमुप्पादो। इदं पि खो ठानं दुद्दसं यदिदं सब्बसङ्खारसमथो सब्बूपधिपटिनिस्सग्गो तण्हक्खयो विरागो निरोधो निब्बाणं। अहञ्चेव खो पन धम्मं देसेय्यं परे च मे न आजानेय्युं। सो मम' स्स किलमथो सा ममस्स विहेसा' ति।'
( मज्झिमनिकाय ८५-२४ )

भावार्थः– मी हा गंभीर, दुर्दर्श्य, दुर्ज्ञेय, शांत, उत्तम, तर्कानें अप्राप्य, निपुण व पंडितांनाच समजण्यास योग्य, असा धर्म प्राप्त करून घेतला आहे. पण काय करावें ? ही जनता पाहिली तर तो विषयवासनेंत पूर्ण रंगून गेलेली, विषयसेवनांत आकंठ निमग्न झालेली, विषयभोगांतच अखंड आनंद मानणारी अशी आहे ! इंद्रियतर्पणांत रत झालेल्या या देहोपासक–जडमूढ–जनतेला हा कार्यकारणरूपी समुत्पाद समजणें मोठें कठीण आहे. तो सामान्य जनतेला दुर्ज्ञेय आहे. सर्व संस्कारांचें शमन, सर्व उपाधीचा त्याग, तृष्णा क्षय, वैराग्य, दुःखनाश, व नित्यानंदरूपी निर्वाण हें समजणें त्यांस कठीण आहे. मी जर या लोकांना धर्मोपदेश केला तर तो त्यांना समजणार नाहीं, पटणार नाहीं. आणि मला मात्र व्यर्थ क्लेश होतील. म्हणून मला चिंता वाटते व विषाद होतो.' असें म्हणून त्यांनी ही पुढील गाथा म्हटली, ती हीः–

किच्छेन मे अधिगतं हलं दानि पकासितुं,
रागदोसपरेतेहि ना' यं धम्मो सुसम्बुद्धो।
पटिसोतगामिं निपुणं गंभीरं दुद्दसं अणुं
रागरत्ता न दक्खन्ति तमोक्खन्देन आवटा' ति ॥

( मज्झिमनिकाय, ८५-२४ )

भावार्थः– हा धर्म मी पुष्कळ कष्ट सोसून प्राप्त करून घेतला आहे. तो जगांत तसा प्रकाशित करण्यासारखा नाहीं. जे राग द्वेषादिकांनी दूषित आहेत, अशा मूढ जनांस हा धर्म कळणें हें सुकर नाहीं. कारण हा माझा धर्म गंभीर आहे. त्याची धार उलट दिशेनें वाहणारी आहे. तो समजण्यास मोठा कठीण आहे. तो अति सूक्ष्म आहे. निपुण आहे. समजण्यास मोठा कठीण आहे असा हा धर्म विषयमग्न व अज्ञानानें गुरफटलेल्या जनतेस समजणें शक्य नाहीं. छे, तें शक्यच नाहीं !

यावरून बुद्धाचा धर्म झाला तरी वैदिक तत्वज्ञानाप्रमाणेंच सूक्ष्म व गहन असून, समजण्यास तितकाच दुर्बोध व म्हणून अत्यंत कठीण आहे.

'गंभीरो चायं, आनंद, पटिच्चसमुप्पादो, गम्भीरावभासो' (वि. म. १७-११) असा सूर शेवटीं खुद्द भगवंतानाच काढणें भाग पडले! आणि पुढें पुढें बौद्ध आचार्यांना व पंडिताना तो विषय लोकांना समजावून सांगतांना शेवटी हात टेकावे लागले!! अखेर त्यांनी पुढील उद्गार काढून त्या व्यूहातून हे झाडून सगळे मोकळे झाले आहेत. ते त्यांचे उद्गार हे असेः—

'सच्चं सतो पटिसन्धि पच्चयकारमेवच। दुद्दसा चतुरो धम्मा, देसेतुञ्च सुदुक्खरा' ति' (वि. म. १७-२५)

भावार्थः— सत्य म्हणजे निर्वाण, आणि त्याचप्रमाणें व त्याबरोबरच पुरुष, पुनर्जन्म (विज्ञान) व प्रतीत्यसमुत्पाद हे चार धर्मविषय असे आहेत कीं, ते समजण्यास अत्यंत दुर्बोध व समजाऊन सांगण्यास व शिकविण्यास तर फारच कठीण आहेत!!! यावरून हें उघड होतें कीं वैदिकांच्या तत्त्वज्ञान क्षेत्रांतहि अखेर अखेर जशी 'नेति नेति' म्हणण्याची पाळी येते, तद्वतच वरील विषयावर विवेचन करीत असतां बौद्ध आचार्यांनाहि तशीच री ओढण्याचा शेवटीं प्रसंग येतो!! पण ज्या महाभागाच्या अंतःकरणांत त्यांचा प्रकाश उजळला आहे, ज्यांना त्यांचें यथार्थ ज्ञान झालें आहे, अशा क्षीणास्रव अर्हतांची मात्र अविद्येच्या अंधकारांतून सुटका होऊन, त्यांचे सर्व संसारपाश गळून पडतात. त्यांच्या सर्व आशा आकांक्षा लुप्त होऊन, अंतःकरणांत सत्यज्ञानाचा मंगल प्रकाश उजळलेला असल्यामुळें कारण व कार्य, हेतु व धर्म, यांची ओळख पटून मारसेनेचा उच्छेद करून टाकण्यास ते समर्थ होतात आणि आकाशांतील सूर्याप्रमाणें तळपूं लागतात!!



# प्रकरण ८ वें

## प्रतीत्यसमुत्पादाचें तात्त्विक पृथक्करण

दुःख कां व कसें उत्पन्न होतें व त्याचा निरोध कसा होतो, याचा येथपर्यंत विहंगमदृष्ट्या विचार केला. आतां या प्रतीत्यसमुत्पादाचें पृथक्करण केल्यास काय दिसून येतें याचा थोडासा कानोसा घेऊन मग पुढच्या मार्गास लागूं. ही जी बौद्ध तत्त्वज्ञानाची सांखळी आहे, ती एकंदरीत बारा दुव्याची असून, तिच्यांत तीन जन्मांचा समावेश होतो. शिवाय त्याचे वीस आकार, तीन जन्म, चार संक्षेप, तीन वर्ते (संधि) व दोन मूलें असे आणखी पोटभेद आहेत. हा भाव अभिधम्मांत पुढील वचनांत गोवून दाखविण्यांत आला आहे.

> ' तथा तयो अद्धा, द्वादसांगानि, वीसताकारा, ति संधि,
> चतु सङ्खेपा, ती ति वट्टे, द्वे मूलानि च वेदितब्बानि ॥'
> ( अभिधम्म, १-८-३-५ )

तीन जन्म म्हणजे पूर्व जन्म, प्रस्तुत जन्म व भावी जन्म याप्रमाणे तीन जन्माचा येथें विचार करण्यांत आला आहे. अविद्या, संस्कार, विज्ञान, नामरूप, षडायतन, स्पर्श, वेदना, तृष्णा, आसक्ति, गर्भवास, जन्म व जरामरण, हीं अशीं त्याचीं बारा अंगें आहेत, या बारा अंगांपैकी पहिलीं दोन म्हणजे अविद्या व संस्कार हीं दोन पूर्वजन्मास अनुलक्षून आहेत. शेवटचीं दोन म्हणजे जाति व जरामरण हीं दोन भावीजन्मास लागूं आहेत. व मधलीं आठ म्हणजे विज्ञानापासून भवापर्यंत प्रस्तुत जन्माला संबंधक आहेत, असें या पुढील वचनावरून सिद्ध होतें. ' अविज्जा संखारा अतीतो अद्धा, जाति जरामरणं अनागतो अद्धा, मज्झे अट्ठ पच्चुप्पन्नो अद्धा ति तयो अद्धा याप्रमाणे हीं बारा अंगें.तीन जन्मास व्यापून आहेत. या सर्वांची कल्पना वाचकांस पुढील कोष्टकावरून सहज येण्यासारखी आहे.

## प्रतीत्यसमुत्पादाचें कोष्टक

| बाराअंगें | तीन जन्म | चार विभाग व वीस आकार | तीनसंधि |
|---|---|---|---|
| १ अविद्या<br>२ संस्कार | पूर्वजन्म | विभाग १<br>अतीत कर्मभव<br>१ अविद्या<br>२ तण्हा<br>३ उपादान<br>४ भव<br>५ संस्कार | |
| ३ विज्ञान<br>४ नामरूप<br>५ षडिन्द्रियें<br>६ स्पर्श<br>७ वेदना<br>८ तृष्णा<br>९ उपादान<br>१० भव | प्रस्तुत जन्म | विभाग २<br>पच्चुप्पन्न विपाक-भव<br>६ विज्ञान<br>७ नामरूप<br>८ षडिन्द्रिये<br>९ स्पर्श<br>१० वेदना | १ |
| | | विभाग ३<br>पच्चुप्पन्न कर्म-भव<br>११ अविद्या<br>१२ तृष्णा<br>१३ उपादान<br>१४ भव<br>१५ संस्कार | २ |
| ११ जाति<br>१२ जरामरण | भावीजन्म | विभाग ४<br>अनागत विपाक-भव<br>१६ विज्ञान<br>१७ नामरूप<br>१८ षडिन्द्रियें<br>१९ स्पर्श<br>२० वेदना | ३ |

या वरील कोष्टकांवरून नजर फिरविली तर त्याच्या तत्वप्रणालींत पूर्वजन्म, प्रस्तुत जन्म व भावी जन्म याप्रमाणें तीन जन्मांचा समावेश होतो, हें स्पष्ट होतें. तसें त्या तीन जन्माचे चार भाग पाडण्यांत आले आहेत, ते येणें प्रमाणे :–

(१) अतीत कर्म–भव–म्हणजे पूर्वजन्मातील कर्मसंग्रह. त्याचा समावेश प्रतीत्यसमुत्पादातील पहिल्या दोन अंगांत म्हणजे अविद्या व संस्कार या दोन दुव्यांत करण्यांत आला आहे. तत्वतः या दोन अंगात मधली तीन अंगें म्हणजे तृष्णा वेदना व भव यांचाहि समावेश होतो. याला वैदिक धर्मांत संचित असें म्हणतात.

(२) प्रत्युत्पन्न विपाक–भव–या भागांत मागच्या जन्मीं केलेल्या कर्मांचा प्रस्तत जन्मातील विपाक म्हणजे फलभोग. याला वैदिक धर्मांत प्रारब्ध हें नांव आहे. अर्थात् हा विपाक विज्ञान, नामरूप, षडिन्द्रियें, स्पर्श, वेदना यांचा मिळून झालेला असतो असें बौद्ध मानतात.

(३) प्रत्युत्पन्न कर्म–भव–म्हणजे प्रस्तुत जन्मांत आचरलेलें कर्म कीं जें भावीजन्मास कारण होतें. यांत तीन अंगांचा म्हणजे तृष्णा, उपादान व भव यांचा अंतर्भाव होतो. आणि वस्तुतः त्यांत अविद्या व संस्कार यांचाहि संबंध असतोच. यास वैदिक धर्मांत क्रियमाण असें नांव आहे.

(४) अनागत विपाक–भव :–म्हणजे प्रस्तुत जन्मांत केलेल्या कर्मांचा भावी जन्मांत होणारा विपाक. यांत शेवटचीं दोन अंगें–जाति व जरामरण–यांचा समावश होतो. अर्थात् या दोन अंगांचा विज्ञान, नामरूम, षडिंद्रियें, स्पर्श, व वेदना यांच्याशी संबंध असतोच.

या प्रमाणें प्रतीत्यसमुत्पादाचे चार भाग होतात. पूर्व जन्माचा एक, प्रस्तुत जन्माचे दोन व भावीजन्माचा एक असे हे चार विभाग असून, त्यास संक्षेप (संखेप) अशी संज्ञा आहे. याप्रत्येक विभागांत पांच अंगांचा समावेश होत असून त्यास आकार हें नांव आहे. अर्थात् या चार विभागांत मिळून वीस आकार होतात.

त्याचप्रमाणें या चार विभागाच्या क्रमांत तीन संधि आहेत. (१

पूर्व जन्मी केलेल्या कर्माचा प्रस्तुत विपाक (२) प्रस्तुत जन्मातील विपाक व प्रस्तुत कर्म. (३) प्रस्तुत कर्म व त्याचा भावी जन्मातील विपाक.

तीन चक्रें ( वट्टं ) तीं हीं:– क्लेशचक्र यांत अविद्या, तृष्णा व उपादान, हीं येतात. (२) कर्मचक्र–यांत जन्मोत्पादक कर्माचा (कम्म–भवाचा) समावेश होतो (३) विपाक चक्र–यांत जन्मोत्पादक कर्मफलाचा अंतर्भाव होतो.

दोन मूलें–म्हणजे अविद्या व तृष्णा–हीं होत. यांच्यामुळेंच संसार वाढतो. व मनुष्यास पुनः पुनः तीन लोकांपैकीं कोणत्यातरी एका लोकांत जन्म घ्यावा लागतो. जन्म म्हटला कीं तेथें जरामरण, दुःखक्लेश इत्यादि परंपरा आलीच. आणि त्याची उत्पत्ति व नाश याचें उपपादन प्रतीत्य-समुत्पादांत सुसंगतपणें करण्यांत आलें असून, बौद्धधर्माचें तें छोटेसें तत्त्वज्ञानाचें उपनिषद् म्हटलें तरी चालेल.

यदनिच्चं तं दुक्खं, यं दुक्खं तदनत्ता, यदनत्ता तं नेतंमम, नेसो हमस्मि, न मेसो अत्ताति। एवमेतं यथाभूतं सम्मपञ्ञाय दट्ठब्बं॥

भावार्थः– जें अनित्य तें दुःख, जें दुःख तें अनात्मा, जें अनात्म तें माझें नव्हे, मी तो नव्हे, तो माझा आत्मा नव्हें. या प्रमाणें हें तत्त्व सम्यक् प्रज्ञेनें यथार्थ जाणावें.

( खंद संयुत, व २ सु. ४ )



## प्रकरण ९ वें

# अत्ता-अनत्ता-वाद

आतां या प्रकरणांत बुद्धधर्मातील मुख्य वदाचा जो अत्यंत महत्वाचा पण तितकाच वादग्रस्त विषय आहे, त्याचा यथार्थतः परामर्श करण्याचें आम्ही येथें योजिलें आहे. पण असें करतांना प्रथम वैदिकांचा आत्मा कसा आहे, त्याचे स्वभावगुण काय आहेत, याची ओळख झाल्याशिवाय बुद्धांचा अनात्मा समजणें सुलभ व सोपें नाहीं. म्हणून वैदिकांचा आत्मवाद व बुद्धाचा अनात्मवाद या दोहोंचा एकत्र विचार केल्यास विषयप्रतिपादनाच्या दृष्टीनें व वाचकांना तो सहज आकलन करण्याच्या दृष्टीनें सोयीचें होईल. म्हणून आम्ही या विषयाची रूपरेखा व मांडणी त्या पद्धतीनें करूं इच्छितो. तसें केल्यास बुद्ध भगवंताचा अनात्मवाद ( अनत्तावाद ) हा वैदिकांच्या आत्मवादाशी सुसंगत आहे कां विसंगत आहे, याची वाचकांस यथार्थ कल्पना करतां येईल. असें करतांना आम्हीं फक्त बुद्धाचींच मूळ वचनें व वैदिक ऋषींचीं उपनिषद्वचनें एवढींच हिशोबांत घेऊन, त्या आधारें व त्यारोखानें प्रस्तुत विषयाची छाननी करूं इच्छितो.

पण पुढें जावयाच्या आधीं कांही अंशी अप्रस्तुत पण विषय समजण्यास उपयुक्त अशा कांही अवांतर गोष्टींचा येथें थोडासा परामर्श करणें हें आम्हांस योग्य व जरूर दिसतें. कारण त्यापासून बुद्धाचें खरें अंतरंग समजण्यास फार मोठा उपयोग होणार आहे. प्रथम म्हणजे हें कीं, बुद्धाची मुख्य व महत्वाची अशी जो शिकवण आहे, ती 'त्रिपिटिक' नांवाच्या ग्रंथांत अंतर्भूत झालेली आहे. अर्थात् हा 'त्रिपिटिक' ग्रंथ म्हणजे बुद्ध धर्माचा महावेद असून, तो त्या धर्माचा मूलाधार आहे, असें मानण्यांत येतें. पण तो पालीभाषेंत असल्यामुळें त्या भाषेचें ज्ञान असल्याशिवाय त्याचें खरें हृद्‌गत समजणें शक्य नाहीं. भाषांतरावरून, विशेषतः इंग्रजी ग्रंथावरून, त्याचा नीट बोध होईल, असें नाहीं. पण हा जो ग्रंथ आहे, त्याची जन्मकथा समजून घेतल्याशिवाय त्यावर अंधविश्वास ठेवणें हें चिकित्सक बुद्धीला पटणार व मानवणार नाही, म्हणून त्याचा येथे थोडक्यांत इतिहास देतो.

हा जो 'त्रिपिटिक' ग्रंथ आहे, तो बुद्धकालीच म्हणजे बुद्धाच्या हयातींतच व त्यांच्या प्रत्यक्ष अध्यक्षतेखालींच तयार झाला, असा जर कोणाचा समज असेल, तर तो खरा नसून, सपशेल चुकीचा आहे, हें सकृद्दर्शनीच येथें सांगून ठेवितो. बुद्धाची कोणतीच शिकवण त्यांच्या हयातींत ग्रंथरूपानें लिपिबद्ध करून ठेवण्यांत आलेली नाहीं. प्रथम ती स्मृतिरूपानें राखून ठेवण्यांत आलेली असून, पुढें बुद्ध परिनिर्वाण पावल्यावर जवळ जवळ पांचशें वर्षांनीं सिंहलद्वीपांत ती पाली भाषेंतून प्रथमतः ग्रथित करून ठेवण्यांत आली. तेवढ्या प्रदीर्घ कालांत ती शिकवण अक्षरशः जशीच्या तशीच नमूद करून ठेवण्यांत आली, त्यांत घुसडा घुसड व काटाकाट अगर अदलाबदल मुळीच झालेला नाहीं, असें समजणें हें मात्र अमळ धाडसाचें होईल.

तेव्हां तो ग्रंथ सोळा आणे बुद्धाच्या खास उपदेशाचा जशाचा तसा शब्दशः आदर्श आहे, असें धरून चालणें अनुभवाच्या दृष्टीनें समंजस होणार नाहीं. त्यांत प्रक्षिप्त भाग नसेलच अशी हमी देणें, हें हि धाडसाचेंच ठरेल. त्रिपिटिकांत प्रत्येक सुक्ताच्या आधी 'एवं मे सुतं' असा जो उल्लेख आढळतो, त्यावरून तो ग्रंथ स्मृतिरूपानें त्यावेळीं राहिलेल्या गोष्टींचा व तत्कालीन बौद्धाचार्यांचा विचारप्रणालीचा-बुद्धाचा नव्हे-खास द्योतक आहे, एवढें वाचकांनी लक्षांत ठेविलें म्हणजे झालें.

शिवाय दुसरी गोष्ट म्हणजे ही कीं, बुद्धाच्या शिकवणीविषयीं त्यांच्या हयातींतच त्यांच्या शिष्यवृंदांत मतभेद माजला होता व बुद्ध त्य संघातील कांहीं भिक्षूंवर रागावून, 'हे मूर्ख व मायेफिरू आहेत' असें म्हणून संघातून निघून कौशांबी सोडून श्रावस्तीस निघून गेले होते, (महावग्ग, १०). त्यांचा एक प्रमुख शिष्य देवदत्त हाहि अशाच कांहीं मतभेदामुळें संघातून फुटून बाहेर पडला होता. त्याचप्रमाणें बुद्धाच्या परिनिर्वाण काळीं संघात धर्माविषयी मतभेद व आचारभेद माजले होते ही गोष्ट त्या संघातील एक भिक्षु जो सुभद्र नांवाचा होता, त्याच्या भाषणावरून स्पष्ट होते.

पुढें बुद्धपरिनिर्वाणानंतर तर त्यांच्या भिक्षुसंघांत बरेच मतभेद, तंटे बखेडे व बजबजपरी माजून राहिली होती, म्हणून बुद्धाच्या निर्वाणा नंतर लगेच राजगृहांत काश्यपाच्या अध्यक्षतेखालीं पहिली संगीति भरून तत्कालीन मतभेदाची चौकशी होऊन, ते कसेबसे मिटविण्यांत आले. पण ते पूर्णतया मिटविण्यांत आले नसल्यामुळें तो मतभेदाग्नि वरून शांत झालासा दिसला, तरी आंतून तो धुसमतच राहिला आणि मधून मधून उचल खाऊन पेट घेतच चालला आणि त्यामुळें भिक्षुसंघांत बुद्धाच्या उपदेशा-विषयीं मतभेद वाढून, त्याला अनेक फाटे फुटले. हा सर्व इतिहास आम्ही पुढें परिशिष्टांत देणारच आहो. आतां येथें सांगावयाचा मुद्दा इतकाच कीं भगवान बुद्धाच्या धर्मोपदेशाविषयीं प्रथमपासूनच अनिश्चितपणा बोकाळला असल्यामुळें तो नेहमी त्यांच्याच भिक्षुसंघांत वादाचा विषय होऊन राहिला होता, एवढी गोष्ट वाचकांनी लक्षांत ठेविली म्हणजे आमचा पुढील मार्ग मोकळा झाला. असो.

आतां प्रस्तुत मुद्यावर यावयाचें तर बुद्ध भगवानाचें अनात्म–स्वरूप कशा प्रकारचें आहे व वैदिकांचा आत्मा कसा आहे, हें फार बारकाईनें तपासून व छाननी करून पाहिलें पाहिजे. त्याशिवाय बुद्धाचा अनात्मा व वैदिकांचा आत्मा यांचें यथार्थ स्वरूप लक्षांत भरण्यासारखें नाहीं. आता प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, वैदिकांची समजूत अशी आहे, की बुद्ध हे नास्तिक आहेत म्हणजे ते आत्मा मानणारे नाहींत. अर्थात् वैदिकांचा आत्मा त्यास मान्य व ग्राह्य नाहीं. याचाच अर्थ असा कीं ते आस्तिक नाहींत. पाखंडी आहेत ! आणि त्यांचा धर्महि तसाच आहे !

होय, कांही अंशी आज तशी गोष्ट आहे, हें खरें. त्या धर्माची वरवर चांचणी करणारास किंवा बुद्धोत्तरकालीन बौद्धपंडितांचें त्या वरील भाष्य व टीकाग्रंथ चाळून पहाणारास तो आक्षेप खरा असल्याचा भास होतो, हें कबूल करणें भाग आहे. पण जरा खोल व सूक्ष्म विचार केला व बुद्धवचनांवर चौफेर दृष्टि फिरविली तर सूज्ञ, समंजस व समतोल दृष्टीच्या मनुष्याला आपलें मत खरोखर बदलावें लागेल, अशी आमची प्रामाणिक समजूत आहे. कां व कसें हें पुढील विवेचनावरून कळून येईल.

बुद्ध भगवंताचा प्रामुख्यानें मिरवणारा जो 'अनत्तावाद' त्याची यथार्थ कल्पना येण्यास वैदिक ऋषी आत्मा कशाला म्हणतात व त्याचें लक्षण काय सांगतात, याचा प्रथम विचार केला पाहिजे. त्याशिवाय बुद्धाचा 'अनत्ता' नीटसा अंतःकरणांत उतरणार नाहीं. म्हणून वैदिक धर्म-दृष्टचा आत्म्याचें रूप व लक्षण काय व कसें आहे, हें आतां आपण थोडक्यांत पाहूं.

पण या प्रश्नांत शिरावयाच्या आधीं आत्मा या शब्दाचा अर्थ वैदिक दृष्टीनें कसा करण्यांत येतो अगर आला आहे, हें पाहणें येथें इष्ट व अगत्याचें आहे. तेव्हां आतां या 'आत्मन्' शब्दाची अर्थव्याप्ति किती तऱ्हेनें व कशा प्रकारानें करण्यांत आली आहे, हें प्रथम पाहूं. आणि मग त्या रोखानें बुद्धाच्या 'अनत्ता' वादाचा छडा घेऊं. कारण पाली भाषा ही संस्कृतोभ्दव भाषा असून, संस्कृत भाषेच्या अर्थानुरोधानेंच त्या भाषेचा व्यवहार चाललेला आहे आणि बुध्दधर्म हा झाला तरी वैदिक धर्माचेंच वहकलेलें एक फोकरूं आहे. तेव्हां त्याची विचारसरणी ही वैदिक धर्माच्या प्रांगणांतच विहार करणारी आहे, हें उघड सांगावयास नकोच. आतां फक्त 'आत्मा' याचा अर्थ संस्कृत भाषेंत कसा कसा करण्यांत येतो, अगर आला आहे, याचें थोडक्यांत दिग्दर्शन करतो.

'आत्मन्' या मूळ शब्दाचा 'आत्मा' प्रथमांत एकवचनी रूप असून, त्याचे वाचस्पति कोशांत निरनिराळे अर्थ देण्यांत आले आहेत ते असे :—

'आत्मन् ( पु. अत्–मनिण् ) (१) स्वरुपे (२) यत्ने (३) देहे (४) मनसि (५) बुद्धिस्थे निजे (६) बुद्धौ (७) अर्के (८) वन्हौ (९) वायौ (१०) जीवे (११) ब्रम्हणि च' याप्रमाणें आत्मन् या शब्दाचे प्रसंगपरत्वे अकरा अर्थ देण्यांत आले असून, त्या सर्वांचा विचार येथें कर्तव्य नाहीं. प्रस्तुत विषयाला उपयुक्त व उपकारक होतील असे '(१) स्वरूपे (३) देहे (४) मनसि (६) बुद्धौ (१०) जीवे व (११) ब्रम्हणि च' हे असे सहा अर्थच विचारणीय आहेत. तेव्हां आतां याचा कोठें व कसा अर्थ

लावण्यांत आला आहे, हें क्रमानें उदाहरण देऊन तद्वारा दाखवीत जातो. अर्थात् हीं सर्व उदाहरणें भगवद्गीतेतूनच घेतलीं आहेत, हें अगोदर सांगून पुढील वाटचाल करूं लागतो.

*आत्म्याचा पहिला अर्थ जो 'स्वरूपे' असा आहे, तद्बोधक वचन आहे तें असें:– 'निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः' येथें 'यत-चित्तात्मा' यांतील आत्मा याचा अर्थ 'बाह्यकार्यकरणसंघातः' असा करण्यांत आला आहे. ( भ. गी ) आतां त्याचा दुसरा अर्थ जो आहे, तो देहवाचक असून, तो अर्थ पुढील वचनांत आढळतो तो असाः– 'एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः'– येथें आत्मा याचा अर्थ देह असा आहे. ( भ. गी. द. ६–१० ) तिसरा अर्थ मनोवाचक असून, तो यापुढील वचनांत याप्रमाणें आढळतो. 'वश्यात्मना तु यततः शक्योऽवाप्तु-मुपायतः' या वचनांत आत्मा याचा अर्थ मन असा लावण्यांत आला आहे. ( भ. गी. ६–३६ ) त्याचप्रमाणें 'संशयात्मा विनश्यति' या वचनाचा अर्थ 'संशयचित्तः' असाच केला आहे. (भ. गी. चिदात्मा ४-४०) आतां ज्यावचनांत 'आत्मा' याचा अर्थ बुद्धि, व मन असा होतो, तें वचन हें असें:– 'ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना'– या वचनांत 'आत्मनि' याचा अर्थ बुद्धींत 'आत्मानं' म्हणजे चेतन स्वरूप आत्म्यास 'आत्मना' म्हणजे मनानें असा लावण्यात येतो ( भ. गी. १३–२४ ) आत्म्याचा पांचवा अर्थ जो आहे. तो 'जीवात्मा म्हणजे अंतरात्मा' असा यापुढील वचनांत केलेला आहे. 'येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथोमयि'– या वचनांत 'आत्मनि' यातील आत्मा याचा अर्थ जीवात्मा–अंतरात्मा– असाच होतो. ( भ. गी. ४–३५ ) त्याचप्रमाणें 'ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना' यांतील 'आत्मानं' याचा अर्थ 'प्रत्येक चेतनं' उर्फ 'अंतरात्मानं' असाच आहे. 'आत्मसंस्थं मनः कृत्वा' या वचनांतील 'आत्मा' शब्दाचा अर्थ अंतरात्मा असा असून 'एतदात्मन्येव वशं नयेत्' येथेंहि तोच अर्थ अभिप्रेत आहे. आतां आत्मा याचा शेवटचा व मुख्य अर्थ म्हणजे ब्रम्ह म्हणजेच परमात्मा– असा अर्थ 'उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः' या वचनांत आढळतो. हा जो दुसरा आहे त्यालाच

उत्तम पुरुष ऊर्फ पुरुषोत्तम म्हणजेच परमात्मा असे म्हणतात. आत्म्याला ब्रम्ह हें नांव 'स वा अयमात्मा ब्रम्ह' या शतपथवचनांत स्पष्टच देऊन ठेविले आहे. (बृ. २-५-१९) हे सर्व अर्थ शंकराचार्यांच्या भगवद्गीतेच्या टीका ग्रंथांत स्पष्ट दिले असून, ते सर्व येथें मननीय आहेत. आत्म्याचा मुख्य अर्थ ब्रम्ह असा असून, बाकीचे लाक्षणिक अतएव गौण आहेत. असो

आतांपर्यंत 'आत्मा' या शद्वाचें जें विवेचन केलें, तें त्याच्या पर्याय अर्थासंबंधाने झालें. पण एवढ्यानेंच भागण्यासारखें नाहीं. त्याचें रूपलक्षण व स्वभावगुण हेंहि सांगणें जरूरीचें आहे. त्याशिवाय आत्म्याची यथार्थ कल्पना येण्यासारखी नाहीं. म्हणून प्रथम वैदिक ऋषींनी आत्म्याचें जें वर्णन दिलें आहे, तें येथें मूळ स्वरूपांत सांगावयाचें म्हणजे तें असें:- 'आत्मा वा इदमग्र आसीत्' (श. प. )- आत्मा हा या विश्वोत्पत्तीच्या पूर्वी व प्रारंभीं अस्तित्वांत होता. तो या सर्व विश्वाहून मोठा तसाच स्वयंभू, जरारहित, मरणरहित, भयरहित असा ब्रम्हस्वरूप असून, 'एष महानज आत्माऽजरोऽमरो ऽमृतोऽभयोब्रम्ह' (स. वा. १४-७-२-३१), तो म्हटला तर सूक्ष्माहून अत्यंत सूक्ष्म आणि म्हटलातर मोठ्याहून अत्यंत मोठा आहे. ('अणोरणीयान्महतो महीयान्' श्वेताश्वतर ३-२०) त्याचप्रमाणें तो ब्रम्ह असून विज्ञानमय, मनोमय, प्राणमय, चक्षुर्मय, श्रोत्रमय, पृथ्वीमय आपोमय, वायुमय, आकाशमय, तेजोमय, काममय, अकाममय, क्रोधमय, अक्रोधमय, धर्ममय, अधर्ममय, सर्वमय, प्रत्यक्षमय, परोक्षमय, असा आहे.!

('स वा' अयमात्मा ब्रम्ह, विज्ञानमयो, मनोमयो, प्राणमयश्चक्षुमयः, श्रोत्रमयः, पृथ्वीमयः, आपोमयो, वायुमय, आकाशमयस्तेजोमयोऽतेजोमयः काममयोऽकाममयः, क्रोधमयोऽक्रोधमयो धर्ममयोऽधर्ममयः सर्वमयस्तद्यदेतदिदंमयोऽदोमय इति'

(श. प. १४-७-२-६)

तसाच तो सर्वप्राणिमात्रामध्यें आहे. (यः सर्वेषु भूतेषु श. प. १४-६-७-२०) पण तो तेथें लपून राहिला आहे म्हणजे

इंद्रियांना दिसत नाही. ( 'एष सर्वेषु भूतेषु गूढ:' कठ १-३-१२ ) अर्थात् तो डोळ्याला दिसत नाहीं व वाणीला वर्णन करतां येत नाहीं किंवा इतर इंद्रियांना कळण्यासारखा नाहीं ! ('न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवै:' मुंडक ३-१-८ ) तर्कानें सुध्दां तो कळणारा नव्हे ! ( 'नैषा तर्केण मतिरापनेया ' कठ १-२-९ ) कारण तो शब्दरहित, स्पर्श-रहित, रूपरहित, रसरहित, गंधरहित असा असून शिवाय तो अव्यय, नित्य, अनादि, अनंत व ध्रुव आहे.

( 'अशब्दमस्पर्शरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगन्धवच्च यत् ।
अनाद्यनन्तं महतः परं ध्रुवम्' ( कठ १-३-१५) फार काय, सर्व भूतांमध्ये तो स्थित आहे व सर्वभूतांच्या अंतर्यामी आहे, तथापि आश्चर्य हें कीं, कोणीच त्याला ओळखूं शकत नाहीं ! हीं सर्व भूतें त्याचें शरीर असून तो त्यांच्या आंत राहून त्यांचें दमन करतो. असा हा आत्मा मनुष्यांच्या अंतः करणांत राहत असून तो अमर आहे !

( 'यः सर्वेषु भूतेषु तिष्ठन् सर्वेभ्यो भूतेभ्योऽन्तरो यं सर्वाणि भूतानि न विदुर्यस्य सर्वाणि भूतानि शरीरं यः सर्वाणि भूतान्यन्तरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृतः' (श.प. १४-६-७-२०) )

असें असून, गम्मत ही कीं आजपर्यंत त्याला कोणीच पाहिला नाहीं. पण सर्वांना पाहणारामात्र तोच आहे ! त्याला कोणी जाणलें नाहीं, पण जाणणारा मात्र तोच आहे ! ('अदृष्टो द्रष्टाऽश्रुतः श्रोताऽमतो मन्ताऽविज्ञातो विज्ञाता' ( श. प. १४-६-७-३१) )याचें कारण म्हणजे हें कीं, तो डोळयाचा डोळा, कानाचा कान, मनाचें मन आहे. ('चक्षुषश्चक्षुरुत श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो मन :'( श. प. १४-७-२-२१)) अशा प्रकारचा हा आत्मा त्या आत्मतत्त्वांतच हीं सर्व भूतें, सर्व लोक, सर्व प्राण, हें सर्व जीवजात अंतर्भूत झालें आहे. !! ( 'अस्मिन्नात्मनि सर्वाणि भूतानि सर्वे देवा : सर्वे लोका : सर्वे प्राणा: सर्व एत आत्मान : समर्पिता :' (श. प.१४-५-५-१५ )) अशा प्रकारचा हा आत्मा अविनाशी असून, ( 'अविनाशी वा अरे अयमात्मा'

(श. प. १४–७–३–१५)) तदितर सर्व कांही नश्वर आहे ('अन्यदार्तम् श. प.) हा आत्मा गम्य नसून, सर्व जाणणारा मात्र तोच आहे. ('अविज्ञातो विज्ञाता' श. प. १४–६–७–३१)

हें योगीश्वर याज्ञवल्क्यांनी व इतर वैदिक ऋषींनी थोडक्यांत केलेलें आत्मवर्णन इतकें सुंदर, इतकें यथार्थ व इतकें समर्पक आहे कीं, त्यांत सूक्ष्म दृष्टीनें पाहणाऱ्यांना बुद्धाचा अनत्ता वाद व वैदिकांचा आत्मवाद दोन्ही एकत्र करून पाहिल्यास ते कसे एकमेकाचे परस्पर पूरक आहेत, हें चाणाक्ष वाचकांस स्पष्ट दिसून येईल. दोन्ही वाद भिन्न भिन्न दृष्टिकोनांतून एकच वस्तूचें वर्णन व अस्तित्व निःसंदिग्धपणें वर्णन करतात, हें कोणालाहि स्वच्छ प्रतीत होण्यासारखें आहे. वैदिकांच्या आत्मवर्णनांत बुद्धाचा अनत्तावाद बीजरूपानें गर्भित असून, बुद्धाच्या अनत्ता-वादांत वैदिकांचा आत्मवादहि सूक्ष्मरूपानें व पर्याय अर्थानें अनस्यूत आहे. मात्र तें ओळखण्यास तेवढी तीक्ष्ण व सूक्ष्म व समतोल दृष्टि पाहिजे !

वरील प्रमाणे वैदिक ऋषींनी आत्म्याचें–अर्थात् परमात्म्याचें–परब्रम्हाचें–थोडक्यांत वर्णन केलें असून, तें पर्यायानें जीवात्म्यांसहि लागू आहे. आणि प्रस्तुत आमच्या कार्यास पुरेसें आहे. वरील सर्व विवेचनाचा सारांश अगदी थोडक्यांत सांगावयाचा म्हणजे सृष्टीच्या बुडाशी आत्मा उर्फ ब्रम्ह या नांवाची सूक्ष्म अशी एक सद्वस्तु असून, तिच्यापासूनच हें सर्व ब्रम्हांड–हा सगळा विश्वपसारा–जन्मला, वाढला व विकास पावला आहे. विश्वाचें ते आदिबीज असून, स्वयंभू, शाश्वत व अविनाशी असें आहे. ती सद्वस्तु–सच्चिदानंदघन वस्तु–या विश्वकोशांत ओतप्रोत व घनदाट भरून राहिली असून, तीच प्राणिमात्रांच्या अंतःकरणांत गुप्तरूपानें वास करून राहिली आहे. याप्रमाणें ती विश्वभांडोदरांत आंतहि आहे, बाहेरहि आहे, जवळहि आहे, दूरही आहे, खालीहि आहे, वरहि आहे, याप्रमाणें ती वस्तु सर्वत्र सारखीच ओतप्रोत भरून राहिली असली, तरी चमत्कार हा कीं ती डोळ्याला दिसत नाहीं, कानाला ऐकूं येत नाहीं, इतर इन्द्रियांना गोचर होऊं शकत नाहीं. इतकेंच नव्हे तर्कालासुद्धा ती भारीच आहे ! असें हें आत्मतत्त्व–

ही सद्वस्तु–वैदिक धर्मांत ब्रम्ह या नांवानें ओळखिली व संबोधिली जाते. थोडक्यांत वैदिक आत्मा उर्फ ब्रम्हाचें हें असें विशाल व सूक्ष्म स्वरूप असून, त्यांत मर्त्य व अमर्त्य–स्थूल व सूक्ष्म–व्यक्त व अव्यक्त– या तीन्ही सृष्टींचा अंतर्भाव होतो. जातां जातां हेंहि सांगितलें पाहिजे कीं, 'आत्मा' या शद्बांत कोठें परमात्मा तर कोठें जीवात्मा या दोन्हींचाहि अंतर्भाव करण्याचा वैदिक ऋषींचा परिपाठ आहे, हें वाचकांनी विसरूं नये.

आतां बुद्ध भगवानाच्या अनत्ता–विषयाकडे वळूं. तत्पूर्वी येथें हें सांगितलें पाहिजे की, भगवंताच्या वेळीं वैदिकांचा आत्मवाद हा जसा प्रचलित होता, तसाच इतर अनेक बाबदूक वादहि बोकाळले होते. त्यांत आत्मा नाहीं, पापपुण्य नाहीं, पूर्वजन्म–पुनर्जन्म नाहीं, स्वर्ग–नरक नाहीं, असें तडसून सांगणारे कांही पंथ तेथें धुमाकुळ घालीत होते, ते लोक आत्मा हा शद्ब वापरीत पण त्याची व्याप्ति जड देहापुरतीच असे. म्हणजे आत्मा म्हणजे देह व देह म्हणजेच आत्मा, त्याच्या पलीकडे आत्म्याचे अस्तित ते मान्य करीत नसत. या पंथास आजीवक पंथ असें नांव असून, या पंथाचा मुख्य आचार्य व प्रचारक मखली गोशाल हा होता. दुसऱ्या–पंथाचा प्रवर्तक अजित कोश–कंबल हा असून त्याला कर्मवाद मुळींच मान्य नव्हता. पाप–पुण्य, पूर्वजन्म–पुनर्जन्म, स्वर्ग–नरक इत्यादि गोष्टी सर्व थोतांड आहे, असें तो बेधडक लोकांना सांगत सुटे. जीव म्हणजे शरीर व शरीर म्हणजे जीव–त्यापलीकडे कांही नाहीं, हें त्याचें मुख्य तत्त्वज्ञान असें. कर्मांवर व परलोकावर त्याचा बिलकूल विश्वास नव्हता. अर्थात् तो कट्टर नास्तिकांतला अट्टल नास्तिक होता. तिसरा एक धर्म प्रचारक म्हणजे ककुध कात्यायन हा होय. हा शाश्वत वादाचा पुरस्कर्ता होता. ' सतो नव्हिच विनासो, असतो नव्हिच संभवो ' हें त्याचे मुख्य तत्त्व असें. आणि जगाचें मूल तत्त्व समजणें व वर्णन करणें हे मानव शक्तीच्या पलीकडे आहे, असा त्याचा समज होता. अर्थात वैदिक तत्त्वज्ञानाशी त्याचें सहमत व सहकार्य नव्हतें. चौथा धर्मपंथ म्हणजे नीर्गंठ नायपुत्र म्हणजे महावीर, या जैन तत्त्वज्ञान प्रचारकाचा हा एका दृष्टीनें शाश्वत वादी खरा पण त्याच्या मते जीव व जड ही दोनच द्रव्यें नित्य असून दोन्हीच्या संयोगापासून जगाची उत्पत्ति आहे, असें तो सांगत

फिरे, जीव व जड ही दोन्ही शाश्वत तत्त्वें असून, जीवाचें स्वरूप सत्, चित् व आनंद असें त्रयात्मक आहे. त्याला वैदिकाचा आत्मा अगर ब्रम्ह मान्य नसे. पांचवा धर्मप्रचारक म्हणजे पूर्ण काश्यप हा होय. व हा त्यावेळी मोठा तीर्थंकर म्हणून गणला जात होता. तसाच तो आपणांस बुद्धहि म्हणवीत असे. हा नग्नस्थितींतच फिरत असे. हा अट्टल अक्रियावादी असून, त्याच्या मतें जगाची मूळ वस्तु शून्य हेंच आहे. शून्य हेंच जगाची बीजशक्ति असून, त्या शून्यांतूनच जग उत्पन्न झालें आहे, असें तो सांगत फिरे. याच्या पंथांतहि बरेच लोक सामील झाले होते. ब्राम्हण व शूद्र, राजा व प्रजा, बाप व लेक, पति व पत्नी असलीं कृत्रिम बंधनें त्यास निरर्थक वाटत होतीं. कर्मांवर त्याचा मुळींच विश्वास नव्हता, अर्थात तो अक्रियावादी होता.

आणखी एक मोठा व महत्वाचा पंथ म्हणजे परिव्राजक पंथ होय. हे लोक वैराग्याप्रमाणें गांवोगांव हिंडून लोकांना नीतिशास्त्र व तत्वज्ञान शिकवीत असत. हे लोक कडकडीत ब्रम्हचर्य पाळीत. त्यांच्यांत कांहीं स्त्रियाहि होत्या. अहिंसा, सत्य, इंद्रियनिग्रह, शुद्धविचार, संतोषवृत्ति साधेपणा, आस्तिक्यबुद्धि, विद्याभ्यास, गुरुसेवा, क्षमाशीलता, ध्यान-धारणा, प्राणायाम, प्रार्थना, आत्मज्ञान इत्यादि बाबतींत ते मोठे तरबेज होते. यांत बहुतेक ब्राम्हणांचा भरणाच विशेष असून, ते सर्व अग्नि-उपासक होते. या पंथाचें मत थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सम्यक्ज्ञान, सम्यक् वर्तन व सम्यक् श्रद्धा या त्रयीच्या जोरावर मनुष्याचें खरें व शाश्वत सुख अवलंबून आहे, असें त्या पंथाचे प्रामाणिक मत होतें. पुढें बुद्धाबरोबर नैतिक, धार्मिक व आत्मिक विषयांवर त्यांची पुष्कळ चर्चा व वादविवाद झाला आहे. या शिवाय आणखी अनेक किरकोळ सांप्रदाय होते. त्या सर्वांचा उल्लेख येथें करण्याचें कारण नाहीं. या प्रमाणें बुद्धाच्यावेळीं व बुध्दाच्या प्रदेशांत अनेक पंथ व उपपंथ यांचें निबिड जाळें पसरलेलें असून, त्यामुळें सामान्य जनतेची दिशाभूल होऊन आचार-विचारांत सगळा सावळा गोंधळ माजून, समाज अधोगतीस व अधोगतीस लागत चालला होता. बुद्ध जेथें जन्मले, वाढले व फिरले, तेथील देशाची ही अशी धार्मिक अनवस्था होती. याविषयीं

ज्यांना अधिक माहिती पाहिजे असेल, त्यांनीं दीघनिकायातील ब्रम्हजाल सुत्त पहावें. याप्रमाणें मतामतांच्या गलबल्यांत व गोंधळांत बुद्ध भगवंताचा उदय झाला, हें वाचकांनी लक्षांत ठेवावें म्हणून याचा एवढा विस्तार केला. असो.

आतां बुद्ध भगवंतांविषयीं बोलावयाचें झालें, तर त्यांची भूमिका सर्वस्वी निराळी होती. त्यांच्या धर्माचा तोंडवळा जवळ जवळ वैदिक धर्मा सारखाच होता. वरील पंथाचीं मतें त्यांस बिलकूल मान्य नव्हतीं. पण वैदिक धर्माशी त्यांचें अनेक बाबतींत साम्य व सहमत होतें. वैदिकांचा कर्म-मार्ग, पाप-पुण्य, पूर्वजन्म व पुनर्जन्म, स्वर्ग-नरक, बंध-मोक्ष या सब गोष्टींत त्यांचें सहमत होतें. इतकेंच नव्हे, तर त्यांचें जें सर्व-श्रेष्ठ निर्वाण, तें दुसरें तिसरें कांही नसून वैदिकांचा जो ब्रम्ह-लोक म्हणजे मोक्ष त्याचेंच तें एक सुंदर प्रतीक आहे. ! कसें, तें पुढील प्रकरणांत विशद करून दाख-विण्यांत येईल. आतां फक्त इतकेंच कीं, प्रस्तुत स्थळीं त्यांच्या अनात्मा ( अनत्ता ) वादाचा विचार करावयाचा आहे. येथें इतकें मात्र मांगणें जरूर आहे कीं, बुद्ध भगवंतांच्या या अनत्ता-वादाला आम्हीं हिंदूंनी इतकें बुजण्याचें अगर नाक मुरडण्याचें कारण नाहीं. वैदिकांच्या आत्म्याविषयीं त्यांनी अत्यंत गंभीर अशी मुग्धता स्वीकारली आहे, ही गोष्ट खरी. पण त्यावरून वैदिकांचा आत्मा त्यांना मुळींच मान्य नव्हता, असा त्याचा अर्थ नव्हे. व तसा ग्रह अगर तसा आग्रह धरणें हें आमच्या मतें न्याय्य होणार नाहीं. त्यांनीं तशी मुग्धता कां स्वीकारली, याला दुसरीं अनेक कारणें आहेत. तीं आम्ही यथास्थळी देत जाऊं. मात्र एक गोष्ट आम्ही येथें स्पष्ट सांगू इच्छितो कीं ' आत्मा नाहीं ' असें त्यांनी कोठेंच उघड बोलून दाख-विलें नाहीं ! येथें आत्मा म्हणजे परमात्मा हा अर्थ अभिप्रेत आहे. त्यांत जीवात्मा हाहि पर्यायानें आलाच, असो.

इतकेच नव्हे, तर आत्मा आहे की नाहीं, या वच्छगोत्ताच्या सरळ व चोख प्रश्नाला हो-ना यांपैकीं कोणतेंच स्पष्ट उत्तर न देतां, त्यांनी त्यावेळीं गंभीर मौन स्वीकारलें आहे ! ही गोष्ट लक्षांत घेतली व जमेस धरली,

तर ते कट्टर अनात्मवादी होते- म्हणजे त्यांना वैदिकांचा उपनिषत्-कथित आत्मा-परमात्मा-सर्वस्वी अमान्य होता, हें म्हणणें कसें टिकेल व कसें शोभेल ? त्यांचा अनत्तावाद म्हणजे वैदिकांच्या आत्मवादाचें खंडण असा त्याचा अर्थ नव्हे, नंतरच्या बौद्धाचार्यांची ती समजूत निराधार व चुकीची आहे, असें आम्हांस स्पष्ट म्हणावेसें वाटतें.

आतां त्यांनी कोठें कोठें उपदेशाच्या भरांत, विषयप्रतिपादनाच्या सौकर्यार्थ, वेळ मारून नेण्याच्या घाईत, अनत्ताचें स्वरूप भडक रंगांत रंगविलें आहे, हें खरें व त्यावरून आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल केव्हां केव्हां संशय डोकावतो, हें कांही खोटें नाहीं. पण त्यांच्या कांही मुख्य मुख्य गोष्टींचा चौबाजूंनी सूक्ष्म व खोल विचार केला व निर्वाणाकडे चौकस दृष्टीनें पाहिलें, तर संशयाचें धुकें पार तेव्हांच निरस्त होऊन जातें, याची आम्हांस पूर्ण खातरी आहे.

फार लांब कशाला, उदाहरणार्थ वत्सगोत्ताचा प्रश्नच घ्या. त्यानें ' आत्मा आहे कीं नाहीं ? या विचारलेल्या सरळ व चोख प्रश्नाला बुद्धांना तत्वतः व वस्तुतः तो अमान्य असतां तर त्यांनी ' आत्मा नाही ' असें रोख-ठोक व सडेतोड उत्तर देऊन वत्सगोत्ताचें तोंड कां बंद केलें नाहीं ? त्यांस तसें करावयास कसली हरकत होती ? त्यावेळीं मौन धारण न करतां तोंड उघडून त्यांस तसें करतां आलें नसते काय ? ' आत्मा नाही ' असें स्वच्छ व सवक उत्तर देऊन आपल्या बाजूचें समर्थन त्यांनी त्या वेळीं केलें नाहीं, यावरून आत्म्याचें नास्तित्व उघड बोलून दाखविण्याची त्यांची तयारी नव्हती अगर तसें धाडस करणें त्यास योग्य वाटलें नाही, असाच अर्थ जग करूं लागलें, तर त्यांत त्याची चूक तरी काय झाली ? त्यांचें त्या वेळचें अर्थपूर्ण मौनच आत्म्याविषयी त्यांची स्पष्ट कबूली देते !

वत्स गोत्तानें एकदा नव्हे, तर दोनदां तीव्र प्रश्न खोदखोदून विचारला असतां, दोन्ही वेळा मौन धारण करून भगवान मुक्याप्रमाणें मूग गिळून गप्प बसले, ही गोष्ट काय सुचवितें ? अशा मुख्य व महत्वाच्या प्रश्नाला सरळ व चोख उत्तर देऊन पृच्छकाचें तोंड बंद केलें असतें तर काय

मौज झाली असती ? पण तशा ऐन मोक्याच्या प्रसंगीं ओठ न उघडता मूकनायकाची मुग्ध भूमिका स्वीकारली, यावरून काय निष्पन्न होतें ? सूज्ञ व विचारवंत लोक काय निष्कर्ष काढतील, हें आतां उघड सांगावयास पाहिजे कीं काय ? मौन धारण करणें म्हणजे मूक सम्मति देणें असाच त्याचा अर्थ होत नाहीं काय ? Silence gives Consent–मौनं सम्मति-बोधकं–हें सुभाषित जग–प्रसिद्धच आहे. बुद्धाचें यावेळचें गंभीर मौन जगाला भ्रमांत पाडणारें व दिशाभूल करणारें असलें तरी सूज्ञांना तें मोठें अर्थबोधक आहे, हें काय आतां निराळें बोलून दाखवावयास पाहिजे ?

आपल्या प्रश्नाला भगवान कांहींच उत्तर देत नाहींत, हें पाहून पुढें कांही न बोलतां तो वत्सगोत्त तेथून उठून निघून गेल्यावर, त्याचा शिष्य आनंदानें तसें कां केलें, प्रश्नाला उत्तर कां नाही दिलें, असें विचारतां, भगवंतांनी त्याला जें उत्तर दिलें, तेंहि मोठें मार्मिक असून, मोठें अर्थगर्भ आहे.

त्यांनी त्यावेळीं आपल्या मौनाचें स्पष्टीकरण केलें आहे तें असें :– ते म्हणाले– ' आनंदा ! वत्सगोत्ताच्या 'आत्मा नाहीं काय' या प्रश्नाला मीं कां उत्तर दिलें नाहीं असें तूं विचारतोस. त्याला माझें उत्तर हें कीं, त्याच्या त्या खोचदार प्रश्नाला 'आत्मा नाहीं ' असें स्पष्ट व सडेतोड उत्तर दिलें असतें, तर मी उच्छेद–वादी–शून्यवादी–ठरलो असतो. म्हणजे जे श्रमण ब्राम्हण केवळ देहात्मवादी आहेत —म्हणजे देह व आत्मा एकच मानणारे आहेत—देहाव्यतिरिक्त कांही नाहीं, असें प्रतिपादन करणारे आहेत, त्यांच्याहून माझें मत भिन्न झालें नसतें. पण तसें मानणारा मी नाहीं ! देह म्हणजेच आत्मा, हा देहात्मवाद मला मान्य नाहीं ! आतां आत्मा आहे, असें मी अस्तिपक्षीं उत्तर दिलें असतें तर शाश्वतवादी ब्राम्हणाप्रमाणेंच मीहि झालों असतो. पण तसा माझा पवित्रा नाहीं. ती माझी भूमिका नाहीं. आतां रूपादि पंचस्कंध हे आत्मा नव्हेत—सगळे धर्म अनात्म आहेत–असें सांगितलें असतें, तर तें माझ्या भूमिकेला धरून झालें असतें. पण त्यामुळें बिचारा वच्छगोत्त मात्र घोटाळयांत पडला असता. तें

कसें असें तू विचारशील तर तें असें:— पहा माझ्या उपदेशानें त्याला असें वाटलें असतें कीं आत्मा म्हणून कांहीं पदार्थ होता, तो या तथागताच्या सांगण्यावरून आतां नष्ट झाला! हा सर्व घोटाळा टाळण्यासाठीं म्हणून हो-ना कांहींच न म्हणतां मी त्यावेळीं मौन स्वीकारलें, तें युक्तच होतें. नाहीं का? ( मज्झिमनिकाय )

या खुलाशावरून काय समजावयाचें? मात्र एक गोष्ट त्यावरून स्पष्ट होते कीं बुद्ध हे देहात्मवादी-उच्छेदवादी-जडवादी-नव्हते. हें त्यानी सिंहनादसुत्तात ( विनयपिटक )व इतरत्र अनेक ठिकाणी दिलेल्या उत्तरावरून अधिक स्पष्ट होतें.

आतां आत्मा त्यांना मान्य नव्हता म्हणावा तर तो शद्ब त्यांनी अनेक प्रसंगीं अनेकवेळां वापरलेला आहे. त्यांच्या शिकवणींत 'अत्ता'- व 'अनत्ता' हे दोन्ही शद्ब आलेले पदोपदीं आढळतात, हे लक्षांत ठेविले पाहिजे. तेव्हां त्या दोघाना कांहींतरी निश्चित व सरळ अर्थ असला पाहिजे. तेव्हां तो काय असावा, हें आतां आपण पाहूं. तत्पूर्वी एक गोष्ट ध्यानांत घेतली पाहिजे. ती ही कीं, बुद्धांनी आपल्या धर्म प्रवचनांत वापरलेली भाषा व शद्ब हे सगळे वेदांत्याची भाषा व शद्बच असल्यामुळें प्रथम वैदिक धर्मांत आत्मा हा शद्ब कोणत्या अर्थी वापरण्यांत आला आहे, याचा अगोदर छडा घेऊं. वेदांत्याच्या भार्षेत आत्मा हा शद्ब द्वयर्थी उपयोगण्यांत आला आहे. 'आत्मन् जीवे ब्रम्हणिच' असें वाचस्पति कोशांत सांगितले असून, त्याचा सरळ अर्थ कोठें जीवात्मा कोठें परमात्मा असा करण्यांत येतो. मायेच्या म्हणजे अविद्येच्या पलिकडचा जो आत्मा तो परमात्मा आणि तो नित्य आहे. दुसरा जो जीवात्मा तो अविद्या-वश असून, तो सोपाधिक, म्हणून अनित्य आहे. हा जो जीवात्मा त्याला बुद्ध हे विज्ञान असें नांव देतात व परमात्म्याला निर्वाण म्हणतात. कारण बुद्धाचा विज्ञानात्मा हा अविद्यावश-कर्मवश आहे. अर्थात् तो सोपाधिक आहे. आणि सोपाधिक आत्मा म्हणजेच वैदिकांच्या भार्षेतला जीवात्मा व बुद्धाच्या भार्षेतला विज्ञानात्मा होय, हें सूक्ष्म विचारांती कोणाहि सूज्ञ

मनुष्याला पटून येईल. वैदिक लोक आत्मा शब्दाचा अर्थ जेव्हां परमात्मा असा करतात, तेव्हां बुद्ध तो अर्थ निर्वाण शब्द वापरून दाखवितात. आणि वैदिक जेव्हां त्याचा अर्थ जीवात्मा असा करतात तेव्हां बुद्ध तो अर्थ अत्ता अगर विज्ञान हा शब्द वापरून स्पष्ट करतात. आतां ही गोष्ट बुद्धाच्या भावेंतून स्पष्ट करून सांगावयाची म्हणजे अत्ता याचा अर्थ विज्ञानात्मा म्हणजे विञ्ञाण—अर्थात् जीवात्मा आणि अनत्ता म्हणजे पंच स्कंधात्मक सूक्ष्म व जड शरीर—मन व देह—असें सांगता येईल. कारण 'यदनिच्चं तदनत्ता' या व्याख्येंत त्यांनी अनत्ता शब्दाचा अर्थ अगदी स्पष्ट करून दाखविला आहे. तेथें संशयाला मुळी जागाच ठेविली नाहीं. आणि रूपादि पांच स्कंध हे अनित्य आहेत, असाहि खुलासा तेथेंच देऊन ठेविला आहे. यावरून अनत्ता हा शब्द नामरूपात्मक म्हणजे देह व मन यांचा संघात, यांना उद्देशूनच वापरण्यांत आला आहे, हें आतां निश्चित सांगण्यांत कोणतीच हरकत दिसत नाहीं. पण पुढें बुद्ध भगवंतांच्या पश्चात बौद्ध आचार्यांना व पंडितांना वेदान्त भाषेचें तितकें सूक्ष्म व यथार्थ तारतम्य ज्ञान नसल्यामुळें व त्यांची विवेक बुद्धि पक्षांधतेमुळें मंद व संकुचित झाली असल्यामुळें त्यांतील सूक्ष्म भेद त्यांना कळला नाहीं व म्हणून अनत्ताचा अर्थ 'अत्ता नाही' असा भलताच व विपरीत करून, बुद्धाच्या तत्त्वज्ञानाला गालबोट लावण्याचें पातक त्यांच्याकडून न कळत घडलें आहे, असें आम्हांस मोठ्या कष्टानें म्हणावेसें वाटतें. असो.

आतां कोणी असा सवाल करूं पाहतील की भगवंताना जर उच्छेद-वाद—शून्यवाद—मान्य नव्हता, तर नसो; पण वत्सगोत्ताच्या दुसऱ्या प्रश्नाला—म्हणजे 'आत्मा नाहीं काय?—' या प्रश्नाला त्यांनीं सरळ नास्ति-पक्षीं उत्तर मग कां नाहीं दिलें? तसें करावयाला काय हरकत होती? याला उत्तर आम्हीं देण्यापेक्षां तें भगवंतानीच इतरत्र देऊन ठेविलें आहे. तिकडे दृष्टि वळविली म्हणजे या प्रश्नाची वासलात लागण्यासारखी आहे. त्यांनी तेथें आपल्या धर्मोपदेशाची मुख्य भूमिका काय आहे, याची स्पष्ट शब्दांत निःसंदिग्ध कल्पना देऊन ठेविली आहे. तिकडे नजर फिरविल्यास या प्रश्नावर चांगला प्रकाश पडणार आहे.

म्हणून आतां तिकडे थोडेसें वळून पाहूंया. मनुष्य मेल्यावर पुनः जन्मतो की नाहीं, देह व जीव एक का भिन्न, मरणोत्तर बुद्ध राहतो कां नाहीं, अशा गहन प्रश्नाविषयीं त्यांनी आपला पुढील प्रमाणें अभिप्राय व्यक्त करून दाखविला आहे.

'गम्भीरो हि अयं वत्स धम्मो दुद्दसो दुरनुबोधो सन्तो पणीतो अतक्कावचरो निपुणो पण्डितवेदनीयो' ( मज्झिमनिकाय, ७२–७ ).

हा धर्म, वत्सा ! मोठा गंभीर असून, तो समजण्यास मोठा कठीण, अर्थात् सामान्य माणसास दुर्ज्ञेय आहे. तसाच तो शांत, उत्तम पण तर्कातीत, सूक्ष्म व फक्त पंडितांनाच गम्य आहे !

यावरून हें उघड होतें कीं, हा प्रश्न–मरणोत्तर मनुष्य राहतो कां नाश पावतो–सामान्य जनास समजण्यास व समजावून सांगण्यास व पटण्यास व पटवून देण्यास मोठा कठीण असल्यामुळें भगवंतांनी तितक्या खोल पाण्यांत शिरण्याचें मुद्दाम टाळलें होतें. हें आम्ही आमच्या पदरचें सांगतो अशातलें कांहीं नसून, खुद्द भगवंतांनीच आपल्या उपदेशाची रूपरेखा इतरत्र–म्हणजे मूळ मालुंक्यपुत्त सुत्तांत–स्पष्ट खुलासा करून दाखविली आहे.

तो त्यांचा खुलासा खुद्द त्यांच्याच मूळ वचनांत देतो म्हणजे वाचकांचें समाधान होईल. त्यांनी या सुत्तांत आपल्या धर्मोपदेशाची रूपरेखा सुटसुटीत शद्बांत स्पष्ट मांडून दाखविली आहे. ती अशी :—

'तस्माति' ह मालुंक्यपुत्त अब्याकतं च मे अब्याकततो धारेय, ब्याकतं च मे ब्याकततो धारेय। किच मालुंक्यपुत्त मया अब्याकतं ? 'सस्सतो लोको' ति मालुंक्यपुत्त मया अब्याकतं, असस्सतो लोको ति …पे…, 'अन्त वा लोको' ति….पे…., 'अनन्त वा लोको' ति… पे…., 'तं जीवं तं सरीरं' ति…. पे… अञ्ञं जीवं अञ्ञं सरीरं' ति….पे…., 'होति तथागतो परम्मरणा' ति….पे….,'होति च न होति तथागतो परम्मरणा'

ति....पे...., नेव होति न न होति तथागतो परम्मरणा ' ति मया अब्याकतं। कस्मा चे ' तं मालुंक्यपुत्त मया अब्याकतं ? न हे' तं मालुंक्यपुत्त अत्थसंहितं नादि-ब्रम्हचरियिकं न निब्बिदाय, न विरागाय, न निरोधाय, न उपसमाय, न अभिञ्ञाय, न सम्बोधाय, न निब्बाणाय संवत्तति, तस्मा तंमया अब्याकतं ॥ किञ्च मालुंक्यपुत्त मया ब्याकतं ? ' इदं दुक्खं ' ति मालुंक्यपुत्त मया ब्याकतं, ' अयं दुक्खसमुदयो ' ति....पे.... 'अयं दुक्खनिरोधो ' ति....पे....,' अयं दुक्खनिरोधगामिनी पाटिपदा ' ति मया ब्याकतं। कस्मा चे ' तं मालुंक्यपुत्त मया ब्याकतं ! एतं हि मालुंक्यपुत्त अत्थसंहितं, एतं आदिब्रम्हचरियिकं, एतं निब्बिदाय विरागाय निरोधाय उपसमाय अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति, तस्मा तं मया ब्याकतं।

( मज्झिमनिकाय, ६३-६).

भावार्थ :— अतएव, मालुंक्यपुत्रा ! मी माझ्या उपदेशाचा जो विषय केला नाहीं, तो तुम्हांस सांगण्यास योग्य नाहीं, असें समज. व जो मी माझ्या उपदेशाचा विषय केला आहे, तो तुम्हांस सांगण्यास योग्य आहे, असें समज. तर आतां मी माझ्या उपदेशाचा विषय कोणता केला नाहीं ? लोक शाश्वत कां अशाश्वत, जगाला अंत आहे कां नाहीं, जीव व शरीर एक कां भिन्न, तथागत मरणोत्तर असतो कां नसतो, हे व असले प्रश्न माझ्या उपदेशाचे विषय नाहींत. म्हणून मी ते स्पष्ट केले नाहींत. याचें कारण काय म्हणून तूं विचारशील, तर त्याला उत्तर हें कीं, त्याच्या उपदेशापासून-त्याच्या चर्चेपासून-त्याच्या स्पष्टीकरण व विशदीकरणापासून-माझ्या मतें म्हणण्यासारखा फायदा नाहीं. शिवयाय ब्रम्हचर्यास-म्हणजे अष्टांगिक मार्ग चोखाळण्यास-त्यापासून काहींच मदत होण्यासारखी नाहीं. त्याचप्रमाणें वैराग्याला, मनःशांतीला, लोकोत्तर ज्ञानाला, निर्वाणप्राप्तीला त्याचें ज्ञान अवश्यक नाहीं. म्हणून त्या गोष्टीचें व्याख्यान करण्याच्या भरीस मी पडलो नाहीं. अर्थात् त्या मी स्पष्ट केल्या नाहीत.

आतां कोणत्या गोष्टी मी माझ्या उपदेशाचा विषय करून, त्या स्पष्ट

केल्या आहेत ? येथें जगांत दुःख आहे, त्याची उत्पत्ति अशी अशी आहे, त्याचा नाश वा निरोध असा असा होतो. व तो करण्याचा मार्ग असा असा आहे. या गोष्टी मी स्पष्ट केल्या आहेत. कारण त्यापासून अर्थनिष्पत्ति आहे. तें ब्रम्हचर्य पाळण्यास उपयोगी आहे. त्यापासून वैराग्य लाभणार आहे. मनाला शांति मिळणार आहे. तसेंच लोकोत्तर ज्ञान, सम्यग्ज्ञान, व निर्वाणप्राप्ति यास ते उपकारक आहे. म्हणून ते विषय मी लोकांपुढे स्पष्ट करून व विशदकरून मांडले आहेत. अर्थात् ते स्पष्ट करून सांगण्यास योग्य आहेत.

या वरील वचनाचा जरा बारकाईनें विचार केला, तर ही गोष्ट सहज निष्पन्न होते कीं मनुष्याच्या सामान्य बुद्धीस दुर्बोध अशा सूक्ष्म व रुक्ष विषयावर उगीच शब्दावडंबर माजवून व्याख्यान देऊन, तेयील श्रोतृवृंदाची समजूत पाडणें हें दुष्कर असून, शिवाय त्यापासून म्हणण्यासारखी अर्थनिष्पत्ति नाहीं. मनुष्याला जें काय पाहिजे आहे तें म्हणजे दुःखविमुक्ति होय. ती ज्या उपायानें–ज्या मार्गानें सुसूत्र व सरळ साधता येईल, तेवढयाचेंच तर्कशुद्ध, अनुभवसिद्ध व बुद्धिग्राह्य पद्धतीनें विवेचन करून, सामान्य जनतेला पटवून दिल्यास आपला उद्देश सफल होणार आहे, अशी भगवंताची दृढ व प्रामाणिक समजूत झाली असल्यामुळे आत्मज्ञाना-सारख्या गहन, गूढ व गंभीर विषयावर त्यांनी अबोला स्वीकारला अगर त्या विषयाला अजीबात फाटा दिला असला तर त्यांना नांव ठेवण्यासारखें त्यांत काय आहे ? त्यांनी स्वीकारलेला तो मार्ग त्यांच्या धोरणास–प्रतिज्ञेस–भूमिकेस–सर्वथैव उचित असाच होता, असें आमचें प्रांजल मत आहे.

त्यांनी आपल्या धर्मोपदेशाचें धोरण स्पष्टच ठरवून टाकून, तें जगास निःसंदिग्ध भाषेंत जाहीर करून टाकलें आहे. तें डोळधाआड करून चालणार नाहीं. त्यांनीं आपलें जें धोरण ठरविलें होतें, तें या पुढील वचनांत स्पष्ट पहावयास मिळतें. तें वचन म्हणजे हें असेंः–

'सब्बं अत्थी' ति खो कच्चायन अयमेको अन्तो। सब्बं नत्थी'

ति अयं दुतियो अन्तो । एते ते कच्चायन उभो अन्ते अनुपगम्म मज्झेन तथागतो धम्मं देसे ' ति । ( संयुक्त १२-१५-७ ).

हे कात्यायना ! सर्व कांही आहे. असें प्रतिपादन करणें हा एक अंत आणि ' सर्व कांही नाही ' असें म्हणणें, हा दुसरा अंत. हे दोन्ही अंत टाळून मधल्या मार्गानें तथागत आपल्या धर्माचा उपदेश करीत असतो.

हें वचन लक्ष्यांत घेतलें तर चार्वाकांचा स्थूल जडवाद व वैदिकांचा सूक्ष्म आत्मवाद, असे हे दोन्ही पराकोटीला जाऊन पोंचलेले वाद बाजूस सारून, सामान्य बुद्धीस पटणारा व बहुजनहिताला व बहुजनसुखाला उप-कारक व परिपोषक असा सरळ व सुगम मध्यम मार्गाचा अवलंब करून, त्या धोरणानें त्यांनी आपली धर्मोपदेशाची दिशा आखली व पाया रचला, यांत चूक ती काय झाली ? तसें जर पाहूं गेलें तर नास्तिक वादाचें-शून्य वादाचें-जडवादाचें-त्यांनी ठिकठिकाणीं खडसून खंडण करून, परोक्षरीतीनें आत्मवादाचें पर्यायानें मंडणच केलें आहे ! वैदिकांचा आत्मवाद त्यांनी प्रत्यक्ष हाताळाला नसला तरी त्याचा निर्धारपूर्वक अव्हेरहि कोठें केलेला नाहीं ! हो सर्व चर्चा आम्ही पुढील प्रकरणासाठीं राखून ठेवतो. इतकें सांगून झाल्यावर आतां त्यांचा अनत्तावाद म्हणजे काय या मुख्य मुद्याकडे वळतो.

वैदिक ऋषींचा रोख सगळा जसा आत्मावर्णनपर आहे, तद्वत बुद्ध भगवंताचा सगळा अनत्तावर्णनपर आहे, ही गोष्ट येथें आधींच सांगून ठेवणें अवश्य आहे. ' आत्मैव सत्यम् । अन्यदार्तम् ' हें वैदिक ऋषींचें आत्मज्ञानाचें महावाक्य असून, बुद्ध भगवंताचें ' यदनिच्चं तं दुक्खं । यं दुक्खं तदनत्ता । ' हें आहे. पहिल्याची दृष्टि आत्म्यावर-नित्य वस्तूवर-तर दुसऱ्याची अनत्तावर-अनित्य वस्तूवर-खिळली असून, दोघांचा सांगण्याचा तात्पर्यार्थ वर वर भिन्नसा दिसला तरी परमार्थतः एकच व सारखाच आहे.

वैदिकांच्या आत्मा उर्फ ब्रम्हाचीं दोन रूपें सांगितलीं असून, त्यांत बुध्दांचा अनत्ताहि अंतर्भूत होतो.

' द्वे वाव ब्रम्हणो रूपे । मूर्तं चैवामूर्तंच मर्त्यं चामृतं च स्थितं च यच्च सच्च त्यं च । ' – ब्रम्हाचीं दोन रूपें असून एक मूर्त व दुसरें अमूर्त, एक मर्त्य वसरें अमर, एक स्थिर व दुसरें चर व एक प्रत्यक्ष व दुसरें परोक्ष. ( श. प. १४–५–३–१ ).

या सत्–असत् मर्त्य–अमर रूपांपैकीं सद्रूपावर–अमर रूपावर–वैदिक ऋषींचा सगळा व मुख्य भर असून, असद्रूपावर–मर्त्यरूपावर–गोतम बुद्धाचा सगळा कटाक्ष आहे.

' सर्वं क्षणिकं सर्वं दुःखं ' हें बौद्धपंडितांचें जें व्यवहारांतील महावाक्य आहे, तें भगवंताच्या मूळ वचनाकडे दुर्लक्ष केल्यास दिशाभूल करणारें आहे. ' सर्वं क्षणिकं, सर्वं दुःखं ' या वचनाच्या बुडाशी असणारें बुद्धाचें मूळ वचन ' यदनिच्चं तं दुःक्खं ' हें असून, पहिल्यातील ' सर्वं क्षणिकं ' हें वचन ' यदनिच्चं ' याचें दर्शक आहे, म्हणजे ' जें अनित्य आहे ते सर्व दुःख आहे असा त्याचा अर्थ आहे. आणि याचाच पर्याय अर्थ वैदिकांच्या ' आत्मैव सत्यम् । अन्यदार्तम् ' यावचनांतील ' अन्यदार्तम् ' यांत गर्भित आहे. आत्म्याला सोडून बाकीचें सर्व नाशवंत व म्हणून दुःख ' असें ' अन्यदार्तं ' चा वैदिक अर्थ आहे. ' सर्वं क्षणिकं ' यांतील ' सर्व ' चा अर्थ मर्यादित असून तो फक्त पंचस्कंधापुरताच लागू आहे. आणि तसें घेतलें तरच ' यदनिच्चं तं दुक्खं व ' सर्वं क्षणिकं ' यांती संगति लागते. येथें क्षणिक म्हणजे क्षणभरच टिकणारें असा अर्थ नसून, कालभंगुर म्हणजे कालांतराने नाशदावणारें असा व्यापक अर्थ घेतला पाहिजे.

पुनः मुद्यावर यावयाचे म्हणजे ' यदनिच्चं तं दुक्खं ' असें म्हटल्यावर अनित्य कशाला म्हणावयाचें हें पाहणें आतां प्रवाहप्राप्तच झालें. आणि समाधानाची गोष्ट ही कीं, बुद्धांनी त्याची रूपरेखा स्पष्ट आखून तो प्रश्नहि निकालांत काढला आहे. भगवंतानी अनित्याचा शिक्का मारला आहे, तो यापुढील वचनांत ग्रथित करून ठेविला आहे.

> ' रूपं भिक्खवे अनिच्चं...., वेदना अनिच्चा...., सञ्ञा अनिच्चा...., संखारा अनिच्चा...., विञ्ञाणं अनिच्चं...., '
> ( खंद संयुक्त, वग्ग २ सू. ४ ).

भावार्थः– भिक्षूहो ! रूप हें अनित्य, वेदना अनित्य, संज्ञा अनित्य, संस्कार अनित्य, व विज्ञान हें अनित्य आहे. आणि या रूपवेदनादिकांस पंचस्कंध हें पारिभाषिक नांव आहे. अर्थात् रूपवेदनादि पांच स्कंधाला उद्देशूनच त्यांनी अनित्याचा व म्हणून अनात्माचा शिक्का मारला आहे हें विसरूं नये.

येथें रूप म्हणजे पृथ्वी, आप, तेज व वायु या चतुर्महाभूतघटित स्थूल देहास व वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान या मनोमय देहास ' नाम - ही संज्ञा आहे. ' वेदना, सञ्ञा, चेतना, फस्सो, मनसिकारो इदं वुच्चति नामम् ' असें अभिधम्मांत म्हटलें आहे. ( अभिधम्म, २-१-८ ). अर्थात् नाम म्हणजे वैदिक भाषेत मन होय. कारण हे सर्व कमी अधिक मनाचेच पर्याय आहेत. या नामरूपालाच भगवान अनत्ता ( अनात्मा ) म्हणतात. कारण तें अनित्य म्हणजे नाशवंत आहे. आणि वैदिक ऋषींचा आशय झाला तरी याहून भिन्न कोठें आहे ? शरीर हें नाशवंत आहे–शरी मर्त्यम् ' हे तर प्रत्यक्ष श्रुतिवचनच आहे ! मग भगवान बुद्ध व वैदिक ऋषी यांच्यात रण माजविण्यास–झुंज चेतविण्यास–जागा कोठें राहिली ?

आतां शरीर हें पांच स्कंधांचें मिळून झालें आहे, या विषयीं आधार देतो म्हणजे संशयास जागा राहणार नाहीं. रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान हे असे पांच स्कंध असून, ते वासनायुक्त झाले झाले म्हणजे त्यांस उपादान स्कंध असें म्हणतात. या पांच उपादान स्कंधांना मिळून सत्काय म्हणजे शरीर ही संज्ञा आहे.

' रूपुपादानखंधो वेद नुपादालखंधो सञ्ञु पादानखंधो संखारु-
पादानखंधो विञ्ञानुपादानखन्धो इमेखो आवुसो विसाख पञ्चु
पादानखन्धावुत्तो भगवता'ति ।।'

( मज्झिमनिकाय ४४–२ )

रूप–उपादानस्कंध, वेदना–उपादानस्कंध, संज्ञा–उपादानस्कंध, संस्कार–उपादनस्कंध व विज्ञान–उपादानस्कंध या पांच उपादान स्कंधांना मिळून भगवान सत्काय–म्हणजे शरीर– म्हणतात असें चूल

वेदल्ल सुत्तांत धम्मदिन्ना भिक्षुणीनें विशाखास सांगितलें आहे. उपादान याचा अर्थ मागें सांगण्यांत आलाच आहे.

यावरून हें स्पष्ट होतें कीं, रूप वेदनादि पंच उपादान स्कंध हे अनित्य असल्यामुळे–म्हणजे नाशवंत असल्यामुळें–फक्त त्यांना उद्देशूनच भगवंतानी दुःख म्हटलें आहे, मग त्यांत चुकलें कोठें ? (' इमे वुच्चन्ति भिक्खवे सङ्खित्तेन पञ्चुपादानखन्धा दुक्खा ' ( दीघनिकाय २२–१८ ) वैदिक ऋषी ज्याला ' आर्त ' म्हणतात, त्यालाच बुद्ध अनित्याचा शिक्का-मारून ' दुःखा ' च्या मालिकेंत ओढतात, हें आतां उघड सांगावयास नकोच. येथपर्यंत वैदिक ऋषी व भगवान बुद्ध यांच्या शिकवणींत तत्त्वतः विरोध नसून, पूर्ण संगतिच आहे, ही उत्तम गोष्ट नाहीं असें कोण म्हणेल? ' पंचन्नं खंधानं निरोधं निब्बाणं '–स्कंधाचा नाश म्हणजेच निर्वाण– असें विशुद्धमग्गांत स्पष्टच म्हटलें आहे, त्यांत सगळा अर्थ आला.

आतां मुख्य वादाचा प्रश्न राहतो तो म्हणजे या पंच उपादान-स्कंधापलीकडे–नाशवंत शरीराहून–भिन्न अशी एखादी सद्वस्तु–नित्य व शाश्वत वस्तु–अशी कांहीं आहे कीं नाहीं, यावर बुद्ध काय कौल देतात, हें पाहणें होय. हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा असून, तो मोठा वादग्रस्त होऊन बसला आहे. याला कारण बुद्धाचें याविषयावरील गंभीर मौन ! आत्मा म्हणून कांहीं आहे कीं नाहीं, या प्रश्नवर त्यांचा स्पष्ट व चोख अभिप्राय कोठेंच देण्यांत आलेला नाहीं. जें काय आढळतें, तें सगळें संदिग्धच ! म्हणून या प्रश्नाला एवढा ऊत व रंग चढला आहे. बौद्ध आचार्य तर आत्मा असा पदार्थ नाहींच न्हीं, असे बेधडक ठोकून देण्यास–' नात्मास्ति ' असें घोषित करण्यास कमी करीत नाहींत. पण बुध्द वचनाचा तसा रोखठोक आधार मात्र कोठेंच देत नाहींत ! बुद्धांनी वापरलेल्या ' अनत्ता ' या शब्दाचा अर्थ आत्म्याचा अभाव असा बौद्धाचार्य करतात. पण तो त्यांचा अर्थ बुद्धाच्या तत्त्वप्रणालीला धरून नाहीं –त्याला परिपोषक नाहीं, असें आमचें स्पष्ट मत आहे.

कसें तें, हें आमच्या या पुढील विवेचनावरून सहज दिसून येणार

आहे. भगवंताचा ' अनत्ता (अनात्मा) हा शब्द नञार्थवाचक असला तरी तो अभावरूप नाहीं ! तर उलट भावरूप आहे. म्हणजे त्या अनत्ताला अस्तित्व आहे. स्थिति आहे, अभाव–शून्यत्व–नाहीं. अनत्ता म्हणजे पंचुपादान स्कंधात्मक शरीर–अर्थात् व्यक्तित्व–होय ! हेंच स्पष्ट सांगावयाचें म्हणजे अत्ता नाहीं, असा त्याचा अर्थ नसून ' अत्ता नव्हे ' असा आहे !! आणि असाच केला पाहिजे. बुद्ध भक्तांनी अजाणतेपणानें त्याचा पहिला अर्थ करून स्वतःची व जगाची फसवणूक करून घेतली व केली आहे व करूत घेत आहेत. व करीत आहेत. वरील दोन्ही पैकीं कोणता अर्थ खरा व बुद्धास मान्य आहे, हें शब्दशास्त्राला–व्याकरणाला–कौल लावल्यास स्पष्ट होणार आहे.

तेव्हा ' अ ' अगर ' अन् ' या नञार्थवाचक शब्दाचा व्याकरण दृष्टया किती तऱ्हेनें बोध होतो, हें आतां पाहूं. या नञार्थवाचक ' अ ' चे वाचस्पति कोशांत अर्थ दिले आहेत ते असें :–

' तत्सादृश्यमभावश्च तदन्यत्वं तदल्पता। अप्राशस्त्यं विरोधश्च
नञर्थाः षट् प्रकीर्तिता ः॥'–

सादृश्य, अभाव, अन्यत्व (निराळेपणा), अल्पता, अप्राशस्त्य व विरोध असे प्रसंगपरत्वे ' अ ' चे सहा अर्थ होतात. पैकीं पहिले दोन अर्थ प्रस्तुत विवेचनास उपयुक्त आहेत. पहिला अर्थ सादृश्याचा निषेध दाखवितो. जसें–तो अहिंदु आहे. यातील ' अहिंदु ' याचा अर्थ तो हिंदू सारखा दिसतो. पण हिंदू नव्हे तर हिंदू–इतर म्हणजे ख्रिस्ती, पारशी, मुस्लीम असा कोणीतरी दुसरा आहे. येथें ' अ ' चा सादृश्यनिषेधपर अर्थ लावण्यांत आला आहे. आतां त्याच ' अ ' चा दुसरा अर्थ अभाव दर्शक आहे. जसें अज्ञान, म्हणजे ज्ञानाचा अभाव. येथें ' अ ' चा ' अभाव ' दर्शक अर्थ आहे.

त्याचप्रमाणें आतां इतर अर्थहि थोडक्यांत सांगून टाकतो. कारण नञार्थाचे कसकसे प्रसंगानुरूपानें निरनिराळे अर्थ होतात, याची वाचकांना कल्पना येईल व आमच्या विवेचनाचें मर्म समजण्यास मदत

होईल. आतां या नञार्थवाचक 'अ' चा तिसरा अर्थ भेद दाखवितो. उदाहरणार्थ–अपट हा शब्द घेऊं. अपट म्हणजे पटाचा अभाव नव्हे. तर पटाहून कापडाहून–निराळा पदार्थ. आतां चौथा अर्थ म्हणजे अल्पता. जसें:–ती अनुदरा आहे. म्हणजे तिची कटी (कम्बर) कृश आहे. स्थूल नाहीं. येथें अनुदरा याचा अर्थ कम्मर नसलेली असा अभाव वाचक केला तर तो हास्यास्पद होईल! पांचवा अर्थ अप्राशस्त्य असा दाखवितो. जसें:-अकाल. म्हणजे अयोग्य काल येथें 'अ' चा अयोग्य असा अर्थ केला जातो सहावा व शेवटचा अर्थ विरोध 'दाखवितो. उदाहरणार्थ–असुर म्हणजे सुर–नव्हे. तर त्याच्या उलट राक्षस अथवा दानव. याप्रमाणे नञार्थवाचक 'अ' चे निरनिराळे अर्थ होतात.

तेव्हां बुद्ध धर्मात त्याचा कोणता अर्थ ग्राह्य व बुद्ध भगवंतांना अभिप्रेत होता, याचा आतां विचार करूं. 'अनत्ता' यांतील नञार्थ वाचक 'अन्' हा सादृश्य दाखवितो. अभाव नव्हे. अनत्ता म्हणजे अत्ताप्रमाणें दिसतो पण वस्तुतः अत्ता नव्हें. अंहिद्र या शब्दाप्रमाणे अनत्ता हा शब्द असून अर्थ झाला तरी दोहोंत तत्सादृश्य–निषेध आहे. वस्तुचा अभाव नाहीं आणि बुद्धांना झाला तरी हाच अर्थ अभिप्रेत होता.

पुरावाच पाहिजे असल्यास त्यांचें हें वचन घ्या. अनत्ता कशाला म्हणावें या विषयीं त्याचें स्पष्ट वचनच आहे तें असें–

'यदनिच्चं तं दुक्खं, यं दुक्खं तदनत्ता' (खंद संयुत्त व २ सु ४)
भावार्थ— जें अनित्य आहे तें दुःख होय. आणि जें दुःख आहे तें

अनात्मा. यावरून अनात्मा हा अभावरूप ठरत नाहीं. तर तो भाव रूपच ठरतो. याचा पडताळा पुढील वचनांत पहावयास मिळतो. आतां अनित्य कशाला म्हणावे याविषयीं बुद्ध सांगतात तें असे :–

'रूपं भिक्खवे अनिच्चं–वेदना अनिच्चा....सञ्ञा अनिच्चा....
संखारा अनिच्चा....विञ्ञानं अनिच्चं'।

(खंद संयुत्त वग्ग २ सुत्त ४)–

भिक्षूहो ! रूप हें अनित्य आहे, वेदना अनित्य आहेत, संज्ञा अनित्य' संस्कार अनित्य व विज्ञान अनित्य आहे. या वचनावरून रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान, हीं सर्व अनित्यांत मोडतात आणि म्हणून 'यदानिच्चं तं दुक्खं' याचवनाप्रमाणें तीं सर्व दुःखांतच गणलीं जातात.

या रूप-वेदना-संज्ञा-संस्कार व विज्ञान यांस पंचस्कंध हें नांव असून, या पांचाचा मिळून हा देह झाला आहे. याला बौद्ध धर्मांत सत्काय असें म्हहताण.

' रूपुपादानखंदो, वेदनुपादानखंदो, सञ्ञुपादानखंदो, संखारुपादानखंदो, विञ्ञानुपादानखंदो, इमे खो आवुसो पंचुपादानखंधा सक्कायो वुत्तो भगवताति ।।" ( मज्झि मनिकाय ४४-२ ).

- रूप-उपादान-स्कंध, वेदना-उपादानस्कंध, संज्ञा-उपादानस्कंध, व विज्ञान-उपादानस्कंध या पांच उपादान स्कंधांना मिळून भगवान सत्काय म्हणजे शरीर म्हणतात,

अर्थात् हें पंचुपादानस्कंधात्मक शरीर हें अनित्य असल्यामुळें तें दुःख होय आणि जें दुःख तें अनात्मा-'यंदुक्खं तदनत्ता'-हें आतां ओघानेंच सिद्ध झालें. यावरून शरीर हें भावरूप आहे, अभावरूप नाहीं, ही गोष्ट सूर्य-प्रकाशाइतकी स्पष्ट असल्यामुळें ' अनत्ता ' शब्दाचा अर्थ ' आत्मा नाहीं ' असा होत नसून ' आत्मा नव्हे ' असा होतो व तसा केसा पाहिजे, हें व्याकरणशास्त्रदृष्टया युक्त आहे. याविषयी आतां अधिक सांगणें नलगे. आतां पुनः अनत्ताचा एकवार अर्थ सांगून पुढील चर्चेस लागतो. 'अनत्ता' म्हणजे आत्मा नव्हे. आत्म्यासारखा दिसतो. पण आत्म्याहून निराळा आहे!

यावरून आत्मा असा दुसरा पदार्थ आहे ही गोष्टहि त्यांतूनच पर्यायानें ध्वनित होते. कशी ती पहाः-

' यदनिच्चं तं दुक्खं, यं दुक्खं तदनत्ता, यदनत्ता तं नेतं मम, नेसो हमस्मि, न मेसो अत्ता ' ति। एवमेतं यथाभूतं सम्मप्पञ्ञाय दट्ठब्बं ।। ( खंद संयुत्त, वग्ग २ सुत्त ४ )

भावार्थ :-जें अनित्य तें दुःख, जें दुःख तें अनात्म, जें अनात्म तें माझें नव्हे, तो मी नव्हे, तो माझा आत्मा नव्हे. याप्रमाणें हें यथाभूत सम्यक् प्रज्ञेनें जाणावें. येथें 'पदनत्ता नेतं मम' 'नेसो हमस्मि' 'न मे सो अत्ता' हीं वाक्यें स्पष्ट व स्वच्छ सांगतात कीं अनात्म्याहून आत्मा हा निराळा आहे. अत्ता असा दुसरा कोणीतरी निराळा आहे.

हीं वाक्यें खुद्द भगवंताच्याच तोंडचीं आहेत. जें अनित्य म्हणजे नाशवंत आहे, तें सर्व दुःखच होय आणि जें दुःखरूप आहे तेंच अनात्म, म्हणजे अनात्मा. पण हा अनात्मा मी नव्हे, मी ज्याला आत्मा समजतो, तो हा नव्हे, तो माझा आत्मा नव्हे, असें बुद्ध भगवानाचें वरील वचनांत प्रत्यक्ष सांगणें आहे. आणि या वरील सुप्रसिद्ध वचनांत त्यांनी वैदिक आत्म्याचें-शाश्वतवादी व उच्छेदवादी लोकांच्या आत्म्याचें नव्हे-अस्तित्व व स्वरूप गर्भितार्थानें मान्य केलें आहे ! तें समजून घ्यावयाचें झालें तर त्या वाक्यांतील नञर्थ वाचक शब्द काढून, त्याला जुळेल असें तें वाक्य जरा बदलून भावरूपांत लिहिल्यास, त्यांतूनच वैदिक आत्म्याचें स्पष्ट प्रतिबिंब चवक उमटलेलें स्वच्छ दिसून येतें.

कसें तें आतां पाहा. 'यत् नित्यं तत् सुखं, यत् सुखं तदत्ता, यदत्ता तं एतं मम, सोऽहमस्मि, मे सो अत्ता ति-'

> भावार्थः- जें नित्य, तें सुख-जें सुख तो आत्मा, जो आत्मा तो हा माझा आहे, तो मी आहे, तो माझा आत्मा आहे !! किती सुंदर अर्थ !! किती मार्मिक कबुली !!

'यो नित्यः स आत्मा' हा बुद्धाचा पर्यायानें निघणारा आत्म्याचा गर्भितार्थ व 'नित्योऽनित्यानाम्' हा वैदिकांचा प्रत्यक्षार्थ या दोहोंत वैदिक आत्मलक्षणाचें साम्य तंतोतंत उमटलेलें दिसून येत नाहीं काय? आणि हा आत्मा म्हणजेच निर्वाण आणि निर्वाण म्हणजेच आत्मा ऊर्फ ब्रम्ह !! आणि भगवंताचें हें जें निर्वाण-उदंड सुखशांतिस्थान-तें भावरूप आहे, अभावरूप नाहीं ! कसें तें पुढील प्रकरणांत स्पष्ट करण्यात येईल. आत्म्याचे

जे निरनिराळे अर्थ आम्ही वर दिले आहेत, ते सर्व बुद्धांना मान्य आहेत. त्यांना आत्मा जो मान्य नाहीं, तो वैदिकांचा नव्हे, तर अवैदिकांचा-म्हणजे उच्छेदवादी व शाश्वतवादी अशा लोकांचा, हें ब्रम्हजाल सुक्तावरून स्पष्ट होतें. त्याला निराळा पुरावा नको.

उपनिषद् ऋषींनी आत्म्याचे प्रसंगानुसार जे निरनिराळे अर्थ दिले आहेत ते सर्व बुद्धांना मान्य होते, ही गोष्ट त्यांच्या या पुढील वचनांनी चांगली अभिव्यक्त होते. 'अत्ताहि किर दुद्दमो' ( ध. प. १२–३ ), येथें अत्ता म्हणजे मन. तें निग्रह करणें मोठें कठीण आहे, असा याचा आमच्या मतें वास्तविक अर्थ आहे. पण बौद्ध पंडित अत्ता याचा 'आपण' असा अर्थ करतात. पण आपण म्हणजे कोण हें मात्र त्यांना सांगता येत नाहीं ! आपण हें सर्वनाम असून, त्याचा उपयोग नामा ऐवजी करण्यांत येतो. पण बौद्ध आचार्य आपण म्हणजे कोण याचा खुलासा करण्याचें मुद्दाम टाळतात. आपण' या सर्वनामाचें संबंधी नाम सांगण्याची टाळाटाळी करतात ! 'पाणी मुरतें ते इथेंच !! त्याचप्रमाणें 'अत्तानं दमयन्ति पण्डिता' ( ध. प. ६–५ ) याचा अर्थ पंडित लोक मनाचें दमन करतात, असा आहे. 'उच्छिन्द सिनेहमत्तनो' ( ध. प. २०–१३ ) – शरीरावरील प्रेम काढून टाक–असा याचा अर्थ असून येथें 'अत्तनो' याचा अर्थ शरीर बोधक आहे. 'अत्तना चोदय अत्तानं' (ध. प. २५–२०), या वचनांत 'अत्तना' याचा अर्थ प्रज्ञाबुद्धीनें म्हणजे विवेक–बुद्धीनें आणि 'अत्तानं' याचा अर्थ मनास असा केला तरच त्याची सुसंगति लागते. 'अत्ताहि अत्तनो नाथो' ( ध. प. २५–२१ ), या वचनांत 'अत्ता' म्हणजे विज्ञानात्मा–अर्थात् वैदिकांचा जीवात्मा–आणि अत्तनो म्हणजे 'स्थूल शरीराचा' असा अर्थ असून, हें वचन 'आत्मैव ह्यात्मनो बन्धुः' (गी. ६–५) या गीतावचनाचा जवळ जवळ अनुवादच म्हटलें तरी चालेल. 'अत्तं पहाय' (सु. नि. ४३–५) येथें 'अत्तं' म्हणजे अहंकार असा अर्थ अभिप्रेत आहे. 'अत्तदीपो विहरथ' ( दी. नि. १६–२–२६ ) या वाक्यांत 'अत्तदीपो' म्हणजे विवेक पाजळून आणि 'अत्तसरणा विहरथ' या वाक्यांत 'अत्तसरणा' म्हणजे विवेक बुद्धीचा–सम्यक् प्रज्ञेचा–आश्रय करून असा अर्थ लावण्यांत आला पाहिजे.

' अत्तदीपा विचरन्ति लोके ' या सुत्तनिपातातील वाक्यांतहि ' अत्तदीपा ' म्हणजे ' विवेक बुद्धीला प्रदीप करून ' असा अर्थच अभिप्रेत असून तसा तो करण्यांत आला आहे. ( सु. नि. ३१–१५ ) अशा तऱ्हेचीं विविध अर्थांचीं अनेक उदाहरणें बुद्ध वचनांत दाखवितां येतील. पण वर जेवढीं दिलीं आहेत, तेवढीं आमच्या विधानास पुष्टि देण्यास पुरेशीं असल्यामुळें आणखी त्याच धाटाचीं इतर वचनें देऊन उगीच पाल्हाळ माजवूं इच्छीत नाहीं. झालें एवढें विवेचन आमचा कार्यभाग तडीस नेण्यास पुरेसें आहे.

आतां एकच पण महत्वाचें वचन देऊन पुढील मार्गास लागतो. बुद्ध भगवान एके ठिकाणीं स्वच्छच आणि स्पष्टच सांगून टाकतात कीं मी आतां ब्रह्मभूत झालो आहे !

' ब्रम्हभूतो अतितुलो मारसेनप्पमद्दनो। सब्बामित्ते वसी कत्वा
मोदामि अकुतोभयो ।। (सु. नि. ३३–१४ )

येथें बुद्ध ' मी ब्रम्हीभूत झालो आहे ' याचा अर्थ ' मी आत्मभूत झालो आहे. ज्ञानस्वरूप झालो आहे, असाच करतात ! या वचनावरून बुद्धाला वैदिकांचा आत्मा अमान्य होता, असें समजणें व सांगणें हें सत्यास व न्यायास धरून होईल काय ? याविषयीं पुढील निर्वाण प्रकरणांत विशेष–रीतीनें चर्चा करण्यांत येईल. आतां जातां जातां इतकेंच सांगतो कीं, बुद्ध हे आत्मा व अनात्मा हे दोन्ही शब्द पूर्ण अर्थानें उपयोग करतात. त्यांचा ' आत्मा ' म्हणजे वैदिकांचा आत्मा ( विज्ञानात्मा ) व ' अनात्मा ' म्हणजे शाश्वत व उच्छेदवादी अशा अवैदिक लोकांचा आत्मा –नामरूप– हा अर्थ तेथे अभिप्रेत आहे आणि निर्वाण म्हणजे वैदिकांचें ब्रम्ह उर्फ परमात्मा हें होय, हे आता निराळे सांगण्याचे कारण नाहीं.

बुद्ध या आत्मवादाच्या विवेचन प्रसंगीं नित्य वस्तु कोणती, सत्यवस्तु कोणती, अमर वस्तु कोणती, परम–सुखद वस्तु कोणती, ती अगर तशी वस्तु आहे कीं नाहीं, हा प्रश्न हाताळत नाहींत, पण म्हणून ती वस्तु त्यांना *मान्य नव्हती असा सूर काढणें फार धाडसाचें व मोठें अन्यायाचें होईल. या* प्रश्नाचा आत्मवादांत ऊहापोह केलेला नसला तरी ती नित्यवस्तु, अज्ञा-

तवस्तु, अमरवस्तु, अजर वस्तु, परमसुखकारक वस्तु, आनंदमय वस्तु, सत्य वस्तु असून, ती कोणती हें त्यांनी इतरत्र स्पष्ट शब्दांतच स्वच्छ सांगून ठेविलें आहे. त्याची आम्ही फोड करून सांगण्याचें पुढील प्रकरणासाठीं राखून ठेवीत आहो. वाचकांनी तोपर्यंत आपल्या जिज्ञासेला आवरून धरावें अशी विनंति आहे.

पुनः आणखी, बुद्धाच्या तथाकथित अनात्मवादांत आणखी थोडेसें खोल शिरलें पाहिजे. *अर्थात् त्यांचा अनात्मवाद आणखी थोडा छेडून पहिला पाहिजे*, म्हणजे त्या वादाचें वास्तव स्वरूप चांगलें उघडकीस येण्यास त्यापासून बरीच मदत होणार आहे. जगांत म्हणा अगर मनुष्याच्या शरीरांत म्हणा नित्य व शाश्वत असें कांही तत्त्व नसून, तेथें सगळा चंचल व क्षणिक व नश्वर वस्तूंचाच बाजार भरला व खेळ रंगला आहे, असा कौल बुद्ध देतात कीं काय, हें आतां पाहूं. मनुष्य मेला म्हणजे मागें कांहींच शिल्लक रहात नाहीं—सगळेंच नाश पावतें—अर्थात् देह गेला कीं त्याचें सगळें कांही गेलें—सगळाच बाजार आटपला—अशा मताचे भगवान नाहींत, असें आम्ही वर दाखविलेंच आहे. देहात्मवाद काय, अगर उच्छेदवाद काय, त्यांना यांपैकीं कोणताच वाद मान्य नाहीं, हें त्यांनी ब्रम्हजाल सुत्तांत स्पष्ट बोलून दाखविलें असून, त्या बरोबरच हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं, उलटपक्षीं कर्मवाद व पुनर्जन्मवाद वैदिकांप्रमाणेंच त्यांनाहि मान्य आहेत. मग आतां हा प्रश्न ओघानेंच पुढें येतो कीं पुनर्जन्म होतो तो कोणाचा? मरणोत्तर मागें कांहीतरी शिल्लक राहतें, हें मान्य केल्याशिवाय पूर्वजन्म काय, किंवा पुनर्जन्म काय, मुळीं धरूंच शकत नाहीं! आणि पुनर्जन्म एकदां मान्य केल्यावर तो कोणाचा—मेल्यावर पाप-पुण्य भोगणारा तो कोण—हें सांगणें मग क्रमप्राप्तच ठरतें. त्याशिवाय शब्दाला अर्थच नाहीं. तेव्हां आतां मरणोत्तर मनुष्यांतील कोणतें तत्त्व मागें राहतें, याचा थोडासा छडा घेऊन पाहूं.

या प्रश्नांत शिरावयाच्यापूर्वीं वैदिक धर्म या विषयावर काय कौल देतो, याचा प्रथम थोडासा कानोसा घेऊन पाहू. मनुष्याला पुनर्जन्म कशा-मुळें लाभतो, या विषयीं शतपथांत उल्लेख आढळतो तो असा—

'अथ खलु क्रतुमयोऽयं पुरुषः स यावत्क्रतुरस्माल्लोका-
त्प्रैति एवं क्रतुर्हामुं लोकं प्रेत्याभिसम्भवति'
( श. प. १०-६-३-१ )

पुरुष हा खरोखर वासनामय प्राणी आहे. हा लोक सोडून जातांना त्याचा क्रतु म्हणजे वासना जेवढी शुद्ध व श्रेष्ठ असेल, तेवढ्या उच्च व श्रेष्ठ योनींत तो मेल्यावर पुनः जन्म पावतो. यावरून वैदिकांचा पुनर्जन्म हा क्रतूवर–म्हणजे वासनेवर–अर्थात् कर्मावर–अवलंबून आहे, हें उघड होतें. याचा अर्थ असा कीं वासना अगर कर्म हे देहाबरोबर नाश न पावतां–भस्म न होतां–मरणोत्तरहि जिवंत राहतें आणि तें जीवात्म्याला चिकटून त्याबरोबरच रहातें. याचा अधिक स्पष्ट असा खुलासा याज्ञवल्क्यांनी केला आहे, तो असाः–

'तं विद्या कर्मणी समन्वारभेते पूर्वप्रज्ञा च'(श.प. १४–७–२–३)

मनुष्य मेल्यावर त्याचा जीवात्मा हा देहांतून जेव्हा बाहेर पडतो तेव्हां त्याच्या बरोबरच ज्ञान, कर्म व संस्कार होंहि निघून जातात. सारांश काय, तर प्रस्तुत जन्मीं मिळविलेलें ज्ञान, केलेलें कर्म व राहिलेली वासना उर्फ मन ही त्रिपुटी ब्रम्हज्ञान होऊन मोक्ष मिळेपर्यंत अज्ञान जिवाबरोबर कायमची चिकटून असते. वैदिकांचा लिंग देह म्हणतात, तो हा. हा लिंग देह ज्ञान होईपर्यंत जन्मजन्मांतरीं कायम असतो व राहतो. बुद्धाचें प्रतीत्य-समुत्पादातील विज्ञान तें हेंच होय.

आतां यावर बुद्धाचें काय मत आहे हें पाहूं. येथें आम्हीं हें सांगूं इच्छितो कीं, बुद्ध भगवंताच्या धर्माची मुख्य बैठक वैदिक तत्त्वज्ञानाच्या मूळ पीठावरच आधारलेली आहे. हें आम्हा हिंदूंना जसें समजतें व पटतें, तसें बौद्ध आचार्यांना त्यांच्या विपरीत ज्ञानदृष्टीमुळें व दुराग्रहीवृत्तीमुळें पटणें शक्य व संभवनीय नाहीं. त्यांच्या मतांध व दुराग्रही वृत्तीशी–बुद्धीशी–आम्हांस कांही कर्तव्य नाहीं. असो. प्रस्तुत मुद्यावर बोलावयाचें झालें तर याविषयीं भगवान काय सांगतात, तिकडे आतां वळूं. पुनर्जन्म कसा होतो व

कशाचा होतो, याविषयीं हें पुढील वचन मननीय आहे.:–

> ' चुतितो पन पुन पटिसन्धि, पटिसन्धितो पुन भवङ्ग 'ति. एवं भव–गति–ठिति–नियासेसु संसर–मानानं सत्तानं अविच्छिन्नं चित्तसंतानं पवति येव ' ।      ( विसुद्धमग्ग. १४–१२४)

*प्राणी मरणपावल्यावर म्हणजे त्याचें भवंगचित्तक्षय झाल्यावर* त्याचा पुनः पुनर्जन्म होतो. मरणानंतर म्हणजे भवंगचित्त निघून गेल्यावर मागें राहणाऱ्या विज्ञानाला ' पटिसंधि विज्ञान ' हें नांव असून, या विज्ञानाचा पुनर्जन्म होतो. नंतर पुनः भवंग–चित्ताचा संचार होतो. म्हणजे सुप्तमन पुनः जागृत होतें. या प्रमाणें भव–गति–स्थिति या अवस्थेत जन्ममृत्यूच्या भोवऱ्यांत घुटमळत राहणाऱ्या प्राण्याचें चित्तसंतान (म्हणजे मनोव्यापार) अव्याहतपणें चालू राहतें. बौद्ध धर्मांत विज्ञान, चित्त, व मन हे शब्द प्रसंगाप्रसंगानें वेगवेगळे वापरण्यांत आले असले, तरी ते सर्व अर्थतः एकच आहेत. ' विञ्ञाणं चित्तंमनो ति अत्थतो एकं ' असें विसुद्धिमग्गांत स्पष्ट म्हटलें आहे. पण हें विज्ञान केव्हां नष्ट होतें, तें या पुढील वचनांत सांगण्यांत आलें आहे. तें असें ' यो पनेत्य अरहत्तं पापुणाति तस्स चुति चित्ते निरुद्धे निरुद्धमेव होति ' ति ॥ (वि. म. १४–१२४ ) पण जो त्याच्यांत अर्हत्‌पद प्राप्त करून घेतो–म्हणजे पूर्ण ज्ञानी होतो– त्याचें विज्ञान मरणानंतर पतन पावतें म्हणजे तें पुनः जन्म पावत नाहीं. हें पतन पावणारें विज्ञान म्हणजे वैदिकांचा विज्ञानकोशात्मा होय, हें वाचकांनी लक्षांत ठेवावें.

या वरील उताऱ्यावरून हें आतां स्पष्ट झालें कीं, बुद्ध भगवंताच्या धर्मांत *मनुष्यातील चित्त उर्फ विज्ञान हें तत्त्व मरणोत्तर मागें शिल्लक* राहात असून, तेंच ' पटिसंधि–विज्ञान ' रूपानें पुनर्जन्म पावतें. बुद्ध यालाच गंधर्व असें टोपण नांव देतात. आणि या गंधर्वाचा उल्लेख गर्भधारणा कशी व केव्हां होतें, हें सांगताना स्पष्ट करतात. हें विज्ञान उर्फ गंधर्व त्यालाच वैदिक लोक लिंग देह म्हणतात. तेथें जीवात्मा हा आलाच. हा लिंग देह *म्हणजे इंद्रियें, ज्ञान, कर्म व वासना यांचा समुच्चय होय.* आणि हीच गोष्ट ' तं विद्याकर्मणी समन्वारभेते पूर्वप्रज्ञाच ' या शतपथवचनांत याज्ञवल्क्यांनी

स्पष्ट करून ठेविली आहे. म्हणजे बुद्धाचें पटिसंधिचित्त व वैदिकांचा लिंग-देह यांचें तत्त्वतः साम्य असून, या दोहोंचीहि आयुर्मर्यादा वासना उर्फ तृष्णा अगर कर्म यांच्या नाशावर अवलंबून आहे व असते. वासना बुजली अगर कर्म संपलें कीं लिंगदेह गळून पडलाच! अर्थात् भवचक्राचा फेरा चुकलाच! अर्थात् हाच मोक्ष!! हेंच निर्वाण!!

हेंच बुद्धाच्या भाषेत सांगावयाचें म्हणजे तृष्णा शमली कीं विज्ञानहि कोलमडून पडलेंच! पुनर्जन्माला कारण ही तृष्णाच असून, ती विझली म्हणजे दुःखाचा अंत हा झालाच! 'तण्हाखयं सब्बं दुक्खं जिनाति'– तृष्णाक्षय हा सर्व दुःखाचा परिहार करतो– असें बुद्ध भगवंतांनी चोखच सांगून टाकलें आहे. (धम्मपद २४–२१). अर्थात् हा तृष्णाक्षय म्हणजेच विज्ञान निरोध! अर्थात् बुद्धाचें निर्वाण! म्हणजेच दुःख विमुक्ति उर्फ मोक्ष!! अर्थात् वैदिकांचें हेंच शाश्वत आनंदधाम!!!

बुद्ध धर्मांत वैदिकांच्या लिंग देहालाच विज्ञान हें नांव आहे. त्याचा सामान्य अर्थ मन या शब्दानें सूचित होतो. आणि मन या शब्दांत वासना, इच्छा, विचार, भावना, स्मरण, चिंतन व चैतन्यतत्त्व इत्यादि अर्थ गर्भित आहेत. बुद्ध भगवान चित्त उर्फ चेतना याचा अर्थ कोठें कोठें कर्म असाहि करतात. ('चेतना' हं भिक्खवे कम्मं वदामि') आणि कर्म म्हणजे कुशल अगर अकुशल चेतना होय, असें 'कम्मनाम कुसलाकुसल चेतना' या वचनांत कम्म शब्दाचें स्पष्टीकरण करतात. (विसुद्धमग्ग. २०–२८) आणि हें जें वासना उर्फ तृष्णायुक्त कर्म, तेंच पुनर्जन्माचें कारण आहे– 'पुनब्भवजनकं कम्म' असा कर्म शब्दावर शेरा मारतात.

याचा अर्थ असा कीं वासनायुक्त कर्म– सकाम कर्म– तसेंच तृष्णा-युक्त चित्त हें पुनर्जन्माला कारण होतें व आहे, हें जसें बुद्धाला मान्य आहे, तसेंच तें वैदिकांनाहि पण आहेच. कारण ही गोष्ट याज्ञवल्क्यांनी मनुष्य मेल्यावर कोठें जातो, या आर्तभागाच्या प्रश्नास 'कर्म हैव तत्' हें उत्तर देऊन जनकाच्या विद्वत्सभेंत स्पष्ट केली आहे. बुद्धधर्मांत चित्त, विज्ञान, मन हे शब्द समानार्थवाचक आहेत, ही गोष्ट 'विञ्ञाणं, चित्तं मनो' ति

अत्यतो एकं' या विसुद्धमग्ग वचनावरून उघड होते. (वि. म. १४-८२) आतां वैदिकांच्या दृष्टीनें आत्मा हा मनोमयहि आहे -'आत्मा वै मनो'- या शतपथ वचनावरून सिद्ध होत असून, बुद्धांनाहि ती गोष्ट अमान्य आहे असें नाहीं. कारण बुद्धाच्या विज्ञान शब्दांत वैदिकांचा मनोमय आत्माहि गर्भित आहे, हें 'विञ्ञाणं चित्तं मनो' ति अत्यतो एकं' या वचनावरून अभिव्यक्त होतें. फक्त शब्दांत तेवढा फरक, अर्थांत नाहीं! यावरून बुद्ध भगवान हे योगीश्वर याज्ञवल्क्यांच्या पावलावरून पावलें टाकीत मार्ग चोखाळीत कसे चालले आहेत, याची सूज्ञ वाचकांना उघड जाणीव करून दिलीच पाहिजे, असें आम्हांस वाटत नाहीं.

येथपर्यंतच्या विवेचनावरून बुद्धांच्या मताप्रमाणें देखील मरणोत्तर मनुष्यांतील सर्व तत्त्व नाश न पावतां त्याच्यातील विज्ञान-अर्थात् मन-हे मागे शिल्लक राहतेंच. इतकेंच नव्हे, तर संस्कार (कर्म) व अविद्या हि त्याबरोबरच असतात. या विषयीं आतां अधिक वाद माजविण्यांत स्वारस्य आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. आतां येथें हें सांगितलें पाहिजे कीं, हें विज्ञान-मरणोत्तर राहणारें हें विज्ञान-तें पंचस्कंधातील विज्ञानापेक्षां निराळें आहे. पंचस्कंधातील विज्ञान-म्हणजे इंद्रियें व विषय यांच्या संपर्कामुळें उत्पन्न होणारें ज्ञान-अर्थात् इंद्रियजनित विषयज्ञान-हें अर्थात् नाशवंत आहे. तें पंचस्कधातील विज्ञान होय. पण पुनर्जन्माला कारण होणारें विज्ञान हें कर्मविपाक असून, तें प्रतीत्य समुत्पादातील विज्ञान होय. तें संस्कारोद्भव असून, शरीराबरोबर नाश पावणारें नसून, निर्वाण प्राप्तीपर्यंत त्याचें अस्तित्व कायम असतें. वैदिकांचा लिंग देह म्हणतात तो हा विज्ञान-देह होय. पंचस्कंधातील विज्ञान नव्हे. कारण तें विज्ञान नाश पावणारें आहे. मरणोत्तोर राहणाऱ्या विज्ञानाला वैदिकलोक विज्ञानात्मा या नावाने ओळखतात. आणि यांतच जन्म जन्मांतरीचें स्मरण, इच्छा, वासना, भावना, संस्कार इत्यादि बीजरूपानें गर्भित असतात. बुद्ध भगवान या विज्ञानात्म्यालाच गंधर्व असें म्हणतात.

मनाचे मुख्य दोन भेद आहेत. एक जागृत मन व दुसरें सुप्तमन याज्ञवल्क्य पहिल्याला व्याकृतमन व दुसऱ्याला अव्याकृत मन असें म्हणतात.

मन ज्यावेळीं बहिर्मुख होऊन बाह्य जगाशीं संबंध ठेवितें, म्हणजे ज्ञानेंद्रिय-द्वारा बाह्य जगांत वावरूं लागतें, तेव्हां तें चित्त होतें. म्हणजे त्याला आधुनिक भाषेत जागृत मन (Conscious mind) हें नांव प्राप्त होतें. त्यालाच वैदिक लोक चित्त असें म्हणतात. हें जें चित्त तें बाहेर जगांत शिरून तेथील इंद्रियद्वारा ज्ञान करून घेतें आणि तें ज्ञान सुप्तमनांत साठवून ठेवितें. आणि जेव्हां त्याची गरज पडेल तेव्हां तेंच स्मरण रूपानें पुनः जागृत मनांत येतें. हें जें स्मरण, तें फक्त मागें पाहिलेल्या वा अनुभविलेल्या गोष्टींचेंच असतें. अनुभव नसेल तर स्मरण होणार नाहीं. आणि ज्याला ज्याचा अनुभव असेल, त्यालाच त्याचें स्मरण होऊं शकतें. एकाचा अनुभव दुसऱ्याला स्मरत नाहीं. या स्मरण शक्तीच्या योगानें सुप्त मनांतील विचार अगर गोष्टी पुनः प्रगट मनांत प्रवेश करून तेथें जागृत होतात.

आतां हें सुप्त मन जर पंचस्कंधात्मक शरीराबरोबरच बौद्धाचार्यांच्या मताप्रमाणें–'सर्वंक्षणिकं सर्वं दुःखं–' या त्यांच्या महावाक्यानुरोधानें–नाश पावत असेल–मागें रहात नसेल, तर त्यांतील सांठीव अनुभव व ज्ञानहि मग त्याबरोबरच नाश व्हावयास हवें. अर्थात् एका जन्मांतील स्मरण मग दुसऱ्या जन्मांत येणें अगर होणें हें मग सहसा शक्य नाहीं. कारण पूर्व जन्मातील देहाचा पुनर्जन्मातील देहाशीं मग अर्थाअर्थी कसलाच संबंध राहत नाहीं. पूर्व जन्मातील सर्व संस्कार मग त्या जन्माबरोबरच देहपतनानंतर नाश होऊन जातात व गेले पाहिजेत. हें जर खरें मानलें तर बुद्ध भगवंतांना बोधिवृक्षाखालीं ते ध्यानस्थ होऊन बसले असता रात्रीच्या प्रथम यामांत पूर्व जन्माचें–अनेक पूर्व जन्माचें–स्मरण झालें, तें मग कसें? तें खरें नव्हे काय? तें मग खोटेंच कीं काय? खुद्द भगवंताचेच ते उद्गार आहेत! त्यांचें पालीतील मूळ वचनच येथें उध्दृत करतो म्हणजे वादाला जागा राहणार नाहीं. बुद्ध सांगतात तें असें:–

> 'सो एवं समाहिते चित्ते अनेक–विहितं पुब्बे निवासं अनुस्सरामि'–त्या सामाधिस्थितींत मी मागें झालेल्या अनेक पूर्व जन्मांचें स्मरण केलें. (म. नि. ८५–२१)

बुद्ध भगवंतांना हें जें मागील जन्मजन्मांतरीचें स्मरण झालें, तें कुठून व कसें झालें ? या जन्मातील असो वा पूर्व जन्मातील असो, त्याचें स्मरण व्हावयाचें तर त्याच्यामागें केव्हातरी अनुभव आला असला पाहिजे. तर त्याचें पुढें स्मरण होईल. हा शास्त्रनियम आहे. ' न ह्यन्येनदृष्टेषु वस्तु ष्वन्यस्य स्मृतिरुपपद्यते '–एकाने पाहिलेली वस्तु दुसऱ्याचा स्मरण–विषय होऊं शकत नाहीं, असा मानसशास्त्राचा सिद्धांत आहे. म्हणजे शरीर भिन्न झालें म्हणजे मनहि भिन्न होऊन, मागील अनुभवाचें–ज्ञानाचें–स्मरण होऊं शकत नाहीं. मागच्या जन्माचा पुढील जन्माशी संबंध असला व लागला तरच पूर्व जन्मातील ज्ञानाचें अगर अनुभवाचें उत्तर जन्मी स्मरण राहणें व होणें, हें शक्य आहे. एरवी नाहीं. मग बुद्धांना आपल्या पूर्वजन्माचें स्मरण झालें, या त्यांच्या उद्‌गारावरून मागच्या जन्माची आठवण ठेवणारें असें कांही नित्य व शाश्वततत्त्व-अविनाशी वस्तु–त्यांच्या देहांत असल्याशिवाय तसें स्मरण होणें हें शास्त्रदृष्टया शक्यच नाहीं. मग भगवंताचें तें सांगणें निव्वळ थापच-अजीबात हूलचं–म्हणावयाचें कीं काय ?

छे, तसें कसें होईल ? बुद्ध खोटें बोलतील–थापा मारतील–हें कसें शक्य आहे ? कोणास तें खरें वाटेल ? ही गोष्ट अगदी सत्यच आहे की, ते जें बोलले, तें खरेंच बोलले ! यांत तिळमात्रहि संशय नाहीं ! त्यांचा विज्ञानात्मा ते जन्मावयाच्या आधीं तुसित लोकांत वास करून होता. या विज्ञानात्म्यास–लिंग देहास–गंधर्व अशी संज्ञा असून, मायादेवीच्या गर्भ धारणेच्यावेळीं तो तुसित लोकांतून येऊन तिच्या गर्भात शिरला, अशी त्यांची जन्मकथा आहे. ( दीघनिकाय १६–३–१५ ) संबोधि व्हावयाच्या आधीं–आर्यसत्याचें यथार्थ ज्ञान व्हावयाच्या अगोदर–बोधिसत्व- रूपांत आपणास अनेक जन्म ध्यावे लागले–जन्ममृत्युच्या भवचक्रांत सारखें घुटमळत रहावें लागलें-असें त्यांनी परिनिर्वाणास जावयाच्या अगोदर आपल्या शिष्यवृंदास स्पष्ट सांगितलें आहे.

( दी. नि. प. नि मू. १६–२–३ )

यावरून त्यांचा गंधर्व ऊर्फ विज्ञानात्मा पूर्वीपासून हयात होता, हें अनुमान चुकीचें म्हणता येईल काय ? नाहीं. आम्हांस वाटतें, नाहीं. कारण

त्यांच्या प्रतीत्यसमुत्पादाच्या तत्त्व-प्रणालीप्रमाणें अविद्या असेतोपर्यंत विज्ञान नाश पावत नाहीं. तें जन्मोजन्मी कायम असतेंच व असणारच. हा सिद्धांत मान्य केला तरच पूर्वजन्म व पुनर्जन्म सिद्ध होतो व बुद्धाचे वरील उदार सत्य व सार्थ ठरतात व ते विचारी जगाला पटतात व मानवतात. भगवान कृष्णांनी देखील गीतेंत अर्जुनाला.—

> ' बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
> तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ '

हेंच सांगितलें आहे. असो

एकंदरींत सांगावयाचें तात्पर्य काय तर मरणोत्तर देखील मनुष्य हा सर्वांशी नाश पावत नसून, विज्ञानरूपानें-कर्मरूपानें-मनोरूपानें-तो मागें शिल्लक राहतो, ही गोष्ट प्रत्यक्ष बुद्ध भगवंताच्या वचनावरून, व त्यांच्या धर्मातील इतर तत्त्वप्रणाली वरून व अनुभवावरून स्वच्छ व स्पष्ट शाबीत होते. नागसेनानें ही स्मृति अभिज्ञेच्या योगानें होते अशी अखेर स्पष्ट कबूली दिली आहे आणि अभिज्ञा म्हणजे तरी काय ? दिव्यज्ञान ! ' अंतर्ज्ञान ' आत्मस्फूर्तज्ञान ! अविद्यानाशाचे व निर्वाणप्राप्तीचें सत्यज्ञान ! हें ज्ञान ज्याला झालें त्याला दिव्यदृष्टि व दिव्य श्रुति लाभते ! तो कामरूप बनतो ! पूर्वजन्मस्मृति जागृत होते ! दिव्यज्ञान व मुक्तिज्ञान उजळतें ! या ज्ञानालाच प्रज्ञा अशी संज्ञा आहे. ही अभिज्ञा बाहेरून येत नाहीं. तर ती शरीरांतच सुप्त असते. पुढें योगाभ्यासानें —समाधि अभ्यासानें— जागृत होते, इतकेंच. वैदिकांच्या योगशास्त्रांत हें स्पष्ट सांगितलें आहे.

यावरून हें स्पष्ट आहे कीं, बुद्धाचा जो अनत्ता ( अनात्मा ) आहे, तो अनित्य असून नामरूपात्मक पंचस्कंधापुरतीच त्याची व्याप्ती आहे. हें आतां वाचकांनी विसरूं नये. नामरूप म्हणजे चतुर्भूतात्मक जडदेह व वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान ( विषयज्ञान ) यांचा समुच्चय असून, तें नाशवंत आहे. या पंचस्कंधात्मक देहालाच नाश आहे-मृत्यु आहे-अंत आहे. प्रतीत्यसमुत्पादातील विज्ञान हें वरील देहपातानंतर नाश पावणारें

नसून, अविद्या जाईपर्यंत तें कायम असतें व राहतें. आणि निर्वाण प्राप्त होईतोपर्यंत तेंच पुनः पुनः जन्म पावतें. या विज्ञान देहांतच पूर्व जन्माचें व पूर्व अनुभवाचें स्मरण गुप्त व सुप्तरूपांत राहिलेलें असतें आणि जे योगी आहेत, त्यांनाच तें प्रगट होतें.

भगवान बुद्ध हे योगिराज असल्यामुळें–शंकराचार्यांच्या मताप्रमाणें 'योगिनां चक्रवर्ती' असल्यामुळें–त्यांना पूर्वजन्माचें ज्ञान–स्मरण–झालें, हें ठीकच झालें. पण इतरांना तसें होणें हे दुष्कर आहे. ज्यांनी योगविद्या साध्य करून घेतली, त्यांना अलौकिक अशा दिव्यसिद्धीचा–दिव्य शक्तीचा–लाभ होतो. योगविद्येचा प्रभावच असा आहे कीं, त्यानें बुद्धि उजळते. मनाच्या सर्व सुप्त व गुप्त शक्ति जागृत होतात व स्मरणशक्ति तीक्ष्ण व सूक्ष्म बनते. या सर्व गोष्टी भगवंताना साध्य झाल्या होत्या. त्यांनी तत्कालीन समाजाच्या नाडया ओळखून, त्याला पटेल व पचेल अशा मध्यम मार्गाची–धर्मोपदेशाची भूमिका पत्करून, सुगम व सुबोध अशा पंचस्कंधात्मक अनत्ता–तत्त्वावरच–अनित्यवस्तूंवरच–दुःखमीमांसेवरच–सगळा भर देऊन, आपल्या नवीन धर्माचें टोलेजंग धर्ममंदीर उभारून त्यांत बहुजन–समाजाच्या दुःखविमुक्तीची सुंदर सोय करून दिली, यांत काय बिघडलें ? बुद्धांनी केलें तें त्याकाळीं अगदी योग्यच होतें.

यावरून त्यांना दुःखविमुक्तिपुरतेंच ज्ञान होतें, त्या पलीकडलें नव्हतें, असा समज मात्र कोणी करून घेऊं नये. त्यांना त्यापलीकडील सूक्ष्मतर ज्ञान होतें, हें समजण्यास ही पुढील गोष्ट उत्तम पुरावा आहे. भगवान कोशांबी येथें असतांना त्यांचा तळ सिसप अरण्यांत पडला होता. त्यावेळीं तेथें जमलेल्या भिक्षुवृंदाला उपदेश करीत असतां शेजारच्या एका सिसप झाडाचीं पानें ओरबडून आपल्या मुठींत भरून घेऊन, ती भरलेली मूठ भिक्षूंच्या पुढें धरून त्यांना उद्देशून ते म्हणाले:– 'भिक्षुहो ! सांगा आतां, या माझ्या मुठींतील पानें अधिक आहेत की झाडावरचीं अधिक आहेत ? तुम्हांस काय वाटतें ? त्या प्रश्नाला त्या भिक्षूंनी उत्तर दिलें कीं 'हें काय विचारावें ? भदंत ! झाडावरचीं अधिक असणारच !' हें त्यांचें

उत्तर ऐकून भगवंतांनी त्यास पुढें जो उपदेश केला तो येथें अत्यंत मननीय आहे. ते म्हणाले-भिक्षुहो, मी जें कांही जाणलें आहे, पण तुम्हांस सांगि- नाहीं—कळविलें नाहीं—उपदेशिलें नाही—असें ज्ञान अजून अपार व अनंत आहे ! तें सगळें मी तुम्हांस सांगितलें नाहीं- उपदेशिलें नाहीं- याचें कारण इतकेंच कीं, तसें करणें हें मला इष्ट वाटलें नाहीं. जें ज्ञान सांगून- उपदेश करून—तुमचा फायदा होणार नाहीं, तें ज्ञान सांगून काय होणार आहे ? ज्या ज्ञानोपदेशानें तुमचें चारित्र्य उच्चतर व जीवन पवित्रतर होणार नाहीं, तुमची विषयतृष्णा शमणार नाही, दुःख हटणार नाहीं, शांति - समाधान लाभणार नाहीं, निर्वाण साधणार नाहीं, असें रुक्ष व नीरस ज्ञान सांगून काय लाभ होणार आहे? म्हणूनच मी तुम्हांस तें सांगितलें नाही व सांगू इच्छित नाहीं. मात्र तुम्ही आतां इतकेंच करावें कीं, आतांपर्यंत मी जें कांही तुम्हांस सांगितलें आहे—शिकविलें आहे—उपदेशिलें आहे, तेवढें तुमच्या मनांत बिंबलें व बुद्धींत ठसलें म्हणजे पुरें आहे. अधिक सांगण्याची जरूरी वाटत नाहीं. माझा उपदेश नीट लक्षांत ठेऊन, त्याप्र- माणें वर्तन करा, म्हणजे निर्वाण खात्रीनें पदरीं पडलेंच म्हणून समजा ! !

( संयुक्त निकाय ५-४-३७ )

भगवंतांच्या या भाषणावरून एवढी गोष्ट स्पष्ट होत नाहीं काय कीं, त्यांनी जें ज्ञान जगास उघट सांगितलें, जो उपदेश जगास प्रत्यक्ष दिला, त्यापेक्षांहि अधिक ज्ञान—उच्च व सूक्ष्म ज्ञान—श्रेष्ठ व पवित्रज्ञान—अतींद्रिय असें गूढ ज्ञान—त्यांच्याजवळ होतें. पण हें ज्ञान बाहेर जगास सांगण्याच्या भरीस ते पडले नाहींत. याचें कारण हें कीं अतींद्रिय अशा गूढ व सूक्ष्म ज्ञानोपदेशापासून सामान्य जनतेला-तत्कालीन मतमतांतराच्या गोंधळांत सांपडलेल्या भ्रमिष्ट लोकांना-त्यांच्या मतें म्हणण्यासारखा फायदा नव्हता, म्हणून वैदिक ऋषींच्या गहन व गंभीर अशा इंद्रियातीत व सूक्ष्म बुद्धिग्राह्य असें श्रेष्ठ आत्मज्ञानाच्या नादीं ते लागले नाहींत.हें योग्यच झालें. मात्र त्यांना वैदिकांच्या आत्म्याचें ज्ञान नव्हतें. हा समज मात्र अत्यंत चुकीचा आहे. त्यांना त्याचें पूर्ण व यथार्थ ज्ञान होतें, हें त्यांच्या निर्वाण लक्षणावरून अगदी स्पष्ट होतें. पण भगवंतांची योगविद्या व आत्मज्ञान

त्यांच्या पश्चात् त्यांच्या आचार्यांत नसल्यामुळें त्यांनी भगवंतांच्या प्रत्यक्ष शिकवणीवरच भर देऊन–कोरड्या शब्दावरच भिस्त ठेवून–वैदिक आत्म्याची यथार्थ ओळख करून न घेतां शाश्वतवादी लोकांच्या भ्रामक आत्म्यालाच 'आत्मा' मानून, त्याचें खंडण म्हणजे वैदिक आत्म्याचें खंडण अशा भ्रमांत पडून बुद्धाच्या पश्चात् त्यांनी वैदिक धर्माशी झुंज घालण्याचा अव्यापारेषु व्यापार केला! अजून त्यांचा तो भ्रम गेलाच नाहीं व जाणें शक्य नाहीं! पंथाभिमान हा महादुस्तर आहे. या दुराग्रही बौद्ध आचार्यांशी आम्हांस कांही कर्तव्य नाहीं, असो.

तेव्हां येथें सांगावयाचा मुद्दा एवढाच कीं भगवंतांनी उपदेशिलेला धर्म व सांगितलेला मार्ग अगदीं व्यावहारिक सत्य–इंद्रियगोचर-बुद्धिग्राह्य–असा असून, कोणालाहि त्याची सत्यता, तेव्हां काय नि आज काय, आपल्या अनुभवांत पडताळून पाहतां येण्यासारखी आहे. हिंदूंना तो धर्म तितकासा समर्पक व आकर्षक वाटत नसला, तरी इतरांना तो खात्रीनें विचारणीय, आदरणीय व अनुसरणीय आहे, यांत तिलमात्र शंका नाहीं. त्यांची धर्मतत्त्वें कोणत्याहि टोंकाला जाऊन भिडलेली नसून, तीं सुवर्ण मध्यावर केंद्रित झालीं आहेत. त्यांची चार आर्य सत्यें. व त्याला उपकारक असें तत्त्वज्ञान याचाच तेवढा मोठ्या चातुर्यानें पुरस्कार करून, त्यांनी आपल्या धर्माचा विजयी झेंडा जगभर यशस्वीपणें नाचविला! यांतच त्यांचें विभूतिमत्त्व दिसून येतें.

येथपर्यंतच्या विवेचनावरून एवढी गोष्ट निर्विवाद आहे कीं भगवान बुद्धांचा अनत्तावाद हा वैदिकांच्या आत्मवादाशीं मुळींच विसंगत व विरोधक नसून, उलट एका अर्थानें त्याला उपकारक व परिपोषक असाच आहे. 'जें अनित्य, तें आत्मा नव्हे'–'यदानिच्चं तदनत्ता–हें भगवंतांचें मांगणें व जो नित्य तो आत्मा–'नित्योऽनित्यानाम्–' हें वैदिकांचें सांगणें यांत अर्थतः फरक आहे कुठें? वाचकांनी हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं बुद्धधर्माचा अवतार हा दुःखोत्पत्ति व दुःखविमुक्ति हें सांगण्यासाठींच झाला आहे. आणि हें बुद्धधावकांस पदोपदीं ठसविण्यासाठींच त्यांनी अनत्ताचें वारंवार

वर्णन व उपदेश केला आहे. पण गम्मत ही कीं वैदिकांच्या आत्म्याचा नांवाला सुद्धां कोठेंहि स्पर्श केला नाहीं. या वैदिकांच्या आत्म्याविषयी व आत्मस्वरूपाविषयीं –वैदिकांच्या सूक्ष्म तत्वज्ञानाविषयीं– त्यांनी गंभीर औदासीन्य-कठोर मौनवृत्ति-स्वीकारली आहे. मात्र विचार करण्यासारखी गोष्ट ही कीं उपनिषत्कथित 'आत्मा नाहीं' असें ते स्पष्ट व निःसंदिग्ध शब्दांत कोठेंच सांगत नाहींत ! ! व त्या आत्मवादाचे खंडण करीत नाहींत ! ! तो सगळा खेळ व गोंधळ त्यांच्या पश्चात् त्यांच्या शिष्यगणांनी उठविला व रंगविला आहे. बुद्धाच्यानंतर महायान आचार्यांनीं बुद्धाच्या मूळ शिकवणीत उलथापालथ-घुसडा घुसड-केली आहे. बुद्धानी जें काही मोठया कटाक्षानें सांगितले आहे, त्या सर्व उपदेशांतील अनात्म्याची व्याप्ति फक्त पंच उपादानस्कंधापुरतीच असून, त्याच्यापुढें त्यांनी मौनाचा पडदा ओढला आहे. त्यांनी खंडण केलेला आत्मा म्हणजे रूप-वेदनादि पंच स्कंधाचा जो आत्मा, त्याचें ते खंडण होय. तें शाश्वतवादी व उच्छेदवादी मताचार्यांच्या आत्म्याचें खंडण आहे. वैदिकांच्या उपनिषदात्म्याचें खंडण नव्हें! बुद्धानंतर बौद्धाचार्यांनी ती उठविलेली अल्लड हूल आहे ! !

अत्ता (आत्मा) कशाला म्हणावें हें बुद्धांनी स्पष्ट शब्दांत न सांगितल्यामुळें त्यांचा अनत्तावाद विचारवंत जिज्ञासूंना अर्धवट व अपूर्ण वाटतो. मात्र त्यांची एक गोष्ट निश्चित म्हणावयास अडचण दिसत नाहीं. ती म्हणजे ही की, त्यांचा जो अनत्ता आहे, तो भंगुर व नश्वर आणि म्हणून दुःखमय आहे. पण वैदिकांच्या आत्म्याकडे दृष्टिक्षेप केल्यास तो नित्य, तसाच शाश्वत व म्हणून आनंदमय आहे. आणि मौज ही कीं हा वैदिकांचा आत्मा म्हणजेच बुद्धाचें निर्वाण ! ! नुसत्या शब्दाकडेच ज्याला पहावयाचें आहे, त्याला अनत्ता व अत्ता यांत विरोध आहेसा दिसतो. पण अर्थाकडे–तात्पर्याकडे–ज्यास पहावयाचें आहे, ते शब्दवलाखीनें कधीहि फसणार नाहींत. आणि भगवंतानी हेंच सांगितलें आहे. 'अत्थंहि नाथो सरणं अवोच न ब्यञ्जनं' अर्थच मुख्याधार, शब्द नव्हे असें त्यांनी स्पष्ट म्हटलें आहे. 'अर्थे तात्पर्यं, न शब्दे '– अर्थात तात्पर्य, शब्दांत नाहीं. या वैदिक वचनाचाच वरील वचन अनुवाद आहे.

आतां यावर कांहीं वीर्य शंकेखोर याचक असा प्रश्न करतील कीं तुम्ही सांगता हें सर्व ठीक. पण भगवंतांचा अनात्मवाद ऋषींच्या आत्मवादास उपकारक व परिपोषक असाच जर होता व असला तर मग तो आत्मवाद त्यांनी कां नाहीं स्वीकारला ? आणि त्याचें स्पष्ट शब्दांत मंडण व स्वागत कां नाहीं केलें ? तसें करावयास कोणती हरकत होती ? हा प्रश्न एका अर्थी ठीक आहे. पण भगवंतांनी तसें कां नाहीं केलें, याचें कारणहि पण तितकेंच सरळ व सबळ आहे. हें समजावयास त्यांच्या कालीन धार्मिक परिस्थिति व वातावरण कसें काय होतें, इकडे जरा नजर फिरविल्याशिवाय भगवंतांनी तसें कां केलें नाहीं, अनत्तावादावरच सगळा भर कां दिला, याचा उलगडा होणार नाहीं. म्हणून त्यावेळच्या लोकपरिस्थितीकडे आतां जरासें डोकावून पाहूं या.

अशावेळीं भगवंताचा तेथें उदय झाला होता की, देहच आत्मा, रूपच आत्मा, वेदना, संस्कार, विज्ञान हाच आत्मा म्हणून वाद घालणारे कांही पाखंड लोकांचा वितंड वाद बोकाळून बसला होता. त्याच प्रमाणे पाप-पुण्य नाहीं, पुनर्जन्म खोटा, स्वर्गनरक सबझूट, कर्म निरर्थक, या व अशा अनेक पाखंड मतांचें वर्चस्व हाणून पाडण्यासाठीं व त्यांचें खंडण करण्यासाठींच भगवंताचा नवा धर्म हिरिहिरीनें पुढें आला व मोठ्या चातुर्यानें व युक्तिवादानें त्यांचें तोंड बंद करून, वहकत चाललेल्या जनसामान्याला नीट शुद्धीवर-सरळ वळणावर-आणण्याची सुंदर कामगिरी त्यानें केली ! यांत वाईट तें काय झालें? वैदिक धर्माशी झुंज घालण्यासाठीं भगवंताचा अवतार नसून, अवैदिक धर्माचें कम्मरडें मोडण्यासाठीं -देहात्मवादाचें उच्चाटण करण्याठीं-उच्छेदवादाला मूठमाती देण्यासाठींच-होता, असें त्यांचे महत्वाचे ग्रंथ काळजीपूर्वक वाचून पाहिल्यावर ठांसून सांगण्यास मग कोणासच भ्यावयास नको ! त्यांचा 'अनत्तावाद' अवैदिक-अशास्त्रीय-धर्माचें खंडणार्थच जन्मास आला, देह म्हणजेच आत्मा, मन म्हणजे आत्मा, वेदना-संस्कार-विज्ञान म्हणजेच आत्मा, या देहात्मवादाला शह देण्यासाठीं, त्याला रोखून धरण्यासाठींच जन्मास आला. नहून तो वैदिक धर्माच्या मळावर-आत्मवादावर-घाव घालण्यासाठीं नव्हे !

बुद्धांना वैदिकांच्या या पुढील गोष्टी मान्य होत्या. पाप-पुण्य स्वर्ग-नरक, पूर्वजन्म-पुनर्जन्म, बंध-मोक्ष, इत्यादि सर्व गोष्टी कमी अधिक मानाने मान्य होत्या पण उच्छेदवाद्यांना त्या नव्हत्या. ही गोष्ट जमेस धरली, तर त्यांना वैदिक धर्माचे शत्रु असें म्हणण्याचें पाप कोणी व कसें करावें? आमचें तर असें स्पष्ट मत आहे कीं, त्यांचा धर्म अवैदिकवादास मूठमाती देण्यासाठींच अवतरला असून, वैदिक मताला उखडून काढण्यासाठीं नव्हे व नाहीं. मग कोणी काय म्हणणारे म्हणोत! त्याचें आम्हांस सोयेरसुतक मुळींच नाहीं.

आतां जातां जातां तात्पर्यरूपानें शेवटीं सांगावयाचें इतकेंच कीं शरीर, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान यांपैकीं कोणतेंच तत्त्व नित्य नसून, सर्वच अनित्य-अतएव नश्वर-आणि म्हणून दुःखमय असल्यामुळें, त्यांचा आनंदरूप अशा नित्य व शाश्वत 'आत्म' शब्दांत समावेश होऊं शकत नाहीं. हें सांगण्याचा भगवंताचा आशय त्यांच्या पंचस्कंधात्मक अनात्म व्याख्येवरून अगदी स्पष्ट व्यतीत होतो. आतां त्यांनी आनंदमय अशा नित्य व शाश्वत आत्म्याचा त्या अनत्ता-प्रवचनाबरोबर उल्लेख केला नाहीं, हें जरी खरें असलें, तरी त्यांनी तो विषय अजीबात नजरेबाहेर केला होता असाहि प्रकार पण झाला नाहीं. तो विषय-वैदिक आत्म्याचें स्वरूप-पुढें त्यांनी 'निर्वाण' व्याख्यानांत पर्यायानें आत्मरूपांतच रंगविलें व हाताळलें आहे, हें वैदिकांना जसें स्वच्छ उमजतें, तसें बौद्धपंडितांना उमजणें शक्य नाहीं. बुद्ध हे वैदिकांच्या अतर्म्याविषयी नांव घेऊन प्रत्यक्ष कांहीं बोलत नसले, तरी वैदिक आत्म्याचा सर्व शृंगारसाज त्यांनी आपल्या निर्वाणावर चढवून, एकापरीनें आत्म्याच्या अस्तित्वाला गर्भित मान्यता व पाठिंबाच दिला आहे, हें आम्हां हिंदूंना जसें चक्क व स्पष्ट समजतें, तसें तें बौद्धपंडितांना समजणें शक्य नाहीं. हें आमचें बुद्धदर्शन आहे. बौद्धदर्शन नव्हे. बुद्धाचे धर्मोपदेशक व पंथाभिमानी अशा बोगट बुद्धीच्या दुराग्रही आचार्यांशीं आम्हांस कांहीं कर्तव्य नाहीं.

वैदिकांचा आत्मा हा जडवादी लोकांच्या आत्म्याहून म्हणजे पंचस्कंधात्मक आत्म्याहून निराळा व स्वतंत्र आहे व तो नित्य, शाश्वत, ध्रुव

व आनंदमय असून, त्या व्यतिरिक्त इतर सर्व धर्म,–सर्व संस्कार–हे अनित्य व॰ म्हणून नाशवंत अर्थात् दुःखरूप आहेत, ही गोष्ट भगवंताना पूर्ण समजून चुकली होती. आणि म्हणून आनंदाला त्यांनी अखेर स्पष्ट बजावून सांगितलें कीं,

'अनिच्चा खो आनंद सङ्खारा, एवं अध्दुवा खो आनंद सङ्खारा, एवं अनस्सासिका खो आनंद सङ्खारा, यावञ्चिदं आनंद अलमेव सब्बसङ्खारेसु निब्बिन्दितुं, अलं विरज्जितुं, अलं विमुच्चितुं'॥ (दी. नि. १७-१६)

इतकें सांगितल्यावर आपल्या धर्माचें सारसर्वस्व–म्हणजे अनत्तावादाचें तत्वज्ञान–म्हणून त्यांनी पुढील तीन सूत्रमय वचनें गाथारूपांत ग्रथित करून ठेविलीं आहेत. तीं जिज्ञासूंना मननीय असल्यामुळें जशींच्यातशीं देऊन हें बरेंच लांबलेलें प्रकरण आटोपतें घेतो.

'सब्बे सङ्खारा अनिच्चा'ति यदा पञ्ञाय पस्सति।
अथ निब्बिन्दती दुक्खे एस मग्गो विसुद्धिया॥ २०-५॥
सब्बे सङ्खारा दुक्खा'ति यदा पञ्ञाय पस्सति।
अथ निब्बिन्दती दुक्खे एस मग्गो विसुद्धिया॥ २०-६॥
सब्बे धम्मा अनत्ता'ति यदा पञ्ञाय पस्सति।
अथ निब्बिन्दती दुक्खे एस मग्गो विसुद्धिया॥ २०-६॥
(धम्मपद २०, ५ ते ७)

भावार्थ:– सर्व संस्कार अनित्य, अतएव दुक्खदायक व म्हणून अनात्म हें जेव्हां प्रज्ञेनें ओळखिलें जाईल, त्याच प्रमाणें सर्व संस्कार दुःखरूप व सर्व धर्म अनात्म हें जेव्हां प्रज्ञेनें जाणलें जाईल, तेव्हांच मनुष्याची संसार-दुःखातून सुटका होईल. निर्वाणप्राप्तीचा–म्हणजे दुःखविमुक्तीचा–शाश्वतशांतीचा–परमसुखाचा–हाच एक मार्ग आहे!!

या सर्व चर्चेचा मथितार्थ इतकाच कीं भगवान बुद्धाचा अनत्तावाद वैदिकांच्या आत्मवादाशीं मुळींच विसंगत व विरोधक नाहीं, तर गर्भ–

तार्थनें त्याला पोषक असाच आहे. मात्र एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे: ती ही कीं वैदिकांच्या आत्मवादास–म्हणजे परमात्मवादास–त्यांनीं आपल्या प्रतीत्यसमुत्पादांत बगल दिली असली–बाजूला सारलें असलें–तरीं पुढें निर्वाणव्याख्यान प्रसंगीं त्याला अप्रत्यक्षपणें उचलूनच धरलें आहे. हें आम्ही पुढील प्रकरणांत स्पष्ट करून दाखवूच दाखवूं. आतां येथें अगदीं थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे वैदिक ऋषींच्या आत्मज्ञानाचें ध्येय जशी आनंदप्राप्ति तशीच बुद्धाच्या आर्यसत्याचें ध्येय दुःखविमुक्ति हें होय. दोघांचा समन्वय करून सांगावयाचें तर आनंदप्राप्ति म्हणजेच दुःखविमुक्ति व दुःखविमुक्ति म्हणजेच आनंदप्राप्ति !! कसें तें पहा, उजाडणें म्हणजे अंधःकार नष्ट होणें आणि अंधःकार नष्ट होणें म्हणजे उजाडणें. एकाचा नाश तोच दुसऱ्याचा उदय. हें सत्य समजल्यावर एकमेकांनी एकमेकांना नांव ठेवण्यांत–एकमेकाचें दोष काढण्यांत–एकमेकांची थट्टा-टवाळी करण्यांत-मग काय स्वारस्य आहे ? काय शहाणपणा आहे ? तेव्हां वैदिकांचे व बुद्धाचे मार्ग निरनिराळे दिसले अगर असले, तरी दोघांचे अंतिम ध्येय एकच व सारखेंच आहे, इतकें वाचकांना पटलें तर आमचा कार्यभाग झाला. भगवान बुद्धाच्या अनत्तावादाचें हें असें स्पष्टीकरण आहे.

## प्रकरण १० वें

# निब्बाण

निब्बाणं परमं सुखं

( धम्मपद १५-७ )

बुद्ध भगवंतांनी आपल्या धर्माचें जें अंतिम ध्येय ठरविलें, तें हें निर्वाण ! बुद्धाचें शाश्वत सुखशांतीचें श्रेष्ठस्थान म्हणजे तें हें निर्वाण ! बुद्धतत्त्वज्ञानाचें सुमधुर सारसर्वस्व म्हणजे तें हें निर्वाण ! बुद्धोपदिष्ट सदाचाराचें म्हणजे अष्टांगिक मार्गाचें दिव्य पारितोषिक म्हणजे तें हें निर्वाण ! नित्य शांतिसुखाचें सुमंगल धाम म्हणजे तें हें निर्वाण, उदंड आनंद, अखंड शांति, नि नितांत तृप्ति यांचें मनोहर माहेरघर म्हणजे तें हें निर्वाण ! ! ' येथें दुःख नाहीं, सुख आहे ! द्वेष नाहीं, प्रेम आहे ! स्वार्थ नाहीं, त्याग आहे ! तृष्णा नाहीं, तृप्ति आहे ! मोह नाहीं, ज्ञान आहे ! ताप नाहीं, शांति आहे ! नाश नाही, अमरत्व आहे ! ! असें हें सुंदर निर्वाण, मंगल धाम, परमसुखनिधान, त्याचें शिव स्वरुप काय नि कसें आहे, हें समजण्यास वाचक उत्सुक झाले असतील. तर तो त्यांची जिज्ञासा पूर्णतया नाहीं, अंशतःतरी तृप्त करणें, हें आतां क्रमप्राप्तच असल्यामुळें, त्या विश्वमंगल विषयाकडे आतां ही लेखणी वळवितो.

या विषयांत खोल शिरण्याच्या आधीं खुद्द बुद्ध भगवंतांनी आपल्या श्रेष्ठ सुखधामाचें- दुःख विमुक्तीचें-मंगलस्वरूप कसें काय रंगविलें आहे, हें प्रथम त्यांच्याच शब्दांतून चित्रित करण्याचा प्रयत्न करूं पाहतो. त्यावरून

निर्वाण म्हणजे शून्य असा जो बौद्ध पंडित अर्थ करूं पाहतात, तो खुद्द भगवंतानाच कितपत मान्य आहे, हें त्यावरून उघड होईल. तेव्हां त्यांच्याच शब्दांतून परमानंदरूप निर्वाणाचें एश्वर्यसंपन्न सुंदरस्वरूप वाचकांपुढें ठेवितो म्हणजे झालें.

सकृद्दर्शनी भगवान निर्वाणाचें स्वरूप थोडक्यात सांगतात तें 'निब्बाणं परमं सुखं' निर्वाण म्हणजे परमसुख, या शब्दांतून जाहीर करतात! ( धम्मपद, १५-७ ) 'परमसुख' या शब्दाचा वैदिक भाषेत 'आनंद' असा अर्थ होतो. कठोपनिषदांत वैदिक ऋषींनी ब्रम्हाला तंतोतंत हेंच, म्हणजे परमसुख, हेंच विशेषण लावलें आहे. (कठ ). तेथें ब्रम्हाचे स्वरूप 'परमं सुखं' या शब्दांनीं ध्वनित केलें आहे. हाच अर्थ भगवंतानी आणखी एके ठिकाणीं 'नत्थि संतपरं सुखं' -शांतिसारखें सुख नाहीं-या वचनांत सूचित करुन ठेविला आहे. ( धम्मपद, १५-६ ) यावरून शांतीलाहि तें परमसुख मानून निर्वाणाची ती दुसऱ्या तऱ्हेनें व्याख्या करतात. त्याच निर्वाणाची तिसरी व्याख्या म्हणजे 'रागक्खयो' दोसक्खयो, मोहक्खयो इदं वुच्चति निब्बानं'- रागक्षय, द्वेषक्षय, मोहक्षय ( अज्ञानक्षय ) याला निर्वाण म्हणतात- अशा स्वरूपांत देतात. यावरून परमशांति लाभावयास राग, द्वेष व मोह इत्यादि दोष म्हणजे मनोविकार हे संपूर्ण नष्ट झाले पाहिजेत, हा आशय सूचित होतो.

हे दोष-अर्थात् हे चित्तदोष-क्षय पावले म्हणजे कसलाहि प्रसंग गुदरला असतां त्यापासून दुःख होत नाहीं, शांति ढळत नाहीं- हें दर्शविण्यासाठीं 'निब्बाणं दुक्खविमुत्ति ति वुच्चति'- निर्वाण म्हणजे दुःखापासून सुटका-असा पर्याय अर्थ अभिव्यक्त करण्यांत आला. दुःख या शब्दांत जन्म, जरा, मरण, इत्यादि पहिल्या आर्यसत्यांत वर्णन केलेल्या दुःखाचा समावेश होत असल्यामुळें त्यांचा निरोध- म्हणजे गर्भवासापासून सुटका- त्याला निर्वाण असें 'भव-निरोधो निब्बाणं' या शब्दांनी ध्वनित करून ठेविलें. पुनः आणखी, या भवाला म्हणजे गर्भवासाला रूपवेदनादि पांच उपादान स्कंध कारण अस-

त्यामुळें त्यांचा निरोध म्हणजेच निर्वाण –पंचन्नं खन्दानं निरोधो निब्बाणं ( विसुद्धिमग्ग ) असा तोच अर्थ जरा निराळया शब्दांतून गोवून दाखविला. अर्थात् या पंच स्कंधाची उत्पत्ति तृष्णेमुळें होत असल्यामुळें या तृष्णेचे निर्दालन म्हणजेच निर्वाण ही गोष्ट ' तण्हक्खयं सब्बं दुक्खं जिनाति- तृष्णाक्षय हा सर्व दुःखावर मात करतो– ( ध. प. २४ २१ ) आणि अभिधम्म या ग्रंथांतहि ' तन्हया निक्खन्तता निब्बानं ' ति पवुच्चते ' – तृष्णा- त्याग म्हणजे निर्वाण– हा आशय अभिप्रेत करून ठेविला आणि हा तृष्णेचा नाश या निरोध व्हावयास अविद्येचे उच्चाटण झालें पाहिजे. तरच तृष्णेचा नाश शक्य आहे. म्हणून ' सब्ब मल विरहितं अच्चन्तं परिसुद्धं निब्बाणं, ( विसुद्धिमग्ग )– सर्व मल रहित व अत्यंत परिशुद्ध असें जें तेंच निर्वाण– अशी घोषणा करण्यांत आली.

याचें कारण असें की सर्व दुःखाचें आदिमूल ही अविद्या आहे. सर्व दोष या अविद्येमुळें जडतात आणि दोष म्हणजेच पाप होय. राग, द्वेष, लोभ, इत्यादि मनोविकार दोषरूप—मलस्वरूप–असून ते अकुशल धर्मांत –म्हणजे पापधर्मांत–मोडतात. ' मला वे पापकाधम्मा ' असें म्हटलें असून, ' अविज्जा परमं मलं '– अविद्या हें परम मल आहे– असा या अविद्येवर शिक्का मारण्यांत आला आहे (ध. प. १८–९). आणि म्हणून भगवंतानी भक्त सांगितलें कीं ' एतं मलं पहत्वान । निम्मला होथ भिक्खवो '— – भिक्षूहो, हा अविद्येचा मल चटसारा झाडून टाकून निर्मल व्हा ! ( ध. प. १८–९ ) या सर्वांचा तात्पर्यार्थ थोडक्यांत सांगावयाचा म्हणजे राग, द्वेष, लोभ, तृष्णा व अविद्या हीं सर्व दुःखालाच –जन्म जरा मरणादि संसारलाच–कारण असल्यामुळें त्या दोषांपासून सर्वस्वी अलिप्त असें जें अढळ व शाश्वत मंगल स्थान, तेंच बुद्ध भगवंताचें मुख्य ध्येय–निर्वाण–होय!

हीच गोष्ट अभिधम्मांत थोड्याशा निराळया शब्दांत दाखविण्यांत आली आहे. ती अशी :– ' पदमच्युतमच्चन्तं असङ्खातमनुत्तरं निब्बाणं ' ( अभिधम्म, १–६–१५–३१ )— अढळ, अनंत, परमशुद्ध व सर्वश्रेष्ठ असें जें आनंदपद, तेंच निर्वाण होय. आतां जातां जातां आणखी एक या निर्वा-

णाची व्याख्या देऊन निर्वाणलक्षण व स्वरूप याच्या वर्णनाला पूर्ण विराम देतो. सुमगल विलासिनीमध्यें या निर्वाणाला उद्देशून '.परमं खेमतभूमि अमत निब्बाण '– म्हणजे श्रेष्ठ, क्षेममय स्थान व अमृतपद असे जें, तें निर्वाण–अशा शब्दात ते रगविणेत आले आहे आम्हाला वाटते निर्वाणाचे हें इतकें विवेचन, बुद्ध भगवताचे निर्वाणपद ही काय चीज आहे, हे समजण्यास पुरेसें आहे आता पुढील रस्त्याला लागू

येथपर्यंत आम्ही निर्वाणाच्या निरनिराळ्या व्याख्या अगर कल्पना वाचकापुढें मांडून त्याचे यथार्थ लक्षण विशद करण्याचा प्रयत्न केला, याचा हेतु इतकाच कीं मागच्या प्रकरणात आम्ही भगवान बुद्धांनी वैदिकाच्या आत्मवादाचे खडण केले नसून, उलट पर्यायाने एकापरी मडणच केलें आहे, तें कसे तर्कशुद्ध व वस्तुस्थितीस धरुन आहे, त या प्रकरणांत दाखवून अखेर बुद्धाचे निर्वाण हें दुसरे कांहीं नसून तें प्रत्यक्ष वैदिकांचें ब्रम्ह अगर आत्माच आहे, याची खात्री वाचकांस करुन द्यावी बुद्धांच्या परिनिर्वाणानतर त्यांच्या अनुयायांनी सूक्ष्म दृष्टीनें अर्थाकडे न पाहतां, फक्त शद्वावरच सगळा भार टाकून, त्याच्या गूढ व सूक्ष्म शिकवणीचा व आशयाचा भडक रगात विपर्यास करून भगवताच्या पवित्र नावलौकिकास कळत न कळत गालबोट लावण्यास कारणीभूत झाले, ही फार खेदाची गोष्ट होय असे आमचे ठाम मत आहे

याचे कारण असे कीं भगवताना जसे वैदिक उपनिषदाचे व वैदिक धर्माचें ज्ञान होतें, तसे या आचार्यांना नसल्यामुळें त्याना भगवतांच्या शिकवणीचें मर्म जसे आकलन करावयास पाहिजे होत, तसे करतां आले नाहीं भगवान बुद्ध झाले तरी वैदिकाचा आत्मा अगर ब्रम्ह हा विषय आपल्या धर्मोपदेशप्रसगीं प्रत्यक्ष हिशोबात धरीत नाहींत, ही गोष्ट खरी असली तरी त्यांनी त्याऐवजी निर्वाणाची जी कल्पना रगविली आहे, ती पडताळून पाहता, त्याचे निर्वाण व वैदिकाचा आत्मा अगर ब्रम्ह या दोहोंत किती व कसे साम्य आहे किंबहुना निर्वाण व ब्रम्ह हीं दोन्ही वस्तुत एकच आहत, याचें अनुमान–नव्हे निर्णय–काढण्यास कोणाहि नि –

पक्षपाती व समतोल दृष्टीच्या निरीक्षकास मुळींच कठीण पडणार नाहीं, अशी आमची प्रामाणिक समजूत आहे. ही गोष्ट सिद्ध करण्यासाठीं आम्ही भगवंतांचे 'अत्थं हि नाथो सरणं न व्यञ्जनं'-अर्थच मुख्य, अक्षर म्हणजे शद्ब नव्हे-हें वचन डोळचापुढें ठेवून, प्रथम वैदिकांचें आत्मलक्षण देऊन, नंतर त्याची व बुद्धकथित निर्वाणाची साम्यता सिद्ध करून दाखविण्याचा अल्पसा पण धाडसी प्रयत्न करून दाखवितो. त्यावरून वाचकांनी काय बोध घ्यावयाचा तो घ्यावा म्हणजे झालें.

बुद्धाचें निर्वाण हें दुसरें तिसरें कांही नसून, तें साक्षात् वैदिकांचें ब्रम्हच आहे-आत्मतत्त्वच आहे-हें दाखविण्यासाठीं आतां थोडेसें विषयांतर करून, वैदिकांच्या उपनिषद क्षेत्रांत क्षणभर फेरफटका करून, तेथील ब्रम्हविषयक शद्बसौंदर्याचा थोडासा आनंद लुटू, म्हणजे बुद्धाच्या निर्वाणाचा आपोआपच खुलासा होण्यास सोयीचें होईल. वैदिक धर्मांत विश्वाच्या आदितत्त्वास-अविद्येच्या पलीकडे असणाऱ्या बीजशक्तीस-'ब्रम्ह' हें व्यापक नांव वापरण्यांत आलें असून, त्यालाच पर्यायानें 'आत्मा'-अयमात्मा ब्रम्ह-असेंहि म्हटलें आहे. म्हणजे ब्रम्ह व आत्मा हे दोन निरनिराळे शद्ब असले, तरी ते समानार्थवाचक असून, त्यांचें मूळ तत्त्व वस्तुतः एकच व सारखेंच आहे, हें अगोदर सांगून मोकळे होतो. 'अयमात्मा ब्रम्ह'-हा आत्मा ब्रम्ह आहे-ही श्रुतवचोक्ति आमच्यावरील विधानास पुष्टिच देत असून, त्या दोहोंचें शद्बचित्र उपनिषदांत रंगविलें आहे, तें पाहून वाचकांची त्यावरून सहज खात्री पटेल. म्हणून ब्रम्ह व आत्मा यांचें उपनिषदोक्त वर्णन आढळतें, तें असें:-

| ब्रम्हवर्णन | आत्मवर्णन |
|---|---|
| कठः-अव्ययं, नित्यं, अनाद्यन्तं, ध्रुवं (१-३-१५) | नित्योऽनित्यानां, चेतन श्चेतनानां (२-५-१३) |
| मुंडकः-विभुं, सुसूक्ष्मं, अव्ययं (१-१-६) | अमूर्तः, अजः, दिव्यः, अणुः (२-१-२ व ३-१-९) |

माण्डूक्यः –शान्तं, शिवं, अद्वैतं, शिवः, अद्वैतः, (१२)
अचिन्त्यं (७)

बृहदारण्यकः –अप्रमेयं, ध्रुवं अजः, अजरः, अमरः, अमृतः, अभय,
(४-४-२०) ४-४-२५)

श्वेताश्वतरः–निष्कलं, निष्क्रियं, सर्वव्यापी, साक्षी, केवलः, निर्गुणः,
शांतं, निरवद्यं, ६–१९ चेता, सर्वभूतान्तरात्मा (६–११)

कैवल्यः – विशुद्धं, अचिन्त्यं, अव्यक्तं
अरूपं, शिवं, प्रशान्तं, अमृतं, विभुं,
चित्, आनंदं, अद्भुतं, सूक्ष्मात्सूक्ष्मतरं (१–६ व १–१६)

हें वरील ब्रम्हात्मस्वरूपवर्णन अगदी संक्षिप्त स्वरूपांत देण्यांत आलें असलें, तरी तें मूळ स्वरूपांत असल्यामुळें प्रस्तुत कार्यभाग साधण्यास पुरेसें आहे. तसें सांगावयाचें झालें तर तो एक स्वतंत्र ग्रंथाचा विषयच होण्यासारखा आहे. पण तितक्या खोल पाण्यात शिरण्याचें हें स्थळ व प्रसंग नसून, फक्त सुगत–कथित निर्वाण हें वैदिकोक्त ब्रम्ह उर्फ आत्मा याशिवाय वस्तुतः निराळें असें नाहीं, इतकें दाखविण्यासाठीं व दाखविण्यापुरताच आम्ही येथें उपनिषदांचा आधार व सहाय्य घेऊन, प्रस्तुत विषयाचा खल करणार आहो. असो.

पुढें जावयाच्या अगोदर येथें आणखी एका गोष्टीचा खुलासा करणें इष्ट वाटतें. आत्मा या शद्बांत ब्रम्ह ऊर्फ परमात्मा व जीव उर्फ जीवात्मा या दोहोंचाहि समावेश होतो. वस्तुतः जीव व ब्रम्ह हीं दोन्हीं एकच आहेत. 'जीवो ब्रम्हैव ना परः' हें वचन प्रसिद्धच आहे. आणि आम्ही वर दिलेल्या ब्रम्ह व आत्मा यांच्या वर्णनावरून वाचकांस त्याची खात्री पटणार आहे. आणि वैदिकांचा जो जीवात्मा तोच बुद्धाच्या प्रतीत्य समुत्पादातील विज्ञान होय. कारण या जीवात्म्या प्रमाणेंच विज्ञान हेंहि पुनर्जन्म पावतें. वैदिकांचा आत्मा हा पांच कोशाचा आहे. अन्नमय कोश, प्राणमय कोश, मनोमय कोश, विज्ञानमय कोश व आनंदमय कोश असे हे आत्म्याचे पांच कोश असून,

त्यांतील चौथा जो विज्ञानमय कोश तोच बुद्धाचें समुत्पादातील विज्ञान होय. मनुष्य मेला तरी हें मरत नाहीं. मरणानंतर देह हा तेवढाच नाश पावतो. विज्ञान हें भावी जन्माचें सूक्ष्मरूपांत कर्मविपाकात्मक बीज होऊन राहतें. अविद्येचा नाश होई तोंपर्यंत याला नाश नाहीं. याला पटिसंधिचित्त असें पारिभाषिक नांव आहे. असो.

आतां बुद्धोक्त निर्वाणाचें स्वरूप व लक्षण कसें आहे, या प्रश्नाकडे वळूं. हा विषय आम्ही बौद्ध वाङमयांतील धम्मपद, विसुद्धिमग्ग, अभिधम्म, मज्झिमनिकाय, दीघनिकाय, उदान, इत्यादि ग्रंथाधारें हाताळणार आहो. बुद्धाच्या निर्वाणाकडे सूक्ष्म दृष्टि फिरविल्यास ते प्रत्यक्ष जरी नाहीं, अप्रत्यक्ष रीतीनें वैदिकांच्या आत्मवादाकडे कसे झुकले आहेत व त्याला त्यांनीं कसें उचलून धरलें आहे, याची गोड प्रचीति येऊन, गुणग्राहक हिंदु धर्मानें त्यांची गणना युगपुरुष म्हणून नवव्या अवतारांत करून,, त्यांचा जो गौरव केला, तो यथायोग्यच आहे, असेंच कोणालाहि वाटेल.

आतां बुद्ध भगवान निर्वाणाचें स्वरूप कसें सांगतात, हें प्रथम थोड्‌क्यांत वाखयून, मग ब्रह्म उर्फ आत्मा व निर्वाण यांचें अचूक साम्य दाखविणारें सुंदर शब्दचित्र वाचकांपुढें ठेवून, त्यांची जिज्ञासा तृप्त करण्याचा अल्पसा प्रयत्न करतो. निर्वाणाचा अर्थ बौद्धाचार्यांनी कांहीं जरी व कसा जरी केला असला, तरी त्यांच्याशी आम्हांस कांहीं कर्तव्य नसून, खुद्द भगवंतांच्या तोंडून जे शब्द निघाले आहेत, त्यांचाच आम्हांला मुख्यतः विचार करावयाचा आहे. म्हणून त्यांच्याच शब्दांत आम्ही निर्वाणाची यथार्थ रूपरेखा मांडून दाखविली म्हणजे आमचा कार्यभाग झाला. हें आमचें बुद्ध दर्शन आहे. बौद्ध-दर्शन नव्हे. हें वाचकांनी लक्षांत ठेविलें पाहिजे.

ज्यावेळी भगवंतांना संबोधि झाली, त्यावेळीं त्यांनी निर्वाणाला उद्देशून काढलेले उद्‌गार त्यांच्याच शब्दांत हे पुढील प्रमाणे आहेत.

'सो खो अहं भिक्खवे अत्तना जातिधम्मो समानो जातिधम्मे आदीनवं विदित्वा अजातं अनुत्तरं योगक्खेमं निब्बाणं परियेसमानो

अजातं....अजरं....अव्याधिं... अमतं....असोकं....असंकिलिट्ठं....
अनुत्तरं.. .योगक्खेमं निब्बाणं अज्झगमं '(अरियपरियेसनसुत्त २६-६)

भावार्थः- 'मी स्वतः जातिधर्मा, व्याधिधर्मा, मरणधर्मा, असून आणि जातिधर्माचे, व्याधिधर्माचे, मरणधर्माचे दुष्परिणाम प्रत्यक्ष. डोळ्यानें पाहून त्याहून विलक्षण अशा अजात, अजर, अव्याधि, अमर, अनुत्तर, . योगक्षेम अशा निर्वाणाचें मी ज्ञान करुन घेतलें'. आतां पहा या वचनांत-आणि संबोधिनंतरचे हें पहिलेंच वचन आहे-बुद्धांना ज्या निर्वाणाचें ज्ञान झालें, त्याचें लक्षण ' अजात अजर, अव्याधि, अमृत, अशोक व योगक्षेम, असें त्यांनी दिलें आहे. हें शून्याचें लक्षण ठरतें काय ?

याला सादृश्य असें वचन उपनिषदांत कोठेंतरी आढळतें की काय हें, आतां पाहू. योगीश्वर याज्ञवल्क्यांच्या शतपथ ग्रंथांत डोकावून पाहिलें तर तेथें आत्म्याचें वर्णन एके ठिकाणी केलेलें याप्रमाणें आढळतें. तें असें:-

'सवा एष महानज आत्माऽजरोऽमरोऽमृतोऽभयो ब्रम्ह'

(श. प. १४-७-२-३१)

भावार्थः- तो हा आत्मा महान, अज म्हणजे जन्मरहित, अजर म्हणजे जरारहित, अमर म्हणजे मृत्युरहित, व अभय म्हणजे भयरहित असें ब्रम्ह आहे. वर बुद्धाचे निर्वाणलक्षण म्हणून 'अजातं, अजरं, अमतं, अनुत्तरं असें जें दिलें आहे, तें याज्ञवल्क्याच्या आत्म्याच्या 'अज, अजर, अमृत, अभय' या वर्णनाशी किती तंतोतंत जुळत आहे! 'बुद्धांनी त्याच निर्वाणाला ' परमं सुखं' असें धम्मपदांत म्हटलें असून, कठोप-निषदांत ब्रम्हालाहि तंतोतंत ' परमं सुखं' हेंच विशेषण लावल्याचें आढळतें !

या निर्वाणाच्या वर्णनाचा विशेष पाल्हाळ न माजवितां फक्त वैदि-कांचें ब्रम्ह व आत्मा आणि बुद्धाचे निर्वाण यांचें हुबेहूब साम्य दाखविणारें प्रत्यक्ष शब्दचित्रच वाचकांच्या डोळ्यापुढें उभें करतो, म्हणजे तें पाहून वाचकांची सहज खात्री पटेल.

| वैदिक | | बुद्ध | |
|---|---|---|---|
| ब्रम्ह | आत्मा | निर्वाण | संस्कृत |
| १ अक्खरं (श्वेता.) .... | | अक्खरं | अक्षर. |
| २ .... | अदृष्टः (बृह.) | अनिदस्सनं (अंगु) | अनिदर्शनं |
| २ अ. अच्युतं | | अच्युतं (सं.नि.) | |
| ३ अजरं (श्वेता.) | अजरः (बृह.) | अजरं (म.नि.) | अजरं |
| ४ अभ्दुतं (कैवल्य) | .... | अब्भुतं (वि. म.) | अभ्दुतं |
| ५ अद्वितीयं (छां) | .... | नदुतीयं (अ.प.) | नद्वितीयं |
| ६ अनंतं (कठ) | अनंतः (कठ) | अच्चन्तं | अनंतं |
| ७ अनादि (कठ) | अजः (बृह) | अजातं (म.नि.) | अजातं |
| ८ अमृतं (कठ) | अमृतः (बृह) | अमतं (म.नि.) | अमृतं |
| ९ अव्यक्तं (कैवल्य) | अव्यक्तः | अनिदस्सनं | अनिदर्शनं |
| १० क्षेमं | .... | क्खेमं (वि. म.) | क्षेमं |
| ११ दुर्दर्श (कठ) | .... | सुदुद्दसं (वि.म.) | सुदुर्दर्श |
| १२ ध्रुवं (बृह) | ध्रुवः (बृह) | धुवं (संयुत्त) | ध्रुवं |
| १३ नित्यं (कठ) | नित्यः (कठ) | निच्चं (संयुत्त) | नित्यं |
| १४ परमं सुखं (छांदोग्य) | .... | परमं सुखं (ध.प) | परमं सुखं |
| १५ विशुद्धं (कैवल्य) | .... | विसुद्धि (वि.म.) | विशुद्धि |
| १६ शान्तं (मांडूक्य) | शान्तः (मांडूक्य) | संति (सुत्तनिपात) | शांति |
| १७ सत्यं (तैत्ति) | .... | सच्चं (वि. म.) | सत्यं. |
| १८ शिवं (मांडूक्य), | शिवः (मांडूक्य) | सिवं (संयुत्त) | शिवं |

येथें 'सच्चं, निच्चं अच्चन्तं, हीं निर्वाणाची विशेषणे 'सत्यंज्ञानमनन्तं' या ब्रम्हार्थीच निदर्शकें आहेत. हें वाचकांनी लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें हीं वरील ब्रम्ह-आत्मा-निर्वाण यांची लक्षणें सूक्ष्म रीतीनें एकमेकांस ताडून पाहिलीं म्हणजे सूज्ञ, सरळ.व. समतोल, वृष्टीच्या प्रामाणिक वाचकांना काय बरें दिसतें व काय बरें वाटतें ? इतरत्र मनता-

याचाच उदो उदो करणारे बुद्ध आपल्या श्रेष्ठ सुख-धामाला-नित्य, शिव, व शांत अशा परम सुख स्वरूप निर्वाणाला-अखेर ब्रम्ह ऊर्फ आत्म्याच्या जोडीस अप्रत्यक्ष रीतीने आणून बसवीत नाहींत काय ? या वैदिकांच्या आत्मस्वरूपाहून बुद्धाचें निर्वाण स्वतंत्र, निराळें व विलक्षण असें शून्य आहे, असें म्हणण्यास आतां कोण शाहणा तयार होईल? आणि अनात्मा याचा अर्थ आत्म्याचा अभाव अशी कोरड करण्यास कोण आपली जीभ विटाळील? वस्तुतः बुद्ध भगवंताचा जो निर्वाणवाद तोच वैदिकांचा आत्मवाद-असें म्हटल्यास-तसें चक्क व स्पष्ट बोलून दाखविल्यास-त्यांत चूक ती काय झाली? व त्यास नांव ठेवावयास जागा ती कोठें राहिली ? बुद्धाचें तत्त्वज्ञान सांगूनसवरून मध्यममार्गी आहे व वैदिकांचें शेवटपर्यंत जाऊन अगदी टोकाला भिडणारें आहे, हें लक्षांत घेतल्यास, मार्ग बदलल्यामुळें त्या मानानें दिशाहि बदलली व बदलावी लागली, हें क्रमप्राप्तच नाहीं काय ?

आम्ही मागच्या प्रकरणी बुद्ध अनत्तावादाचें मंडण करीत-असले तरी तें आत्मवादाचें खंडण नव्हे;-असें जें विधान केलें आहे, त्याला प्रस्तुत स्थळीं स्पष्ट आधार व ठसठशीत पुष्टि, चोकस बुद्धीला स्वच्छ प्रतीत झाल्याशिवाय रहात नाही. आता त्यानी आपल्या धर्माचें धोरण वैदिकांहून काहींसें निराळें आखले असल्यामुळें, त्याला धरून व्याख्यान करतांना सामान्य दृष्टीला कोठें कोठें आत्मवाद-विरोधाचा भास होतो, हें खरें. पण तो नुसता वरवरचा बुडबुडाच आहे! सत्यांश नव्हे!!

आतां हें बुद्ध भगवंतांचें निर्वाण हें अभाव रूप-शून्यरूप कां भावरूप-सद्रूप-याचा थोडासा मेरामर्श घेऊं. निर्वाण हा शब्द 'निर्' व 'वा' या दोन संस्कृत शब्दांपासून झाला असून, त्याचा अर्थ विझणें असा होतो. यावरून निर्वाण म्हणजे विझून जाणें-अर्थात् शून्यांत जाणें-नाश पावणें-असा बुद्ध नव्हे-बौद्धाचार्य-अर्थ करतात व तसा या बौद्धाचार्यांचे ग्रंथ पाहून पाश्चात्य पंडितांनी आपला ग्रह करून घेतला आहे व त्यांनी आपल्या ग्रंथांत त्यावर विवेचन करतांना निर्वाण म्हणजे विझून जाणें (Extinction),-शून्य बनणें-यावर भर दिला आहे. पण हा

अर्थ–हा ग्रह–बुद्ध भगवंतानाच मान्य नाहीं. कारण ते चार्वाकाप्रमाणें–नास्तिक अगर उच्छेदवादी नाहींत. हें आम्ही येथें पुनः एकवार स्पष्ट सांगू इच्छितो. 'भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनो कुतः ?' अशा मताचे तथागत नाहींत, हें त्यांनीच आपल्या तोंडानें जाहीर केलें आहे. मग त्यांचें निर्वाण शून्य–अगर अभावरूप–कसें असेल ? तें शून्य तर नाहींच. उलट ते वैदिकांच्या ब्रम्हाप्रमाणें सत् आहे. आनंद–रूप–'परमसुख' रूप–आहे. निर्वाण परमंसुखं' असें त्यांनी स्पष्ट बोलून दाखविलें आहे ! मग त्यांचे निर्वाण शून्य कसें असेल ?

तें सत् कां असत् याविषयीं भिक्षूंना उपदेश करताना ते पुढीलप्रमाणें त्याचें स्पष्ट वर्णन करतात ते असें:–

> 'अत्थि भिक्खवे अजातं अभूतं अकतं असंखतं नो चे तं भिक्खवे अभविस्स अजातं अभूतं अकतं असंखतं न इध जातस्स भूतस्स कतस्स संखातस्स निस्सरणं पञ्ञायेथ. यस्माच खो भिक्खवे अत्थि अजातं अभूतं अकतं असंखतं जातस्स भूतस्स कतस्स संखातस्स निस्सरणं पञ्ञायती' ति।' ( उदान ८–३ )

भावार्थः– हें जें निर्वाण आहे, तें अजात स्वयंभू, अभूत, व असंस्कृत असें आहे. हें जर अजात, अभूत, अकृत व असंस्कृत असें नसतें, तर जात, भूत, कृत व संस्कृत याचे उपशामन होणें मग शक्य झालें नसतें. भिक्षूहो ! तें अजात अभूत अकृत व असंस्कृत आहे म्हणूनच तर जात, भूत, कृत व संस्कृत याचें उपशमन होतें, हें समजलें जातें. या वचनावरून निर्वाण हें सत् कां असत्– शून्य का भावरूप–याची खात्री पटण्यास आणखी निराळा पुरावा पाहिजे कशाला ? बुद्ध भगवानच ते 'आहे' असें प्रत्यक्ष सांगत असतां–'एकंहि सच्चं न दुतीयमत्थि' ( अभिधम्म )–असें स्पष्ट जगाला जाहीर करीत असतां–'तें नाहीं' असा वितंडवाद करण्यांत दुराग्रह धरण्यांत–मग काय स्वारस्य आहे ? आणि ज्यांना ते शून्य वाटतें–अभावरूप वाटतें–त्यांनी तसें खुशाल समजून आपल्या मनाचें समाधान करून घ्यावें ! त्यांस आम्ही कांही आड येऊं इच्छित नाहीं !!

या वरील गोष्टीला पुष्टिकारक असा आणखी एक भगवताच्या तोंडचाच महत्वाचा पुरावा येथें हजर करतो त्यावरून सुद्धा वाचकाची खात्री होण्यास चांगली मदत होईल पुन: एके ठिकाणी भगवान म्हणतात –

' अत्थि भिक्खवे तद आयतन यत्थ नें ' व पथवी न आपो न, वायो न आकासानचायतन विञ्ञानचायतन न आकिचायतन न नेवसञ्ञानासञ्ञायतन न' आय लोको न परलोको उभो चन्दिमसूरिया, तद अह भिक्खवे न' एव आगति वदामि न गति न थिति न चुति न उपपत्ति अप्पतिट्ठ अप्पवत्त अनारम्मण एव त, एस एव' अन्तो दुक्खस्सा' ति '– ( उदान, ८–१ )

भावार्थ – भिक्षूहो ! असे एक स्थान आहे की जेथें पृथ्वी नाहीं, जल नाहीं तेज नाहीं, वायु नाहीं आकाशानंत्यायतन नाही, विज्ञानंत्यायतन नाहीं, अकिंचन्यायतन नाहीं, नैवसंज्ञानासंज्ञायतन नाहीं ! तेथें हा लोक नाही व परलोक नाहीं ! तेथें चंद्र नाहीं, सूर्य नाहीं ! मी या स्थानाला –आयतनाला–आगति अगर गति यापैकी काहीच म्हणत नाहीं ! त्याला स्थिति आहे अगर च्युति आहे, असेहि म्हणत नाही ! उत्पत्ति आहे असेहि म्हणत नाहीं ! ते स्थान आधाररहित, संसरणरहित, आलंबन रहित असे असून, तेथेंच दु:खाचा अंत होतो ! (उदान ८–१) हे उदान वचन निर्वाणाचे दुसऱ्या तऱ्हेनें लक्षण वर्णन करणारें असून, तें निर्वाण बोधक आहे हे ' निब्बाण दुक्खाविमुत्ति ' या वचनावरून स्पष्ट होते वरील वचन वाचून आम्हा वैदिकाना याज्ञवल्क्याच्या ' नेति नेति ' या निर्गुण आत्म्याचे स्मरण होत नाही काय ?

' न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं नेमा विद्युतो भान्ति, कुतोऽयमग्नि ' या कठोपनिषदातील परब्रम्हाची आठवण होते

असे म्हटल्यास त्यात बिघडण्यासारखें काय आहे ? येथें भगवतानीं बृहदारण्यकोपनिषदातील ' आयतन '–म्हणजे एकमेवस्थान–हा शब्द वापरला आहे, तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

पुनः आणखी भगवान या निर्वाणाचें आणखी एका तऱ्हेनें निरूपण करतात, तेंहि पाहण्यासारखें आहे. तें वचन हें असें:–

> असङ्खतञ्च वो भिक्खवे, देसिस्सामि, सच्चंच…, पारञ्च …, सुदुद्दसञ्च…, अजरञ्च…, खेमञ्च…, अब्भुतञ्च…, अनीतिकञ्च…, अब्यापज्झञ्च…, विसुद्धिञ्च…, दीपञ्च…, *ताणञ्च…, वो भिक्खवे दे'सिस्सामी'ति.'* (वि. म. ८–२–४८).

भावार्थः– भिक्षूहो स्वयंभू, सत्य, परलोक, दुर्ज्ञेय, अजर, शांतिमय, लोकोत्तर, अहिंसक, निर्मल, तेजस्वी, सर्वाधार, अशा निर्वाणपदाचा मी तुम्हांस उपदेश करतो. हें भगवंताचें निर्वाण-वर्णन अत्यंत स्पष्ट असून मोठें मननीय आहे. निर्वाणाचीं हीं वरील सर्व लक्षणें कशाचीं द्योतक आहेत?

या वरील वचनावरून भगवंताचें निर्वाण सत्य म्हणजे भावरूप कां असत् म्हणजे शून्य हें ठरविणें आतां वाचकांवरच सोंपवितो, म्हणजे झालें. 'सच्चं,' 'पारं,' अजरं, खेमं, सुदुद्दसं, अब्भुतं, विसुद्धि, दीपं इत्यादि विशेषणें असंस्कृताला–म्हणजे निर्वाणाला उद्देशून लावण्यांत आलीं आहेत, तीं जर विचारांत घेतलीं तर निर्वाण हें शून्य नाहीं, सत्–स्वरूपच आहे *सगुणस्वरूप आहे, हें सूर्यप्रकाशा इतकें स्वच्छ व स्पष्ट दिसत असतां आणखी* निराळा पुरावा देऊन विषय वाढविण्यांत मग अर्थ तरी काय?

निर्वाणाच्या स्वरूपाविषयीं–लक्षणाविषयीं–हें इतकें पुरेसें झालें. आता भिक्षूला निर्वाण प्राप्त होतें म्हणजे काय प्रकार होतो, हें सांगितल्याशिवाय या विषयाची पूर्तता होत नाहीं. म्हणून त्याचाहि याच हातानें थोडक्यांत उलगडा करतो. निर्वाण म्हणजे 'विझणें, शांत होणें असा त्याचा बौद्धधर्मात अर्थ लावण्यांत येतो. त्या ठिकाणीं भगवान दिव्याची उपमा देऊन सांगतात कीं *'निब्बन्ति धीरा यथेयं पदीपो'* (सुत्तनिपात). जे ज्ञानी आहेत, ते दिव्याप्रमाणें विझून जातात. 'विझून जातात' म्हणजे काय होतें, याविषयीं कांहींचा गैर समज झाला आहे. दिवा विझला म्हणजे तो

अदृश्य होतो-डोळयाला दिसेनासा होतो म्हणजे इंद्रियाना अगोचर होतो तेवढयावरून तो नाहींसा झाला- अभावरूप बनला-नाश पावला-शून्यात गेला- अशी कियेकाची समजूत-प्रामाणिक समजूत-झालेली आहे आणि सामान्य जनतेस तसे वाटणें, यात गैर काही नाहीं सामान्य मनुष्याची गोष्टच तशी असते ते नुसते वरवर पाहणारे असे इंद्रियनिष्ठ असून, तेवढयावरूनच ते आपला ठोकळाळा बांधीत असतात त्यांना खोल शिरण्याची-अतींद्रिय विश्वात विहार करण्याची-ताकद व म्हणून धाडस नसते असाच प्रकार वरील दिव्याच्या बाबतींनहि झाला आहे तेव्हा त्याचा गूढ पण खरा अर्थ काय होतो हे आतां पाहू

दिवा विझतो म्हणजे तो अजिबात नाश पावतो—अभावरूप होतो-*असा त्याचा अर्थ नव्हे तर तो दृश्यातून अदृश्यात-व्यक्तातून अव्यक्तात-* जातो. त्याचा अर्थ तो नष्ट झाला असा नव्हे व तसा अर्थ करणें हें चुकीचे होईल जोपर्यंत त्याला दृश्य रूपात राहता येत-राहता येण्याचीं साधनें *असतात-तोपर्यंत त्याचे प्रकट स्वरूप कायम असते* व तें इंद्रियास दिसतें. याचा अर्थ असा कीं जोपर्यंत त्याला प्रकट स्थितींत राहण्याचे साधन असतें-म्हणजे तेथें तेल नि वात असते-तोपर्यंत तो जळत राहतो म्हणजे प्रकाश स्वरूपात-प्रकट स्वरूपात-असतो तेल अगर वात संपली म्हणजे त्याचे प्रकट स्थितींत राहण्याचे साधन नष्ट होऊन, तो विझतो म्हणजे काय होतें ? तो नाश पावतो का अदृश्य होतो ? सरळ उत्तर-शास्त्रीय उत्तर-त्याचे असे आहे कीं, तो नाश पावत नाहीं फक्त दृश्याचा तो अदृश्य होतो स्थूलातून सूक्ष्मात जातो त्याचे व्यक्त स्वरूप जाऊन, त्याला अव्यक्त स्थिति प्राप्त होते अर्थात् तो अमूर्त होऊन विश्वव्यापी पण गुप्त व सूक्ष्म रूपात राहतो म्हणजे तो सर्वत्र असतो, *पण* कोठेंच दिसत नाहीं ! तेल व वात घालून पेटविल्यास पुन त्याची ज्योत पूर्वीप्रमाणे उजळलीच ! पुन तो अदृश्यातून दृश्यात आलाच !

*याच भासल्याचे पण अधिक स्पष्ट असे दुसरें उदाहरण द्यावयाचे* झाल्यास याफेचे देतां येईल पाण्याला अग्नीचा संस्कार झाला कीं त्याची

वाफ होते. पाणी दिसतें, पण वाफ दिसत नाहीं. याचा अर्थ असा नव्हे कीं तें पाणी नाश पावलें, अभावरूप बनलें. याचा अर्थ इतकाच कीं, जड रूपांतून तें सूक्ष्म रूपांत गेलें. दृश्यातून तें अदृश्यांत गेलें. व्यक्तांतून जाऊन अव्यक्त बनलें, एवढाच त्याचा अर्थ व तोच खरा अर्थ. पुनः त्या वाफेला गारव्याचा संस्कार झाला म्हणजे तीच वाफ पुनः पाणी बनते. अव्यक्तांतून पुनः व्यक्त स्थितींत येते. सूक्ष्मातून पुनः जडसृष्टींत उतरते. अशीच गोष्ट दिव्याची झाली तरी आहे. आतां दिवा विझल्यावर शून्यांत विलीन होत नाहीं, याची साक्ष अन्यत्र भगवान प्रत्यक्ष आपल्या तोंडानेंच देतात. ते म्हणतात कीं मी आता ब्रम्हभूत झालो आहे. म्हणजे ब्रम्हरूप बनलों आहे. याविषयीं त्यांचे वाक्य सुत्तनिपातांत आढळतें तें असें:-

'ब्रम्हभूतो अतितुलो मारसेनप्पमद्दनो' ( सु. नि. ३-३३-१४)

याचा भावार्य हा असा आहे.-मी ब्रम्हांत लीन झालो आहे-ब्रम्ह-स्थिती प्राप्त करून घेतली आहे, त्याचप्रमाणे मी तुलनातीत झालो आहे, म्हणजे मी तुलनेच्या पलिकडे गेलो आहे, आणि मारसेनेचे मर्दन केलें आहे, म्हणजे दुःखमय प्रपंचाच्या मिठींतून मुक्त झालो आहे. येथें ब्रम्ह हा शब्द वापरला असून, तो शून्यरूप-अभावरूप-नसून भावरूप आहे, सद्रूप आहे. तेव्हां बुद्ध निर्वाण प्राप्त करून घेतल्यावर-संबोधि प्राप्त करून घेतल्या-वर-मी ब्रम्हरूप झालो आहे, हे त्यांच्या तोंडचे शब्द मी शून्य नाहीं-सद्रूप आहे-आनंदरूप आहे-पण अव्यक्तस्थितीत आहे, असें स्पष्ट होत नाही काय ? कारण उपनिषदांत ब्रम्हाचें जें वर्णन आहे, तें सर्व भावरूपांतच आहे. अर्थात् दिवा विझला तरी तो वस्तुतः अभावांत जात नाहीं, तर व्यक्तातून अव्यक्त स्थितींत जातो. मनुष्य मेला तरी सर्वस्वी नाश पावत नाहीं. फक्त त्याचें स्थूल स्वरूप-व्यक्त स्वरूप-जातें. पण त्याचें सूक्ष्म शरीर-अव्यक्त शरीर राहतें. तसेंच हें आहे. आणि इतकाच त्याचा अर्थ.

बुद्धाचा हा वरील दिव्याचा दृष्टांत समजण्यास जरा क्लिष्ट व म्हणून कठीण आहे. पण वैदिकांचा यापेक्षां अधिक स्पष्ट व सरस आहे. ज्ञानी मरणोत्तर ब्रम्हरूप होतो म्हणजे काय होतो, हें दृष्टांत त्यानें

मुंडकोपनिषदांत फार मार्मिक रीतीनें सांगितलें आहे. तें येथें देतो. म्हणजे वाचकांची समजूत पटेल.

> 'यथानद्यः स्यन्दमानाः समुद्रे अस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय।
> तथा विद्वान् नामरूपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम्॥'
> (मुंडक ३-२-८)

नद्या समुद्रांत जाऊन मिळाल्या म्हणजे ज्याप्रमाणें त्या आपलें नामरूप म्हणजे स्वतंत्र व्यक्तिमत्व टाकून देऊन समुद्ररूपच बनतात, त्या महोदधींत विरून जातात-त्याप्रमाणें ज्ञानी हा मरणोत्तर आपलें नामरूपात्मक स्वतंत्र व्यक्तिमत्व टाकून दिव्य अशा परात्पर पुरुषांत-म्हणजे ब्रम्हरूपांत-विलीन होतो, अर्थात तद्रूप बनतो! किती सुंदर व किती समर्पक आहे दृष्टांत हा! दुसरें उदाहरण म्हणून पाण्यांत टाकलेल्या मिठाच्या खड्याचें देतात. आणि तें तर अत्यंत समर्पक आहे. वैदिक ऋषींची सांगण्याची तऱ्हाच कांहीं और असते! असो.

एवंच सांगण्याचें तात्पर्य काय, तर विझणें-अस्त पावणें-म्हणजे *अभावरूप बनणें, शून्यांत जाणें,* असा अर्थ नसून, फक्त व्यक्तातून अव्यक्तांत जाणें-स्थूलांतून सूक्ष्मांत जाणें-असा अर्थ आहे. बुद्ध भगवान काय किंवा वैदिक ऋषी काय, त्यांची सांगण्याची तऱ्हा, शब्द-योजना, दृष्टांत कथन आपापल्यापरि वेगळें असलें वा दिसलें, तरी त्याचा भाव व अर्थ एकच व सारखाच आहे व असतो, हें सांगण्याचा आमचा मुद्दा. वरील श्रुतिवचनांत नामरूप हे शब्द आले असून, तेच बुद्धांनी आपल्या धर्मांत सर्रास व्यक्तीला उपयोगिले आहेत, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. नामरूप म्हणजे मन व शरीर, अर्थात् सजीव शरीर-व्यक्ति-असा बुद्धांचा अर्थ आहे, हें वाचक विसरले नसतीलच.

यावरून असें म्हणण्यास आतां हरकत नाहीं, कीं निर्वाण हें शून्य नसून, तें सत् (सत्त्व) म्हणजे भावरूप आहे. त्याचप्रमाणें तें वैदिकांच्या आत्म्याप्रमाणें आनंद-स्वरूप आहे. कारण भगवंतानी निर्वाणास परमसुख 'निब्बाणं परमं सुखं' (ध. प.)- असें चक्क म्हटलें आहे, आणि कठोप-

निषदांत ब्रम्हास 'परमं सुखं' असें म्हटलें असून,तैत्तिरीय उपनिषदांत 'परमसुख' या शद्धाऐवजी 'आनंद' हा शद्ब वापरण्यांत आला आहे. आणि शतपथांतहि 'आनंद' हाच शद्ब ब्रम्हाला अनुलक्षून योजिला आहे. शिवाय 'शिव' 'शान्ति' 'ध्रुव' 'अक्षर' 'अच्युत' 'क्षेम' 'अजर' 'अमर' 'अजात' 'अमृत' इत्यादि लक्षणें ब्रम्ह उर्फ आत्म्यास लावण्यांत आलीं आहेत. तशीच विशेषणें–नव्हे, तंतोतंत तींच विशेषणें–बुद्ध भगवान आपल्या निर्वाणालाहि अचूक लावतात. मग बुद्धाचें निर्वाण हें शून्य आहे, असें आतां कोणत्या तोंडानें म्हणावें?

आतां एका अर्थानें असें म्हणतां येईल की, आमच्यांत जसें सगुण निर्गुण असें द्विविध ब्रम्ह आहे, तद्वत बौद्धाचें निर्वाणहि एका दृष्टीनें सगुण व एका दृष्टीने निर्गुण म्हणतां येईल. पण निर्वाण हें केवळ शून्य स्वरूपच आहे, हा दुराग्रह मात्र कदापि समर्थनीय नाहीं. असो.

एवंच वरील विवेचनावरून भगवंतांचें निर्वाण हें 'सत्' प्रमाणेंच 'परम–सुख उर्फ' आनंद स्वरूप आहे. अर्थात् तें 'सदानंद' स्वरूप आहे, असें म्हणावयास आतां कोणालाहि भ्यावयास नको!

त्याचप्रमाणें तें 'चिन्मयहि' आहे, कारण कोणत्याहि भावाचें भान राहण्यास, प्रचीति येण्यास, 'चित्' ची जरूरी आहे, त्याशिवाय कशाचीच अनुभूति येऊं शकत नाहीं. म्हणून जेथें सुखानुभवाची जाणीव आहे, तेथ चित् हें असलेंच पाहिजे. भगवान निर्वाण 'आहे,' असें सांगतांत इतकेंच नव्हे तर तें 'परमसुख आहे' 'शांतस्वरूप आहे,' 'ध्रुव आहे,' 'क्षेम आहे,' 'शिव आहे,' 'शुद्ध आहे,' 'अमर आहे,' असें त्याचें लक्षण सांगतात. याची प्रचीति येण्यास, ज्ञान होण्यास चित्ता-शिवाय कसें शक्य आहे? जाणीव हा गुण चित्ताचा आहे. आनंद, क्षेम, शांति, शिव इत्यादि सर्व भावना चित्तावर अधिष्ठित असल्यामुळें ती निर्वाणस्थिति चिन्मय नाहीं असें म्हणून कसें चालेल? म्हणून 'सत्' व 'आनंद' (परमसुख) या दोहोंना जोडणारा दुव्वा म्हणजे हें 'चित्' होय! या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्यास निर्वाण हेंहि वैदिकांच्या ब्रम्हा-

प्रमाणेंच 'सच्चिदानंद' स्वरूप आहे!! ही गोष्ट आतां सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट झाली, असे सांगितल्यास त्यांत चूक ती काय झाली ?

तेव्हा बुद्ध भगवंताचें निर्वाण कसें आहे, हें थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तें असें सांगता येईल. तें सत् आहे. आनंदमय आहे, परमशुद्ध आहे, शांतस्वरूप आहे! तसेंच तें नित्य आहे, शुद्ध आहे, मुक्त आहे! ते अनंत आहे, अमृत आहे, अक्षर आहे, अच्युत आहे, अद्वितीय आहे! तें ध्रुव आहे, शिव आहे, सत्य आहे, व श्रेष्ठ आहे! वैदिकांचें तें ब्रम्ह आहे, बुद्धाचें निर्वाण आहे व श्रीकृष्णाचें ब्रम्ह-निर्वाण आहे!!! किती सुंदर संगति ही! किती विलक्षण सादृश्य हें!! या उप्पर ज्यांना तें शून्य वाटत असेल-अभावरूप वाटत असेल-त्यांनी ती कल्पना खुशाल आपल्या उराशी कवटाळून ठेवावी! त्यांचे हात धरावयाला कोणी येणार नाहीं!!

येथपर्यंतच्या विवेचनावरून बुद्धाचें निर्वाण झालें तरी वैदिकांच्या ब्रम्हाप्रमाणेच सच्चिदानंदस्वरूप आहे. असें म्हणण्यास व मानण्यास आतां फारशी अडचण दिसत नाहीं. भगवंतानी '*यदनिच्चं तद्दुक्खं,*' *यद्दुक्खं तदनत्ता*'-जें अनित्य तें दुःख व जें दुःख तें अनात्म'-हें आपल्या धर्मांचें मुख्य पालुपद करून, त्यावर सगळा जोर दिला आहे आणि तोच भाव जरा निराळ्या तऱ्हेनें वैदिकांनी '*यो नित्यः स आत्मा*' या वचनामध्यें गर्भित करून ठेविला आहे. दोघांच्या सांगण्यांत फरक पण भावांत ऐक्य. वस्तु तीच- *एकच-म्हणजे रुपया तोच-एकाने मुखवट्याची बाजू पुढें धरून* त्याचें वर्णन केलें व दुसऱ्यानें उलट बाजू जगापुढें धरून त्याचा पोवाडा गायला. पण म्हणून ती वस्तु-तो रुपया-कांहीं निराळा म्हणतां येईल काय? तसें समजणाऱ्याला विचारवंत लोक कशांत काढतील, हें काय आतां उघड सांगावयास पाहिजे? आतां ज्यांना नुसता वादच-वितंडवादच-*करावयास पाहिजे, त्यांच्या विषयीं आमचें कांहीं म्हणणें नाहीं. त्याला नुसता घोकड वाद-छळवाद-वितंडवाद-म्हणून आम्ही तोंड फिरवूं.* यापलीकडे कांही नाहीं.

बुद्धांनी काय केलें तें इतकेंच कीं, वैदिकांच्या गहन व गूढ आत्म-

वस्तूवर अविद्येचा पडदा ओढून तिला दृष्टिआड केलें व तत्कालीन जनमनाला समजेल, पटेल व पेलेल असें आनात्म्याचें-नाशवंत वस्तूचें-पंचस्कंधात्मक नामरूपाचें-कालभंगुर चित्र-भडक रंगात रंगवून, जगापुढें धरून त्याचें सुबोध व सोप्या भाषेंत सरस व मुद्देसूद वर्णन केलें आणि अखंड आनंदमय निर्वाणाचें आमिष दाखवून जगाला प्रपंचातून निवृत्त होण्याचा आदेश दिला व स्वतः तो धडा गिरवून, इतरांस उदाहरण घालून दिलें. याचा परिणाम असा झाला कीं त्यावेळच्या लोकांना त्यांचा तो अनत्तावाद पटून, तेवढयावरच समाधान मानून, पुढें अधिक खोल पाण्यांत शिरण्याचें टाळून, असंख्य शिष्यांचा प्रचंड घोळका त्यांच्या सभोवती जमा झाला ! पण जेथें जेथें व जेव्हां जेव्हां त्यांना निर्वाणावर थोडेंफार बोलण्याचा प्रसंग आला, तेथें तेथें व तेव्हां तेव्हां त्यांनी वैदिकांच्या ब्रम्ह उर्फ आत्म्याचेंच सुंदर चित्र मोठ्या खुबीनें व मार्मिकतेनें पण निराळ्या शब्दांत श्रोतृवृंदापुढें ठेविलें, ही गोष्ट ज्यांना उपनिषदाचें ज्ञान आहे, त्यांना तें सहज दिसून येणारें आहे. आणि जगातील सर्व विद्वान-समतोल दृष्टीचे सर्व देशी-परदेशी विचारवंत लोक-झाले तरी आज हेंच म्हणत आहेत ! !

आतां हें निर्वाण प्राप्त करून घेणेंचा हेतु काय, एवढें सांगून हें प्रकरण संपवितो. मनुष्याला स्वभावतःच दुःख नको आहे. दुःखाला तो फार बुजतो. पण तितक्याच प्रमाणांत त्याला सुख पाहिजे आहे. सुखाचा तो मोठा चाहता आहे. या गोष्टी निर्वाणांत साध्य आहेत. ' निब्बाणं दुक्ख-विमुत्ति ' (निर्वाण म्हणजे दुःखांतून सुटका) व 'निब्बाणं परमंसुखं ' ( निर्वाण म्हणजे परमसुख ) अशी स्थिति असल्यामुळें मनुष्याचें तें परमध्येय ठरविण्यांत अनुचित असें काय आहे ? तेथें दुःख नाहीं, सुख आहे ! ताप नाहीं, शांति आहे ! मोह नाहीं, ज्ञान आहे ! ! आणि त्याबरोबरच हेंहि सांगितले पाहिजे कीं, तेथें एकदां जाऊन पोचल्यावर मग तेथून च्युति नाहीं म्हणजे अनात्मसृष्टींत-दुःखमय जगांत-स्वार्थ भरित संसारांत पुनः उतरणें नाहीं, अर्थात पुनर्जन्म नाहीं ! जरा-मरण शोकादिकांची भगभग नाहीं ! ती कायमची मिटली ! हेंच भगवंताच्या खाशा शब्दांत सांगावयाचें तर ' उच्छिन्नं मूलं दुक्खस्स, नत्थिदानि पुनब्भवो'

–दुःखाचे मूळ उन्मळून पडलें ! आणि म्हणून आता पुनः जन्म नाहीं ( महापरिनिब्बान, सुत्त, १६, दीघनिकाय ) प्रभु याज्ञवाल्क्य झाले तरी ब्रम्हज्ञान्याविषयीं हुबेहुब हेच उद्‌गार काढतात

' ते तेषुब्रम्हलोकेषु परा·परावतो वसन्ति, तेषामिह न पुनरावृत्तिरस्ति ( श. प १४-२-१-१८ )

ते म्हणजे ब्रम्हज्ञानी ब्रम्हलोकांत चिरकाल राहतात. ते पुन. या मृत्युलोकांत जन्म पावत नाहींत' किती सुंदर विचारसाम्य हे !! आणि हें ब्रम्ह अगर निर्वाण वैदिकधर्मात फक्त ज्ञानी लोकांना व बुद्धधर्मात फक्त अर्हतानाच प्राप्त होतें, इतराना नाहीं. याविषयीं दोघांतहि पूर्ण मतैक्य आहे ' येतद्विदुरमृतास्ते भवन्ति ' – जे ते ब्रम्ह जाणतात, ते अमर होतात – हें श्रुतिवचन–शतपथवचन–व ज्याला आर्यसत्य समजलें–म्हणजे ज्याची अविद्या नष्ट झाली–अज्ञानमल झडून गेला–तो अर्हतच–तो ज्ञानीच निर्वाणाप्रत जातो, हें बुद्धवचन या दोहोंचा गर्भित अर्थ एकच व सारखाच नाहीं, असे कोण म्हणेल ? वैदिकधर्माच्या तत्त्वज्ञानाचें ध्येय व रोख आनंदप्राप्ति हा आहे आणि बुद्ध भगवताच्या तत्त्वज्ञानाचे ध्येय व रोख दु खविमुक्ति हें आहे. अर्थात व वस्तुत दु खविमुक्ति म्हणजे आनंदप्राप्ति! ! हेच अधिक स्पष्ट शब्दांत सांगावयाचें म्हणजे मागें सांगितल्याप्रमाणें प्रकाश म्हणजे अंधकार नाश व अंधकार नाश म्हणजे प्रकाश. याचकरीं, अखेर भगवान बुद्ध हे वैदिक तत्त्वज्ञानाच्या परमध्येयाकडे कसें झुकले आहेत, हे 'निब्बाण परमसुखम्' या उद्‌गारावरून स्पष्ट होत असून, या विषयीं अधिक सागण्यासारखें आतां आणखी काय राहिले ? असो

या सर्व गोष्टी स्पष्ट असूनहि बुद्ध हे वैदिक धर्माचे निंदक आहेत, द्वेष्टे आहेत, विरोधक आहेत असे म्हणण्याचें धारिष्ट्य मग आता कोणी व कसे करावे ? '*यथा हि चोरः स एव बुद्धः*' असें बरळून जीभ विटाळणारे विटाळोन पण गुणग्राहक श्री शंकराचार्यांनी त्याना ' *योगिनः चक्रवर्ति* ' *अशा गोड शब्दानी गौरविले आहे* !! याची दखल सूज्ञ जरूर घेतील अशी आम्हास आशा आहे असो आम्ही जे पाली बौद्ध वाङ्मय नजरे-

खालून घातलें आहे, त्यांत वेदाविषयीं निंदा अगर तिरस्कारव्यंजक भगवंताचे उद्‌गार आम्हांस कोठेंच आढळून आले नाहींत. उलट त्या धर्माविषयीं त्यांचा आदरभावच दिसून आला आहे. भक्तिमार्गी हिंदू संतांनी वेदाची जेवढी निंदाटवाळी केली, जितक्या कटाक्षानें त्याला भक्तीचें ढोलगें वाजवितांना दातांत धरलें, त्याचा तिरस्कार केला, नाक मुरडलें, तेवढे व तसले पातक बुद्ध भगवंताकडून मुळींच झालें नाहीं. उलट त्यांनी आदरच दाखविला आहे, एवढा निर्वाळा देऊन आतां निर्वाणास अधिकारी कोण, हा विषय पुढील प्रकरणासाठीं राखून ठेवून, हा विषय येथें हातानिराळा करतो.



# प्रकरण ११ वें

## निर्वाणास अधिकारी कोण ?

मागच्या प्रकरणांत बुद्ध भगवताचे निर्वाणस्वरूप कसे आहे, याची रूपरेखा थोडक्यात वाचकापुढें मांडून दाखविण्यांत आली आता तें निर्वाण कोणास उक्त व लभ्य आहे, म्हणजे त्यास अधिकारी कोण, हें सांगणे आता क्रमानेंच प्राप्त झाले म्हणून त्याचेंहि आता या प्रकरणात स्थूल मानानेंच का होईना पण थोडक्यात दिग्दर्शन करणे भाग आहे या प्रश्नांत शिरायच्या आधीं बुद्ध भगवतानी हें ज्ञान मिळविण्यास काय केलें व काय सांगितले, याचा थोडासा कानोसा घेऊन पाहू भगवतानी हें जें निर्वाण प्राप्त करून घेतले, तें कांहीं घरात राहून, ससारांत रगून, प्राप्त करून घेतले, असा प्रकार नाहीं. ही गोष्ट येथें ध्यानात घेणे जरूर आहे. तेव्हा ज्यावेळीं आपल्या ध्येय सिध्यर्थ घरातून ते निष्क्रमण पावले, त्यावेळीं त्याच्या मनात कोणते विचार घोळत होते, त्याना कशाची तहान लागली होती, इकडे थोडसे नजर फिरविणे जरुर आहे म्हणून त्याचा येथें प्रथम थोडासा उल्लेख करून मग मुख्य विषयाकडे वळतो

बुद्ध घरातून बाहेर पडले, तेव्हां त्याची मन स्थिति कशी होती, याविषयीं बुद्ध त्याच्याच तोंडचे उद्गार आहेत ते असे–

'भिक्षूहो ! सबोधि ज्ञान होण्यापूर्वी बोधिसत्व स्थितींत असताना मला असे झालें कीं, मी स्वत जराधर्मा, मरणधर्मा, शोकधर्मा असताना माझ्याप्रमाणेंच जन्म–जरा–मरण–व्याधि–धर्मादिकानी युक्त असलेल्या वस्तूच्या–म्हणजे पुत्रदारा, दासदासी इत्यादिकाच्या नादीं मी लागावें, हे

कांही ठीक नाहीं. तेव्हां माझ्या मनांत राहून राहून असे विचार येऊं लागले कीं, मी स्वतः मरणधर्मी असून, तशाच धर्मांनी युक्त असलेल्या वस्तूंवर मोहित होऊन, त्यांच्या नादीं लागलों, त्यांना कवटाळून बसलों, हें कांहीं योग्य नाहीं. तर जन्मजरादिकांनी युक्त असणाऱ्या वस्तूंची क्षणभंगुरता–अनित्यता–नश्वरता–पाहून, त्यांचा मोह आवरून, व नाद सोडून जें अजात अजर, अमर व अशोक आहे, अशा नित्य, सत्य व शाश्वत वस्तूची म्हणजे अखंड आनंदमय निर्वाणपदाची परमश्रेष्ठ पायरी शोधून प्राप्त करून घ्यावी, यांतच पुरुषार्थ आहे.' अशाप्रकारचे विचार त्यांच्या मनांत घोळत होते. हे त्यांचें विचार त्यांच्याच मूळ वचनांत द्यावयाचे म्हणजे ते असेः–

> 'यन्नूनाऽहं अत्तना जातिधम्मो समानो जातिधम्मे आदीनवं विदित्वा अजातं····अजरं····अब्याधिं····अमतं ...असोकं····संकिलिट्ठं····अनुत्तरं····योगक्खेमं....निब्बाणं परियेसेय्यं'
> (मज्झिमनिकाय, अरियपरियेसन सुत्त २६)

या वचनावरून पाहतां भगवंतांना जगातील नश्वर सुखाचा–इंद्रियसुखाचा–विषयसुखाचा–वीट व कंटाळा आला असून, त्या व्यतिरिक्त अजात, अजर, अमर, अशोक अशा घाटाचें जें नित्य व शाश्वत सुख म्हणजेच निर्वाणसुख–अखंड आनंदमय पद–त्यांना पाहिजे होतें, तें प्राप्त करून घ्यावयाचें होतें, हें अगदी निर्विवाद आहे. तेव्हां कोणी कांही जरी म्हटलें तरी या त्यांच्या वरील उद्गारांवरून व त्यांच्या निर्णाणावरील इतर वचनांवरून सूक्ष्मदृष्टचा नजर फिरवून पाहतां, विचारवंतांस असें म्हणणें भाग आहे कीं, भगवंताचें निर्वाण अभावात्मक शून्यरूप नसून, भावात्मक सत्स्वरूप आहे, याविषयीं मागच्या प्रकरणांत आम्ही विस्तृत विवेचन केलें असल्या मुळें त्याविषयीं येथें पुनरुक्ति करून वाचकांचा निरर्थक कालापव्यय करण्याच्या भरीस पडूं इच्छित नाही. तेव्हां येथें सांगावयाचें तात्पर्य इतकेंच कीं, भगवान हे नश्वर जगातील क्षणभंगुर सुखाला–विषय मोहाला–देहतर्पण बुद्धीला–पूर्ण विटले असून, त्यांना नित्य, शाश्वत, अखंड सुखाची म्हणजे परमसुखाची तहान लागली होती. इतकें स्पष्ट झाल्यावर आतां पुढील प्रश्न ओघानेंच असा उभा राहतो कीं, तें सुख कोठें व कसें मिळूं

शकेल ? तें घरात राहून-प्रपचात रगून-मिळेल का इतरत्र मिळेल हा विचार त्यांच्यापुढें येऊन, अखेर त्यानी त्यावर आपला निर्णय घेतला तो असा —

> ' सम्बाधोय घरावासो रजस्सायतन इति। अब्भोकासोच पब्बज्जा इति दिस्वान पब्बजि ॥ (सुत्तनिपात, पब्बज्जासुत्त२७ २)
> भावार्थ – येथें गृहवास हा सकटानी भरलेला असून, तें वासनेचे

माहेर घर आहे प्रव्रज्या ही खुल्या आकाशा सारखी स्वच्छ व निर्मल आहे, हें पाहून मी घराबाहेर पडलो म्हणजे प्रव्रजित झालो हाच अर्थ त्यानी दुसऱ्या तऱ्हेने मज्झिमनिकायांत सांगितला आहे तो असा —

' सम्बाधोय घरावासो रजापयो अब्भोकासो पब्बज्जा '– गृहवास म्हणजे जजाल असून तो मोठी अडचणीची जागा आहे शिवाय तो केरकचऱ्यातला घाणेरडा मार्ग आहे. आणि प्रव्रज्या म्हणजे आकाशा प्रमाणे उघडें, खुले व स्वच्छ मैदान आहे ('मज्झिमनिकाय)'

म्हणून घरात राहून निर्वाणासारखें नितांत, परिपूर्ण, परिशुद्ध, शखवत् सोज्ज्वल अशा ब्रम्हचर्याचे-एकातवासाचे-परिपालन करणे हें सोपें नाहीं ( ' नयिद सुकर अगार अज्झा वसता एकान्तपरिपुण्ण एकान्त परिसुद्ध सङ्खलिखित ब्रम्हचरिय चरितु ( मज्झिमनिकाय ५१—११ ) म्हणून त्यानी आपल्या सोन्यासारख्या सुदर ससाराचा म्हणजे गृहस्थ धर्माचा त्याग करून, सर्व राजवैभवार व सुखविलासावर लाथ मारून भर यौवनदशेंतच डोके दाढी मुडून प्रव्रज्या घेतली आणि मग निर्वाण शोधण्याच्या-तें प्राप्त करुन घेणेच्या—खडतर मार्गास ते लागले त्यानी गृहस्थाश्रमास राजीनामा दिला-रामराम ठोकला तो प्रसग त्यानी आपल्या शब्दात सागितला आहे तो असा —

> ' अहम्पि खो राजकुमार पुब्बे ' व सम्बोधा अनभिसं बुद्धस्स बोधिसत्तस्से' व सतो 'एतदहोसि– न खो सुखेन सुख अधिगन्तब्ब, दुक्खेन खो सुख अधिगन्तब्ब ति । सो खो अह, राजकुमार, अपरेन समयेन दहरो'व समणो सुसु काळकेसो

भद्रेन योब्बनेन समन्नागतो पठमेन वयसा अकामकानं माता-
पितुन्नं अस्सुमुखानं रुदन्तानं केसमस्सुं ओहारेत्वा कासायानि
वत्थानि अच्छादेत्वा अगारस्मा अनगारियं पब्बजिं ।।'
( मज्झिमनिकाय, बोधिराजकुमार सुत्त ८५-४ )

यावरून हें उघड होतें कीं, हें जें बुद्धोक्त निर्वाण, तें घरांत राहून-प्रपंचांत गढून-जागतिक जंजालांत रंगून-सुखविलासांत गुरफटून-साध्य होणें-प्राप्त होणें-शक्य नाहीं. याचाच पर्याय अर्थ असा की गृहस्थाला हें अंतिम सुखनिधान साध्य नसून, त्याला गृहत्यागच म्हणजे प्रव्रज्याच घेतली पाहिजे. प्रपंच निवृत्तच झालें पाहिजे. त्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. हा सिद्धांत भगवंतांनी आपल्या खास वर्तनानें व स्पष्ट भाषणानें जगास खडसून व निक्षून जाहीर केला आहे. तेव्हां आतां असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, बुद्धधर्माचा अवतार हा प्रामुख्यानें प्रपंचांत गुटमळून राहणाऱ्या देहतर्पणरत गृहस्थाकरतां नसून तो प्रपंचनिवृत्त भिक्षु लोकांकरतांच झाला आहे. पृथग्जनांना तें लभ्य नाहीं. पृथग्जन म्हणजे सामान्यजन. त्याची व्याख्या बुद्ध धर्मांत करण्यांत आली आहे ती अशी:-

'कतमो च पुग्गलो पुथुज्जनो ? यस्स पुग्गलस्स तीनि
संयोजनानि अपिहीनानि न च तेसं धम्मानं पहानाय पतिपन्नो,
अयं वुच्चते पुग्गलो पुथुज्जनो !!' ( विशुद्धमग्ग पृ १६४ )

भावार्थः- पृथग्जन कोण ? त्या पुरुषाला पृथग्जन म्हणावें की ज्याची सत्कायदृष्टि, विचिकित्सा व सीलव्रतपरामर्श हीं पहिलीं तीन संयोजनें ( संसार बंधनें ) नष्ट झाली नाहींत व जो तीं नाश करण्याचा प्रयत्नहि करीत नाहीं, अर्थात् जे सांसारिक जन आहेत-जे जागतिक जंजालांत गुरफटून गेले आहेत-त्यांना पृथग्जन असें म्हणतात. अशा लोकांना बुद्ध धर्मांत प्रवेश नाहीं, असें नव्हे तर त्यांना प्रवेश आहे. पण तेथें त्यांना गौणस्थान आहे, इतकेंच.

जे भिक्षू नाहींत, त्यांना या धर्मांत स्थान आहे, नाहीं असें नाहीं. पण त्यांना निर्वाण नाहीं, स्वर्ग आहे. अशा इतरेजनांना-सामान्यजनांना

प्रापंचिक जनाना–पृथग्जन अशी सज्ञा असून, त्यानी बुद्धधर्म स्वीकारल्यास त्याची गणना उपासकांत करण्यात येते, व ते स्वर्गाचे अधिकारी होतात. ज्याना निर्वाणाची चाड आहे, त्यानी गृहत्याग करून, प्रव्रज्या घेऊन भिक्षूच झाले पाहिजे, ही गोष्ट भगवतानी मोठ्या कटाक्षानें सांगितली असून, शिवाय आपल्या प्रत्यक्ष आचरणानें ती स्पष्ट सिद्ध करून दाखविली आहे तेव्हा बुद्धप्रणीत निर्वाणाची मिरासदारी ही सार्वजनिक चीज नसून ती दिव्य दौलत फक्त भिक्षूचीच व भिक्षूकरतांच राखून ठेवण्यात आली आहे, याविषयीं आता वाद माजविण्यात अर्थ नाहीं अर्थात् हे विवेचन आमचें प्राचीन हीनयान पयास-सनातन पयास–धरून आहे, हें लक्षात घेतले पाहिजे

येथपर्यंतच्या विवेचनावरून एवढी गोष्ट निर्विवाद स्पष्ट बोलून दाखविण्यास हरकत नाहीं कीं, खुद्द भगवताच्या मतें मुमक्षूला निर्वाण प्राप्तीसाठीं प्रव्रज्या घेणे,–भिक्षु होणे–हें अत्यावश्यक आहे मात्र याचा अर्थ असा नव्हे कीं प्रपंचनिवृत्त होऊन, डोकेंदाढी मुडून, काषायवस्त्रें धारण करून, प्रव्राजक झाल्याबरोबर निर्वाणाचा महा-दरवाजा चटकन् उघडला जाऊन, शाश्वत सुखशातीचा दिव्य प्रसाद झपकन् पदरात येऊन पडतो. ती आशा मात्र अगदी व्यर्थ आहे. त्याचा अर्थ इतकाच कीं तो साधक निर्वाण प्राप्तीच्या पवित्र क्षेत्रांत पदार्पण करण्यास लायख झाला पण पुढें त्याला त्या श्रेष्ठपदाच्या–अमरपदाच्या–प्राप्तीसाठीं दीर्घ तपश्चर्या ही करावी लागणारच व केलीच पाहिजे पण तो मार्ग बोलण्याइतका सोपा नाहीं. मोठा कठीण व खडतर आहे पण त्याच्या तपशिलात खोल शिरण्याचें हे स्थळ नसल्यामुळें त्या भरीस न पडता फक्त प्रस्तुत स्थळीं भिक्षु कोणास म्हणावे, त्याचे प्रकार किती व लक्षण काय, इतके सागून हें प्रकरण मिटते घेतो

भिक्षु होणे म्हणजे प्रपंचत्याग करून, घरादारावर तुळशीपत्र वाहून, स्त्रीपुत्रादि प्रियजनाचा सहवास तोडून म्हणजे जगातील सर्व पसारा आटपून घरांतून बाहेर पडून डोके मुडून, काषायवस्त्रें धारण करून, गेंड्याप्रमाणें एकटेंच राहणे, याला प्रव्रज्या असे म्हणतात

त्याला संघात प्रवेश मिळावयाचा झाला तर उपसंपदाविधि झाला पाहिजे. तो विधि येणेंप्रमाणें:–

मांडी न घालता गुडघ्यावर बसून व दोन्ही हात जोडून 'बुद्धं सरणं गच्छामि, धम्मं सरणं गच्छामि, संघं सरणं गच्छामि' असें त्रिवार उच्चार करणें. हा विधि उरकल्यावर मग तो साधक भिक्षु म्हणविण्यास योग्य होऊन, त्याला संघात रहावयास परवानगी मिळते. संघासाठीं रहावयास स्वतंत्र विहार असतात आणि उपसंपदा झाल्यावर त्याला तेथें प्रवेश मिळतो.

उपासकानें ही भिक्षूची दीक्षा धारण केल्यावर त्यानें हे पुढील व्रत पाळलें पाहिजे. त्याचा निर्देश खुद्दक पाठांत देण्यांत आला आहे तो असा:–

१ पाणातिपाता वेरमणी-सिक्खापदं समादियामि।
२ अदिन्नादाना वेरमणी–सिक्खापदं समादियामि।
३ अब्रम्हचरिया वेरमणी–सिक्खापदं समादियामि।
४ मुसावादा वेरमणी–सिक्खापदं समादियामि।
५ सुरामेरय–मज्जपमादट्ठाना वेरमणी सिक्खापदं समादियामि।
६ विकल भोजना वेरमणी–सिक्खापदं समादियामि।
७ नच्च, गीत, वादित, विसूकदस्सना वेरमणी–सिक्खापदं समादियामि
८ माला, गन्ध, विलेपन धारण मण्डन विभूसनट्ठाना वेरमणी–सिक्खापदं समादियामि।
९ उच्चासयन–महासयना वेरमणी–सिक्खापदं समादियामि।
१० जातरूप–रजतपटिग्गहणा वेरमणी–सिक्खापदं समादियामि।

भावार्थ:– १ हिंसा २ चोरी ३ व्यभिचार ४ असत्य भाषण ५ दारु, आसव, मद्य इत्यादि मादक पदार्थ, ६ अकाली भोजन ७ नाच, गाणें वादन, व इतर खेळ व तमाशे, बाहुल्यांचाखेळ इत्यादि कामोद्दीपक गोष्टी ८ फुलांच्या माळा, गजरे, सुगंधी द्रव्यें, उटणी इत्यादि धारण करणें व अंगास लावणें, ९ प्रमाणशीर नसलेलीं शयनासनें, आस्तरणें, सजविलेल्या शय्या व १० सोनें रुपें इत्यादिकांचे परिग्रहण, या सर्वांपासून अलिप्त ठेवणाऱ्या शिक्षापदाचा, उल्लंघन न करण्याच्या इराद्यानें मी

अंगिकार करतो या दहा नियमांना बौद्धधर्मांत शिक्षापदें (सिक्खापद) असे नाव असून, हे नियम भिक्षूने मोठ्या काटेकोरपणानें पाळले पाहिजेत जो कोणी त्याचे अतिक्रमण करील त्यास संघातून बहिष्कृत करण्यात यतें

पुन: आणखी आतां या भिक्षूमध्यें त्याच्या विचारवर्तन प्रगतिप्रमाणे भेद पाडण्यात आले आहेत भिक्षुभिक्षूतच त्याच्या त्याच्या प्रगतिप्रमाणें व योग्यतेप्रमाणे दर्जा ठरविला जातो, तो येणें प्रमाणें –

१) सोतापन्न ( स्रोतापन्न ), २) सकदागामी ( सकृदागामी ) ३) अनागामी, व ४) अर्हत्, या चार प्रकारच्या भिक्षूत अर्हताची पायरी सर्वश्रेष्ठ असून, निर्वाणाचा तोच एक निकटचा वारसदार आहे या चौघांची लक्षणें आहेत ती अशीं —

सोतापन्न – भिक्षु जेव्हा आपल्या उद्योगानें व व्रताचरणानें ससारात पाडणाऱ्या--भवचक्रात अडकविणाऱ्या -तीन सयोजनाचा सत्कायदृष्टि, विचिकित्सा व सीलव्रत परामर्श–या सयोजनाचा म्हणजे ससारबधनाचा नाश करील, तेव्हा तो सोतापन्न होतो स्रोतापन्नाची व्याख्या ही अशी आहे

' इध महालि भिक्खु तिण्णं सयोजनानं परिक्खया सोतापन्नो होति
अविनिपात धम्मो नियतो सम्बोधि–परायणो (दी नि ६–२३)

भावार्थ याप्रमाणें भिक्षु हा स्रोतापन्न–निर्वाण मार्ग प्रविष्ट–झाला म्हणजे अर्थात् त्याची तीन सयोजनें–बधनें–क्षय पावलीं म्हणजे मग त्यास कसल्याहि दु खदायक स्थितीतला जन्म येणार नाहीं व शेवटीं त्यास हटकून सबोधि प्राप्त होते हा स्रोतापन्न फक्त सातच वेळा देवलोकीं वा मृत्युलोकीं जन्म घेतो सातव्या जन्मीं त्यास निर्वाण प्राप्त होते मनुष्यास ससारात–भवचक्रात-पाडणारीं सयोजनें म्हणजे बधनें हीं बौद्धधर्मांप्रमाणे एकदर दहा आहेत तीं हीं १ सत्काय दृष्टि २ विचिकित्सा ३ सीलव्रत परामर्श ४ कामराग ५ व्यापाद (क्रोध) ६ रूपराग ( रूपलोकात उत्पन्न होण्याची इच्छा ७ अरूपराग (अरूप लोकात उत्पन्न होण्याची इच्छा), ८ मान ( अभिमान ), ९ उद्धता (एकाग्रतेचा अभाव) १० अविद्या (मनुष्यालीं ससारात पाडणारीं) हीं दहा सयोजनें म्हणजें बधनें आहेत व यात पहिली तीन नाश पावलीं म्हणजे भिक्षु स्रोतापन्न होतो

यानंतर त्या भिक्षुची तीन संयोजनें क्षय पावल्यावर पुढें राग, द्वेष व मोह हे दुर्बल झाले म्हणजे तो सकृदागामी होतो. म्हणजे अशा स्थितींत त्याला मरण आलें असतां तो या लोकीं पुनः एकच वेळां जन्मास येऊन, नंतर तो मुक्त होतो. या सकृदागामीची व्याख्या आहे. ती अशी–

' पुनंच परं महालि भिक्खु तिण्णं संयोजनानं परिक्खया राग–
दोस–मोहानं तनुत्ता सकृदागामी होति, सकि 'देय इमं लोकं

अगन्त्वा दुक्खस्सं'न्त करोति ( दी. नि, ६–२३ )

यापुढें या पांच बंधनांचा (संयोजनांचा) म्हणजे सत्कायदृष्टि, विचिकित्सा, सीलव्रतपरामर्श, कामराग व रूपराग या पांच संयोजनांचा संपूर्ण नाश झाला म्हणजे तो अनागामी होतो. म्हणजे या स्थितींत त्याला मृत्यु आला तर तो या लोकीं जन्म न पावतां स्वर्गलोकीं जन्म घेतो. आणि तेथूनच तो पुढें निर्वाणाप्रत जातो. या अवस्थेंत त्याच्या देहसुखवासना संपूर्ण शमन पावलेल्या असतात. पण जगण्याची वासना–जीवितेच्छा मात्र संपूर्ण नष्ट झालेली नसते.

( 'अनागामी–अयं वुच्चति पुग्गलो कामेसु वीतरागो भवेसु
अवीत–रागो,' अभिधम्म. )

आणि संपूर्ण दहा संयोजनांचा पुरा नाश झाला म्हणजे तो अर्हत् होतो. म्हणजे त्याला या जन्मींच निर्वाणाची प्राप्ति होते. वैदिक धर्मात त्याला जीवन्मुक्त असें म्हटलें जाते. जीवन्मुक्ताचें लक्षण शतपथांत सांगितलें आहे तें असें–

' यदा सर्वे प्रमूच्यन्ते कामा येऽस्य हृदि स्थिताः । अथ
मर्त्योऽमृतो भवति अत्रैव ब्रम्ह समश्नुते (श. प. १४–७–२–९)

भावार्थ :– मनुष्याच्या अंतःकरणांतील सर्व ग्रंथि जेव्हां सुटून पडतील, तेव्हां तो मर्त्याचा अमर होतो आणि या जन्मी व या देहींच ब्रम्हसुखाचा अनुभव घेतो. हें जें वैदिकांचें ब्रम्हज्ञाचें लक्षण आहे, त्याच भासल्याचें जवळजवळ अर्हताचेंहि आहे, हें सूज्ञ वाचकांस तेव्हांच कळून येईल. या अर्हताची व्याख्या थोडक्यांत दिली आहे, ती अशी :–

'अरहा-अयं वुच्चति पुग्गलो कामेसुच भवेसुच वीतरागो' (अभिधम्म २-५-१)

विषयसुखेच्छा व जिवंत राहण्याची इच्छा या दोहोंचा संपूर्ण नाश झाला म्हणजे तो भिक्षु अर्हत् झाला म्हणजे तो निर्वाणात विलीन होऊन, भवचक्रांतून त्याची कायमची सुटका झाली. याज्ञवल्क्यांनी ' अत्रैव ब्रम्ह समश्नुते ' असें जें शतपथांत म्हटलें आहे व तुकारामानी ' माझें मरण पाहिलें म्या डोळा ' अशी जी अभंगवाणी उच्चारिली आहे, ती अशा विरक्त व ज्ञानी पुरुषाला उद्देशूनच आणि बुद्धाचें अर्हताविषयीं सांगणें झाले तरी वरील याज्ञवल्क्य-वचनाचा जवळ जवळ अनुवादच नव्हे, असें कोण म्हणेल? जीवन्मुक्त म्हणतात तो हाच, असो. हें तत्त्वज्ञान थेरवादी बौद्ध-पंथांचें आहे, महायानाचें नव्हे

जे बुद्धाला याप्रमाणें शरण जातात, त्याना कसलाहि अपाय होत नाहीं व मरणानंतर ते मानव देह टाकून देवकायांत प्रविष्ट होतातः-

ये केचि बुद्धं सरणंगतासे न ते गमिस्सन्ति अपायं॥<br>
पहाय मानुसं देहं देवकायं परिपूरेस्सन्ती ' ति ॥ (दी नि २०-३)



# प्रकरण १२ वें

## बुद्ध आणि आहार

बुद्ध भगवंतांनी हिंसेचा ठिकठिकाणी कडकडून निषेध केला आहे, ही गोष्ट खरी, पण त्याबरोबरच त्यांनी मांसाहारावरहि तितक्याच कटाक्षानें बहिष्कार पुकारलेला आहे, अशी जर कोणी समजूत करून घेईल, तर ती सर्वथैव चुकीची आहे, असे चकचकीत सांगून टाकणें आम्हांसहि प्राप्त आहे. त्यांचा अहिंसावाद म्हणजे स्वतः आपल्या हातानें प्राण्याची हिंसा करावयाची नाहीं. इतकाच नि एवढाच त्याचा अर्थ. एवढीच त्या अहिंसावादाची व्याप्ति. तेवढयावरून मांसाहारावर त्यांनी बंदी घातली होती–बहिष्कार पुकारला होता–असा ध्वनि त्यांतून उमटत नाहीं, ही गोष्ट त्यांच्या आचार विचारावरून अगदी स्पष्ट प्रतीत होते. 'प्राणातिपाता वेरमणी समादियामि' हें त्यांच्या धर्मप्रणालीतील प्रथम व प्रमुख तत्त्व असल्यामुळें बुद्ध धर्मांत मांसाहार हा निषिद्ध मानण्यांत आला आहे, अशी बुद्ध-धर्माची ओळख नसलेल्या वर वर पाहणाऱ्या सामान्य जनतेची समजूत होणें शक्य व स्वाभाविक आहे. पण खरी वस्तुस्थिति मात्र तशी नसून, अगदी उलट आहे

आतां वस्तुस्थितीस धरून खरें सांगावयाचें म्हणजे बुद्ध धर्मांत मांसान्नावर बहिष्कार घातलेला नसून, खुद्द भगवंतांच्या जीवन चरित्रांतहि तसा आधार सांपडत नाहीं. इतकेंच काय, स्वच्छ व स्पष्टच सांगावयाचें म्हणजे खुद्द भगवानच मांसान्न–विशेषतः डुकराचें मांसान्न–अत्यंत प्रिय मानणारे होते! ते कालवश झाले ते मांसान्न भोजन करूनच! त्यांची शेवटची भिक्षा चुंदाच्या घरीं झाली. त्याप्रसंगीं चुंदानें एक चांगलें डुकर मारून, त्याच्या मांसाचें सुंदर मिष्टान्न तयार केलें त्या मिष्टान्नाचें नांव सूकरमद्दव. म्हणजे डुकराचें मांसाचे शिजवून तयार केलेलें मधुर परमान्न.

अलीकडे कांही बुद्धभक्त व चाहते पडित–उदाहरणार्थ श्री ऱ्हीस डेव्हिस इत्यादि–पाश्चात्यपडितांनी अधपणाने बुद्धास मासाहारापासून सोवळे ठेवण्याच्या इरादाने 'सूकरमद्दव' याचा अर्थ 'डुकराचे मास' असा नसून, त्या नांवाचा रानात उगवणारा एक कांदा असा आहे, असा सूर काढीत आहेत पण ही त्याची आत्मवचना आहे बुद्ध धर्मातील एक प्रथितयश भाष्यकार बुद्धघोषाचार्य हे सूकरमद्दव याचे स्पष्टीकरण करताना डुकराचे शिजवून तयार केलेलें मासान्न असाच करतात मग तेहि अर्थ लावण्यास चुकले असेच म्हणावयाचे कीं काय ? तसे म्हणण्याचे धाडस करणारे करोत पण त्याला किम्मत देण्यास पडित लोक तयार नाहींत.

इतकेच काय, आणखी एकाप्रसगीं त्यानी डुकराचे मास खाल्याचें उदाहरण आहे, वैशाली येथील उग्ग गृहपतीच्या घरचा तो प्रसग बुद्धाची भवित डुकराच्या मासान्नावर फार आहे, ही गोष्ट उग्ग गृहपति समजून असल्यामुळें त्यानें एक चागले डुकर मारून, त्याचें सुदर मिष्टान्न तयार करून, भगवतास घरीं भिक्षेस येण्यास आमत्रण दिलें व त्याना तें गोड पक्वान्न वाढून खूप केले भगवान तें परमान्न खाऊन फार सतुष्ट झाले त्या पक्वान्नाचे वर्णन अगुत्तर निकायात 'सपन्नकोलक सूकरमस' असे आढळते येथें 'सूकरमद्दव' या शब्दाऐवजी 'सूकरमस' असे स्पष्ट व स्वच्छ म्हटले आहे उग्गाच्या घरीं भगवतानी 'मनाप सूकरमस (अत्यत रुचिकर डुकराचें मासान्न) सेवन करून प्रसन्न होत्साते त्यास प्रशसापूर्वक बक्षीस दिले, असें म्हटले आहे (अगुत्तरनिकाय ५-४४)

हें जें वर सागितले, तें प्रत्यक्ष त्याच्या जीवनातील काही विशिष्ट गोष्टी व नमस्कार चमत्कार सर्व आटपल्यावर बोलता बोलता जीवकाने त्याच्या जवळ सहज गोष्ट काढली कीं, भदत ! लोकात असा प्रवाद आहे की, आपणाकरता लोक प्राणी मारून त्याचे मिष्टान्न तयार करून आपणास वाढतात व आपण तें मिटक्या मारीत यथेच्छ भक्षण करता लोक याप्रमाणें आपापसात कुजबुजतात. पण यात खरें काय आहे ?

तेव्हां भगवंतांनी त्यास काय उत्तर दिलें तें खुद्द त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे ते असें :–

> तीहि खो अहं जीवक ठानेहि मंसं अपरिभोगं'ति वदामिः– दिट्ठं, सुतं, परिसङ्किकतं । इमे हि खो अहं, जीवक, तीहि ठानेहि मंसं अपरिभोगं'ति वदामि । तीहि खो अहंजीवक ठानेहि मंसं परिभोग ति वदामिः– अदिट्ठं, असुतं, अपरिसङ्किकतं । इमेहि खो अहं जीवक तीहि ठानेहि मंसं परिभोगं'ति वदामि '।
>
> ( मज्झिमनिकाय ५५-१ )

भावार्थ :– जीवका ! ऐक माझें यावर मत ऐक. तीन प्रकारचें मांस भोजनास मी वर्ज्य मानतो. कोणते तीन ? पशूला मारतांना प्रत्यक्ष पाहिलेलें, अथवा ऐकलेलें अथवा संशय आलेलें अशा प्रकारचें मांस मी भोजनास निषिद्ध मानतो. आणि आतां कोणतें भोग्य म्हणशील तर तें हें:– पशूला मारतांना न पाहिलेलें, किंवा न ऐकलेलें किंवा संशय न आलेलें असें तीन प्रकारचें मांसान्न मी भोज्य समजतो. अर्थात् मांसान्न सर्वस्वी वर्ज्य मानणारा मी नाहीं. यावरून भगवंताना मांसाहार सर्वस्वी निषिद्ध नव्हता, हें स्पष्ट होत नाहीं काय ?

इतकेंच नव्हे, शिवाय आणखी, मागें एकदां त्यांचा प्रिय शिष्य देवदत्त यानें भिक्षूंना मांस अजिबात वर्ज्य करण्याविषयीं संघाच्या भर सभेंत एक ठराव आणला होता. त्यावेळींहि भगवंतानी त्याला हेंच उत्तर देऊन गप्प बसविलें, हें प्रसिद्धच आहे. (चुल्लवग्ग ६-३-१ व ६) यावरून बुद्धाना प्राणि-हिंसानिषिद्ध असली तरी मांसाहार मात्र तसा सर्वस्वी नव्हता, याविषयीं निराळा पुरावा तो आतां आणखी काय पाहिजे ?

## बुद्ध आणि स्त्री

आतां बुद्ध भगवंतांचें स्त्रियांविषयी काय मत होतें, हें थोडक्यांत येथें सांगतो. पण अगोदर हें सांगितलें पाहिजे कीं, भगवान् गृहत्याग करावयाच्या पूर्वी म्हणजे वयाच्या २९ व्या वर्षापर्यंत ते चांगले गृहस्थाश्रमीच होते. त्यावेळीं त्यांनीं प्रपंचाला कंटाळून बाहेर जाऊ नये, म्हणून

त्याच्या वडिलानी म्हणजे शुद्धोदनाने त्याचें मन संसारात व विषयसुखांतच रमून व रगून रहावें, म्हणून त्याच्यासाठीं गावाबाहेर एक सुंदर उद्यान वसवून, तेथें सर्व सुखोपकरणानी युक्त असे विविध भोग विलासार्थ प्रमोद-भुवन बाधून, तेथे त्यास ठेविले होते. व तेथें त्यास रमविण्यासाठीं म्हणून सुंदर सुदर तरुण युवतींचा मोहक घोळका त्याच्या विमतीस ठेविला होता. तेव्हा अर्थात् त्याच्या सहवासात राहून स्त्रीस्वभावाचे सूक्ष्म निरीक्षण व परीक्षण करण्याची संधि त्यास लाभून, स्त्री ही काय चीज आहे, याचा ठोकताळा त्यानीं मनात निश्चित करून ठेविला होता

पुढें बुद्धानी धर्मप्रसाराचे काम चालू केल्यावर त्यांचे दीक्षा घेऊन जे अनुयायी झाले, त्याचेसाठीं म्हणून एक भिक्षुसघ स्थापन केला त्यांत पुरुष तेवढेच होते अशा वेळी भगवताशी बोलत असताना आनद हा सहज त्यास म्हणाला--'भदत ! स्त्रिया व्यवहारात वगैरे पडत नाहींत याचे कारण काय ?

त्याला भगवान उत्तरले-आनदा! हे काय विचारतोस ? खरें सांगावयाचे म्हणजे स्त्रिया या व्यवहाराला अगदी नालायख आहेत !

आनंद-का ?

भगवान-का म्हणजे ? आनदा! पहिली गोष्ट ही कीं बुद्धींत त्याचे स्थान अगदीच खालीं ! फार कोतो बघ बुद्धि त्याची ! तशाच त्या मोठया चंचल स्वभावाच्या ! फार आशाखोर ! मोठ्या अघाशी ! तशाच मोठया मत्सरी ! दुसऱ्याचे त्याना बिलकूल सहन नाहीं ! आणि राग तर नाकाच्या अगदी शेंड्यावर ! मनावर ताबा बिलकूल नाहीं ! मग अशाच्या कडून जबाबदारीचीं व महत्वाचीं कामें कशी बरें होतील ? अशा कामास त्या अगदी नालायख आहेत, असे माझें स्पष्ट मत आहे

( अंगुत्तर निकाय, २-८ )

हे झाल्यावर पुढें काही दिवसानी त्यांची मावशी गोतमी ही बरोबर पांचशे स्त्रियाना घेऊन भिक्षुणी होऊन भगवताजवळ राहण्यास म्हणून

त्यांच्याकडे आली. पण बुद्धांनी तिला भिक्षुणी होऊन संघांत आश्रय देण्यास साफ नकार दिला. त्यांनी स्पष्टच सांगितलें कीं संघांत स्त्रियांना स्थान मिळणार नाहीं. त्यावेळीं आनंद तेथें होता. त्याला भगवंताचें हें करणें आवडलें नाहीं. गोतमीला नकार देऊन भगवान आंत गेल्यावर निराश होऊन खिन्न झालेल्या गोतमीची ती केविलवाणी स्थिति पाहून, त्याला तिची दया आली. तसाच तो भगवंता जवळ गेला आणि गोतमीचा पक्ष घेऊन खुबीदार भाषण करून,त्यानें अखेर त्यांचें मन वळविलें व कांहीं अटींवर तिला भिक्षुणी होऊन संघांत राहण्यास त्यांनी परवानगी मिळविली. गोतमीनें त्या सर्व अटी मान्य करून त्याप्रमाणें भिक्षुणी धर्मानें राहण्याचें कबूल केल्यावर तिला व तिच्या बरोबर आलेल्या स्त्रियांना दीक्षा देऊन, त्यांचेसाठीं निराळाच स्वतंत्र असा भिक्षुणी संघ स्थापन करण्यांत आला. व तेव्हांपासून स्त्रियाहि संसारत्याग करून भिक्षुणी होऊन संघात येऊन राहूं लागल्या.

याप्रमाणें कांहीं काळ लोटल्यावर परिणाम असा झाला कीं स्त्रीसंघांत दिवसेंदिवस सारखी भर पडत चालली. तरुण व सुंदर स्त्रिया भिक्षुणी होऊन संघात दाखल होऊं लागल्या. त्याचप्रमाणें भिक्षुसंघांतहि तरुण व तेजस्वी तरुणांची भरती सारखी वाढत चालली. अर्थात् वेळोवेळीं भिक्षु व भिक्षुणी एकत्र जमण्याचा व राहण्याचा प्रसंग येऊन, त्यामुळें त्यांच्या मनांत मानवस्वभावाला अनुसरून चलबिचल व गोंधळ उडत गेल्यास त्यांत आश्चर्य मानण्यासारखें अस्वाभाविक असें कांहींच नाहीं.

बुद्धसंघात दिनें दिनें भिक्षू व भिक्षुणी यांची संख्या वाढत गेली. पुढें वस्तुस्थिति अशी चमत्कारिक बनत गेली कीं, नवरा भिक्षु तर बायको भिक्षुणी, भाऊ भिक्षु तर बहिण भिक्षुणी, मुलगा भिक्षु तर आई भिक्षुणी. याप्रमाणें संघात भिक्षु व भिक्षुणींचा संग्रह जुळून आला. यांत कितीतरी तरुण स्त्रिया व तरुण पुरुष भिक्षुभिक्षुणींच्या वेशांत वावरत होते

( आमचा बुद्धगीताग्रंथ पहा. )

पावसाळ्याचे दिवस होते ते. भगवताचा मुक्काम श्रावस्ती येथील जेतवनांत होता अशी प्रथा होती कीं वर्षावासात सर्व भिक्षु व भिक्षुणी एकत्र जमावयाचे अर्थात भिक्षूचा संघ वेगळा व भिक्षूणीचा वेगळा व त्यांचा राहण्याचा विहारहि पण वेगळा असे असले तरी भिक्षु व भिक्षुणी प्रसंगोपात एकत्र जमत असत तेथें एक भिक्षु एका भिक्षुणीकडे जात येत असे पुढें त्याच्या जाण्यायेण्याची घसट वाढत चालली त्यामुळें एकमेकांना वारवार भेटण्याची त्यांच्यात आवड उत्पन्न झाली त्याला तिचा सहवास व तिला त्याचा सहवास पुढें हळूहळू गोड वाटू लागला याचा परिणाम पुढें असा झाला कीं, वेळीं अवेळीं व रात्री अपरात्री त्यांच्या भेटीगांठी होण्यास सुरुवात झाली आणि पुढें त्याची फलश्रुति म्हणजे त्याच्यात प्रेम विकार अंकुरून दोघेंहि अखेर चोरून एकातात रमू लागलीं ! असें होता होता भिक्षुणीचा विटाळ गेला ! पोट हळू हळू वाढू लागलें ! व चेहऱ्यात फरक पडत चालला !! गरवारपणाचे लक्षण होतें ते !!!

इतर भिक्षूनी हे पाहिले. आणि भगवताजवळ जाऊन त्याना ही हकीकत कळविली पुढें चौकशी अंती असे कळून आले कीं तो भिक्षु मुलगा असून, ती भिक्षूणी त्याची आई होती!! आई मुलात हा अनाचार माजला होता ! तेव्हा भगवान म्हणाले–काय मूर्खपणा हा ! त्या भिक्षूला समजू नये काय कीं , ती आपली आई आहे व तिला समजू नयें काय कीं तो आपला मुलगा आहे म्हणून ! काय अभद्र गोष्ट ही! किती लाजिरवाणी, किती निंद्य व अघोर ! (अगुतर ३–१ ५५)हा असला प्रकार पाहून भगवताच्या मनात नवीन प्रकाश पडून तेथें नवीन विचार तरगू लागले आपण स्त्रियाना भिक्षुणी होण्याची सधी व परवानगी दिली ही गोष्ट धर्मस्थिरतेच्या दृष्टीनें कांहीं चागली झाली नाहीं, असा विचार त्याच्या मनात चमकून गेला आणि त्यामळें मन जरा अस्थिर नि अस्वस्थ झाले

तेथें जमलेल्या भिक्षूना उद्देशून ते म्हणाले– भिक्षू हो ! स्त्रीसारखी मोहिनी जगात दुसरी नाहीं ! तिचे रूप, तिचें हास्य, तिचें भाषण, तिचा आवाज, तिची वेषभूषा, तिचा स्पर्श, सर्वच काहीं मोहक व मादक !!

पुरुषाला वेड लावणारें आहे ! पुरुष तेथें हतबुद्ध होतो ! विवेकशून्य बनतो ! प्रेममूढ होतो ! आणि अखेर तिच्या प्रेमपाशांत सापडून, तिचा कुत्रा होऊन राहतो ! स्त्रीची ही मोहिनी भिक्षूहो ! दुर्दम्य आहे ! अर्थात् तिचें सौंदर्य म्हणजे माराचा जणु कांही सांपळाच !!

( (अंगुत्तर निकाय ३-५-५५)

भगवंतांनीं ही सत्यकथा सांगितली हें ठीकच झालें. पण सर्वच भिक्षू तितके खंबीर व निग्रही असतील तर ! डोकें मुंडणें हें फार सोपें आहे. पण मन मुंडणें हें तितकेंच कठीण आहे ! मन न मुंडता नुसतें डोकें मुंडून स्त्रीमोहांतून सहीसलामत सुटणें ही आशा अगदी व्यर्थ आहे! ' बलवानिंद्रियग्रामो विद्वांसम पिकर्षति ' हें कांही खोटें नाहीं. मनुष्य प्रेम-वेडा झाला म्हणजे तो आई पहात नाहीं, बहीण पहात नाहीं, मुलगी पहात नाहीं ! कांहींच पहात नाहीं ! यावेळी तो पूर्णपणें विवेकशून्य पशु बनलेला असतो, यांत शंका घेण्याला जागाच नाहीं. असो.

यानंतर पुढें कांही दिवसांनी आनंद हा बुद्धाशी बोलत असतांना, त्याला काय वाटलें कोणास ठाऊक, तो भगवंतास म्हणाला-भवंत ! माझ्या मनांत एक गोष्ट विचारावी, असें आलें आहे. विचारूं कां ?

भगवान म्हणाले-खुशाल विचार.

आनंद-आम्हीं स्त्रियांशी कसें वागावें, याविषयीं भगवंतानी आम्हांस आतांपर्यंत कांहीं सांगितलें नाहीं. तेव्हा त्याविषयी आम्हांस स्पष्ट मार्ग-दर्शन करावें, असें मी म्हणतो.

भगवान- यांत काय तुला एवढा पेंच पडला आहे ? अरे, भिक्षूनें तिच्याकडे पहावयाचें नाहीं.

आनंद- पण ती होऊनच पुढें येऊन उभी राहिली तर ?

भगवान- तर तिच्याशीं बोलूं नये.

आनद– ती होऊाच योलण्यास सुरवात करील तर ?

भगवान– तसा प्रसगच आला तर जरूरी पुरतेंच दोन शद्ब बोलावे. आनदा ! तुम्ही भिक्षूनीं कमळावरील जलबिंदूप्रमाणें स्त्रियांच्या बाबतींत अगदी निर्लेप व निर्विकार असावे

आनदा– नाहीं तर ?

भगवान– मोठी आपत्ति ओढवेल ! जो स्त्रीशी अधिक लगट करतो व तिच्याशी फार सलगीने बोलतो, त्याचे व्रत फार दिवस टिकणार नाहीं! आनदा ! लवकरच तो भ्रष्ट होईल, कामविकारानें घेरला जाईल ! स्त्रीचे दर्शन, तिचे भाषण तिचा स्पर्श अत्यत मोहक व मादक असतो ! त्यापासून प्रेमांकुर उभ्दवून, भिक्षूचा अध पात होण्यास फार वेळ लागत नाहीं ! लागलीच पुरुष कामविकाराने विरघळून तिच्या मोहपाशात ओढला जातो ! समजले ? आनदा ! तुला खचित खचित सागतो की, स्त्री ही विस्तवासारखी असून पुरुष हा लोण्यासारखा आहे ! तिच्याजवळ गेला कीं विरघळलाच ! म्हणून सांगतो, तिच्यापासून लायच राहणें हें चांगले तिच्याशी बोलण्याचा प्रसग आला तर फार सावधगिरी बाळगून मोठ्या सयमानें वागले पाहिजे

आनदाच्या या वरील प्रश्नांनी भगवतानी त्याचें हृद्गत जाणले व क्षणभर थाबून त्यास म्हटले – एक गोष्ट तुला सागावीशी वाटते.

आनदा – ती काय ? भदत !

• भगवान– स्त्रियाना भिक्षुणी होऊन सघात राहण्यास परवानगी दिली, हे आता होऊन गेल, पण आनदा ! तें मी चागले केले नाहीं

आनद– का ?

भगवान– त्याना घरदार सोडून भिक्षुणी होण्यास व सघात येऊन राहण्यास परवानगी दिली नसती तर बरें झाले असतें, असे मला वाटू लागले आहे माझा तोल येथें सुटला !

आनंद :– असें कां म्हणतां ? भदंत !

भगवान :– हा माझा धर्म शुद्ध राहून फार दिवस टिकला असता. निदान हजार वर्षे तरी टिकला असता.

आनंद :– मग आतां काय झालें तसें न व्हायला ?

भगवान :– आतां मला शंका दाटूं लागली आहे. तो आतां फार तर पांचशे वर्षे टिकेल ! पुष्कळ बायका व थोडे पुरुष असलेल्या घरांत चोर व दरोडेखोर शिरून जसें तें लुटून फस्त करतात, तद्वत स्त्रियांना संघांत येऊन राहण्यास परवानगी दिल्यानें माझ्या धर्माचेंहि असेंच होणार !

आनंद – म्हणजे ?

भगवान – स्त्री ही धर्म क्षेत्रांतील कीड आहे ! आनंद ! पुरुषाचें सत्त्व हरण करणारी ती कीड आहे !! (चुल्ल वग्ग)

भगवान बुद्धाचें हें स्त्रियाविषयीचें मत असून, तें अनुभवसिद्ध होतें. असेंच म्हणावयाचें नाहीं काय ? असो. (आमची बुद्धगीता पहा )

## बुद्ध व यज्ञ

भगवान बुद्धाची यज्ञविषयक भावना आदरयुक्त आहे. त्यांना यज्ञ मान्य असून, तेथें होणारी हिंसा तेवढी अमान्य आहे. बुद्धकाळीं तेथील प्रांतांत यज्ञसंस्था अत्यंत विकृत व हीन स्थितीस पोंचली असावी असें अनुमान करण्यास जागा आहे. त्यावेळीं यज्ञांत गायी, बैल, बोकड, कोंबडे, डुकर इत्यादि शेकडो प्राण्यांचा वध करण्यांत येत असे, हें तत्कालीन यज्ञ वर्णनावरून दिसून येतें. त्यावरून वैदिक यज्ञाला त्याकाळीं व त्या देशांत केवढी अवकळा व विपर्यस्त स्वरूप आलें होतें, हें स्पष्ट दिसून येते. तसा हिंसाप्रचुर यज्ञ बुद्धाना मान्य नव्हता. त्यांनी बंड उठविलें तें यज्ञसंस्थेवर नसून, तेथील हिंसेवर मात्र कठोर प्रहार केला. अहिंसात्मक यज्ञ त्यांना मान्य होता, हें पुढील विवेचनावरून दिसून येतें. कूटदंत सुत्तांत त्यांनी आपलें यज्ञाविषयक मत सांगितलें आहे तें असें :–

ते उज्जय ब्राम्हणास अनुलक्षून म्हणतात ' हे उज्जय ब्राम्हणा! मी सर्व यज्ञाची प्रशसा करीत नाहीं किंवा सर्व यज्ञाची निंदाहि करीत नाहीं ज्या यज्ञांत गायी, बैल, बोकड, मकरे, कोंबडे, डुकर व अशाच प्रकारचे इतर प्राणी मारले जातात, त्या यज्ञाची मात्र मी प्रशसा करीत नाहीं अशा हिंसाप्रचुर यज्ञाविषयीं माझें मत चागले नाहीं कारण विचारशील तर अशा यज्ञात अर्हत सारखे थोर व श्रेष्ठ लोक जात नाहींत पण ज्या यज्ञात पशुहिंसा मुळीच नसते, अशा यज्ञाची मी प्रशसा करतो कारण अशा यज्ञात थोर सत्पुरुष जातात (मज्झिमनिकाय, कूटदतसुत्त) असाच उपदेश पुढें बुद्धानी अगुत्तर निकायात उदायीलाहि केला आहे

(अगुत्तर निकाय, २–४–९)

बुद्धाच्या भाषेतच यज्ञविषयक मत सागावयाचे तर तें असे –

' अस्समेध पुरिसमेध सम्मापास वाजपेय।
निरग्गल महारभा न ते होन्ति महप्फला ॥
अजेळकाच गावोच विविधा यत्थ हञ्ञरे।
न त सम्मग्गता यञ्ञ उपयन्ति महेसिनो ॥'

भावार्थ – अश्वमेध, पुरुषमेध, वाजपेय इत्यादि यज्ञात अमर्याद पशुहिंसा होत असल्यामुळें ते महाफलदायक दोत नाहीत बोकड, गायी व विविध प्राण्याची जेथें हिंसा होते, अशा त्या हिंसायुक्त यज्ञात सत्पुरुष जात नाहींत यावरून हिंसात्मक यज्ञ बुद्धाना पसत नव्हता, असे सिद्ध होतें

आता त्याचे अहिंसात्मक यज्ञाविषयीं सागावयाचें तर तें मत असे :–

' येच यञ्ञा निरारभा यजन्ति अनुकूल सदा
अजेळकाच गावोच विविधा नेत्थ हञ्ञरे ।
एत सम्मागतो यञ्ञ उपयन्ति महेसिनो
एत यजेथ मेधावी एसो यञ्ञो महप्फलो ।
एत हि यजमानस्स सेय्यो होति न पापियो
यञ्ञोच विपुलो होति पसीदन्ति देवता॥

(दी. नि पायासिसुत्त, २३–३१)

वरील विचार वैदिक यज्ञाविषयीं झालें. आता बुद्धधर्मांतहि यज्ञकर्म विहित मानलें असून, त्याचें स्वरूप हें असें आहे :– ' यो खो ब्राम्हण, पसन्नचित्तो बुद्धं सरणं गच्छति, धम्मं सरणं गच्छति, संघं सरणं गच्छति, अयं ब्राम्हण यञ्ञो,........इमिनाच निच्च दानेन अनुकूल यञ्ञो न इमिनाच विहार–दानेन अप्पट्ठतरोच अप्पसमारम्भतरोच महाफलतरोच महा' ,निसंसतरो चा'ति' (दीघनिकाय, कूटदंतसुत्त ५–२०)

भावार्थ– जो प्रसन्नचित्तानें बुद्धाला, धर्माला व संघाला शरण जातो तो त्याची कृति ही एक यज्ञच आहे !

बौद्धधर्मांतर्गत हा एक यज्ञ असून त्याचें स्वरूप भिक्षुसंघाला नित्य भोजनादि दान देणें व राहण्यास विहारादि बांधून देणें हें यज्ञकर्मांतच मोडते. यज्ञाविषयी ही इतकी माहिती आम्हास वाटतें इथें पुरेशी आहे.

## बुद्ध आणि देव

बुद्धाविषयीं आम्हा हिंदूचें मन जें कलुषित झालें आहे, त्याला कारण म्हणजे कोणीतरी बुद्धद्वेष्टयानें त्यांची नाचक्की करण्याकरितां ' यथा चोरस्तया हि बुद्धः' हें वाक्य व्यासांच्या नांवावर मोडणाऱ्या पुराणग्रंथांत कुत्सित बुद्धीनें घुसडून दिलें असावें हें होय. असें म्हणण्याला आधार हाच कीं भगवान व्यासांनी इतिहासपुराणें लिहिलीं त्यावेळीं बुद्ध मुळीं जन्मलेच नव्हते ! ही गोष्ट जमेस धरली तर वरील वचनाचा खोडसाळपणा सूज्ञ वाचकांच्या सहज ध्यानीं भरतो त्याला निराळा पुरावा देण्याची जरूरीच भासत नाहीं. ज्यांना भगवान बुद्धदेवाची अंतःसाक्ष पटली, त्या श्री शंकराचार्यांनी त्यांना 'य आस्ते कलौ योगिनां चक्रवर्ती' असा बहुमानानें गौरविलें आहे ! ! इकडे वाचकांचें लक्ष वेधिलें म्हणजे मग आम्हांस त्यांच्या विषयीं अधिक प्रशंसापत्र देणेचें कारण पडत नाहीं.

आम्ही चक्क व स्पष्ट सांगतो की, बुद्ध हे वैदिक धर्माचे द्वेष्टे व विरोधक मुळींच नव्हते. उलट पर्यायानें त्या धर्माचे अभिमानी व अनुगामी होते. कसें ते पहा, वैदिक धर्म पूर्वजन्म व पुनर्जन्म मानतो. बुद्धहि ती गोष्ट

मान्य करतात वैदिक धर्माची पाप–पुण्यावर भिस्त आहे आणि बुद्धानाहि तें अमान्य नाहीं. वैदिक धर्माचा स्वर्ग–नरकावर विश्वास आहे आणि बुद्धाचा झाला तरी त्याला रुकारच आहे वैदिक धम यज्ञयागादि कर्माचा पुरस्कार करतो व बुद्धहि थोडयाफार फरकानें त्याची प्रशसाच करतात. वैदिक धर्म देव व असुर याचे आस्तित्व मानणारा आहे आणि बुद्धाना झाले तरी ती गोष्ट मान्य आहे वैदिक धर्म मोक्ष मानतो व बुद्ध निर्वाण मानतात ! ! मग बुद्ध हे वैदिक धर्माचे द्वेष्टे व विरोधक कसे ? आता मतात थोडाफार फरक दिसून आला तर त्या मतवैचित्र्यामुळें त्याना वाटेल तसे दूषण देणें न्याय होईल काय ? त्यानाच काय बोल, वैदिक ऋषींत व वैदिक आचार्यांतहि मतभेदाचे व मतवैचित्र्याचें बड काय कमी आहे ? याविषयी आता अधिक लिहिणे बरे नाहीं असो

आता प्रस्तुत विषयाकडे वळू या बुद्ध हे वैदिका प्रमाणेच देव मानणारे आहेत ! फरक इतकाच की त्याचे देव काही निराळे आहेत पण ते देवयोनि वैदिकाप्रमाणेंच पूर्ण मानतात ते स्पष्ट म्हणतात की 'अत्थि खो भिक्खु तुसिता नाम देवा'– भिक्षुहो, तुसित नावाचे देव आहेत तसेच 'अत्थि खो भिक्खु ब्रम्हा महाब्रम्हा'– भिक्षुहो ब्रम्हा, महाब्रम्हा हे देव आहेत शिवाय हे पुढील वचनहि मननीय आहे ते वचन हे असे–

'देसिस्साभि भिक्खवे देव कायान नामानि ।
त सुणाय, साधुक मनसि करोथ, भासिस्सामी ति ।'

(दी नि. महासमय सुत्त २२-४) दीघनिकायातील कूटदत्त व केवट्ट सुत्तात त्यानी केलेल्या देवांचा उल्लेख आढळतो तो असा त्र्यत्रिंश, शक्र, वैश्रवण, विरुपाक्ष, कुबेर, धृतराष्ट्र, अच्युत, सोम, वरुण, चित्रसेन गधर्व, चद्रमा, सूर्य, वसु, हरि, तुषित, यम, सुब्रम्हा, सनत्कुमार, तिष्य, ब्रम्हा, ब्रम्हासहपति, प्रल्हाद, निर्माणरति, नळ, पचाशिख तुंबरु, ऐरावत, इत्यादि हे सर्व कर्म देव आहेत म्हणजे कर्म करून देवत्व पावले आहेत त्याना कर्तुमन्यथा–कर्तुं चे सामार्थ्य नाही हे त्र्यत्रिंश नामक देव स्वर्गात राहतात एकंदरीत तात्पर्य काय तर बुद्धांनाहि देवयोनि मान्य आहे पण ते

सगळे कर्मदेव आहेत. म्हणजे कर्म करून त्यांनी देवत्व प्राप्त करून घेतलें आहे. ते आजान-म्हणजे जन्मजात-देव नव्हेत. शिवाय त्यांना वैदिकाच्या देवांप्रमाणें कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं, ची शक्ति नाहीं. बुद्धाचा धर्म पौरुषप्रधान-कर्मप्रधान-धर्म आहे व हिंदुधर्म हा देव-देवता-प्रधान-भक्तिप्रधान धर्म आहे, हा बुद्ध व हिंदुधर्मातला महत्वाचा फरक होय.

## बुद्ध आणि जातिवाद

हिंदुधर्म हा जातिवादी आहे,तसा बुद्ध धर्म नाहीं. म्हणजे जन्माला हिंदूमध्यें जसें महत्वाचें स्थान आहे, तसें बुद्ध धर्मांत नाहीं इतकेंच. तेथें जातीपेक्षा गुणकर्माला अधिक मान्यता आहे आणि अशीच गोष्ट वैदिकधर्माचीहि पण आहे. वैदिक धर्मांत मनुष्याचें महत्वमापन हें जन्मावरून न ठरवितां गुणावरून ठरविलें जातें. वेदकालीं हीन जातीचे लोक देखील गुणकर्माच्या आधारावर ऋषिपदापर्यंत जाऊन पोचलेलीं उदाहरणें कैक सांपडतील. या विषयावर अधिक माहिती पाहिजे असल्यास आमच्या 'ऋग्वेद-दर्शना'तील वैदिक आर्यांची सामाजिक घडण या प्रकरणावरून नजर फिरविल्यास त्याची कोणालाहि खात्री पटेल. या आमच्या हिंदुधर्मांची गोष्ट अशांतली नाही. या धर्मांत उच्च-नीचतेचें मापन केवळ जातीवरून म्हणजे जन्मावरून पारखलें जातें. आणि ही जातिव्यवस्था लखोटबंद असल्यामुळें रोटीबेटी व्यवहारालाहि तेथें पायबंद बसला आहे. वैदिक धर्मांत असा प्रकार नव्हता. तेथें आर्यांच्या सर्व थरामधून परस्परांत अन्नोदक व्यवहार चालू असलेला प्रत्ययास येतो. आणि याला यज्ञसंस्था ही मुख्यत: कारण होती व झाली, हे निराळें सांगावयास नकोच. असो.

आतां या प्रश्नावर बुद्धभगवंतांचा काय कौल पडतो हें थोडक्यांत पाहूं आम्ही येथें स्पष्ट सांगून ठेवितो की, कोणी कांहीं जरी म्हटलें तरी बुद्धाचीं पावलें वैदिक धर्माच्या पावलांवरच पडत गेलीं आहेत. हें ज्यांनी वैदिक व बौद्ध धर्माचा सखोल व समतोल दृष्टीनें अभ्यास केला आहे, त्यांना पटल्याशिवाय राहणार नाहीं. बुद्धांनी या विषयावर आपलें मत

मज्झिम–निकायातील वासिष्ठ सुत्तात स्पष्टपणे प्रदर्शित केले आहे, त्याचाच येथें अनुवाद करतो.

तो प्रसग म्हणजे असा आहे. बुद्ध भगवान हे दौऱ्यावर असताना त्यांच्या तळ एकदा इच्छानगल गावाच्या उपवनात पडला होता. त्या गावात विद्वान व बहुश्रुत ब्राम्हण असे बरेच असून, त्यात वासिष्ठ व भारद्वाज हे दोन तरुण मोठे विद्वान व तल्लख पडित होते त्याच्यात नेहमी कोणत्या ना कोणत्या तरी विषयावर वाद जुपून मोठी खडाजगी उडत असे असाच प्रसग एका प्रसगीं एका प्रश्नावर आला वादाचा विषय म्हणजे श्रेष्ठत्व हें कुलावर का गुणावर हा होता भारद्वाजाचे म्हणणे असे कीं मनुष्याचा श्रेष्ठपणा हा कुलावर अवलबून आहे म्हणजे जन्मावर अवलबून आहे उदाहरणार्थ मनुष्य हा जन्मानेंच ब्राम्हण होतो व जन्मानेच शूद्र होतो वासिष्ठाचा आग्रह असा कीं, श्रेष्ठपणा हा जन्मावर म्हणजे जातीवर अवलबून नाहीं, तर गुणावर आहे दोघेहि शास्त्रात ज्ञाडे पडित असल्यामुळे व दोघाच्या वादकौशल्यात काही तथ्य असल्यामुळे कोणी कोणास हार जाण्याचें लक्षण दिसेना इतक्यात बुद्धाचा तळ तेथें पडला तेव्हा त्या दोघानी तो प्रश्न त्या गुरुदेवापुढें ठेवून, त्याचा कौल मान्य करण्याचे त्यानी आपापसात ठरविले व त्याप्रमाणे भगवताजवळ येऊन प्रत्येकानें त्याच्या पुढें आपापली बाजू माडली दोघाचे म्हणणे शातपणे ऐकून घेतल्यावर, त्यानी आपला निर्णय दिला तो असा –'पडित हो' ते म्हणाले, ' हें पहा, पशुपक्ष्यादिकांत आकारादिकानी निरनिराळ्या जाती आढळतात, तसा प्रकार मनुष्यात दिसून येत नाहीं सर्व मनुष्यें शरीरावयवादिकानी सारखींच आहेत त्याच्या शारीरिक घडणात फरक नसतो व नाहीं. म्हणून त्याच्यात जातिभेद ठरविता व मानता येत नाहीं अर्थात मनुष्यात श्रेष्ठत्व–ब्राम्हणत्व–ठरवावयाचे झाले, तर तें जातीवरुन–म्हणजे जन्मावरुन–न ठरवितां कर्मावरुनच–गुणावरुनच–ठरविलें पाहिजे

वासिष्ठ – म्हणजे ?

बुद्ध – म्हणजे असे एखादा मनुष्य ब्राम्हण आई–बापाच्या पोटीं जन्मास येऊन, पुढें मोठा झाल्यावर ब्राम्हणकर्म न करतां–म्हणजे विद्या–

संपन्न न होतां–गायी पाळून गवळयाप्रमाणें राहूं लागला व त्यावर आपला चारितार्थ चालवूं लागला, तर त्यास ब्राम्हण न म्हणता गवळी म्हणावें. ब्राम्हण म्हणूं नये व ब्राम्हणाचा मानसन्मान त्यास देऊं नये ! तो जर शिल्पकलेवर आपलें उपजीवन करूं लागेल तर त्यास कारागीर म्हणावें. ब्राम्हण म्हणूं नये ! तो व्यापार–उदीम करून, पोट भरूं लागेल तर, त्याला वाणी म्हणावे ! म्हणजे त्याची वैश्यांत गणना करावी, ब्राम्हणांत करूं नये. त्याचप्रमाणे तो राजकारणावर अगर राष्ट्रकार्यावर जगणारा झाला, तर तो क्षत्रिय झाला. ब्राम्हण नव्हे. शिप्याचा धंदा करणारा शिंपी; शेती करणारा शेतकरी, थोडक्यांत म्हणजे धंद्यावरच–कर्मावरच मनुष्याचें श्रेष्ठत्व अगर नीचत्व अवलंबून आहे. तो प्रत्यक्ष ब्राम्हण आईबापाच्या पोटी जन्मला असला तरीं त्यास ब्राम्हण म्हणूं नये.

भारद्वाज :– मग कशामुळें ब्राम्हण म्हणावे ? भदंत !

बुद्ध :– यावर माझें मत असें आहे कीं मनुष्य हा केवळ जन्मानें ब्राम्हण होत नाहीं व जन्माने अब्राम्हण होत नाहीं. तर तो कर्मानेंच ब्राम्हण होतो व कर्मानेंच अब्राम्हण तोतो. कर्मानेच तो शेतकरी होतो, व कर्मानेंच कारागीर बनतो, कर्मानेंच चोर होतो, कर्मानेंच याजक होतो. कर्मानेंच क्षत्रिय होतो व कर्मानेंच चांडाळ होतो. अर्थात् ब्राम्हणत्व हें जन्मावर म्हणजे कुलावर अवलंबून नसून, कर्मावर आहे. आंसेवर रथ जसा अवलंबून असतो तद्वत कर्मावरच ब्राम्हणत्व अवलंबून आहे. पंडितहो ! हा माझा तुमच्या प्रश्नावरचा निर्णय आहे.

याचा अर्थ असा की बुध्दांना मनुष्यांत भेद मानावयाचा तो जन्मावरून नसून कर्मावर मानला पाहिजे. यावरून जातिभेद मान्य नव्हता असा त्याचा अर्थ नव्हे. मनुष्याचें श्रेष्ठत्व हें जातीवर नसून, कर्मावर आहे, इतकाच त्याचा भावार्थ.

हे बुद्ध बुद्धाच्याच वचनांत सांगावयाचें तर तें पुढीलप्रमाणें आहे.

'न जच्चा ब्राम्हणो होति न जच्चा होति अब्राम्हणो ।
कम्मुना ब्राम्हणो होति कम्मुना होति अब्राम्हणो ॥५७॥
कस्सको कम्मुना होति सिप्पिको होति कम्मुना ।
वाणिजो कम्मुना होति पेस्सको होति कम्मुना ॥५८॥
चोरो पि कम्मुना होति योधाजीवोपि कम्मुना ।
याजको कम्मुना होति राजापि होति कम्मुना ॥५९॥
कम्मुना वत्तती लोको कम्मुना वत्तती पजा ।
कम्मनिबन्धना सत्ता रथस्साणीव यायतो॥ ६१॥
तपेन ब्रम्हचरियेन संयमेन दमेनच।
एतेन ब्राम्हणोहोति एतं ब्राम्हणमुत्तमं ॥६२॥

(मज्झिमनिकाय, वासेट्टसुत्त ९८–५७ ते ६१)

बुद्धांच्या या वरील वचनावरून त्यांना जातीचे श्रेष्ठत्व मान्य नसून कर्माचें श्रेष्ठत्व मान्य होतें, हें उघड दिसतें. वैदिक धर्मांतहि अशीच प्रथा आहे. आणि भगवान श्रीकृष्णजी झाले तरी 'चातुर्वर्ण्यं मयासृष्टं गुणकर्म विभागशः' असेंच गीतेंत घोषित करतात. या सर्वांचा मथितार्थ इतकाच कीं, बुद्ध हे जातीला महत्व देत नसून गुणकर्माला महत्व देतात. म्हणजे त्यांना जातिप्राधान्य मान्य नसून कर्मप्राधान्य मान्य आहे, हा प्रस्तुत विषयाचा सारांश बुद्ध झाले तरी 'मी जाति मानत नाहीं' असें कोठेंहि म्हणाले नाहींत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

पण याला एक अपवाद आहे. तो येथें सांगितला पाहिजे. तो म्हणजे मनुष्य हा भिक्षु झाल्यावर मात्र त्याची जात नष्ट होतें. म्हणजे भिक्षुसंघांत जातिभेद राहत नाहीं. सर्व जाती तेथें एक होतात. ही घोष्ट पुढील वचनांत आढळते तें वचन हे.– ये केचि महानदियो सेय्यथि' दम्-गंगा, यमुना, अचिरावती, सरभू, माही ता महासमुद्दं पत्ता यजहन्ति पुरिमानि नामगोत्तानि महासमुद्दो त्वेव सङ्खं गतानि, एवमेव खो भिक्कवे चत्तारो

यण्णा–खत्तिया ब्राम्हणो, वेस्सा, सुद्दा–ते तथागतप्पवेदिते धम्मविनये आगारस्मा अनागरियं पब्बजित्वा जहन्ति पुरिमानि नामगोत्तानि, समता शाक्यपुत्तिया सङ्खं गच्छन्ति ॥' (उदान ५–५)

भावार्थः– ज्या प्रमाणे गंगा, यमुना, अचिरावती, सरयू, माही इत्यादि महा नद्या समुद्रास जाऊन मिळाल्यावर आपलें पूर्वीचें नाम व रूप टाकून देतात, त्याप्रमाणे क्षत्रिय, ब्राम्हण, वैश्य व शूद्र या चार जाती तथागतोपदिष्ट धर्माचा व शिष्यत्वाचा अंगिकार करून, घरांतून निघून प्रव्रज्या घेतल्यावर आपलें पूर्वीचें नांव व गोत्र यांचा त्याग करून फक्त भिक्षु–शाक्यपुत्र–या नांवानें ओळखिले जातात. यावरून बुद्धधर्मांत फक्त भिक्षु झाल्यावर मात्र जातिभेद अगर कर्मभेद मानण्यांत येत नाहीं आधी मानण्यांत येतो, हें उघडच व्यक्त होतें.

## ख्यातनाम बुद्ध–शिष्य–वृंद

एतदग्ग वग्ग,
१–१४, अंगुत्तर निकाय

बुद्ध भगवंतांचा शिष्यसमुदाय फार मोठा असून जवळ जवळ त्याची संख्या दोन हजारावर गेली होती. त्याचा व्यवस्थित असा संघ बनला असून त्यांत सर्व जातीच्या लोकांचा समावेश झालेला होता. संघात ब्राम्हण होते, क्षत्रिय होते, वैश्य होते, न्हावी होते, कोळी होते, गुराखी होते, फार काय झाडू व चांडाळसुद्धा होते. उदाहरणार्थ–सारीपुत्र, मोग्गलान, अञ्ञा कोण्डिण्य, महाकश्यप व महाकात्यायन, इत्यादि भिक्षू ब्राम्हण होते. आनंद, अनुरुद्ध, भद्दिय वगैरे क्षत्रिय होते. सुभूति, सोण, बक्कुल इत्यादि वैश्य असून, उपालि हा न्हावी, स्वाती हा कोळी, नंद हा गोप, सुनीत हा झाडू व सोपाक हा चांडाळ होता! याप्रमाणे समाजातील सर्व थरांचा त्या संघांत समावेश झाला होता.

भगवंतांनी या बाबतींत स्पष्टच बोलून दाखविलें आहे कीं, माझ्या भिक्षुसंघांत जातीपातीचा, कुलगोताचा भेदाभेद असा मुळींच नाहीं. भिक्षु होऊन संघांत आलें कीं जातपात व कुलगोत्र सर्व पुसलें जाऊन सर्व एकच व सारखेच ! हें प्रत्यक्ष त्यांच्याच शद्बांत सांगावयाचें म्हणजे तर तें असें:— ' भिक्षूहो ! ज्याप्रमाणें गंगा, यमुना, सरभू, मही इत्यादि महा नद्या सागरास जाऊन पोंचल्यावर त्यांचें वैयक्तिक नामरूप सगळें नाहींसें होऊन फक्त महासागर हें एवढेंच नांव त्यांस प्राप्त होते, तद्वत क्षत्रिय काय, ब्राम्हण काय, वैश्य काय अगर शूद्र काय, या चारी वर्णांतील लोक जेव्हां घरदार सोडून—म्हणजे प्रपंच निवृत्त होऊन—भगवंताच्या धर्मविनयामध्यें प्रविष्ट होतात—म्हणजे भिक्षु होऊन भिक्षुधर्मानें वागतात, तेव्हां त्यांचें पूर्वीचें नांवगांव, कुलगोत हीं पुसलीं जाऊन, केवळ ' शाक्य पुत्रीय श्रमण ' हें एवढेंच नाव त्यांना प्राप्त होतें मग तेथें कसलाच भेदाभेद राहत नाहीं.

(उदान ५-५)

यावरून हें स्पष्ट आहे कीं, बुद्ध हे जातीभेद मानणारे नव्हते. पण केव्हा ? तर भिक्षु होऊन संघांत प्रविष्ट झाल्यावर, आधीं नाहीं. ही गोष्ट बुद्ध जातीभेद मानणारे नव्हते, असें सभेंत ओरओरडून सांगणारे अगर लेखांत शेरा मारणारे पुष्कळ शहाणे लोक विसरतात ! भगवंतांच्या मतें भिक्षुसंघ म्हणजे समुद्रासारखा विशाल व सर्वसंग्राहक असून तो एक-जिनसी असल्यामुळें तेथें भेदाभेदाला मुळीं वावच नसतो, तद्वत भिक्षु होऊन होऊन संघांत प्रविष्ट झाल्यावर तेथें व्यक्तीचें नांवगांव व जातपात इत्यादि सर्व गोष्टी विरून जातात. बुद्धधर्माच्या संघातील वैशिष्टच तें हेंच होय !

आतां त्यांच्या संघातील भिक्षूंमध्यें कांही काहीचें कांहीं कांहीं बाबतींत अपूर्व वैशिष्टच होतें. असें कांही अलौकिक भिक्षु तेथें असून, त्यांतलीं कांहीं निवडक नांवें खुद्द भगवंतानीच अंगुत्तर निकायांतील १–१४ या सुत्तंतांत दिलीं असून, त्या सूक्ताला एतदग्गवग्ग असें टोपण नांव आहे. त्यावरून ही पुढील माहिती देण्यांत येत आहे.

| १–१४ अ) नांव | जात |
|---|---|
| १ आज्ञा कौण्डिन्य, हा जुन्या शिष्यांत अग्रगण्य आहे. | ब्राम्हण |
| २ सारीपुत्र, हा महाप्रज्ञांत श्रेष्ठ आहे | ,, |
| ३ महा मोद्गल्यायन, हा ऋद्धिमानांत श्रेष्ठ आहे | ,, |
| ४ महा काश्यप, हा घुतवाद्यांत श्रेष्ठ आहे | ,, |
| ५ अनुरुद्ध, हा दिव्यचक्षूंमध्ये श्रेष्ठ आहे | क्षत्रिय |
| ६ भद्दिय कालिगोधापुत्र हा कुलीनांमध्ये श्रेष्ठ आहे | क्षत्रिय |
| ७ लकुंटक, भद्दिय हा सुरस भार्वेत उपदेश करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | धनीकुल |
| ८ पिंडोल भारद्वाज ,हा सिंहनादांत श्रेष्ठ आहे | ब्राम्हण |
| ९ पूर्ण मैत्रायणी-पुत्र, हा धर्म प्रवचनकारांत श्रेष्ठ आहे | ,, |
| १० महा कात्यायन, हा संक्षिप्त गोष्टींचा विस्ताराने अर्थ करून सांगणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | ,, |

१–१४ (ब)

| | |
|---|---|
| ११ चुल्लपंथक, हा मनोमय काय निर्माण करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | श्रेष्ठी कन्यापुत्र |
| १२ महा पंथक, हा संज्ञाविवर्तन चतुरांत श्रेष्ठ आहे | श्रेष्ठीकन्यापुत्र |
| १३ सुभूति, हा अरण्यांत विहार करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | वैश्यकुल |
| १४ रेवत खदिर वनिय, हा अरण्यकांत श्रेष्ठ आहे | ब्राम्हण |
| १५ कंखा रेवत, हा ध्यान करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | महा भोग कुल |
| १६ सोण कोडवीस, हा आरब्धवीर्यांत श्रेष्ठ आहे | श्रेष्ठी कुल |
| १७ सोणकुटिकण्ण, हा सुवक्त्यांमध्ये श्रेष्ठ आहे | वैश्यकुल |
| १८ सिवली, हा लाभियांत श्रेष्ठ आहे | क्षत्रियकुल |
| १९ वक्कली, हा श्रद्धावंतांत श्रेष्ठ आहे. | ब्राम्हण |

१–१४ (क)

| | |
|---|---|
| २० राहुल, हा भिक्षुनियम जिज्ञासूंत श्रेष्ठ आहे | क्षत्रिय |

| | | |
|---|---|---|
| २१ | राष्ट्रपाल, हा श्रद्धापूर्वक झालेल्या प्रव्राजितांत श्रेष्ठ आहे | वैश्यकुल |
| २२ | कुंडधान, हा प्रथम शलाका ग्रहण करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | ब्राम्हण |
| २३ | वंगीस, हा प्रतिभावानांत श्रेष्ठ आहे | ,, |
| २४ | उपसेन, वंगन्तपत्र, हा सर्व बाजूंनी सुंदर असणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | ,, |
| २५ | दब्ब मल्लपुत्र, हा शयनासन जाणाणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | क्षत्रिय |
| २६ | पिलिन्द वत्स, हा देवांना प्रिय असणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | ब्राम्हण |
| २७ | बाहिय दारुचीरिय, हा क्षिप्राभिज्ञ लोकांत श्रेष्ठ | कुलपुत्र |
| २८ | कुमार काश्यप, हा चित्र कथाकारांत श्रेष्ठ आहे | |
| २९ | महाकोट्टित, हा प्रतिसंवित् प्राप्त झालेल्यांत श्रेष्ठ आहे | ब्राम्हण |

१-१४ (ड)

| | | |
|---|---|---|
| ३० | आनंद, हा बहुश्रुतांमध्ये, गतिमानामध्ये, स्थितिमानांमध्यें, उपस्थापकांमध्यें श्रेष्ठ आहे | क्षत्रिय |
| ३१ | उरुवेल, काश्यप हा मोठी जमांत असलेल्यांत श्रेष्ठ आहे | ब्राम्हण |
| ३२ | काल उदायी, हा कुलप्रसादकांत श्रेष्ठ आहे | आमात्यगृहांत |
| ३३ | बक्कुल, हा निरोगी लोकांत श्रेष्ठ आहे | वैश्यकुल |
| ३४ | शोभित, हा पूर्वजन्म स्मरण करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | ब्राम्हण |
| ३५ | उपाली, हा विनयधरांत श्रेष्ठ | न्हावी |
| ३६ | नन्दक, हा भिक्षुणींना उपदेश करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | कुलगेह |
| ३७ | नन्द, हा जितेंद्रियांत श्रेष्ठ आहे | क्षत्रिय |
| ३८ | महा, कप्पिन, हा भिक्षूंना उपदेश करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे | राजवंश |
| ३९ | स्वागत, हा तेजधातु कुशलांत श्रेष्ठ आहे | ब्राम्हण |
| ४० | राध, हा प्रतिभाशालींमध्यें श्रेष्ठ आहे | ब्राम्हण |
| ४१ | मोघराज, हा लक्षचीवर धारकांत श्रेष्ठ आहे | ब्राम्हण |

## भिक्षुणी

१-१४ (इ)

४२ महाप्रजापती गोतमी, ही भिक्षुणीश्राविकांमध्यें श्रेष्ठ आहे क्षत्रिय

४३ खेमा, ही महाप्रज्ञांत श्रेष्ठ आहे (राजपुत्री) क्षत्रिय
४४ उत्पलवर्णा, ही ऋद्धि-मति भिक्षुणींत श्रेष्ठ आहे श्रेष्ठीकुल
४५ पटाचारा, ही विनयधरांत श्रेष्ठ आहे श्रेष्ठीकुल
४६ धम्मदिन्ना, ही धर्म कथा सांगणाऱ्यांत श्रेष्ठ आहे श्रेष्ठीकुल
४७ नन्दा, ही ध्यान करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे क्षत्रिय
४८ सोणा, ही आरब्धवीर्यांत श्रेष्ठ आहे कुलगेह
४९ भद्रा, कुंडल-केशा ही क्षिप्राभिज्ञावंतांत श्रेष्ठ आहे श्रेष्ठीकुल
५० भद्रा कापिलायनी, ही पूर्वजन्म स्मरण करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे ब्राम्हण
५१ भद्रा कात्यायनी, ही अभिज्ञा प्राप्त करून घेतलेल्यांत श्रेष्ठ आहे ब्राम्हण
५२ कृशा गौतमी, ही रुक्षचीवर धारण करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे वैश्य
५३ शृगाल माता, ही श्रद्धायुक्तांमध्ये श्रेष्ठ आहे श्रेष्ठीकुल

## उपासक

१-१४ (फ) नांव जात
५४ तपस्सु } हे प्रथम शरण आलेल्यांत श्रेष्ठ आहेत कुटुंबिक
५५ भल्लुक }
५६ अनाथ पिंडक सुदत्त गृहपति, हा दान देणाऱ्यांत श्रेष्ठ आहे श्रेष्ठी
५७ मच्छिकाषन्डवासी चित्र गृहपति, हा धर्म कथाकात श्रेष्ठ आहे श्रेष्ठी
५८ हस्तक आवलक, हा परिषत् भरविणाऱ्यांत श्रेष्ठ आहे श्रेष्ठी
५९ महानाम शाक्य, हा उत्तम दान देणाऱ्यांत श्रेष्ठ आहे श्रेष्ठी
६० वैशालिक उग्र गृहपति, हा प्रियदायकांत श्रेष्ठ आहे श्रेष्ठी
६१ उग्गत गृहपति, हा संघाची सेवा करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे श्रेष्ठी

नांव जात
६२ शूर अम्बष्ट, हा अत्यंत प्रसन्नांत श्रेष्ठ आहे श्रेष्ठी
६३ जीवक कौमारभृत्य, हा व्यक्तींना प्रसन्न करणाऱ्यांत श्रेष्ठ आहे
६४ नकुल पिता गृहपति, हा विश्वासू लोकांत श्रेष्ठ आहे

## उपासिका

१–१४(ग).

| | | |
|---|---|---|
| ६५ | सेनानी दुहिता सुजाता, ही मला प्रथम शरण आलेल्या उपासिकात अग्र आहे. | क्षत्रिय |
| ६६ | विशाखा मिगारमाता, ही दायिकामध्ये अग्र आहे | वैश्य |
| ६७ | खुज्ज उत्तरा, ही दायिकांमध्यें अग्र आहे | श्रेष्ठी |
| ६८ | सामावती, ही मैत्री विहार प्राप्त झालेल्यांत अग्र आहे | श्रेष्ठी |
| ६९ | उत्तरा नदमाता, ही ध्यानीलोकात अग्र आहे | क्षत्रिय |
| ७० | सुप्रवासा कोलिय दुहिता, ही उत्तम दायिकामध्ये अग्र आहे. | क्षत्रिय |
| ७१ | सुप्रिया उपासिका, ही रोगी सुश्रूषिकात अग्र आहे | वैश्य |
| ७२ | कात्यायनी, ही अतीव प्रसन्नात अग्र आहे | वैश्य |
| ७३ | नकुलमाता, गृहपत्नी ही विश्वासू उपासिकात अग्र आहे | वैश्य |
| ७४ | काली उपासिका, ही अनुश्रवप्रसन्नात अग्र आहे. | |

येणे प्रमाणे बुद्ध भगवताच्या भिक्षुसंघात उपरिनिर्दिष्ट भिक्षू व भिक्षुणी, उपासक व उपासिका त्या त्या विषयात अग्रगण्य म्हणून कथन करण्यात आल्या आहेत

## बुद्धोक्त स्वर्गादिलोक नामें

बुद्ध भगवतानी निरनिराळे लोक मानले असून त्याची सख्या एकदर एकतीस भरते या एकतीस लोकाची मुख्य पाच भागात विभागणी करण्यात आली असून, त्या भागाची नावे अशी आहेत–(१) अपाय लोक, (२) मनुष्यलोक, (३) कामलोक, (४) रूपलोक व (५) अरूपलोक. या पाच विभागात मिळून ३१ लोकाची सगति लावण्यात आली आहे, ती अशी–

| विभाग | लोक | |
|---|---|---|
| १ अपाय | १ निरय | |
| | २ तिरच्छानयोनि | |
| | ३ पेत्तविसय | |
| | ४ असुरभवन | |
| २ मनुस्सलोक | ५ मनुष्यलोक | |
| ३ कामलोक | ६ चातुम्महाराजिक | |
| | ७ तावतिंस | |
| | ८ याम | |
| | ९ तुसित | |
| | १० निम्मनरति | |
| | ११ परिनिम्मितवसवत्ति | |
| ४ रूपलोक | १२ ब्रम्हपरिसज्ज | ब्राम्ह कायिक. हे लोक प्रथमध्यानानें प्राप्त होणारे आहेत. |
| | ३१ ब्रम्हपुरोहित | |
| | १४ महाब्रम्हा | |
| | १५ परित्ताभ | हे लोक द्वितीय ध्यानानें प्राप्त होणारे आहेत. |
| | १६ अप्पमाणाभ | |
| | १७ आभस्सर | |
| | १८ परित्तसुभ | हे लोक तृतीय ध्यानानें प्राप्त होणारे आहेत. |
| | १९ अप्पमाणसुभ | |
| | २० सुभकिण्ण | |
| | २१ वेहप्फल | हे चौथ्या ध्यानानें प्राप्त होणारे लोक आहेत. |
| | २२ असिञ्ञासत्त | |
| | २३ अविह | |
| | २४ आतप्प | |
| | २५ सदस्स | |
| | २६ सुदस्सी | |
| | २७ अकनिट्ठ | |

| | | |
|---|---|---|
| ५ अरूपलोक | २८ आकासनञ्चायतन<br>२९ विञ्ञाणानञ्चायतन<br>३० अकिञ्चञ्ञायतन<br>३१ नेवसञ्ञानासञ्ञा-यतन | हे लोक अरुप ध्यानानी प्राप्त होणारे आहेत |

पहिल्या म्हणजे निरयलोकात आठ पोटभेद असून, त्याची पुढील प्रमाणें नावे आहेत – (१) सजीव (२) कालसुत्त (३) सघात (४) रोरुव (५) महारोरुव (६) तपन (७) पतापन व (८) अवीची दुसरा लोक तो पशुपक्ष्यादिकाचा लोक आहे तिसरा प्रेतपिशाचादिकाचा लोक असून चौथा असुराचा लोक आहे पाचवा लोक हा मनुष्य लोक होय व पुढील लोक हे स्वर्ग लोकाचे पोट भेद आहेत त्यांतील पहिला म्हणजे चातुम्म-हाराजिक हा देवलोक असून तेथें चार देवाची सत्ता चालू आहे. पूर्वेस गधर्वांचा राजा जो धृतराष्ट्र त्याचा अम्मल असून, पश्चिमेस नागाचा राजा विरूपाक्ष याचे राज्य आहे दक्षिणेस कुभडाचा अधिपति विरूठक याचा प्रात असून, उत्तरेस यक्षाचा स्वामी कुबेर याचे राज्य आहे. हा देवलोकातील पहिला लोक होय याच्यापुढें तावतिंस नावाचा देवलोक असून, तेथें शक्र ऊर्फ इद्राची सत्ता चालते यापुढें याम, तुसित, निम्मानरति व परिनिम्मितवसवत्ति असे एकावर एक चार लोक आहेत या सहा देव लोकाना कामलोक अशी सज्ञा आहे याचे कारण असे कीं येथील सर्व देव कामराग याच्या वशात असतात या लोकाच्या पुढें रूप लोक असून त्याची सख्या सोळा आहे याना ब्रम्हकायिक असे नाव असून, त्यातील पहिले तीन लोक म्हणजे ब्रम्हपरिसज्ज, ब्रम्हपुरोहित व महा ब्रम्हा याची प्राप्ति प्रथमध्यानानें साध्य होते पुढील तीन लोक द्वितीय ध्यानानें व त्यापुढील तीन लोक तृतीय ध्यानानें प्राप्त होतात आणि पुढील सात लोक हे चतुर्थ ध्यानानें लाभतात याना रूप लोक असे म्हणण्याचे कारण कीं येथें फक्त रूप असतें पण काम व राग हे नसतात आणि शेवटचे जे चार चार लोक आहेत, ते अरुप लोक अरूपध्यानानी प्राप्त होणारे आहेत या

लोकांत रूपहि नाहीं व कामरागहि नाहींत. यांची प्राप्ति आकासनञ्चायतन, विञ्ञानञ्चायतन, आकिञ्चञ्ञायतन व नेवसञ्ञानासञ्ञायतन या चार अरूप ध्यानांनी होते अशी ही बुद्ध धर्मांतील विविध लोकांची एकंदर ढोबळ कथा आहे.

## बौद्ध वाङ्मयाचा इतिहास व परिचय

सांप्रत बौद्धधर्माचें जें वाङमय प्रसिद्ध आहे, त्यांतील उपदेश व निरूपण प्रत्यक्ष भगवंतांच्या तोंडून जसें निघालें, तंतोतंत तसेंच प्रस्तुच्या धर्म ग्रंथांत उतरलें आहे, असें आग्रहानें म्हणतां यावयाचें नाहीं. त्यांत पुष्कळ फेरबदल, घुसडाघुसड व मोडतोड झाली असल्यामुळें प्रत्यक्ष भगवंतांच्या धर्मकथनाचा साक्षात्कार होणें प्रस्तुत स्थितींत अशक्य होऊन बसलें आहे. अर्थात् आपल्या सनातन वेद ग्रंथांना जें शद्वप्रामाण्य लाभलें आहे, तशी या बौद्धधर्माची गोष्ट नाहीं. भगवंतांच्या परिनिर्वाणानंतर तत्कालीन व उत्तरोत्तर भिक्षु वर्गात अनेक मतभेद व आचारभेद माजून, तन्मूलक विविध पंथ-उपपंथ निर्माण होऊन, त्या त्या पंथातील आचार्यांनी आपणास पटेल व वाटेल व रुचेल तसें त्या धर्माला स्वरूप देऊन टाकलें असल्यामुळें त्या धर्माला अनेक फाटे फुटून, त्याला विविध रूपें प्राप्त झालीं व आचार विचारांत गोंधळ व विरोध वाढत चालला. तेव्हां बौद्धधर्म व बौद्ध वाङमय यांचा इतिहास काय व कसा आहे हें येथें थोडक्यांत देऊन, त्याचा वाचकांस परिचय करून देणेसाठीं हें प्रस्तुत प्रकरण हातीं घेतलें आहे.

हल्ली जें पाली वाङमय आहे, तें बुद्धाच्या हयातींत तयार झालेलें नव्हेच नव्हे आणि त्यांत खुद्द बुद्धशिक्षणाचा अव्वल भाग असा किती आहे आणि नवीन घुसडलेला किती आहे, हे समजणें आज शक्य नाहीं. तें सर्व वाङमय बुद्धोत्तर काळीं बुद्ध भिक्षूंच्या स्मरणवहींतून ग्रंथबद्ध झालेलें आहे. खुद्द भगवान हयात असतानांच भिक्षु संघांत विनयासंबंधी फूट पडत चालली होती. त्यांच्या अंतकाळीं ती तीव्र झाली होती.

म्हणून बुद्ध परिनिर्वाण पावल्यानंतर थोडक्याच दिवसांत संघातील फूट व मतभेद काढून टाकण्यासाठीं भिक्षूंची पहिली संगीति म्हणजे महासभा महाकस्सप भिक्षूच्या अध्यक्षतेखालीं राजगृह येथें भरून त्यांत धम्म व विनय या विषयावर चर्चा व विचारविनिमय होऊन त्याप्रमाणे सुत्त-पिटक व विनय-पिटक यांची घटणा व रचना करण्यांत आली. यावेळीं बुद्ध भगवताचा प्रमुख शिष्य आनंद हा तेथें हजर असून त्याने विनय पिटक सांगितले व दुसरा एक प्रमुख शिष्य उपाली हाही हजर असून त्याने विनयपिटक सांगितले. याच्या सांगण्यावरून ते कार्य पार पाडण्यांत आले. आनंद व उपाली यांनी जें त्यावेळी तेथें सांगितले, ते सर्व त्यांनी आपल्या स्मरणांत जेवढें राहिले होतें. तेवढेंच सांगितले, याप्रमाणें सुत्तपिटक व विनयपिटक हे बौद्ध वाङमयांतील अत्यंत प्राचीन व प्रमुख भाग आहेत.

पुढें शंभर वर्षांनी वैशाली येथें दुसरी महासभा भरली. यावेळीं भिक्षु संघांत थेरवाद व महासांघिक वाद डोकाळून बसले होते थेरवादाचा प्रवर्तक महाकच्छायन नावाचा भिक्षू असून, त्याच्या अठरा संप्रदायांत सर्वास्तिवाद हा सर्वांत प्रसिद्ध होता. त्याचा प्रचार मथुरा, गांधार, व काश्मीर येथें मुख्यत्वाने झाला असून, काश्मीरच्या कनिष्कराजानें या सर्वास्तिवादाची दीक्षा घेतली होती त्याच्या संरक्षणाखाली हा वाद पुढे मध्य आशिया व तेथून चीन, जपान येथें प्रविष्ट झाला. दुसऱ्या म्हणजे महासांघिक सांप्रदायाचे केंद्र वैशाली येथें असून, तेथून तो पुढें खाली आंध्र देशांत उतरला महासांघिकाचे मत असे होतें कीं बुद्ध हा साधारण मनुष्य नव्हता. तो लोकोत्तर होता. शिवाय ते असेहि म्हणत कीं, मनुष्य जीवनाचा हेतु व ध्येय बुद्धत्व प्राप्त करून घेणेंचे आहे केवळ अर्हत्व प्राप्ति हे त्याचे इतकेच ध्येय नव्हे थेरवादी लोक जे होते, ते बुद्धाला लोकोत्तर मानीत नव्हते व मनुष्याच्या दुःखमुक्तीसाठी अर्हत्व प्राप्ति ही तेवढीच पुरेशी आहे, असे ते प्रतिपादीत थेरवादि व महासांघिकवादी यांच्यांत हा असा फरक होता

पुढें शंभर सव्वाशें वर्षांच्या कालांत बौद्ध भिक्षूलोकांत आणखी

अनेक मतभेद व आचार भेद वाढून, त्यांचे अनुयायी अनेक सांप्रदायांत व उपसांप्रदायांत विभागले गेले. हें मतभेद इतके तीव्र बनले होते कीं, त्यांच्यात उपोसथ हा विधि एकत्र होणें हें सुद्धां अशक्यप्राय होऊन बसलें होतें. अशा स्थितींत अशोक राजानें बौद्ध दीक्षा घेऊन बौद्ध धर्माची तळी उचलून धरली. व त्या धर्मातील मतभेद व बजबजपुरी मिटवून सुधारणा करणेसाठीं त्यानें प्रयत्न चालविले. यासाठीं त्याचे गुरु आचार्य मोग्गलिपुत्र तिस्स (उपगुप्त) ह्याच्या नेतृत्वाखाली पाटलिपुत्र येथे तिसरी महासभा उर्फ संगीति भरविणेंत येऊन त्यांत एक हजार विद्वान भिक्षु सतत नऊ महिने राबून, वादग्रस्त सर्व प्रश्नांची सूक्ष्म व दीर्घ चर्चा करून, मतभेद मिटविण्यांत त्यांनी यश मिळविलें. ही सभा मुख्यत: थेरवादी लोकांचीच असून, त्यांतील अंतर्गत मतभेदाचें निराकरण करण्यांत आलें पण हा या सभेतील निर्णय महासांघिक सांप्रदायिक भिक्षूंस मान्य झाला नाहीं. म्हणून अशोकानें त्यांस संघातून बहिष्कृत करून हाकून दिले. थेरवादातील अंतर्गत मतभेदाचें निराकरण करून तेथें ऐक्यमत्य निर्माण केल्यानें सभेचा उद्देश सफल होऊन, त्याचा परिणाम म्हणून 'कथावत्थु' नांवाचा धर्मशास्त्राचा एक महाग्रंथ निर्माण करण्यांत आला. आणि त्या ग्रंथाला प्रामाण्य स्वरूप प्राप्त झालें. अशोक हा थेरवादी सांप्रदायी पंथाचा अनुयायी असून, पुढें त्याचा मुलगा महेंद्र यानें लंकेंत जाऊन तेथें त्या पंथाचा प्रचार केला. हल्ली लंकेत जो बौद्धधर्म आहे, तो थेरवादी पंथच होय.

त्रिपिटक :—पुढें खिस्तपूर्व पहिल्या शतकांत तेथील राजा वट्टगामिनी याच्या कारकीर्दीत भिक्षूंची एक सभा होऊन, तेथें बौद्धधर्माला पाली भाषेंत ग्रंथ बद्ध स्वरूप देण्यांत आलें. त्या ग्रंथाला त्रिपिटक असें नांव आहे. त्याचा तपशील पुढील प्रमाणें आहे. बौद्ध धर्माचा प्रमुख असा महाग्रंथ म्हणजे त्रिपिटक हा होय. हा आद्य ग्रंथ असून, त्यांत बुद्ध भगवंतांची शिकवण अधिकांत अधिक विश्वसनीय अशी संग्रहीत झालेली आहे. ग्रंथ फार मोठा-जवळ जवळ महाभारतासारखाच-असला तरी, त्यांत बराचसा भाग पुनरु-

क्तीने व नीरस चर्चेने भरलेला आहे तथापि त्यात बुद्धधर्माचे वास्तव व प्रामाणिक स्वरूप उमटलेले दिसून येतें सर्व बौद्धवाङमयात त्याचे महत्व इतर ग्रथापेक्षा अधिक असले तरी तो प्रत्यक्ष बुद्धाच्या तोंडातून निघालेल्या उपदेशाची व प्रवचनाची अक्षरश हुबेहुब नक्कल नसल्यामुळे त्याचा आधार अत्यत काळजीपूर्वक व विचारपूर्वक घेतला पाहिजे कारण त्याचा जन्म स्मरणापासून व परपरागत पठणापासून झालेला आहे या ग्रथाविषयीं इतकी सूचना देऊन, आता त्या ग्रथाच्या तपशीलात शिरतो आम्हा हिंदूच्या दृष्टीने या ग्रथाला स्मृतीचे प्रामाण्य लाभले आहे, श्रुतीचे नव्हे

त्रिपटक म्हणजे तीन करडक. अर्थात् त्याचे तीन भाग पाडण्यात आले असून, पहिल्या भागास विनयपिटक,* दुसऱ्या भागास सुत्तपिटक व तिसऱ्या भागास अभिधम्मपिटक अशीं नावे आहेत

(१) विनय पिटक– या ग्रथाचे पुन तीन विभाग करण्यात आले असून, त्याचीं नावे (१) सुत्तविभग (२) खधक, व (३) परिवार अशीं आहेत सुत्त म्हणजे सूत्र, अर्थात् उपदेश या ग्रथात बौद्धधर्माप्रमाणे पापाची यादी देण्यात आली असून, त्या पापाचे प्रकार पाराजिक व प्राचित्तिय या दोन भागात विभागण्यात आले आहेत पाराजिक यादीतील पापें करणारा साप्रदायातून बहिष्कृत केला जात असे व याचात्तिक पापें करणारा प्रायश्चित्ताने शुद्ध होत असे

(अ) खधक – या विभागात सघाच्या व्यवस्थेबद्दल नियम दिले आहेत याचे महावग्ग व चुल्लवग्ग असे दोन पोट विभाग असून, पहिल्यात म्हणजे महावग्गात साप्रदाय प्रवेश, उपोसथविधि वगैरे सबधी नियम असून, दुसऱ्या म्हणजे चुल्लवग्गात बौद्धाचे दिनचर्याविषयक नियम ग्रथित करून ठेवण्यात आले आहेत तिसऱ्या विभागात म्हणजे परिवारात सूचि, परिशिष्टें वगैरे कमी महत्वाचीं प्रकरणे आहेत

(२) सुत्तपिटक – यात बुद्धभगवताचा सगळा धम व आचार-विषयक उपदेश व प्रवचने सग्रहित करण्यात आलीं असून, त्याचे एकदर

पांच भाग पाडण्यांत आले आहेत. यास निकाय असें नांव आहे. त्यांचीं नांवें:- (१) दीघनिकाय, (२) मज्झिमनिकाय, (३) संयुत्तनिकाय, (४) अंगुत्तर-निकाय व (५) खुद्दकनिकाय.

(अ) दीघनिकाय :– हा उपदेशपर मोठमोठ्या सूत्रांचा ग्रंथ असून, यांत एकंदर चौतीस सुक्तांचा संग्रह आहे. त्यापैकी पुढील सूक्तें महत्वाचीं असून वाचनीय आहेत तीं सूक्तें हीं:– (१) ब्रम्हजालसुत्त (हें तत्कालीन सांप्रदायिक इतिहासाच्या दृष्टीनें उद्बोधक आहे)(२) सामञ्ञफलसुत्त, (यांत वैराग्यावर विवेचन आहे), अंबट्ठसुत्त (यांत जातिव्यवस्थेचा मजकूर आहे),(५) कूटदंतसुत्त (यांत तीक्ष्णदंत ब्राम्हण

यावर व्याख्यान आहे), (१३) तेविज्जसुत्त (यांत वेदत्रयीवर विवेचन आहे), १४ महापदान सुत्त (यांत बुद्धाच्या चमत्काराचें वर्णन आहे.), १५ महानिदानसुत्त (यांत कारण परंपरेचा उहापोह आहे), १६ महापरि-निर्वाण सुत्त (हें अत्यंत महत्वाचें सुत्त असून त्यांत बुद्धाच्या शेवटच्या तीन महिन्यांचा व त्यांचा परिनिर्वाणाचा विश्वसनीय असा महत्वाचा चरित्रभाग आहे), २३ पायासिसुत्त (यांत एक ऐतिहासिक संवाद आहे), २९ सिगा-लोवादसुत्त (यांत बौद्धगृहस्थाचा आचार धर्म आहे). ही अशी दीघनिकायाची आत्पांत अल्प माहिती आहे.

(ब) मज्झिमनिकाय :–मज्झिमनिकाय म्हणजे मध्यम सूत्रें. यांत असून, त्यांची संख्या १५२ आहे. विषयाप्रमाणें त्याचे तीन भाग व पंधरा वर्ग करण्यांत आले आहेत. त्यांतील मुख्य व वाचनीय सूक्तें पुढील प्रमाणें:– सूक्त ९ वें, (सम्मादिट्ठि), सू. १० वें सतिपट्ठान (आर्यसत्य), सू. १३ वें महादुक्खक्खन्ध, सू. २२ वें. अलगुद्दूपम (अनात्मवाद) सू. २६ वें, पासिरासी.(बुद्धजीवन), सू. ३८ वें महा तण्हासंखय, ४३ वें महावेदल्ल सू. ४४ वें चूल वेदल्ल सू. ५३ वें सेल, ५५ जीवक (मांस भक्षण नियम), सू. ६३ वें चूल मालुंक्यपु (बुद्धाचा ग्राह्याग्राह्य उपदेश), सू. ७१ तेविज्ज

वच्छगोत्त, सू ७४ वे, दीघनख, सू. ८५ वे बोधिराजकुमार (बुद्धचरित्र) सू ८६ वे अंगुलिमाल, सू ९३ अस्सलायन (वर्णव्यवस्थाखंडण) सू ९८, वासेट्ठ (जाति जन्मावर नसून कर्मावर), सू १२७, अनुरुद्ध, सू १३० देवदूत, सू १४१ सच्चविभंग, सू १४६, नन्दकावाद, व सू १५२ इंद्रियभावना.

याशिवाय अनेक वाचनीय सुक्तें आहेत त्याचा उल्लेख येथें करू शकत नाहीं. ज्याना हवीं आहेत त्यानें मूळ ग्रंथच पहावा असो

(क) संयुत्तनिकाय – यात सुक्ताचे एकदर ५६ गुच्छ असून त्यात पहिले, देवतासंयुत्त, ४ थें मार संयुत्त, ५ वे भिक्षुणीसंयुत्त, ११ वे सक्कसंयुत्त, १२ वे निदान संयुत्त, १५ वे अनमतग्ग संयुत्त, १६ वे कस्सप संयुत्त, २८ वे सारिपुत्त संयुत्त, २९ वे नागसंयुत्त, ३४ समाधि-संयुत्त, ३५ वें साळायतन संयुत्त, ३७ वे मातुगाम संयुत्त, ४० मोग्गलायन संयुत्त, हे असे काही महत्वाचे गुच्छ आहेत. यातच महत्वाचे धर्मचक्र प्रवर्तन सुत्त व परिच्चसमुप्पाद यांचा समावेश होतो

(ड) अंगुत्तर निकाय – यात वाढत्या श्रेणीचीं २३०८ सुक्तें असून, त्याचे अकरा वर्ग उर्फ निकाय पाडण्यात आले आहेत यातील सुक्तें लघुत्व गुणानी युक्त असून, यात एकेक वर्ग एकेक गुणाने वाढत जातो. म्हणजे पहिल्यात एकेक विषय, दुसऱ्यास दोन दोन, तिसऱ्यात तीनतीन याप्रमाणे एकेक वर्गांत एकेक विषय वाढत जातो शेवटच्या म्हणजे अकराव्या वर्गांत अकरा विषयाचा संग्रह करण्यात आला आहे

(इ) खुद्दक निकाय :– याचे पधरा विभाग आहेत १ खुद्दकपाठ, २ धम्मपद, ३ उदान, ४ इतिउत्तक ५ सुत्तनिपात, ६ विमानवत्थु ७ पेतवत्थु, ८ थेरगाथा, ९ थेरीगाथा, १० जातक, ११ निद्देस, १२ पटिसंभिदामग्ग, १३ अवदान, १४ बुद्धवंश व १५ चरियपिटक.

(अ) खुद्दक पाठ :– यांत नऊ सूक्तें असून पैकी ९ वें सूक्त हें रतन ऊर्फ महा मंगलसुत्त, गुप्तनिधि सुत्त नं. ८ व नं. ९ वें हें मेत्तसुत्त आहे. पैकीं मंगलसुत्त हें मंगल प्रसंगीं म्हणण्यांत येतें.

(आ) धम्मपद :– धम्मपद हा ग्रंथ बौद्ध धर्मातील एक अमूल्य असें ग्रंथ-रत्न असून बौद्ध-सांप्रदायांत त्यास मोठें मान्य व श्रेष्ठ स्थान-प्राप्त झालें आहे. हिंदूंना जशी गीता तसें बौद्धांना हें धम्मपद होय. यांत ४२३ गाथा असून त्याचे एकंदर २६ वर्ग झाले आहेत. बुद्धाला बुद्धत्व प्राप्त झाल्यावर वेळोवेळी त्यांनी निरनिराळया व्यक्तींना उद्देशून निरनिराळया प्रसंगी निरनिराळया विषयांवर केलेला उपदेश या ग्रंथांत गाथारूपानें संग्रहीत करून ठेवण्यांत आला आहे. या ग्रंथांतील प्रत्येक गाथेमध्यें बौद्धधर्माचें कोणतें ना कोणतें तरी तत्व अगर नीति अगर सुभाषित गर्भित झालेलें आहे. अर्थात् या ग्रंथांत शील, समाधि, प्रज्ञा, निर्वाण याचें फार सुंदर चित्र दृष्टीस पडतें. या ग्रंथाचा जगांतील सुधारलेल्या सर्व भाषांत अनुवाद करण्यांत आला आहे.

यातील अप्पमादवग्ग (२), पंडितवग्ग (६), अरहन्तवग्ग (७), दंडवग्ग (१०), अत्तवग्ग (१२), बुद्धवग्ग (१४), धम्मट्ठवग्ग (१९), निरयवग्ग (२२), तण्हावग्ग (२४) भिक्खुवग्ग (२५) व ब्राम्हणवग्ग (२६), हे त्यातल्या त्यांत विशेष बोधप्रद असून, वाचनीय व मननीय आहेत.

(इ) उदान :– हा ग्रंथ गद्यपद्यात्मक असून, त्यांत आठवर्ग व ऐंशी सूत्रें आहेत. यांत बुद्धाच्या वेळच्या लहान लहान गोष्टी असून, शेवटीं बुद्धानें त्या गोष्टींवरून स्फूर्ती होऊन म्हटलेलीं वचनें दिलीं आहेत. अशा स्फूर्तीनें उच्चरलेल्या वचनाला उदान हें नाव आहे उदानामध्यें बुद्धाचे जीवित ध्येय, बौद्ध भिक्षूंचा आयुष्क्रम, त्यांच्या मानाला शांती पासून लाभणारा आनंद, सर्व वस्तूंचा त्यांनी केलेला त्याग, व निर्वाणापासून लाभणारें परमसुख, याची थोरथी वर्णन केली आहे.

जन्मीं आपण केलेल्या पुण्यकर्मामुळें आपणास तें वैभव प्राप्त झालें असें तिनें त्यास सांगितलें आहे. अशा प्रकारच्या या विमानवत्थु ग्रंथांत अनेक कथा सांगण्यांत आल्या आहेत.

(ऊ) पेतवत्थु :– पेतवत्थु या ग्रंथामध्यें प्रेतांच्या म्हणजे भूत–पिशाच्चांच्या गोष्टी आहेत. नारदानें एखाद्या प्रेतास कोणत्या कर्मामुळें त्यास दुःख प्राप्त झालें असा प्रश्न विचारल्यावरून, त्यानें आपली पूर्व जन्मातील हकीकत त्यास सांगितली आहे. अशा अनेक प्रेतांच्या त्यांत विविध गोष्टी आहेत.

(ए) थेरगाथा व थेरीगाथा : थेर म्हणजे वृद्ध बौद्ध–भिक्षु व थेरी म्हणजे वृद्ध बौद्ध भिक्षुणी. थेरगाथा म्हणजे वृद्ध बौद्ध भिक्षूंनी गायिलेलें काव्य व थेरी गाथा म्हणजे वृद्ध बौद्ध भिक्षुणींनी गायिलेलें काव्य. थेरगाथेंत एकंदर १०७ काव्यें असून त्यांत १२७९ पद्यें आहेत व थेरीगाथेंत ७३ काव्यें असून, त्यांत ५२२ पद्यें आहेत. हीं पद्यें थेर व थेरी यांनी रचलेलीं असून निराळे अनुभव व थेरी गाथेंत त्यांना बाहेरच्या जगाचे दृष्टीस पडलेले अनुभव यांचें वर्णन आहे. दोन्हींमध्ये अध्यात्मिक व नैतिक तत्वांचें सुंदर वर्णन करण्यांत आलें असून, मानसिक शांति हीच सर्वांत श्रेष्ठ आहे, आणि ती विषय व प्रपंच यांचा त्याग केल्यानें प्राप्त होते आणि पुनर्जन्म चुकतो, असें सांगण्यांत आलें आहे. थेर गाथेंत स्त्रियांची निंदा केली असून, त्या पुरुषांना मोह पाडून बंधनांत पाडणाऱ्या व पवित्र स्थानापासून भ्रष्ट करणाऱ्या आहेत असें म्हटलें आहे. थेरीगाथेंत आयुष्यांतील कांही प्रसंगाचें वर्णन असून, मार व भिक्षुणी यांच्यातील संवाद रूपानें स्त्रीशरीराची विडंबना करण्यांत आली आहे.

(ऐ) जातककथा : जातक कथा म्हणजे बुद्धाच्या पूर्वजन्मातील बोधिसत्व अवस्थेंत असतांना घडलेल्या गोष्टी. बोधिसत्व हें नांव पुढें

होणाऱ्या बुद्धाला दिलेलें असतें. गौतम बुद्धाला बोधिसत्व हें नांव त्याला बुद्धत्व प्राप्त व्हावयाच्या पूर्वीचें दिलेलें नांव आहे. जातकांत ज्या कथा गोष्टी आहेत, त्या त्यांच्या पूर्वजन्मांत स्वतः केलेल्या अगर पाहिलेल्या गोष्टींचें वर्णनपर आहेत. या कथा जवळ जवळ ५५० पर्यंत जातकांत देण्यात आल्या असून, त्यांत पुष्कळ बोधप्रद भाग आला असल्यामुळे संस्कृतीच्या इतिहासाच्या दृष्टीनें त्याला बरेंच महत्व प्राप्त झालें आहे. या ग्रंथावर बुद्धघोषांची टीका आहे.

(ओ) निद्देश : यांत सुतनिपातावरील दोन भागावर लिहिलेली टीका आहे.

(औ) पटिसंभिदामग्ग:— हा अभिधम्म ग्रंथापैकीं एक असून, त्याला खुद्दक निकाय-मध्यें स्थान मिळालें आहे.

(अं) अपादनः हा एक जातकग्रंथ असून, यांत बुद्धाच्या अगर बोधिसत्वाच्या कथा सांगितल्या नसून, बुद्धाच्या नंतर अर्हत् झालेले शिष्य व शिष्यिणी यांच्या पद्यमय गोष्टींचा संग्रह आहे. हा ग्रंथ थेर अपादान व थेरी अपादान अशा दोन भागांत विभागला असून, थेर अपादानांत ५५ प्रकरणे असून प्रत्येकांत दहा अपादानें आहेत.

(अः) बुद्धवंस :- हा खुद्दक निकायातील लहान ग्रंथामध्ये बुद्धवंस हा एक असून, त्यांत बुद्धाच्या पूर्वी जगाच्या बारा कल्पामध्यें होऊन गेलेल्या चोवीस बुद्धांच्या कथा आहेत. हा बुद्धवंस भगवान बुद्धानें स्वतः आपल्या तोंडानें कथन केला असून तो थेरांच्या परंपरेनें तृतीयसंगीति पर्यंत राखून ठेवण्यांत आला पुढे तो तसाच गुरुशिष्यांच्या अव्याहत परंपरेनें आजपर्यंत चालत आला आहे

(क) चरियापिटक :—हा खुद्दक निकायातील शेवटला ग्रंथ असून त्यामध्यें ३५ पद्यमय जातकांचा संग्रह आहे.

(उ) अभिधम्मपिटक :– हे त्रिपिटकातील शेवटचें पिटक होय. यांत अध्यात्मविषयावर अधिक भर देण्यांत आला आहे. पण तो बौद्ध–तत्त्व ज्ञानाचा मुख्य ग्रंथ नव्हे. यांत पुग्गल–पञ्ञत्ति (व्यक्तिवर्णन), धातुकथा (पदार्थनिर्देश), धम्मसंगणि (मनोवृत्तीचे विविधप्रकार) विभंग (ज्ञानप्राप्ति). पठ्ठानपकरण व कथावत्थु (इतर धर्मांचें खंडनपर विवेचन) व यमक असे सात विभाग आहेत. येथें त्रिपिटकाची माहिती थोडक्यांत देऊन ती पूर्ण करण्यांत आली.

## बौद्धधर्माचे इतर ग्रंथ

बौद्ध धर्मवाङ्मयांत त्रिपिटक हा ग्रंथ प्रमुख असून अग्रेसराचा मान त्याच्याकडेच जातो. त्यांत बुद्ध भगवंताचा प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष असा संबंध येतो. त्याशिवाय इतर ग्रंथहि असून, त्यांत बुद्धोत्तर कालीन बौद्ध आचार्यांनी व विद्वानांनी लिहिलेल्या ग्रंथाचा समावेश होतो. हें ग्रंथ कांहीं पाली भाषेंत व कांहीं संस्कृत भाषेंत लिहिलेले आहेत. त्यांत पुढील पाली भाषेंत लिहिलेले कांहीं प्रमुख ग्रंथ आहेत. ते येणे प्रमाणे–

१ मिलिंदपन्हः–हा ग्रंथ राजामिलिंद व नागसेन बौद्धपंडित यांच्या मध्ये झालेल्या बौद्धधर्मविषयक प्रश्नोत्तरांचा संग्रह आहे.

२ निदानकथा :– यांत बुद्धाचें संगतवार लिहिलेलें चरित्र आहे.

३ बुद्धघोषाचे पुढील ग्रंथ :– जातकटीका ; विशुद्धि मग्ग (निर्वाण प्राप्तीचा मार्ग, सांप्रदायिक विधि व संस्कार यांच्या माहितीचा ग्रंथ); समंतपासादिक (विनयपिटकावरील टीका); सुमंगलविलासिनी (दीघनिकायावरील टीका); पपंचसूदनी (मज्झिमनिकायावरील टीका); सारत्थपकासिनी (संयुत्त निकायावरील टीका); मनोरथपूरणी (अंगुत्तरनिकायावरील टीका); परमत्थकथा (अधिधम्मपिटकातील

सातहि ग्रंथावरील टीका ); खुद्दकपाठावरील टीका, धम्मपदावरील टीका, सुत्तनिपातावरील टीका वगैरे वगैरे;

संस्कृत ग्रंथ :- ललित विस्तर ( बुद्धचरित्रावरील महायान पंथाचा संस्कृत सविस्तर ग्रंथ; अश्वघोष-कृत बुद्धचरित्र; सूत्रालंकार; सद्धर्म पुंडरीक ( महायान पंथाच्या विशिष्ट तत्त्वांचा माहिती देणारा ग्रंथ ); अभिधम्मकोश ( वसुबंधूचा नीतिशास्त्र, मानसशास्त्र व अध्यात्मशास्त्र यावरील चर्चात्मक हीनयान पंथाचा विद्वत्ताप्रचुर ग्रंथ याशिवाय इतर अनेक किरकोळ ग्रंथ आहेत. त्या सर्वांचा उल्लेख येथें विस्तर भयास्तव करणें शक्य नाहीं



# बुद्ध-बोधवचन-संग्रह



## ( मराठी भावार्थ )

( १ ) मह्यं भिक्खवे एतरहि सुद्धोदन नाम राजा पिता अहोसि। माया देवी माता जनत्ती। कपिलवत्थु नगरं राजधानी 'ति ॥

( दीघनिकाय १४-१-१२ )

भिक्षूहो! शुद्धोदन नांवाचा राजा हा माझा पिता असून, मायादेवी ही माझी माता आहे, आणि कपिलवस्तु ही राजधानी होय.

( २ ) अहं पि सुदं भिक्खवे पुब्बे'व सम्बोधा अनभिसम्बुद्धो बोधिसत्तो व समानो अत्तना जातिधम्मो समानो जातिधम्मन्ने'व परियेसामि, अत्तना जराधम्मो समानो जराधम्मन्ने'व परियेसामि, अत्तना ब्याधिधम्मो ..., अत्तना मरणधम्मो, अत्तना सोकधम्मो ..., अत्तना संकिलेसधम्मो समानो संकिलेसम्मन्ने'व परियेसामि। तस्स मह्यं भिक्खवे एतद् अहोसि:- किं नु खो अहं अत्तना जातिधम्मो समानो जातिधम्मन्ने'व परियेसामि, ...। यन्नूना'हं जातिधम्मो समानो जातिधम्मे आदीनवं विदित्वा अजातं अनुत्तरं योगक्खेमं निब्बानं ॥ ( मज्झिमनिकाय, पासिरातिसुत्त २६ )

भिक्षूहो! मी मोठा झाल्यावर संबोधि प्राप्त व्हावयाच्या पूर्वी म्हणजे असंबुद्ध बोधिसत्त्व असतांना मी स्वतः जातिधर्मा — म्हणजे जन्ममरणादि धर्मांनें युक्त असून तशाच धर्मांनी युक्त असलेल्या पुत्र-

दारा, दासदासी, घरदार, धनदौलत, अश्वगवादिपशु इत्यादिकांच्या शोधांत गुंतलों होतो. अर्थात् त्यांतच माझा जीव घुटमळत होता. मी स्वतः जराधर्मा, व्याधिधर्मा, मरणधर्मा, शोकधर्मा असा असतांना माझ्या प्रमाणेंच असणाऱ्या जातिधर्मांच्या नादीं लागावें, शोधार्थ झटावें, हें काय आहे ! मी स्वतः जातिमरणधर्मा असून आणि जातिधर्मांचे दुष्परिणाम प्रत्यक्ष डोळ्यानें पाहून, त्याहून विलक्षण अशा अजात, सर्वोत्तम, मंगलमय, अशा निर्वाणाची पर्येषणा म्हणजे विचार मी कां करूं नये !

( ३ ) सम्बाधो घरावासो रजो-पथो, अब्भोकासो पब्बज्जा ॥

( दीघनिकाय, २-४३ )

गृहवास—म्हणजे प्रापंचिकजीवन— हें पूर्ण बाधक व विषयासक्ति यांनी युक्त आहे. आणि प्रव्रज्या ही खुली जागा आहे.

( ४ ) न इदं सुकरं अगारं अज्झावसता एकन्त-परिपुण्णं एकन्त-परिसुद्धं सङ्खलिखितं ब्रह्मचरियं चरितुं ॥ ( दीघनिकाय २-४३ )

घरांत—म्हणजे प्रपंचांत—राहणाऱ्याला एकांतपरिपूर्ण, परिशुद्ध व शंखाप्रमाणें निर्मळ अशा या ब्रह्मचर्याचें पालन करणें सोपें नाहीं.

( ५ ) न खो सुखेन सुखं अधिगन्तब्बं, दुक्खेन खो सुखं अधिगन्तब्बं ति ॥ ( मज्झिमनिकाय, ८५-४ )

मी बुद्ध व्हावयाच्या पूर्वीं — म्हणजे बोधिसत्व असतांना मला असें वाटत होतें कीं, संसारसुखापासून शाश्वत सुख लाभणें शक्य नाहीं. तर दुःख—कष्ट—सोसण्यानेंच तें लभ्य आहे.

(६) सो खो अहं, राजकुमार! अपरेन समयेन दहरो'व समणो सुसु काळकेसो भद्रेन योब्बनेन समन्नागतो पठमेन वयसा अकामकानं मातापितुन्नं अस्सुमुखानं रुदन्तानं केसमस्सुं ओहारेत्वा कासायानि वत्थानि अच्छादेत्वा अगारस्मा अनगारियं पब्बजिं ॥

(मज्झिमनिकाय, ८५-४)

आणि म्हणून, राजकुमारा! मी त्यावेळीं चांगला तरणाबांड होतो. माझे केस काळे कुळकुळीत होते. दिसण्यांत सुंदर तरुण होतो. अर्थात् तें माझें पूर्ववयच होतें. त्या वयांतच माझे आईबाप नको नको म्हणत असतां, अश्रु ढाळीत असतां, रडत असतां डोक्याचे केस व तोंडावरील दाढी मिशा मुंडून कषायवस्त्रें धारण करून घरांतून बाहेर पडलों आणि प्रव्रज्या घेतली.

(७) कतमञ्च भिक्खवे दुक्खं अरियसच्चं ? । जातिपि दुक्खा, जरापि दुक्खा, व्याधि पि दुक्खा, मरणम्पि दुक्खं, अप्पियेहि संपयोगो दुक्खो । पियेहि विप्पयोगो दुक्खो । यम्पिच्छं न लभति तम्पि दुक्खं । संखित्तेन पञ्चुपादानक्खन्धा पि दुक्खा ॥

(धम्मचक्कपवत्तनं सुत्त ५)

भिक्षूहो! (तो माझा धर्म चार आर्य सत्यांत विभागला आहे) त्या चार आर्यसत्यांतील दुःख हें पहिलें आर्यसत्य असून, तें काय आहे? तर तें हें आहे — जन्म हें दुःख आहे. म्हातारपण हें दुःख आहे. व्याधि हें दुःख आहे. मरण हें दुःख आहे. अप्रियाचा संयोग हें दुःख आहे. प्रियाचा वियोग हें दुःख आहे. इच्छित वस्तु न मिळणें हें दुःख आहे. थोडक्यांत म्हणजे पंचुपादानस्कंध हे दुःखरूप आहेत.'

( ८ ) इदं खो पन भिक्खवे दुक्खसमुदयं अरियसच्चं । या'यं तण्हा पोनोभविका नन्दिरागसहगता तत्रतत्राभिनन्दिनी, सेय्यथीदं – कामतण्हा, भवतण्हा, विभवतण्हा ॥ (धम्मचक्कपवत्तनसुत्त ६)

✓ त्याचप्रमाणें दुःखसमुदय – म्हणजे दुःखोत्पत्ति – हें दुसरें आर्यसत्य आहे. तें म्हणजे तृष्णा ही होय. ही जेथें तेथें सुख शोधीत असते. व पुनः पुनः उद्‌भवत असते. ती काय म्हणाल तर कामतृष्णा, भवतृष्णा व विभवतृष्णा.

( ९ ) कतमञ्च भिक्खवे दुक्खनिरोधं अरियसच्चं ? यो तस्सा येव तण्हाय असेसविरागनिरोधो चागो पटिनिस्सग्गोमुत्ति अनालयो ॥ (धम्मचक्कपवत्तनसुत्त ७)

✓ त्यानंतर दुःखनिरोध–म्हणजे दुःखाचा नाश हें तिसरें आर्यसत्य आहे. त्या तृष्णेचा अत्यंत वैराग्यानें निरोध, त्याग, प्रतिनिसर्ग, मुक्ति आणि अनासक्ति हें तें तिसरें सत्य होय.

( १० ) इदं खो पन भिक्खवे दुक्खनिरोधगामिनी पटिपदा अरियसच्चं, अयमे'व अरियो अठङ्गिको मग्गो । सेय्यथीदं–सम्मादिट्ठि सम्मासंकप्पो सम्मावाचा सम्माकम्मन्तो सम्माआजीवो सम्मावायामो सम्मासति सम्मासमाधि ॥ (धम्मचक्कपवत्तनसुत्त ८)

✓ आणि दुःखनिवृत्तीचा मार्ग हें चौथें आर्यसत्य आहे. आणि तो मार्ग म्हणजे आर्य अष्टांगिक मार्ग होय. तो कोणता म्हणाल तर तो हा – सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्म, सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति व सम्यक् समाधि.

( ११ ) 'सम्मादिट्ठिस्स भो सम्मासङ्कप्पो पहोति, सम्मासङ्कप्पस्स सम्मावाचा पहोति, सम्मावाचस्स सम्माकम्मन्तो पहोति, सम्माकम्मन्तस्स सम्माआजीवो पहोति, सम्माआजीवस्स सम्मावायामो पहोति, सम्मावायामस्स सम्मासति पहोति, सम्मासतिस्स सम्मासमाधि पहोति सम्मासमाधिस्स सम्माञाणं पहोति, सम्माञाणस्स सम्माविमुत्ति पहोति ॥ ( दीघनिकाय १८-२७ )

✓ ज्याला सम्यक् दृष्टि लाभली, तो मनुष्य सम्यक् संकल्प करण्यास समर्थ होतो. सम्यक् संकल्प प्राप्त झाला असतां त्याला सम्यक् वाणी लाभते. सम्यक् वाणीचा लाभ झाला म्हणजे मनुष्य सम्यक् कर्म करण्यास समर्थ होतो. सम्यक् कर्म करणारा सम्यक् आजीव मिळविण्यास समर्थ होतो. सम्यक् आजीवानें सम्यक् व्यायामाला मदत मिळते. सम्यक् व्यायाम सिद्ध झाला म्हणजे सम्यक् स्मृतीचा लाभ होतो. सम्यक् स्मृति लाभली म्हणजे सम्यक् समाधि सिद्ध होते. सम्यक् समाधी साधली म्हणजे अंतःकरणांत सम्यक् ज्ञान उजळतें. आणि सम्यग् ज्ञान उजळलें म्हणजे सम्यक् विमुक्ति लाभते ।

( १२ ) अयं खो सा भिक्खवे मज्झिमा पटिपदा तथागतेन अभिसम्बुद्धा चक्खुकरणी ञाणकरणी उपसमाय अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बानाय संवत्तति ॥ ( धम्मचक्कपवत्तनसुत्त ४ )

✓ भिक्षूहो ! तथागतानें उपशमाला, अभिज्ञेला, संबोधाला व निर्वाणाला जो मार्ग शोधून काढला, तो हाच मध्यम मार्ग होय. हा मार्ग दृष्टिदायक व ज्ञानदायक असा आहे.

( १३ ) याव कीव चं मे भिक्खवे इमेसु चतुसु अरियसचेसु एवं तिपरिवट्टं द्वादसाकारं यथाभूतं ञाणदस्सनं न सुविसुद्धं अहोसि नेव तावाहं भिक्खवे सदेवके लोके समारके सब्रम्हके सस्समणब्राह्मणिया पजाय सदेवमनुस्साय अनुत्तरं सम्मासम्बोधिं अभिसम्बुद्धो'ति पच्चञ्ञासिं ॥ ( धम्मचक्कपवत्तन सुत्त १३ )

✓ जोपर्यंत मला ह्या चार आर्यसत्याविषयी प्रत्येकी तीन तऱ्हेची व एकंदर बारा प्रकारची यथार्थ ज्ञानदृष्टि सोज्ज्वळतेनें लाभली नव्हती, तोपर्यंत देव, मनुष्य, मार, ब्रह्मदेव, श्रमण व ब्राह्मण यांनी वसलेल्या जगांत अलौकिक अशा संबोधि ज्ञानाचा मला लाभ झाला असें वाटत नव्हतें.

( १४ ) यतो च खो मे भिक्खवे इमेसु चतुसु अरियसचेसु एवं तिपविट्टं द्वादसाकारं यथाभूतं ञाणदस्सनं सुविसुद्धं अहोसि अथाहं भिक्खवे सदेवके लोके समारके सब्रम्हके सस्समणब्राह्मणिया पजाय सदेवमनुस्साय अनुत्तरं सम्मासम्बोधिं अभिसम्बुद्धो ति पच्चञ्ञासिं ॥ ( धम्मचक्कपवत्तनसुत्त १४ )

✓ पण भिक्षूहो ! मला जेव्हां या चार आर्यसत्याविषयीं सुविशुद्ध अशी यथार्थ ज्ञानदृष्टि लाभली तेव्हांच देव, मानव, मार इत्यादि लोकांनी भरलेल्या जगांत अनुत्तर अशा संबोधीचा लाभ झाला, यांची मला खात्री पटली.

( १५ ) ञाणं च पन मे दस्सनं उदपादि । अकुप्पा मे चेतोविमुत्ति । अयं अन्तिमा जाति । नत्थि'दानि पुनब्भवोति । इदमवोच भगवा ॥ ( धम्मचक्कपवत्तनसुत्त १४ )

मला जी दिव्य ज्ञानदृष्टि लाभली, ती ही कीं, माझ्या चित्ताची संसारदुःखांतून विमुक्ति झाली असून ती आतां अविकंप आहे. हा माझा आतां शेवटचाच जन्म आहे. पुनः आतां मला जन्म नाहीं. ( असें भगवान् बुद्धांनी त्या भिक्षूंना सांगितलें. )

( १६ ) अथ खो भगवा रत्तिया पठमं यामं पटिच्च समुप्पादं अनुलोमपटिलोमं मनसाकासि । अविज्जापच्चया सङ्खारा । सङ्खारपच्चया विञ्ञाणं । विञ्ञाणपच्चया नामरूपं । नामरूपपच्चया तण्हा । तण्हा-पच्चया उपादानं उपादानपच्चया भवो । भवपच्चया जाति । जातिपच्चया जरामरणं सोकपरिदेवदुक्खदोमनस्सुपायासा सम्भवन्ति । एवमेतस्स केवलस्स दुक्खक्खन्धस्स समुदयो होति ॥

( मज्झिमनिकाय, ३८ )

पुढें रात्रीच्या प्रथम यामांत अनुलोम-प्रतिलोम एतात्मक प्रतीत्य-समुत्पाद भगवंताना स्फुरला. तो असा — अविद्येपासून संस्कार, संस्कारा-पासून विज्ञान, विज्ञानापासून नामरूप, नामरूपापासून षडायतन (म्हणजे षडिंद्रियें), षडायतनापासून स्पर्श, स्पर्शापासून वेदना, वेदनापासून तृष्णा, तृष्णेपासून उपादान, उपादानापासून भव (संसार), भवापासून जन्म, जन्मापासून जरा-मरण, दुःख, शोक, रुदन, हैराण इत्यादि उत्पन्न होतात. (हा अनुलोम समुत्पाद होय)

(१७) अविज्जाय त्वेव असेसविरागनिरोधा सङ्खारनिरोधो । सङ्खारनिरोधा विञ्ञाणनिरोधो । विञ्ञाणनिरोधा नामरूप-निरोधो । नामरूपनिरोधा सळायतननिरोधो । सळायतननिरोधा फस्सनिरोधो । फस्सनिरोधा वेदनानिरोधो । वेदनानिरोधा तण्हानिरोधो । तण्हानिरोधा

उपादान निरोधो। उपादाननिरोधा भवनिरोधो। भवनिरोधा जातिनिरोधो। जातिनिरोधा जरामरणं सोकपरिदेवदुक्खदोमनस्सुपायासा निरुज्झन्ति। एवमेतस्स केवलस्स दुक्खक्खन्धस्स निरोधो होती'ति॥

(मज्झिमनिकाय, महातण्हासुत्त, ३८)

✓ अविद्येपासून पूर्णतया विरक्त झाल्यानें व अविद्येचा नाश झाल्यानें संस्काराचा निरोध म्हणजे नाश होतो. संस्काराचा निरोध झाला म्हणजे विज्ञानाचा नाश होतो. विज्ञानाच्या निरोधानें नामरूपाचा, नामरूपाच्या निरोधानें षडायतनाचा, षडायतनाच्या निरोधानें स्पर्शाचा, स्पर्शाच्या निरोधानें वेदनेचा, वेदनेच्या निरोधानें तृष्णेचा, तृष्णेच्या निरोधानें उपादानाचा, उपादानाच्या निरोधानें भवाचा, भवाच्या निरोधानें जातीचा, जातीच्या निरोधानें जरा-मरण, शोक-रुदन, दुःख-दुर्मनस, उद्विग्नता, इत्यादिकांचा नाश होतो. (हा प्रतिलोम-समुत्पाद होय.)

(१८) अधिगतो खो मे अयं धम्मो गम्भीरो दुद्दसो दुरनुबोधो सन्तो पणीतो अतक्कावचरो निपुणो पण्डितवेदनीयो। आलयरामा खो पना'यं पजा आलयरता आलयसम्मुदिता। आलयरामाय खो पन पजाय आलयरताय आलयसमुदिताय दुद्दसं इदं ठानं यदिदं इदपच्चयता पटिच्चसमुप्पादो॥

(दीघनिकाय, १४–३–१)

✓ (पण पुढें माझ्या मनांत असा विचार आला कीं) मी हा जो गंभीर, दुर्ज्ञेय, दुर्बोध, शांत, प्रणीत, तर्कानें अप्राप्य, निपुण असा विमुक्ति मार्ग शोधून काढला आहे, तो फक्त पंडितांनाच समजण्यासारखा आहे. आणि ही प्रजा म्हणजे संसारी लोक तरी काय, ते सतत विषयभोगांतच रमणारे व रंगणारे असे अज्ञजन आहेत. केवळ विषयभोगांतच

रमणारे व त्यांतच उदंड रंगलेले अशा लोकांना हें समजणें कठीण आहे की अमक्यामुळें अमक्याची उत्पत्ति होते व आहे. तसेंच हेंहि समजणें कठीण कीं सर्व संस्कार शांत झाल्यावर, सर्व उपाधींचा अंत झाल्यावर, आणि तृष्णेचा समूळ उच्छेद झाल्यावर रागरहित-म्हणजे आसक्तिरहित होणें म्हणजेच निर्वाण होय. या धर्माचा मी जगाला उपदेश करीन म्हणतो, पण तो इतरांना समजण्यासारखा नाहीं! मग माझे प्रयत्न व श्रम हे फुकटच होणार ना!

(१९) इदम्पि खो ठानं दुद्दसं यदिदं सब्बसङ्खारसमथो सब्बूपधिपटिनिस्सग्गो तण्हक्खयो विरागो निरोधो निब्बाणं ॥

(दीघनिकाय, १४–३–१)

संसारांत व विषयसेवनांत अखंड रंगलेल्या या लोकांना हा प्रतीत्यसमुत्पाद आकलन होणें महाकठीण आहे. हा जो प्रतीत्यसमुत्पाद आहे हा दुर्बोध असला तरी तो सर्व संस्कारांचें शमन करणारा, सर्व उपाधींचा नाश करणारा असून तसाच तो तृष्णाक्षय, विराग, निरोध, निर्वाण यांची प्राप्ति करून देणारा आहे.

(२०) किच्छेन मे अधिगतं हलं दानि पकासितुं रागदोसपरेतेहि नायं धम्मो सुसम्बुद्धो। पटिसोतगामिं निपुणं गंभीरं दुद्दसं अणुं रागरत्ता न दिक्खन्ति तमोखन्धेन आवटा'ति ॥

(दीघनिकाय, १४–३–२)

पुष्कळ कष्ट व हालअपेष्टा सोसून मी हा धर्म जोडला आहे. हा उपदेश अनाठायीं करणें हें कांही ठीक नाहीं. राग व द्वेष यांत मग्न झालेल्या देहतर्पणरत विषयमूढ जनतेला हा धर्म झटकन् समजण्यासारखा

नाहीं. उलट दिशेनें जाणारा, निपुण, गंभीर, दुर्ज्ञेय व सूक्ष्म असा हा धर्म विषयमग्न व अविद्याग्रस्त लोक जाणूं शकत नाहींत.

(२१) सव्वं अत्थी'ति खो कच्चायन अयमेको अन्तो। सव्वं नत्थी'ति अयं दुतियो अन्तो। एते ते कच्चायन उभो अन्ते अनुपगम्म मज्झेन तथागतं धम्मं देसे'ति ॥ (संयुत्त, १२-१५-७)

✓ हे कच्चायना! माझ्या धर्माची भूमिका ही अशी आहे. 'सर्व कांहीं आहे' हा एक अंत आणि 'सर्व कांहीं नाहीं' हा दुसरा अंत. हे दोन्ही अंत टाळून हा तथागत मधल्या मार्गानें आपल्या धर्माचा उपदेश करीत आहे.

(२२) तस्माति' ह मालुंक्यपुत्त अव्याकतञ्च मे अव्याकततो धारेथ, व्याकतञ्च मे व्याकततो धारेथ ॥

✓ अतएव! हे मालुंक्यपुत्रा! मी जें सांगितलें नाहीं, तें सांगण्यास योग्य नाहीं, असें समज. आणि जें सांगितलें आहे, तें सांगण्यास योग्य आहे समज.

(२२ अ) किञ्च मालुंक्यपुत्त मया अव्याकतं? 'सस्सतो लोको'ति मालुंक्यपुत्त मया अव्याकतं, असस्सतो लोको'ति ... पे० ..., अन्तवा लोको'ति ... पे० ..., अनन्त वा लोको'ति ... पे० ... 'तं जीवं तं सरीरं' ... पे० ..., 'अञ्ञं जीवं अञ्ञं सरीरं'ति ... पे० ..., 'होति तथागतो परम्मरणा' ति ... पे० ..., 'न होति तथागतो परम्मरणा'ति, ... पे० ..., 'होति च न च होति तथागतो परम्मरणा'ति, 'नेव होति न न होति तथागतो परम्मरणा'ति मया अव्याकतं ॥ (मज्झिमनिकाय, ६३-६)

✓ मालुंक्यपुत्रा! मी काय सांगितलें नाहीं? लोक शाश्वत का अशाश्वत, लोक अन्त का अनन्त, जीव व शरीर एक का निराळे,

मेल्यानंतर तथागत असतो का नसतो या व असल्या गोष्टी मी स्पष्ट करून सांगितल्या नाहींत. त्या फोड करून सांगितल्या नाहींत.

(२३) कस्मा चे' तं मालुंक्यपुत्त मया अव्यागतं ? नहे' तं मालुंक्यपुत्त अत्थसंहितं ना'दिब्रम्हचरियिकं, न निव्विदाय न विरागाय न निरोधाय न उपसमाय न अभिञ्ञाय न सम्बोधाय न निब्बाणाय संवत्तति, तस्मा तं मया अव्याकतं ॥ (-मज्झिमनिकाय, ६३–६)

✓ कशासाठीं मी हें असें केलें – याविषयीं मुग्ध कां राहिलों – असें तूं विचारशील, तर त्याला उत्तर हें कीं त्यांच्या कथनापासून तादृश लाभ नाहीं. तें ब्रह्मचर्य पाळण्यास उपयोगी पडत नाहीं. आणि त्या ज्ञानाचा वैराग्य, उपशम, लोकोत्तर ज्ञान, परमज्ञान, निर्वाणप्राप्ति यासाठीं कांहीच उपयोग नाहीं. म्हणून मी त्या गोष्टी स्पष्ट केल्या नाहींत. अर्थात् त्या अव्याकृतच–गुप्तच–ठेविल्या.

(२४) किञ्च मालुंक्यपुत्त मया व्याकतं ? 'इदं दुक्खं'ति मालुंक्यपुत्त मया व्याकतं, 'अयं दुक्खसमुदयो' ति ... पे० ..., अयं दुक्खनिरोधो' ति ... पे० ... अयं दुक्खनिरोधगामिनी पटिपदा' ति मया व्याकतं ॥ (मज्झिमनिकाय ६३–६)

✓ मग मी कोणत्या गोष्टी स्पष्ट केल्या आहेत–अर्थात् माझ्या धर्माचा विषय काय आहे–हें मी तुला आतां स्पष्ट करून सांगतो. माझ्या धर्माचा विषय म्हणजे येथें जगांत सगळें दुःख आहे, तें दुःख उत्पन्न होणारें आहे, तसेंच तें नाश पावणारेंहि आहे. आणि त्या दुःखाचा अंत करणारा हा असा मार्ग आहे. या गोष्टींचा मी माझ्या धर्मोपदेशाचा प्रत्यक्ष विषय केला आहे.

(२५) कस्मा चे'तं मालुंक्यपुत्त मया ब्याकतं ? एतं हि मालुंक्यपुत्त अत्थसंहितं, एतं आदिब्रम्हचारियिकं, एतं निब्बिदाय विरागाय निरोधाय उपसमाय अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति, तस्मा तं मया ब्याकतं ॥ (मज्झिमनिकाय, ६३-६)

✓ हें मी असें कां केलें असें तूं विचारशील तर त्याला उत्तर हें कीं असें करणें हिताचें--फायद्याचें आहे. ब्रह्मचर्य पाळावयास त्याचा उपयोग आहे. वैराग्य, उपशम, लोकोत्तर ज्ञान, परमज्ञान, संबोधि व निर्वाण प्राप्तीसाठीं तें उपयोगी आहे. म्हणून मी तें ज्ञान माझ्या उपदेशाचा मी विषय केला आहे.

(२५ अ) तस्माति'ह मालुंक्यपुत्त अब्याकतं च मे अब्याकततो धारेथ, ब्याकतञ्च मे ब्याकततो धारेथा'ति ॥

(मज्झिमनिकाय, ६३-६)

✓ म्हणून म्हणतो कीं मालुंक्यपुत्रा ! मी जें उपदेशिलें नाहीं —उघड करून सांगितलें नाहीं—तें निरर्थक व निरुपयोगी, म्हणून समज. आणि मी जें उपदेशिलें आहे--स्पष्ट करून सांगितलें आहे—तें सार्थक म्हणून समज.

(२५ ब) अथ खो भगवा रत्तिया पठमं यामं पटिच्च समुप्पादं अनुलोमपटिलोमं मनसा कासि । अविज्जापच्चया सङ्खारा । सङ्खारपच्चया विञ्ञाणं । विञ्ञाणपच्चया नामरूपं । नामरूपच्चया सळायतनं । सळायतनपच्चया फस्सो । फस्सपच्चया वेदना । वेदनापच्चया तण्हा । तण्हापच्चया उपादानं । उपादानपच्चया भवो । भवपच्चया जाति । जातिपच्चया जरामरणं सोकपरिदेवदुक्खदोमनस्सुपायासा सम्भवन्ति । एवमेतस्स केवलस्स दुक्खक्खन्धस्स समुदयो होति ॥

(मज्झिमनिकाय, महातण्हासुत्त. ३८)

✓ आतां या माझ्या आर्यधर्माची संगति कशी लावली आहे, तें मी तुला सांगतो ऐक. संबोधीच्या रात्रीं मी पहिल्या यामांत 'प्रतीत्य-समुत्पाद' या माझ्या धर्माच्या तत्त्वप्रणालीची उलटसुलट उपपत्ति व संगति मनांत योजिली ती अशी — मूळ अविद्या, त्या अविद्येपासून संस्कार, संस्कारापासून विज्ञान, विज्ञानापासून नामरूप, नामरूपापासून षडायतन, षडायतनापासून स्पर्श, स्पर्शापासून वेदना, वेदनेपासून तृष्णा, तृष्णेपासून उपादान, उपादानापासून भव, भवापासून जन्म, जन्मापासून जरा, मरण, शोक, आक्रोश, दुःख, मनस्ताप, चित्तप्रकोप हीं उत्पन्न होतात. याप्रमाणें या सर्व दुःखसमूहाचा उद्भव होतो. त्याला अनुलोम-प्रतीत्यसमुत्पाद असें म्हणतात.

( २५ क ) अविज्जायत्वेव असेसविरागनिरोधा सङ्खारनिरोधो। सङ्खारनिरोधा विञ्ञाणनिरोधो। विञ्ञाणनिरोधा नामरूपनिरोधो। नामरूपनिरोधा सळायतननिरोधो। सळायतननिरोधा फस्सनिरोधो। फस्सनिरोधा वेदनानिरोधो। वेदनानिरोधा तण्हानिरोधो। तण्हानिरोधा उपादाननिरोधो। उपादाननिरोधा भवनिरोधो। भवनिरोधा जातिनिरोधो। जातिनिरोधा जरामरणं सोकपरिदेवदुक्खदोमनस्सुपायासा निरुज्झन्ति। एवमेतस्स केवलस्स दुक्खखन्दस्स निरोधो होती' ति ॥ ( मज्झिमनिकाय, महातण्हासुत्त ३८ )

✓ ( या वरील विचारसरणींत दुःख कसें उत्पन्न होतें हें सांगितलें. आतां तें दुःख कसें टाळावें हें सांगतो ) मूळ अविद्येचाच वैराग्याच्या योगानें निःशेष निरोध केला म्हणजे संस्काराचा निरोध होतो. संस्काराचा निरोध झाला म्हणजे विज्ञानाचा निरोध होतो. विज्ञा-

नाचा निरोध झाला असतां नामरूपाचा निरोध होतो. नामरूपाच्या निरोधानें षडायतनाचा निरोध होतो. षडायतनाच्या निरोधानें स्पर्शाचा निरोध, स्पर्शनिरोधानें वेदनानिरोध, वेदनानिरोधानें तृष्णानिरोध, तृष्णानिरोधानें उपादाननिरोध, उपादाननिरोधानें भवनिरोध, भवनिरोधानें जन्मानिरोध, जन्मनिरोधानें जरा, मरण, शोक, रडणें, दुःख, मनस्ताप, चित्तप्रकोप, या सर्वांचा निरोध होतो. याप्रमाणें सर्वदुःखसमूहाचा निरोध — म्हणजे अंत — होतो. ( याला प्रतिलोमसमुत्पाद असें म्हणतात ).

( २६ ) पञ्च खो इमे उदायि कामगुणा। कतमे पञ्च? चक्खुविञ्ञेय्या रूपा इट्ठा कन्ता मनापा पियरूपा कामूपसंहिता रजनीया। सोतविञ्ञेय्या सद्दा, घानविञ्ञेय्या गन्धा, जिव्हाविञ्ञेय्या रसा, कायाविञ्ञेय्या फोट्ठब्बा इट्ठा कन्ता मनापा पियरूपा कामूपसंहिता रजनीया। इमे खो उदायि पञ्च कामगुणा ॥

( मज्झिमनिकाय, ६६-८ )

✓उदायि! हे पांच कामगुण आहेत, म्हणजे ज्ञानेंद्रियाचे भोग आहेत. कोणते पांच? चक्षुद्वारां ज्ञेय असें इष्ट, कांत, प्रिय व रंजनीय रूप. त्याचप्रमाणें श्रोत्रविज्ञेय शब्द, घ्राणविज्ञेय गंध, जिव्हाविज्ञेय रस, कायविज्ञेय स्पर्श. हे रूपगंधरसादि विषय इष्ट, कांत, प्रिय व रंजनीय असे आहेत. यांना पांच कामगुण असें म्हणतात.

( २७ ) यं खो उदायि इमे पञ्च कामगुणे पटिच्च उप्पज्जति सुखं सोमनस्सं इदं वुचति कामसुखं मीळ्हसुखं पुथुज्जनसुखं अनरियसुखं; न आसेवितब्बं न भावेतब्बं न बहुलीकातब्बं भायितब्बं एतस्स सुखस्साति, वदामि ॥ ( मज्झिमनिकाय ६६-८ )

✓ या पांच कामगुणापासून – विषयभोगापासून – जें सुख उत्पन्न होतें, तें क्षुद्र लोकांचें सुख, पृथग्जन म्हणजे अल्प व अज्ञजन सुख असून; तें अनार्यसुख आहे. अर्थात् तें सुख उपभोगण्यास योग्य नाहीं. व वाढविण्यासहि योग्य नाहीं. अर्थात् तें असेवनीय व अवर्धनीय आहे.

(२८) एवमे'व खो वासेट्ठ, पञ्चि'मे कामगुणा अरियस्स विनये अन्दू'ति पि वुच्चन्ति, बन्धनं'ति पि वुच्चन्ति ॥

(दीघनिकाय १३-२३)

✓ याप्रमाणें, हे वसिष्ठा ! हे पांच कामगुण बेडी म्हणविले जातात. बंधन म्हणविले जातात.

(२९) सेय्यथीदं :- चक्खुसम्फस्सजा वेदना सोतसम्फस्सजा वेदना, घानसम्फस्सजा वेदना, जिव्हासम्फस्सजा वेदना, कायसम्फस्सजा वेदना, मनोसम्फस्सजा वेदना ॥ (मज्झिमनिकाय, ९)

✓ (इंद्रियें व विषय यांच्या संपर्कापासून वेदना संभवते. अर्थात्) चक्षुसंस्पर्शज वेदना, श्रोत्रसंस्पर्शज वेदना, घ्राणसंस्पर्शज वेदना, जिव्हासंस्पर्शज वेदना, कायसंस्पर्शज वेदना, मनसंस्पर्शज वेदना. असे हे वेदनेचे पांच पर्याय आहेत.

(३०) तिस्सो खो इमा अग्गिवेसन वेदना–सुखा वेदना, दुक्खा वेदना, अदुक्खमसुखा वेदना ॥ (मज्झिमनिकाय, ७४-५.)

✓ आणि या वेदना हे अग्निवेसना ! तीन आहेत. (१) सुखवेदना, (२) दुःखवेदना आणि (३) असुख-अदुःखवेदना.

(३१) यस्मिं अग्गिवेसन सुखं वेदनं वेदेति ने'व तस्मिं समये दुक्खं वेदनं वेदेति, न अदुक्खमसुखं वेदनं वेदेति, सुखं येव तस्मिंसमये वेदनं वेदेति ॥ (म. नि. ७५-५)

ज्यावेळी, अग्निवेश्यना, मनुष्य सुखवेदनाचा अनुभव घेत असतो, त्यावेळीं तो दुःखवेदनाचा अनुभव करीत नाहीं. तसेंच अदुःख–असुख वेदनांचा अनुभवहि करीत नाहीं. त्यावेळीं तो फक्त सुखवेदनाचाच अनुभव घेत असतो.

(३२) सुखा पि अग्गिवेसन वेदना अनिश्चा सङ्खता पटिच्च-समुप्पन्ना खयधम्मा वयधम्मा विरागधम्मा निरोधधम्मा ॥

(मज्झिमनिकाय, ७४–५)

या ज्या सुखकर वेदना, त्या अनित्य आहेत, कृत आहेत. कारणा-मुळें उत्पन्न होणाऱ्या आहेत. शिवाय त्या क्षयधर्मी आहेत, नाशधर्मी आहेत, विरागधर्मी आहेत, निरोधधर्मी आहेत.

(३३) दुक्खा पि खो अग्गिवेसन वेदना अनिच्चा... पे०... निरोधधम्मा। अदुक्खमसुखं पि खो अग्गिवेसन वेदना अनिश्चा... पे०... निरोधधम्मा ॥ (मज्झिमनिकाय, ७४–५)

त्याचप्रमाणें दुःखवेदना देखील अनित्य आहेत, कृत आहेत, कारणामुळें उत्पन्न होणाऱ्या आहेत, शिवाय त्या क्षयधर्मी आहेत, नाशधर्मी आहेत, विरागधर्मी आहेत व निरोध–धर्मी आहेत. तशीच कथा असुख–अदुःखवेदनांची देखील आहे.

(३४) एवं पस्सं अग्गिवेसन सुतवा अरियसावको सुखाय पि वेदनाय निब्बिन्दति, दुक्खाय पि वेदनाय निब्बिन्दति अदुक्खमसुखाय पि वेदनाय निब्बिन्दति ॥ (मज्झिमनिकाय ७४-५)

हे अग्निवेश्या! असें समजून जो बहुश्रुत आर्य श्रावक आहे, तो सुखवेदनाविषयीं उदासीनता प्राप्त करून घेतो. दुःखवेदनाविषयींहि उदासीन राहतो. त्याचप्रमाणें अदुःख–असुख–वेदनाविषयींहि उदासीनच राहतो.

( ३५ ) निब्बिदं विरज्जति, विरागा वुमुच्चति, 'विमुत्तस्मिं विमुत्तं'ति ञाणं होति, खीणा जाति, वुसितं ब्रह्मचरियं, कतं करणीयं, ना'परं इत्थत्तायां'ति पजानाति । एवं विमुत्तचित्तो सो अग्गिवेस्सन भिक्खु न केनचि संवदति, न केनचि विवदति, यञ्च लोके वुत्तं तेन वोहरति अपरामसं'ति ॥ ( मज्झिमनिकाय, ७४-५ )

✓ या सुखदुःखादि वेदनांपासून निर्वेदास प्राप्त झाल्यावर मग तो त्यापासून विरक्त होतो. विरागास प्राप्त झाल्यावर विमुक्त होतो. विमुक्त झाल्यावर 'मी विमुक्त झालो' असें त्यास ज्ञान होतें. जन्ममरणाच्या संसारचक्रांतून सुटका झाली, ब्रह्मचर्य पूर्ण झालें, जें करायचें तें सर्व करून चुकलें, आतां कर्तव्य असें कांहीं राहिलें नाहीं, याचें त्यास ज्ञान होतें. अशाप्रकारचा विमुक्तचित्त भिक्षु कोणाबरोबर संवाद करीत नाहीं, संसारांत जें कांहीं कर्तव्य म्हणून सांगण्यांत आलें आहे, तें सर्व आग्रहरहित होऊन व्यवहरूं लागतो.

( ३६ ) कतमे च भिक्खवे सङ्खित्तेन पञ्चुपादानक्खन्धा दुक्खा ? सेय्यथीदं रूपूपादानक्खन्धो वेदनूपादानक्खन्धो सञ्ञूपादानक्खन्धो सङ्खारूपादानक्खन्धो विञ्ञाणूपादानक्खन्धो, इमे वुच्चन्ति भिक्खवे सङ्खित्तेन पञ्चुपादानक्खन्धा दुक्खा ॥ इदं वुच्चति भिक्खवे दुक्खं अरियसच्चं ॥ ( दीघनिकाय २२-१८ )

✓ भिक्षूहो, पंचुपादानस्कंध हे दुःखद आहेत. ते संक्षेपानें किती आहेत ? असें विचाराल तर ते हे आहेत. रूपूपादानस्कंध, वेदनूपादानस्कंध, संज्ञूपादानस्कंध, संस्कारूपादानस्कंध, विज्ञानूपादानस्कंध या

पांच उपादानस्कंधाला, भिक्षूहो, दुःख असें म्हणतात. यालाच दुःख आर्य सत्य असें नांव आहे.

( ३७ ) वेदनापच्चया तण्हा ॥ ( मज्झिमनिकाय १५-८ )

या वेदनेपासूनच तृष्णेची — सुखलालसेची — उत्पत्ति आहे.

( ३८ ) सेय्यथीदं:- रूपतण्हा, सद्दतण्हा, गन्धतण्हा, रसतण्हा फोट्ठब्बतण्हा, धम्मतण्हा ॥ ( मज्झिमनिकाय १५-७ )

✓ या तृष्णेचे हे असे प्रकार आहेत. रूपतृष्णा, शब्दतृष्णा, गन्धतृष्णा, रस-तृष्णा, स्पर्श-तृष्णा व धर्मतृष्णा.

( ३९ ) या'यं तण्हा पोनोभविका नन्दिरागसहगता तत्र तत्रा'भिनन्दिनी:- सेय्यथीदं- कामतण्हा, भवतण्हा, विभवतण्हा ॥

( दीघनिकाय २२-१९ )

✓ ही जी तृष्णा — विषयसुखलालसा — ती पुनः पुनः उद्भवणारी, विषयांचा छंद म्हणजे हव्यास धरणारी, विषयावर प्रेम करणारी व जेथें तेथें रममाण होणारी — आनंद पावणारी — अशी आहे. ती या स्वरूपाची आहे. ( १ ) कामतृष्णा, ( २ ) भवतृष्णा व ( ३ ) विभवतृष्णा.

( ४० ) सा खो पने'सा भिक्खवे तण्हा कत्थ उप्पज्जमाना उप्पज्जति, कत्थ निविसमाना निविसति ? यं लोके पियरूपं सातरूपं, एत्थे'सा तण्हा उप्पज्जमाना उप्पज्जति निविसमाना निविसति ॥

( दीघनिकाय २२-१९ )

अशी ही तृष्णा उत्पन्न झाल्यावर कोठें उत्पन्न होते आणि स्थिर झाल्यावर स्थिर होते म्हणाल, तर मनुष्याला जें प्रिय आहे, जें सात म्हणजे अनुकूल आहे, तेथेंच ही तृष्णा उत्पन्न झाल्यावर पुनः पुनः उत्पन्न होते व स्थित झाल्यावर तेथेंच स्थिर होते.

(४१) किञ्चि लोके पियरूपं सातरूपं? चक्खु लोके पियरूपं सातरूपं, एत्थे'सा तण्हा उप्पज्जमाना उप्पज्जति निविसमाना निविसति। सोतं लोके ...पे०...घानं लोके...पे०..., जिह्वा लोके...पे०...; कायो लोके...पे०..., मनो लोके पियरूपं सातरूपं, एत्थे'सा तह्वा ...; पे०...निवसति॥ (दीघनिकाय २२-१९)

संसारांत प्रियरूप, सातरूप असें काय आहे? चक्षु, श्रोत्र, घ्राण, जिव्हा, काया व मन हीं प्रियरूप आहेत व त्याच प्रमाणें रूप, शब्द, गंध, रस, स्पर्श व धर्म हीं प्रियरूप आहेत. येथेंच ती तृष्णा उत्पन्न होते व उत्पन्न झाली म्हणजे पुनः उत्पन्न होते. येथेंच स्थिर होते व स्थिर झाली म्हणजे तेथेंच घर करून राहते.

(४२) रूपा लोके पियरूपं, सातरूपं, सद्दा लोके पियरूपं सातरूपं, गन्धा लोके पियरूपं सातरूपं, रसा लोके पियरूपं सातरूपं, रसालोके पियरूपं, सातरूपं, फोट्ठब्बा लोके पियरूपं सातरूपं, धम्मा लोके पियरूपं सातरूपं, एत्थे'सा तह्वा उप्पज्जमाना उप्पज्जति निविसमाना निवसति॥ (दीघनिकाय २२-१९)

भिक्षूहो ही तृष्णा उत्पन्न झाली म्हणजे ती कोठें उत्पन्न होते व कोठें राहते? जें जें मनुष्याला प्रिय आहे, अनुकूल आहे, तेथें तेथें ही तृष्णा उत्पन्न होते व उत्पन्न झाल्यावर तेथेंच स्थिर होऊन राहते: जगांत लोकांना काय प्रिय आहे? व काय अनुकूल आहे? तर जगांत लोकांना रूप प्रिय आहे व अनुकूल आहे. त्याचप्रमाणे शब्द, गन्ध, रस, स्पर्श व धर्म हे प्रिय आहेत व अनुकूल आहेत. तेथेंच तृष्णाबीज धरून अंकुरते व तेथेंच राहते. भिक्षूहो! दुःखोत्पत्तीचें हें आर्यसत्य आहे.

( ४३ ) सा खो पने'सा भिक्खवे तह्वा कत्थ पहीयमाना पहीयति, कत्थ निरुज्झमाना निरुज्झति ? यं लोके पियरूपं सातरूपं, एत्थे'सा तह्वा पहीयमाना पहीयति निरुज्झमाना निरुज्झति ॥ इदं वुचति भिक्खवे दुक्खनिरोधं अरियसच्चं ॥ (दीघनिकाय २२-२०)

आणि भिक्षूंहो ! ही तृष्णा कोठें सोडली म्हणजे सोडून जाते व कोठें निरुद्ध होते ? जें मनुष्याला प्रिय व अनुकूल आहे, त्याचा त्याग केल्यास ती सोडून जाते व तेथें ती निरुद्ध केल्यास निरुद्ध होते.

( ४३ अ ) तण्हक्खयो सब्बदुक्खं जिनाति ॥ (धम्मपद ३५४)

तृष्णाक्षय हा सर्व दुःखाला जिंकून टाकतो.

( ४४ ) ( किञ्चि लोके दुक्खं ? ) यदनिच्चं तं दुक्खं, यं दुक्खं तदनत्ता, यदनत्ता तं ने'तं मम, ने'तो हम'स्मि न मे'सो अत्ता'ति। एवमेतं यथाभूतं सम्मपञ्ञाय दट्ठब्बं ॥ (खंदसंयुत्त, वग्ग २, सुत्त ४).

भिक्षूंहो ! जगांत दुःख काय आहे ? जें अनित्य आहे तें सर्व दुःखच होय. जें दुःख आहे, तें अनात्म आहे, जें अनात्म आहे, तें माझें नव्हे. तें मी नव्हे, आणि तें माझा आत्मा नव्हे.

-( ४५ ) ( किञ्चि लोके अनिच्चं ? ) रूपं भिक्खवे अनिच्चं वेदना अनिच्चा ... सञ्ञा अनिच्चा ... संखारा अनिच्चा ... विञ्ञाणं अनिच्चं ॥ (खंदसंयुत्त, वग्ग २, सुत्त ४)

जगांत अनित्य काय आहे ? भिक्षूंहो, रूप अनित्य आहे, वेदना अनित्य आहे, संज्ञा अनित्य आहे, संस्कार अनित्य आहेत आणि विज्ञान अनित्य आहे.

( ४६ ) अनिच्चा खो आनंद सङ्खारा, एवं अद्धुवा खो आनन्द सङ्खारा, एवं अनस्सासिका खो आनन्द सङ्खारा, यावञ्चि दं आनन्द अलमेव सब्बसङ्खारेसु निब्बिन्दितुं, अलं विरज्जितुं, अलं विमुच्चितुं ॥
( दीघनिकाय, १७-१६ ).

आनंदा ! तुला खरंखरं सांगतो कीं, संस्कार हे अनित्य आहेत. जसे *अनित्य* तसेच *अध्रुव* आहेत. आणि तसेच ते *अविश्वसनीय* आहेत. म्हणून आनंदा ! संस्काराची इच्छा व्यर्थ आहे. त्यांत आनंद मानणें व्यर्थ आहे त्यांत आसक्त होणें व्यर्थ आहे.

( ४७ ) यं किञ्चि समुदयधम्मं सब्बं तं निरोधधम्मं'ति ॥
( मज्झिमनिकाय ७४-६ ).

हें सर्व थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे जें जें उत्पन्न होणारें आहे, तें तें सर्व नाश पावणारें आहे.

( ४८ ) ' एवं पस्सं भिक्खवे सुतवा अरियसावको रूपास्मिं निब्बिन्दति, वेदनाय...पे०..., सञ्ञाय ... पे० ..., संखारेसु ... पे०..., विञ्ञाणस्मिं निब्बिन्दति, निब्बिन्दं विरज्जति, विरागा विमुच्चति, विमुत्तस्मिं विमुत्तमि'ति ञाणं होति, खीणा जाति, वुसितं ब्रह्मचरियं, कतं करणीयं, नापरं इत्थत्तायाऽति पजानाति ॥

विमुक्त झाल्यावर ' मी विमुक्त झालों ' हें ज्ञान त्यास प्राप्त होतें. तें ज्ञान झालें म्हणजे माझा जन्म क्षय पावला, ब्रह्मचर्यवास पुरा झाला, करायचें तें करून टाकलें, आतां करणेचें शिल्लक राहिलें नाहीं, ही त्यास जाणीव येते.

( ४९ ) इमे खो वच्छ तयो धम्मा अकुसला, तयो धम्मा कुसला। लोभो खो वच्छ अकुसलं, अलोभो कुसलं। दोसो खो वच्छ अकुसलं, अदोसो कुसलं ! मोहो खो वच्छ अकुसलं, अमोहो कुसलं ॥

( मज्झिमनिकाय ७३-२ )

( आतां कुशल व अकुशल धर्म कोणते तें सांगतो वच्छा ऐक. ) हे तीन, वच्छा ! अकुशल धर्म आहेत आणि तीन कुशल धर्म आहेत. लोभ हा अकुशल आहे, अलोभ हा कुशल आहे. द्वेष हा अकुशल आहे, अद्वेष हा कुशल आहे. मोह हा अकुशल आहे आणि अमोह हा कुशल आहे.

( ५० ) पाणातिपातो खो वच्छ अकुसलं, पाणातिपाता वेरमणि कुसलं। अदिन्नादानं खो वच्छ अकुसलं, अदिन्नादाना वेरमणी कुसलं। कामेसु मिच्छाचारो खो वच्छ अकुसलं, कामेसु मिच्छाचारा वेरमणी कुसलं। मुसावादो खो वच्छ अकुसलं, मुसावादा वेरमणी कुसलं। पिसुणा वाचा खो वच्छ अकुसलं, पिसुणाय वाचाय वेरमणी कुसलं। फरुसा वाचा खो वच्छ अकुसलं, फरुसाय वाचाय वेरमणी कुसलं। सम्फप्पलापो खो वच्छ अकुसलं, सम्फप्पलापा वेरमणी कुसलं। अभिज्झा खो वच्छ अकुसलं, अनभिज्झा कुसलं। व्यापादो खो वच्छ अकुसलं, अव्यापादो कुसलं। मिच्छादिट्ठि खो वच्छ अकुसलं, सम्मादिट्ठि कुसलं। इति खो वच्छ दसधम्मा अकुसला, दस - धम्मा कुसला ॥

( मज्झिमनिकाय ७३-२ )

प्राणिहिंसा ही अकुशल म्हणजे पाप आहे. हिंसेपासून विरति म्हणजे निवृत्त होणें हें कुशल म्हणजे पुण्य आहे. चोरी करणें हें अकुशल आहे. चोरीपासून निवृत्त होणें हें कुशल आहे. व्यभिचार हा अकुशल आहे. व्यभिचारापासून निवृत्ति हें कुशल आहे. खोटें बोलणें हें अकुशल म्हणजे पाप आहे. खोटें बोलण्यापासून निवृत्त होणें हें कुशल म्हणजे पुण्य आहे. चुगली करणें हें पाप आहे. चुगलीपासून निवृत्त होणें हें पुण्य आहे. कठोर भाषण हें अकुशल आहे. कठोर भाषणापासून निवृत्ति हें कुशल आहे. व्यर्थ बडबड करणें हें अकुशल आणि बडबड करण्यापासून निवृत्ति हें कुशल. लोभ हें पाप व अलोभ हें पुण्य. पीडा देणें हें पाप व पीडा न देणें हे पुण्य. मिथ्यादृष्टि हें अकुशल, सम्यग्दृष्टि हें कुशल. याप्रमाणें दहा अकुशल व दहा कुशल धर्म आहेत.

( ५१ ) कथञ्च कस्सप, भिक्खु सीलसम्पन्नो होति ? इध कस्सप, भिक्खु पाणातिपातं पहाय पाणा' तिपाता पटिविरतो होति, निहित-दण्डो, निहित-सत्थो लज्जी दया'पन्नो सब्बपाणभूतहिता'नुकम्पी विहरति । इदं पि'स्स होति सीलसम्पदाय ॥ (दीघनिकाय ८–२२)

कश्यपा ! भिक्षु हा शीलसंपन्न कसा होतो ? हिंसेला सोडून जेव्हां तो हिंसेपासून अलिप्त राहतो, दंड व शस्त्र फेकून देतो, संकोची होतो, दयाळु होतो, सर्व प्राणिमात्राशी प्रेमानें वागतो, तेव्हां तो शीलसंपन्न होतो. ही त्याची शीलसंपत्ति होय.

(५२) स खो सो कस्सप भिक्खु एवं सील-सम्पन्नो न कुतोचि भयं समनुपस्सति । सो इमिना अरियेन सील-क्खन्धेन समन्नागतो अज्झत्तं अनवज्जसुखं परिसंवेदेति । एवं खो कस्सप, भिक्खु सील-सम्पन्नो होति । अयं खो सा कस्सप सीलसम्पदा ॥ (दीघनिकाय ८–२४)

याप्रमाणें भिक्षु शीलसंपन्न होत्साता, त्याला मग कोठूनंहि कसलेंहि भय दिसत नाहीं. तो या आर्यशील स्कंधानें युक्त होत्साता, आपल्यांतच निर्दोष अशा सुखाचा अनुभव घेत राहतो. कश्यपा! ही शीलसंपत्ति होय.

(५३) पुन च परं गहपतयो सीलवा सील सम्पन्नो कायस्स भेदापरं मरणा सुगतिं सग्गं लोकं उप्पज्जति। अयं पञ्चमो आनिसंसो सीलवतो सीलसम्पदाय॥ (दीघनिकाय १६-२४)

गृहपतिनो! जो सुशील म्हणजे सदाचारी आहे, त्याच्या सदाचाराचा परिणाम असा आहे कीं, तो देह सोडून गेला म्हणजे सुगतीप्रत म्हणजे स्वर्गलोकाप्रत जातो. हा सुशीलाचा पांचवा सुपरिणाम होय.

(५४) पुन च परं गहपतयो दुस्सीलो सीलविपन्नो कायस्स भेदा परं मरणा अपायं दुग्गतिं विनिपातं निरयं उप्पज्जति। अयं पञ्चमो आदीनवो दुस्सीलस्स सीलविपत्तिया॥ (दीघनिकाय १६-२३)

गृहपतिनो! जो दुःशील म्हणजे दुराचरणी आहे, तो देह सोडून गेल्यावर दुर्गतीला म्हणजे नरकाप्रत जातो. हा दुःशीलाचा पांचवा दुष्परिणाम होय.

(५५) सील-परिधोता हि ब्राह्मण, पञ्ञा, पञ्ञा-परिधोतं सीलं। यत्थ सीलं तत्थ पञ्ञा, यत्थ पञ्ञा तत्थ सीलं। सीलवतो पञ्ञा, पञ्ञवतो सीलं॥ (दीघनिकाय ४-२१)

शील-प्रक्षालित प्रज्ञा आहे आणि प्रज्ञा-प्रक्षालित शील आहे. जेथें शील आहे, तेथें प्रज्ञा आहे आणि जेथें प्रज्ञा आहे, तेथें शील आहे. शीलवानाला प्रज्ञा लाभते आणि प्रज्ञावानाला शील लाभतें.

(५६) सीलपरिभावितो समाधि महप्फलो होति महानिसंसो, समाधिपरिभाविता पञ्ञा महप्फला होतिं महानिसंसा, पञ्ञापरिभावितं चित्तं सम्मदेव आसवेहि विमुचति, सेय्यथी'दं कामासवा, भवासवा, दिट्ठासवा, अविज्जासवा'ति ॥ (दीघनिकाय १६–१–१२)

शीलानें परिभावित समाधि मोठी फलदायक होते. शीलानें परिभावित समाधि मोठी आनृशंस्य (शांतिकारक) होते. त्याचप्रमाणें समाधीनें परिभावित प्रज्ञा अत्यंत फलकारी असून, त्या प्रज्ञेनें परिभावित चित्त सर्व आस्रवांपासून--चित्तमलापासून--विमुक्त होतें.

(५७) या काचि'मा दुग्गतियो अस्मिं लोके परह्मि च ।
अविज्जामूलका सब्बा इच्छालोभसमुस्सया ॥
(इति-उत्तक विद्यासुत्त २-२-३)

या लोकीं व परलोकीं ज्या कांहीं दुर्गति म्हणून आहेत, त्या सर्व अविद्यामूलक असून, इच्छा व लोभ यांनी समन्वित आहेत.

(५८) मला वे पापका धम्मा अस्मिं लोके परह्मि च ॥
ततो मला मलतरं अविज्जा परमं मलं ।
एतं मलं पहत्वान निम्मला होथ भिक्खवो ॥
(धम्मपद, १८-८,९)

या लोकीं व परलोकी पापप्रवृत्ति ही सर्व अनिष्टाचें मूळ आहे. पण सर्व मळांत अत्यंत वाईट मळ म्हणजे अविद्यामळ होय. म्हणून भिक्षूहो ! हा अविद्यामळ चट सारा झाडून टाका आणि धुतलेल्या तांदुळाप्रमाणें निर्मळ व्हा !

(५९) धम्मारामो धम्मरतो धम्मं अनुविचिन्तयं ।
धम्मं अनुस्सरं भिक्खू सद्धम्मा न परिहायति ॥
(धम्मपद, २५-५)

जो भिक्षु धर्मांत आनंद मानतो, जो धर्माचरणांत रममाण होतो व जो धर्मविषयाचें अनुचिंतन करतो व जो धर्माप्रमाणे वागतो, तो सद्धर्मापासून चळत नाहीं

(६०) मेत्ताविहारी यो भिक्खू पसन्नो बुद्धसासने ।
अधिगच्छे पदं सन्तं सङ्खारूपसमं सुखं ॥
(धम्मपद, २५-९)

जो भिक्षु मैत्री-भावनेंत विहार करतो व जो बुद्धधर्मावर श्रद्धा ठेवितो, तो सर्व संस्कारांचें उपशमन करणाऱ्या अशा शांत व सुखमय स्थाना-प्रत जातो.

(६१) सन्तकायो सन्तवाचो सन्तवा सुसमाहितो ।
वन्तलोकामिसो भिक्खू उपसन्तो'ति वुचति ॥
(धम्मपद २५-१९)

जो कायावाचामनें शांत झाला आहे, ज्याचें चित्त सुसमाहित झालें आहे, व ज्यानें जागतिक विषयानंदाचें वमन केलें आहे, असा भिक्षु उपसंत म्हटला जातो.

(६२) असङ्खतञ्च वो भिक्खवे देसिस्सामि...सच्चञ्च...पारञ्च ...सुदुद्दसञ्च...अजरञ्च...धुवञ्च...निप्पपञ्च...अमतञ्च...सिवञ्च ...खेमञ्च...अब्भुतञ्च...अनीतिकञ्च...अब्यापज्झञ्च...विसुद्धिञ्च... दीपञ्च...ताणञ्च वो भिक्खवे देसिस्सामि ॥
(सं ४-३६० ते ३७२; वि. मग्ग ८-२४८)

भिक्षूहो ! निर्वाणाचें लक्षण सांगतो, तें ऐका ! हें माझें निर्वाण अजात म्हणजे स्वयंभू आहे ! तें सत्यस्वरूप आहे ! तें जगाच्या पलीकडे आहे ! तें अचिंत्य आहे ! तें जरारहित आहेत ! तें अढळ आहे ! तें प्रपंचरहित आहे ! तें जन्ममरणरहित आहे ! तें सुखस्वरूप आहे ! तें अखंड शांतिमय आहे ! तें हिंसाशून्य आहे ! तें विशुद्ध आहे ! तें प्रकाशमय आहे ! आणि तें सर्वाधार आहे !! भिक्षूहो ! हें माझें निर्वाण असें आहे !!!

( ६३ ) निब्बाणं परमं सुखम् ॥ ( धम्मपद १५–८ )

सर्व सुखांत निर्वाण हें अत्यंत श्रेष्ठ सुख आहे.

( ६४ ) 'नत्थि सन्तिपरं सुखं' ॥ ( धम्मपद १५–६ )

शांतिसारखें सुख नाहीं

( ६५ ) कतमे च ते भिक्खवे धम्मा मया अभिञ्ञाय देसिता ? सेय्यथी'दं चत्तारो सतिपट्ठाना, चत्तारो सम्मप्पधाना, चत्तारो इद्धिपादा, पञ्चि'न्द्रियानि, पञ्च बलानि, सत्त बोज्झङ्गा अरियो अट्ठङ्गिकमग्गो ॥ ( दीघनिकाय १६–३–५ ).

भिक्षूहो ! कोणते धर्म मी स्वतः जाणून, शिकून, व भावना करून, तुम्हांस उपदेशिले आहेत असे विचाराल तर ते हे :— ( १ ) चार स्मृतिप्रस्थानें, ( २ ) चार सम्यक् प्रधानें, ( ३ ) चार ऋद्धिपाद, ( ४ ) पांच इंद्रियें, ( ५ ) पांच बलें, ( ६ ) सात संबोध्येगें, व ( ७ ) अष्टांगिकमार्ग.

( ६६ ) चतुन्नं भिक्खवे धम्मानं अननुबोधा अप्पटिवेधा एवमि'दं दीघमद्धानं सन्धावितं संसरितं ममञ्चे'व तुम्हाकञ्च ॥

( दीघनिकाय, १६–४–२ ).

भिक्षूहो! चार आर्यसत्याचें यथार्थ ज्ञान न झाल्यामुळें दीर्घकालपर्यंत म्हणजे या वेळपर्यंत आम्हांला व तुम्हांना दोघांनाहि येथें संसारांत पुनः पुनः येणें जाणें भाग पडलें. पण आतां, भिक्षूहो! दुःख वगैरे चार आर्यसत्याचें ज्ञान झालें अतएव भवतृष्णा उच्छिन्न झाली आणि तृष्णेचा सर्वस्वी नाश झाला.

(६७) तयिदं भिक्खवे अरियं सीलं अनुबुद्धं पटिविद्धं अरियो समाधि अनुबुद्धो पटिविद्धो, अरिया पञ्ञा अनुबुद्धा पटिविद्धा, अरिया विमुत्ति अनुबुद्धा पटिविद्धा, उच्छिन्ना भवतण्हा, खीणा भवनेत्ति, न'त्थि दानि पुनब्भवो ॥' (दीघनिकाय, १६-४-२)

पण आतां, भिक्षूहो! मी हें आर्यशील जाणलें आहे. तशीच आर्यसमाधीहि साधली आहे. आर्यप्रज्ञेचें ज्ञान करून घेतलें आहे. आणि आर्यविमुक्तीचा अनुभवहि घेतला आहे. सबब माझी भवतृष्णा, पूर्णपणें उच्छिन्न झाली असून संसारपाश गळून पडला आहे! आतां यापुढें मला पुनर्जन्म नाहीं! अर्थात् मी संसारमुक्त–दुःखमुक्त–झालों आहे!!

(६८) अप्पमत्ता सतीमन्तो सुसीला होथ भिक्खवो।
सुसमाहित – संकप्पा सचित्तम'नुक्खथ॥
यो इमस्मिं धम्मविनये अप्पमत्तो विहेस्सति।
पहाय जातिसंसारं दुक्खस्सन्तं करिस्सती'ति ॥'
(दीघनिकाय १६-३-५१)

भिक्षूहो! तुम्ही निरालस व्हा! सावधान व्हा! सुशील व्हा! संकल्पाचें उत्तम प्रकारें समाधान करून, चित्ताचें चांगलें रक्षण करा! जो या माझ्या धर्मविनयांत आळस सगळा झाडून देऊन, सतत

उद्योग करीत राहील, तो जन्ममृत्यूचा फेरा चुकवून, सर्व संसारदुःखातून खात्रीनें मुक्त होईल!!

( ७० ) इमे च खो भिक्खवे धम्मा मया अभिञ्ञाय देसिता, ते वो साधुकं उग्गहेत्वा आसेवितब्बा भावेतब्बा बहुलीकातब्बा यथयिदं ब्रम्हचरियं अद्धनियं अस्स चिरट्ठितिकं, तदस्स बहुजनहिताय बहुजनसुखाय लोकानुकम्पाय अत्थाय हिताय सुखाय देवमनुस्सानं'ति ॥ ( दीघनिकाय १६–३–५० )

आतां, भिक्षूहो! तुम्हांस शेवटीं सांगावयाचें इतकेंच कीं मी जो धर्म तुम्हांस उपदेशिला आहे, तो तुम्हीं उत्तम प्रकारें ग्रहण करून, त्याप्रमाणें आचरण करावें. त्याची भावना करावी. आणि त्याचें संवर्धन करावें, कीं ज्यांत हें ब्रह्मचर्य चिरस्थायी होईल. आणि हें ब्रह्मचर्य–हें सदाचरण–बहुजनहितार्थ, बहुजनसुखार्थ, लोकानुकंपार्थ, तसेंच देव व मानव यांच्या अर्थ – हित – सुखास कारणीभूत होईल असें करावें.

( ७१ ) सेयत्थापि भिक्खवे उप्पलं वा पदुमं वा पुण्डरीकं वा उदके जातं, उदके संवद्धं, उदकं अच्चुग्गम्म थाति अनुपलित्तं उदकेन, एवं एव खो ब्राम्हण ॥ ( अंगुत्तरनिकाय, २–४–३७ )

भिक्षूहो! उत्पल, पद्म अगर पुंडरीक हें उदकांतच जन्मतें व उदकांतच वाढतें. आणि वाढून पुढें उदकांतून वर आल्यावर तें जसें त्या उदकापासून अलिप्त राहतें.

( ७२ ) लोके जातो लोके संवद्धो लोकं अभिभुय्य ( विहरामि ) अनुप्पलित्तो लोकेन, बुद्धोति *मं ब्राह्मण धारेही'ति* ॥ '

( अंगुत्तरनिकाय, २–४–३७ )

तद्वत् मीहि या जगांतच जन्मलों आणि जगांतच वाढलों. पण आतां त्या जगांतून वर निघालों असून, त्यापासून पूर्ण अलिप्त राहून मी विहार करीत आहे. म्हणून ब्राह्मणा ! मला बुद्ध असें समज !

( ७३ ) पुण्डरीकं यथा वग्गु तोये न उपलिप्पति ।
न उपलिप्पामि लोकेन तस्मा बुद्धो'स्मि ब्राह्मण ॥

( अंगुत्तरनिकाय, २-४-३७ )

चांगलें व सुंदर कमळ हें पाण्यानें दूषित होत नाहीं. तद्वत् मीहि जगापासून अलिप्त असल्यानें ब्राह्मणा ! मी बुद्ध झालों आहे !!

## दस सिक्खापद

(७५) १ पाणातिपाता वेरमणी-सिक्खापदं समादियामि ॥
प्राणघातापासून निवृत्ति हें शिक्षापद मी उत्तमरीतीनें ग्रहण करतो.

२ अदिन्नादाना वेरमणी-सिक्खापदं समादियामि ॥
न दिलेले घेण्यापासून निवृत्ति म्हणजे चौर्यापासून निवृत्ति हें शिक्षापद मी उत्तमरीतीनें ग्रहण करतो.

३ अब्रम्हचरिया वेरमणी-सिक्खापदं समादियामि ॥
व्यभिचारापासून निवृत्ति हें शिक्षापद मी उत्तमरीतीनें ग्रहण करतो.

४ मुसावादा वेरमणी सिक्खापदं समादियामि ॥
खोटें बोलण्यापासून निवृत्ति हें शिक्षापद मी उत्तमरीतीनें ग्रहण करतो.

५ सुरा – मेरय – मज्जपमादट्ठाना वेरमणी – सिक्खापदं समादियामि ॥
दारू वगैरे मादक पदार्थापासून निवृत्ति हें शिक्षापद मी उत्तमरीतीनें ग्रहण करतो.

६ विकालभोजना वेरमणी-सिक्खापदं समादियामि ॥
अवेळीं भोजन पान करण्यापासून निवृत्ति हें शिक्षापद मी अंगिकारतो.

७ नच्च–गीत–वादित–विसूकदस्सना वेरमणी–सिक्खापदं समादियामि ॥
नाच, गाणें, वाजविणें, नाटक, तमाशा, बाहुल्यांचा खेळ इत्यादि पाहण्यापासून निवृत्ति हें शिक्षापद मी अंगीकृत करतो.

८ माला–गन्ध–विलेपन–धारणमण्डन–विभूसनट्ठाना
वेरमणी–सिक्खापदं समादियामि ।

पुष्पमाला, सुगंधी द्रव्यें, उटणीं इत्यादिकांच्या उपभोगांपासून निवृत्ति, हें शिक्षापद मी अंगीकृत करतो.

९ उच्चासयन–महासयना वेरमणी– सिक्खापदं समादियामि ।

पलंगादि उच्च शयनासनें किंवा सजविलेल्या शय्या यांपासून निवृत्ति, हें शिक्षापद मी ग्रहण करतो.

१० जातरूप – रजतपटिग्गहणा वेरमणी – सिक्खापदं समादियामि । ( २ दससिक्खापद )

सोनें, रुपें इत्यादि परिग्रहापासून निवृत्ति, हें शिक्षापद मी ग्रहण करतो.

## मंगल सुत्त

( ७६ ) बहू देवा मनुस्सा च मङ्गलानि अचिन्तयुं ।
आकङ्खमाना सोत्थानं ब्रूहि मङ्गलमुत्तमं ॥ १ ॥
( मंगलसुत्त ५-१ )

( एक देवता बुद्धाजवळ येऊन म्हणाली )- ' हे भगवान् ! पुष्कळ देव व मनुष्यें यांनी आपणास सुख व्हावें या हेतूनें मंगलाची कल्पना केली. त्यांत उत्तमांतील उत्तम मंगल कोणतें हें मला सांगा.

( ७७ ) असेवना च बालानं पण्डितानञ्च सेवना ।
पूजा च पूजनेय्यानं एतं मङ्गलमुत्तमं ॥ २ ॥
( मंगलसुत्त ५–२ )

(तेव्हां भगवान म्हणाले) मूर्ख लोकांच्या सहवासापासून अलिप्त राहणें, तसेंच पंडितांची संगति करणें आणि मान्यांची पूजा करणें, हें उत्तम मंगल होय.

(७८) पतिरूपदेसवासो च पुब्बे च कतपुञ्ञता ।
अत्तसम्मापणिधि च, एतं मङ्गलमु'त्तमं ॥ ३ ॥
(मंगलसुत्त ५-३)

योग्य देशांत वास्तव्य करणें, पदरीं पुण्याचा सांठा असणें, व सन्मार्गांत मन मग्न करणें, हें उत्तम मंगल होय.

(७९) बाहुसच्चञ्च सिप्पञ्च विनयो च सुसिक्खितो ।
सुभासिता च या वाचा, एतं मङ्गलमु'त्तमं ॥ ४ ॥
(मंगलसुत्त ५-४)

बहुश्रुतपणा, कलाकौशल्य, अभ्यासपूर्वक इंद्रियनिग्रह, व गोड भाषण हें उत्तम मंगल होय.

(८०) मातापितुउपट्ठानं पुत्तदारस्स सङ्गहो ।
अनाकुला च कम्मन्ता, एतं मङ्गलमु'त्तमं ॥ ५ ॥
(मंगलसुत्त ५-५)

आईबापांची सेवा करणें, बायकामुलांचा संभाळ करणें, मनास बेचैन करणारें असें कर्म न करणें हें उत्तम मंगल होय.

(८१) दानं च धम्मचरिया च ञातकानञ्च सङ्गहो ।
अनवज्जानि कम्मानि, एतं मङ्गलमु'त्तमं ॥ ६ ॥
(मंगलसुत्त ५-६)

दानधर्म, पुण्याचरण, जातिबांधवांचा परामर्श, अनिंद्य कर्मानुष्ठान हें उत्तम मंगल होय.

(८२) आरति विरती पापा मज्जपाना च संयमो।
अप्पमादो च धम्मेसु, एतं मङ्गलमुत्तमं ॥ ७ ॥
(मंगलसुत्त ५-७)

दुर्वर्तनाविषयीं वैराग्य, पापाचरणापासून निवृत्ति, मद्यपानाविषयीं संयम, धर्माचरणांत तत्परता हें उत्तम मंगल होय.

(८३) गारवो च निवातो च सन्तुट्ठी च कतञ्ञुता।
कालेन धम्मसवनं, एतं मङ्गलमुत्तमं ॥ ८ ॥
(मंगलसुत्त ५-८)

पूज्यभाव, एकांतता, संतोषवृत्ति, कृतज्ञता व वारंवार धर्मश्रवण हें उत्तम मंगल होय.

(८४) खन्ती च सोवचस्सता समणानाञ्च दस्सनं।
कालेन धम्मसाकच्छा, एतं मङ्गलमुत्तमं ॥ ९ ॥
(मंगलसुत्त ५-९)

क्षमा, मृदु भाषण, श्रमणांचें दर्शन, व वारंवार धर्मचिकित्सा हें उत्तम मंगल होय.

तपो च ब्रम्हचरियञ्च अरियसच्चान दस्सनं। निब्बाण-
सच्छिकिरिया च, एतं मङ्गलमुत्तमं ॥ १० ॥
(मंगलसुत्त, ५-१०)

तपश्चर्या, इंद्रियनिग्रह, आर्यसत्याचें यथार्थ ज्ञान व निर्वाण-साक्षात्कार हें उत्तम मंगल होय.

(८५) फुट्ठस्स लोकधम्मेहि चित्तं यस्स न कम्पति।
असोकं विरजं खेमं, एतं मङ्गलमुत्तमं ॥ ११ ॥
(मंगलसुत्त ५-११)

लौकिक व्यवहारांत असतांना इष्टानिष्ट गोष्टी प्राप्त झाल्या असतां चित्तवृत्ति ढळूं न देणें, शोकरहित, विकाररहित, व क्षेमयुक्त असणें हें उत्तम मंगल होय.

( ८६ ) एतादिसानि कत्वान सब्बत्थम'पराजिता ।
सब्बत्थ सोत्थिं गच्छन्ति, तं तेसं मङ्गलमु'त्तमं ॥ १२ ॥
( मंगलसुत्त, ५–१२ )

उपरोक्त गोष्टींचें आचरण करून सर्वत्र विजयी होणारे असे जे आहेत, त्या देवमनुष्यांचें सर्वत्र कल्याणच घडून येतें. आणि हेंच त्यांचें उत्तम मंगल होय.

## रतनसुत्त ६

( ८७ ) यानी'ध भूतानि समा'गतानि
भुम्मानि वा यानि च अन्तलिक्खे ।
सब्बेव भूता सुमना भवन्तु
अथो'पि सक्कच्च सुणन्तु भासितं ॥ १ ॥
( रतनसुत्त ६–१ )

या पृथ्वीवरील आणि अंतरिक्षांतील जे प्राणिमात्र या ठिकाणी जमले आहेत त्या सर्वांचीं अंतःकरणें सुप्रसन्न होवोत ! आणि मी आतां जें सांगत आहे तें लक्ष्यपूर्वक ते श्रवण करोत !

( ८८ ) तस्मा हि भूता निसामेथ सब्बे
मेत्तं करोथ मानुसिया पजाय ।
दिवा च रत्तो च हरन्ति ये बलिं
तस्मा हि ने रक्खथ अप्पमत्ता ॥ २ ॥
( रतनसुत्त ६–२ )

अतएव हे सर्व प्राणिमात्रांनो ! ऐका ! मनुष्यजातीवर तुमचें सदा प्रेम असो ! ज्याअर्थी तुम्हांस दिवसां व रात्रीं अन्नसंतपर्ण करण्यात येतें, त्याअर्थी तुम्ही या मानवी प्रजेचें दक्षतेनें रक्षण करा.

( ८९ ) यं किञ्चि वित्तं इध वा हुरं वा
सग्गेसु वा यं रतनं पणीतं ।
न नो समं अत्थि तथागतेन, –
इदम्पि बुद्धे रतनं पणीतं
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ ३ ॥

( रतनसुत्त ६–३ )

पृथ्वीवर व स्वर्गावर जें काही वित्त आहे किंवा स्वर्गांत जें उत्तम रत्नभांडार आहे, त्या सर्वांची तथागताशीं बरोबरी होऊं शकणार नाहीं. हें बुद्धरूप रत्न सर्वांत श्रेष्ठ आहे. या सत्यवचनानें आपलें सर्वांचें कल्याण होवो.

( ९० ) खयं विरागं अमतं पणीतं
यद'ज्झगा सक्यमुनी समाहितो ।
न तेन धम्मेन सम'त्थि किञ्चि –
इदम्पि धम्मे रतनं पणीतं
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ ४ ॥ ( रतनसुत्त ६–४ )

समाधियुक्त चित्तानें शाक्यमुनीनें तृष्णाक्षयरूप व विरागमय अशा प्रकारचा जो अमृततुल्य धर्म प्राप्त करून घेतला, त्याची बरोबरी करणारा असा दुसरा धर्म नाहीं. हें धर्मरूप श्रेष्ठ रत्न आहे या सत्यभाषणानें तुमचें मंगळ होवो !

(९०-अ) ये पुग्गला अट्ठ सतं पसत्था
चत्तारि एतानि युगानि होन्ति ।
ते दक्खिणेय्या सुगतस्स सावका
एतेसु दिन्नानि महप्फलानि, –
इदम्पि सङ्घे रतनं पणीतं
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ ६ ॥

( रतनसुत्त ६–६ )

सज्जनांनी ज्या आठप्रकारच्या स्रोतापन्नादि सत्पुरुषाची प्रशंसा केली आहे व ज्यांचीं चार युग्में ( जोड्या ) होतात, असे ते बुद्धाचे श्रावक दिलेल्या दानाचा स्वीकार करण्यास अत्यंत योग्य आहेत., त्याना अर्पण केलेलीं दानें प्रकर्षानें फलद्रूप होतात. या सत्यवचनानें आपलें मंगल असो !

( ९१ ) सहा व'स्स दस्सनसम्पदाय
तय'स्सु धम्मा जहिता भवन्ति ।
सक्कायदिट्ठि विचिकिच्छितञ्च
सीलब्बतं वा'पि यद'त्थि किञ्चि ।
चतूह'पायेहि च विप्पमुत्तो
छचा'भिट्ठानानि अभब्बो कातुं,–
इदम्पि सङ्घे रतनं पणीतं
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ १० ॥

( रतनसुत्त ६–१० )

सोतापत्तिमार्गाचा साक्षात्कार झाल्याबरोबर सत्कायदृष्टि, विचिकित्सा, व शीलव्रत या तीन्ही आसक्तींचा पक्का नाश होतो. प्राणी चार दुर्गती-

पासून मुक्त होतो. व त्याच्याहातून सहा दुष्कृत्यांपैकीं एकहि घडणें शक्य नाहीं. हें संघरूप उत्तम रत्न आहे. या सत्यवचनानें आपलें क्षेम असो !

( ९२ ) वरो वरञ्ञू वरदो वराहरो
अनुत्तरो धम्मवरं अदेसयि ।
इदम्पि बुद्धे रतनं पणीतं
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ १३ ॥
( रतनसुत्त ६–१३ )

श्रेष्ठ गुणांनी संपन्न, उत्तम ज्ञान म्हणजे निर्वाण जाणणारा, हा अवर्णनीय बुद्ध भगवान आपल्या श्रेष्ठ धर्माचा उपदेश करता झाला. हें सुदिव्यरत्न बुद्धात आहे. या सत्यवाणीनें आपलें क्षेम होवो !

( ९३ ) खीणं, पुराणं नवं नत्थि-संभवं '
विरत्तचित्ता आयतिके भवस्मिं ।
ते खीणबीजा अविरूळ्हिच्छन्दा
निब्बन्ति धीरा यथा'यं पदीपो,–
इदम्पि सङ्घे रतनं पणीतं
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ १४ ॥
( रतनसुत्त ६–१४ )

पूर्वीच्या कर्मांचा लोप झाला आहे, नवीन कर्म उत्पन्न होणें संभवनीय नाहीं. पुढील जन्मासंबधीं ज्याचें मन विरक्त झालें आहे, असे नष्टबीज, विगततृष्ण, निर्भय पुरुष जळणाऱ्या ज्योतीप्रमाणें निझून जातात. हें संघरूप उत्तम रत्न आहे. या सत्यवाणीनें आपलें क्षेम असो !

( ९४ ) यानी'ध भूतानि समा'गतानि
भुम्मानि वा यानि व अन्तलिक्खे ।

तथागतं देवमनुस्सपूजितं
बुद्धं नमस्साम, सुवत्थि होतु ॥ १५ ॥
( रतनसुत्त ६–१५ )

पृथ्वीवर व तसेच अंतरिक्षांत उत्पन्न झालेले असे जे आम्ही प्राणी येथें जमलो आहोत, ते सर्व आम्ही देव-मानव-पूजित अशा तथागताला म्हणजे बुद्ध भगवंताला वंदन करितो. या सर्वांचें क्षेम असो.

(९५) यानी'ध भूतानि समा'गतानि
भुम्मानि वा यानि व अन्तलिक्खे
तथागतं देवमनुस्सपूजितं
धम्मं नमस्साम, सुवत्थि होतु ॥ १६ ॥
( रतनसुत्त ६–१६ )

पृथ्वीवर व आकाशांत जन्मलेले असे जे आम्ही प्राणी येथें जमलों आहोत, ते सर्व आम्ही देव-मनुष्यपूजित अशा तथागताच्या धर्माला वंदन करतो. सर्वांचें मंगल असो !

(९६) यानी'ध भूतानि समा'गतानि
भुम्मानि वा यानि व अन्तलिक्खे ।
तथागतं देवमनुस्सपूजितं
सङ्घं नमस्साम, सुवत्थि होतु ॥ १७ ॥
( रतनसुत्त ६–१७ )

पृथ्वीवर व अंतरिक्षलोकांत जन्मलेले असे जे आम्ही प्राणी येथें जमलो आहोत, ते सर्व देव-मनुष्यपूजित अशा तथागत संघाला वंदन करितो. सर्वांचें क्षेम असो !

(९७) तिरोकुड्डेसु तिट्ठन्ति सन्धिसिङ्घाटकेसु च ।
द्वारबाहासु तिट्ठन्ति आगन्त्वान सकं घरं ॥ १ ॥
( तिरोकुड्डसुत्त ७–१ )

पितर हे आपल्या घरापाशीं येऊन भिंतीच्याबाहेर त्रिकोन अगर चतुष्कोन रस्त्यावर अगर घराच्या दारापाशीं येऊन उभे राहतात.

(९८) पहूते अन्नपानम्हि खज्जभोज्जे उपट्ठिते ।
न तेस कोचि सरति सत्तानं कम्मपच्चया ॥ २ ॥
( तिरोकुड्डसुत्त ७–२ )

घरांत पुष्कळ अन्नपाणी व खाद्यपेय पदार्थ तयार केले असुनहि, त्याच्या पितराची कोणाला आठवण होत नाहीं. कारण सर्व प्राणी हे कर्मवश आहेत.

(९९) एवं ददन्ति ञातीनं ये होन्ति अनुकम्पका ।
सुचिं पणीतं कालेन कप्पियं पानभोजनं ॥ ३ ॥
( तिरोकुड्डसुत्त ७–३ )

पण जे दयाळु आहेत, ते आपले पितर उपस्थित झाले असतां त्याना शुद्ध, उत्तम अन्नपाणी यथाकाल सतर्पण करतात. व देताना हें आमचे पितराकरता असो, आमचे पितर सुखी असोत ! असें म्हणतात.

( १०० ) पहूते अन्नपानम्हि सक्कच्चं अनुमोदरे ।
'चिरं जीवन्तु नो ञाति' येस हेतु लभामसे ॥ ५ ॥
( तिरोकुड्डसुत्त ७–५ )

अन्न मिळाल्यावर आनंदयुक्त होऊसाते ज्यांच्या योगानें आम्हांस हें दान मिळालें आहे, ते आमचे ज्ञातिबांधव चिरंजीव होवोत अशी इच्छा प्रदर्शित करतात.

( १०१ ) अम्हाकञ्च कता पूजा दायका च अनिप्फला ।
नहि तत्थ कसी अत्थि, गोरक्खे'त्थ न विज्जति ॥ ६ ॥
वणिज्जा तादिसी'नत्थि हिरञ्ञेण कयक्कयं ।
इतो दिन्नेन यापेन्ति पेता कालगता तहिं ॥ ७ ॥
( तिरोकुड्डसुत्त ७,६–७ )

आम्हांस दिलेलें दात्यांना निष्फल होतें असें नाहीं. आम्हा पितरांच्या प्रदेशांत शेतकी नाहीं किंवा गोरक्षणहि नाहीं.

तसेंच तेथें व्यापारधंदा नाहीं. किंवा सुवर्णाचा क्रयविक्रयहि नाहीं. अतएव मरणोत्तर पितृलोकांत गेलेले पितर या पृथ्वीतलावरून दिलेल्या अन्नदानावरच जगतात.

(१०१-अ) उन्नमे उदकं वट्टं यथा निन्नं पवत्तति ।
एवमे'व इतो दिन्नं पेतानं उपकप्पति ॥
( तिरोकुड्डसुत्त ७–८ )

ज्याप्रमाणें उंच प्रदेशांत पाऊस पडला म्हणजे, तेथून पाणी सखल प्रदेशाकडे वाहत जातें, तद्वत् या पृथ्वीवर दिलेलें दान वर पितरांकडे जाऊन पोंचतें.

( १०२ ) 'अदासि मे, अकासि मे', ञातिमित्ता सखा च मे'।
पेतानं दक्खिणं दज्जा, पुब्बेकतं अनुस्सरं ॥
( तिरोकुड्डसुत्त ७–१० )

अमक्या पितरानें मला धन दिलें, अमक्यानें माझें काम केलें, अमुक माझे नातलग होते, माझे मित्र होते, माझे सहकारी होते, अशा रीतीनें पितरांनी आपणावर केलेले उपकार आठवून त्यांना अन्नपानादि दान करावें.

(१०३) न हि रुण्णं वा सोको वा या च' ञ्ञा परिदेवना ।
न त पेतान अत्थाय, एव तिट्ठन्ति ञातयो ॥
(तिरोकुड्डसुत्त ७–११)

परलोकात गेलेल्या पितरासाठीं अश्रु ढाळणें, शोक करणें किंवा अन्य प्रकारानी दु ख करीत बसणें – यापैकी कशानेंहि पितरांचें हित होत नाहीं. तर उपरोक्त रीतीनेंच त्याच्या उपकाराचें स्मरण करून त्यास दान दिलें असता त्या पितराचा योगक्षेम चालतो

(१०४) सो ञातिधम्मो च अय निदस्सितो ।
पेतान पूजा च कता उळारा
बलञ्च भिक्खूनं अनुप्पदिन्नं ।
तुम्हेहि पुञ्ञ पसुत अनप्पकं ॥
(तिरोकुड्डसुत्त ७–१३)

तो हा पितरांविषयक ज्ञातिधर्म आज निर्दिष्ट केला आहे. ज्ञातिपितराची आज उत्तम पूजा करण्यात आली आहे. भिक्षूनाहि पितृकार्यांत अन्नसतर्पण करण्यात आल्यामुळें त्यांनाहि बळ प्राप्त झालें आहे, आणि दात्याना पुष्कळ पुण्यलाभ झाला आहे.

## निधिकण्डसुत्त ८

(१०५) निधिं निधेति पुरिसो गम्भीरे ओदक'न्तिके ।
'अत्थे किच्चे समुप्पन्ने अत्थाय मे भविस्सति ॥
(निधिकंडसुत्त ८–१)

एखादें लाभदायक कार्य प्राप्त झालें असता या सपत्तीचा आपणास उपयोग होईल, अशा उद्देशानें मनुष्य हा पाणी लागेल इतका खोल खड्डा खणून त्यात ती सपत्ति पुरून ठेवितो.

(१०६) राजतो वा दुरुत्तस्स चोरतो पीळितस्स वा।
इणस्स वा पमोक्खाय, दुब्भिक्खे आपदासु वा॥
एतदत्थाय लोकस्मिं निधि नाम विधीयते॥

(निधिकंडसुत्त ८-२)

राजापासून व लुटारू चोरांपासून बचावण्यासाठीं, देणेदाराचें देणें देऊन ऋणमुक्त होण्यासाठीं, दुर्भिक्ष ओढवल्यावेळीं अगर आपत्काल कोसळला असतां त्यांतून पार पडण्यासाठीं अशा अनेक कारणांसाठीं म्हणून लोक या जगांत पैसा पुरून ठेवीत असतात.

(१०७) ताव सुनिहितो सन्तो गम्भीरे ओदक'न्तिके।
न सब्बो सब्बदा एव तस्स तं उपकप्पति॥

(निधिकंडसुत्त ८-३)

याप्रमाणें पाणी लागेल इतका खोल खड्डा खणून त्यांत निधि काळजीपूर्वक पुरून ठेविला तरी तो सर्वकाळीं हमखास उपयोगास येईल अशी हमी देता येत नाहीं.

(१०८) निधी वा ठाना चवति सञ्ञा वाऽस्सविमुह्यति।
नागा वा अपनामेन्ति यक्खा वा पि हरन्ति नं॥

(निधिकण्डसुत्त ८-४)

याचें कारण असें कीं तो केव्हां केव्हां ठेविलेल्या ठिकाणींच नाहींसा होतो. किंवा कोठें ठेविला याची नक्की आठवण बुजते.

(१०९) अप्पियाया'पि दायादा उद्धरन्ति अपस्सतो।
यदा पुञ्ञक्खयो होति सब्बं एतं विनस्सति॥

(निधिकण्डसुत्त ८-५)

किंवा नाग तो पळवून नेतात, किंवा यक्ष त्याचें हरण करतात किंवा आपल्या वाइटावर टपलेले भाऊबंद न-कळत तो खणून घेऊन जातात किंवा पुण्याचा क्षय झाल्यावर त्या सर्व निधीचा नाश होतो.

(११०) यस्स दानेन सीलेन संयमेन दमेन च ।
निधी सुनिहितो होति इत्थिया पुरिसस्स वा ॥
(निधिकण्डसुत्त ८–६)

(१११) चेतयम्हि व सङ्घे वा पुग्गले अतिथीसु वा ।
मातरि पितरि वा पि अथो जेट्ठम्हि भातरि ॥
(निधिकण्डसुत्त, ८–७)

(११२) एसोनिधि सुनिहितो अजेय्यो अनुगामिको ।
पहाय गमनीयेसु एतसा'दाय गच्छति ॥
(निधिकण्डसुत्त ८–८)

पण ज्या स्त्री अगर पुरुषाकडून दान, शील, सयम व दम यानी सपन्न असा हा निधि चैत्य व भिक्षुसघ किंवा एखादा महात्मा पुरुष, अथवा अतिथि, आईबाप किंवा ज्येष्ठ भाऊ याच्या सन्निधानें साठवून ठेविलेला असतो, तोच पुण्यमय निधि उत्तम रीतीनें साठवून ठेविला असें होय. तोच अजय्य निधि होय. व तोच आपल्या मागोमाग येणारा आहे. आणि शेवटीं जेव्हा भोग्यवस्तु कायम सोडून जाण्याची वेळ येते, तेव्हा हाच निधि परलोकात आपल्या बरोबर येतो.

(११३) असाधारणं अञ्ञेस अचोरा'हरणो निधि ।
कयिराथ धीरो पुञ्ञानि यो निधि अनुगामिको ॥
(निधिकडसुत्त, ८–९)

हा निधि इतरांस देतां येत नाहीं व चोरांनाहि लांबवितां येत नाहीं. म्हणून शाहण्यानें पुण्यकर्मे करून हा निधि संग्रह करून ठेवावा. कारण तोच आपल्याबरोबर येणारा आहे.

(११४) एस देवमनुस्सानं सब्बकामददो निधि ।
यं यदेवा'भिपत्थेन्ति सब्बं एतेन लब्भति ॥
(निधिकण्डसुत्त ८-१०)

हा निधि देव व मनुष्य यांच्या सर्व इच्छा पूर्ण करणारा आहे. याच्या योगाने जो ज्याची इच्छा करील, तें सर्व त्यास प्राप्त होतें.

(११५) एवं महत्थिका एसा यदि'दं पुञ्ञसम्पदा ।
तस्मा धीरा पसंसन्ति पण्डिता कतपुञ्ञतं ॥
(निधिकण्डसुत्त ८-१६)

याप्रमाणें हा पुण्य-निधि मोठा उपकारक आहे. आणि म्हणून शाहणे व विचारवंत लोक पुण्यकर्माची प्रशंसा करतात.

## मेत्तसुत्त ९

(११६) माता यथा नियं पुत्तं आयुसा एकपुत्तं अनुरक्खे ।
एवम्पि सब्बभूतेपु मानसं भावये अपरिमाणं ॥
(मेत्तसुत्त ९-७)

माता ज्याप्रमाणें आपला जीव खर्ची घालून आपल्या एकुलत्या मुलाचें रक्षण करते, त्याप्रमाणें सर्व प्राण्याविषयीं अमर्याद मित्रत्वाची प्रेमभावना वाढवावी.

(११७) मेत्तञ्च सब्बलोकस्मि मानसं भावये अपरिमाणं ।
उद्धं अधो च तिरयञ्च असम्बाधं अवेरं असपत्तं ॥
(मेत्तसुत्त ९-८)

वर, खाली आणि मध्यें सर्व लोकांविषयीं अबाधित, स्नेहपूर्ण व निर्वैर अशी मित्रत्वभावना वाढवावी

(११८) तिट्ठं चरं निसिन्नो वा सयानो वा यावतस्स विगतमिद्धो।
एवं सतिं अधिट्ठेय्य, ब्रह्मं एतं विहारं इधमा'हु ॥
(मेत्तसुत्त ९–९)

उभें असतां, चालत असतां, बसलें असता व निजलें असतां जागरूक राहून ही मैत्रीची भावना कायम ठेवावी. हिला या लोकाचा ब्रह्मविहार असें म्हणतात.

(११९) दिट्ठिञ्च अनुपगम्म सीलवा दस्सनेन सम्पन्नो।
कामेसु विनेय्य गेधं न हि जातु गब्भसेय्य पुनरे'ति ॥
(मेत्तसुत्त ९–१०)

सम्यक् दृष्टीचा स्वीकार करून शील व ज्ञान यानी सपन्न होऊन आणि विषयसुखाचा लोभ सोडून देणारा असा पुरुष पुन. गर्भवास भोगीत नाहीं.



# धम्मपद



(१२०) मनोपुब्बङ्गमा धम्मा मनोसेट्ठा मनोमया ।
मनसा चे पदुट्ठेन भासति वा करोति वा ।
ततो'नं दुक्खमन्वेति चक्कं'व वहतो पदं ॥

(यमकवग्ग १-१)

मन हें सर्व प्रवृत्तीच्या अग्रभागीं आहे. मन त्यांचा प्रधान आहे. सर्व मनोधर्म मनापासूनच उत्पन्न होतात. जो कोणी दूषित मनानें बोलतो अगर कर्म करतो, त्याच्या मागें गाडीच्या बैलामागून जसें चाक जातें तद्वत् दुःख लागतें.

(१२१) मनोपुब्बङ्गमा धम्मा मनोसेट्ठा मनोमया ।
मनसा चे पसन्नेन भासति वा करोति वा ।
ततो'न सुखमन्वेति छाया'व अनपायिनी ॥

(यमकवग्ग १-२)

मन हें सर्व प्रवृत्तीच्या अग्रभागीं आहे. मन त्यांचा प्रधान आहे. सर्व धर्म मनापासूनच उत्पन्न होतात. जो कोणी प्रसन्न मनानें बोलतो अगर कर्म करतो, तो कधींहि न सोडणाऱ्या सावलीप्रमाणें सुखाचें अनुसरण करतो.

(१२२) अक्कोच्छि मं अवधि मं अजिनि मं अहासि मे ।
ये च तं उपनय्हन्ति वेरं तेसं न सम्मति ॥

(यमकवग्ग १-३)

अमक्यानें मला शिवी दिली, अमक्यानें मला मारलें, मला जीत केलें, मला लुबाडलें, असे विचार ज्याच्या मनांत सदैव घोळत असतात, त्याचें वैर कधींहि शमन पावत नाहीं.

(१२३) अक्कोच्छि मं अवधि मं अजिनि मं अहासि मे।
ये तं न उपनय्हन्ति वेरं तेसूपसम्मति॥

(यमकवग्ग १–४)

अमक्यानें मला शिवी दिली, अमक्यानें मला मारलें, मला जिंकलें, मला लुबाडलें, असे विचार ज्याच्या मनांत घोळत नाहींत, त्याचें वैर शांत होतें,

(१२४) न हि वेरेन वेरानि सम्मन्तीध कुदाचिनं।
अवेरेन च सम्मन्ति एस धम्मो सनन्तनो॥

(यमकवग्ग १–५)

येथें या संसारांत वैरानें वैर हें कधींहि शमन पावत नाहीं. तर तें अवैरानें–मित्रभावानें–शांत होऊं शकतें. हा असा सनातन धर्म आहे.

(१२५) अनिक्कसावो कासावं यो वत्थं परिदहेस्सति।
अपेतो दम–सच्चेन न स कासावमरहति॥

(यमकवग्ग १–९)

जो रागद्वेषादि मनोमलाचा त्याग न करतां, वर वर कषाय वस्त्रें धारण करतो, त्याचप्रमाणें जो संयम व सत्यहीन आहे असा मनुष्य कषायवस्त्रें धारण करण्यास योग्य नाहीं.

(१२६) यो च वन्तकसावस्स सीलेसु सुसमहितो।
उपेतो दमसच्चेन स वे कासावमहरति॥

(यमकवग्ग १–१०)

ज्यानें चित्तमल चटसारा झाडून टाकला आहे, जो शीलसंपन्न आहे आणि त्याचप्रमाणें संयम व सत्य यांनी युक्त आहे, तोच कषाय-वस्त्रें धारण करण्यास पात्र आहे.

(१२७) सारञ्च सारतो ञत्वा असारञ्च असारतो ।
ते सारं अधिगच्छन्ति सम्मासङ्कप्पगोचरा ॥
(यमकवग्ग १–१२)

जो साराला सार समजतो आणि असाराला असार समजतो, तो सम्यक् संकल्पानें युक्त होत्साता सार प्राप्त करून घेतो.

(१२८) इध सोचति पेच्च सोचति पापकारी उभयत्थ सोचति ।
सो सोचति सो विहञ्ञति दिस्वा कम्मकिलिट्ठमत्तनो ॥
(यमकवग्ग १–१५)

जो पापी आहे, तो या लोकींहि शोक करतो आणि परलोकींहि शोक करतो. पापी मनुष्य याप्रमाणें उभय लोकांत शोक करतो. तो आपलें दुष्कृत्य पाहून शोक करतो आणि खिन्न होतो.

(१२९) इध मोदति पेच्च मोदति कतपुञ्ञो उभयत्थ मोदति ।
सो मोदति सो पमोदति दिस्वा कम्मविसुद्धिमत्तनो
(यमकवग्ग १–१६)

जो पुण्यवान आहे, तो या लोकीं आनंद पावतो आणि परलोकींहि आनंद पावतो. पुण्यात्मा हा उभय लोकांत आनंद पावतो. आपल्या कर्माची शुचिता पाहून तो मुदित होतो आणि प्रमुदित होतो.

(१३०) अप्पमादो अमत–पदं पमादो मच्चुनो पदं ।
अप्पमत्ता न मीयन्ति ये पमत्ता यथा मता ॥
(अप्पमादवग्ग २–१)

जागरूकता हें अमृतपदाचें साधन आहे. आणि आळस हा मृत्यूकडे नेणारा मार्ग आहे. जे जागरूक असतात, ते मरत नाहींत. जे असावध असतात ते मृत्यूच्या भक्ष्यस्थानीं पडतात.

(१३१) मा पमादमनुयुञ्जेथ मा कामरतिसन्थवं ।
अप्पमत्तो हि झायन्तो पप्पोति विपुलं सुखं ॥
(अप्पमादवग्ग २–७)

आळसात मग्न होऊं नका ! विषयभोगाच्या संगतींत रमूं नका ! जागरूक आणि ध्यान करणारा पुरुष हा विपुल सुख प्राप्त करून घेतो.

(१३२) अप्पमादेन मघवा देवानं सेट्ठतं गतो ।
अप्पमादं पसंसन्ति पमादो गरहितो सदा ॥
(अप्पमादवग्ग २–१०)

इंद्र हा जागरूक राहूनच देवलोकांत श्रेष्ठतेस पावला. कर्तव्य-दक्षतेची सर्वत्र प्रशसा होते आणि आळसाची सर्वत्र निंदा केली जाते.

(१३३) अप्पमादरतो भिक्खु पमादे भयदस्सि वा ।
अभब्बो परिहाणाय निब्बाणस्सेव सन्तिके ॥
(अप्पमादवग्ग २–१२)

जो भिक्षु कर्तव्य-रत आहे आणि प्रमादाकडे भयानें पाहतो, तो केव्हांहि पतन पावत नाहीं. तो निर्वाणाच्या सन्निध जाऊन पोंचला आहे.

(१३४) फन्दनं चपलं चित्तं दूरक्खं दुन्निवारयं ।
उजुं करोति मेधावी उसुकारो'व तेजनं ॥
(चित्तवग्ग ३–१)

चित्त हें चंचल आहे. तसेंच तें चपलहि आहे. त्याचें रक्षण करणें हें महा कठीण काम आणि त्याला रोखून धरणें ही तितकीच कठीण गोष्ट. पण जे मेधावी आहेत ते बाणकरणारा बाणाला जसा सरळ करतो तद्वत् चित्ताला सरळ करतात.

(१३५) सुदुद्दसं सुनिपुणं यत्थ कामनिपातिनं।
चित्तं रक्खेय्य मेधावी, चित्तं गुत्तं सुखावहं ॥
(चित्तवग्ग ३-४)

ज्याला जाणणें हें मोठें कठीण, जें अत्यंत चलाख, जें वाटेल तेथें जाऊं शकतें, *अशा चित्ताचें बुद्धिमान मनुष्यानें रक्षण करावें.* कारण संरक्षित चित्त सुखदायक होतें.

(१३६) दूरङ्गमं एकचरं असरीरं गुहासयं ।
ये चित्तं सञ्ञमेस्सन्ति मोक्खन्ति मारबन्धना ॥
(चित्तवग्ग ३-५)

दूर जाणारें, एकटेंच संचार करणारें, निराकार, गुप्तस्थलीं राहणारें अशा चित्ताचें जो संयमन करतो तो मारबंधनांतून मुक्त होतो.

(१३७) दिसो दिसं यन्तं कयिरा वेरी वा पन वेरिनं ।
मिच्छापणिहितं चित्तं पापियो'नं ततो करे ॥
(चित्तवग्ग ३-१०)

शत्रु शत्रूची, अगर वैरी वैऱ्याची जितकी हानि करूं शकेल, त्याहूनहि अधिक हानि दुर्मार्गी लागलेलें मन करूं शकतें.

(१३८) न तं माता पिता कयिरा अञ्ञे चापि च ञातका ।
सम्मापणिहितं चित्तं सेय्यसो'नं ततो करे ॥
(चित्तवग्ग ३-११)

आई बाप, अगर भाऊबंद कोणी झाले तरी जितकें आपलें कल्याण करूं शकतील, त्याहिपेक्षा अधिक कल्याण सन्मार्गी लागलेलें हें मन करूं शकतें.

(१३९) यथापि भमरो पुप्फं वण्णगन्धं अहेठयं ।
पलेति रसमादाय एवं गामे मुनी चरे ॥
(पुप्फवग्ग ४–६)

फुलांतील रंग व गंध यांची हानि न करतां भ्रमर जसा त्यांतील मकरंद लुटून घेऊन जातो तद्वत् जो मुनि आहे, त्यानें गावांत भ्रमराप्रमाणें वर्तन करावें.

(१४०) यथापि रुचिरं पुप्फं वण्णवन्तं सगन्धकं ।
एवं सुभासिता वाचा सफला होति कुब्बतो ॥
(पुप्फवग्ग ४–९)

फूल जसें रंगानें सुंदर व गंधानें मधुर असतें, त्याप्रमाणें वचनाप्रमाणे कृतिकरणाराची वाणी सुफलदायी होते.

(१४१) न पुप्फगन्धो पटिवातमेति न चन्दनं तगरमल्लिका वा ।
सतञ्च गन्धो पटिवातमेति सब्बा दिसा सप्पुरिसो पवाति ॥ (पुप्फवग्ग ४–११)

फुलाचा सुगंध हा वाऱ्यानें उलट दिशेनें वाहत जाऊं शकत नाहीं. पण सज्जनांच्या सत्कीर्तीचा सुगंध हा वाऱ्याच्या उलट दिशेनेंसुद्धां वाहत जातो. सज्जन हे सर्व दिशांमध्यें आपला कीर्तिपरिमल पसरवितात.

(१४२) अप्पमत्तो अयं गन्धो या'यं तगरचन्दनो ।
यो च सीलवतं गन्धो वाति देवेसु उत्तमो ॥
(पुप्फवग्ग ४–१२)

तगर अगर चंदन यांचा जो सुगंध वाऱ्यांत पसरतो तो क्षणमात्रच असतो. पण सदाचाराचा जो सुगंध आहे तो देवलोकांत सुद्धां जाऊन पसरतो.

(१४३) दीघा जागरतो रत्ति दीघं सन्तस्स योजनं ।
दीघो बालानं संसारो सद्धमं अविजानतं ॥

(बालवग्ग ५-१)

जागरण करणाऱ्याला रात्र मोठी भासते. थकलेल्याला योजन लांब वाटतो. सद्धर्माला जो जाणत नाहीं, त्या मूर्खाला संसार हा प्रदीर्घ वाटतो.

(१४४) पुत्ता म'त्थि धनम्म'त्थि इति बालो विहञ्ञति ।
अत्ता हि अत्तनो नत्थि कुतो पुत्तो कुतो धनं ॥

(बालवग्ग ५-३)

'पुत्र माझा, धन माझें' असें समजून अज्ञजन पीडाग्रस्त होतात. पण आपलें शरीर तेंच जर आपलें नाहीं, तर पुत्र काय अगर धन काय, तें आपल्याला कितीसें कामास येणार ?

(१४५) मधू'व मञ्ञति बालो याव पापं न पच्चति ।
यदा च पच्चती पापं अथ दुक्खं निगच्छति ॥

(बालवग्ग ५-१०)

जोपर्यंत पापकर्म हें फलद्रूप होत नाहीं, तोपर्यंत मूर्ख लोक त्याला मधासमान गोड मानतात. पण जेव्हां त्या पापकर्माचें फळ उभें राहतें, तेव्हां मात्र ते दुःखाच्या आगींत येऊन पडतात.

( १४६ ) निधीनं 'व पवत्तारं यं पस्से वज्ज-दस्सिनं ।
निगय्हवादिं मेधाविं तादिसं पण्डितं भजे ।
तादिसं भजमानस्स सेय्यो होति न पापियो ॥
( पंडितवग्ग ६–१ )

भूमींतील गुप्तधन दाखविणाऱ्याप्रमाणें आपले दोष दाखविणारे असे जे संयमवादी व मेधावी पंडित आहेत, त्यांची सेवाचाकरी करावी. पंडितांची सेवाचाकरी करणाऱ्याचें केव्हांहि कल्याणच होतें. अकल्याण होत नाहीं.

( १४७ ) न भजे पापके मित्ते न भजे पुरिसाधमे ।
भजेथ मित्ते कल्याणे भजेथ पुरिसुत्तमे ॥
( पंडितवग्ग ६–३ )

दुष्ट व पापी मनुष्याची मैत्री करूं नये. अधम पुरुषाची सेवा करूं नये. सज्जनांची संगति धरावी आणि उत्तम पुरुषाची सेवा करावी.

( १४८ ) उदकं हि नयन्ति नेत्तिका उसुकारा नमयन्ति तेजनं ।
दारुं नमयन्ति तच्छका अत्तानं दमयन्ति पण्डिता ॥
( पंडितवग्ग ६–५ )

माळी हा जसा बागेत पाटातून पाणी खेळवितो, बाणकार हा जसा बाणाला सरळ करतो, सुतार हा जसा काठी सरळ करतो, त्याप्रमाणें पंडित लोक आपलें दमन करतात.

(१४९) सेलो यथा एकघनो वातेन न समीरति ।
एवं निन्दापसंसासु न-समिञ्जन्ति पण्डिता ॥
( पंडितवग्ग ६–६ )

पर्वताचा दगडी पहाड हा जसा वाऱ्यानें कंपित होत नाहीं, तद्वत् पंडित लोक जे आहेत, ते निंदास्तुतीनें विचलित होत नाहींत.

(१५०) ये च खो सम्मदक्खाते धम्मे धम्मानुवत्तिनो।
ते जना पारमेस्सन्ति मच्चुधेय्यं सुदुत्तरं ॥
(पंडितवग्ग ६-११)

जे उपदिष्ट धर्मांत शास्त्रनियमानें वागतात, ते मृत्युग्रस्त अशा या दुस्तर संसारसागराच्या पलीकडे पार निघून जातात.

(१५१) गतद्धिनो विसोकस्स विप्पमुत्तस्स सब्बधि।
सब्बगन्थप्पहीणस्य परिलाहो न विज्जति ॥
(अर्हन्तवग्ग ७-१)

जो संसाराचा मार्ग ओलांडून गेला आहे, जो शोकरहित व सर्वथा मुक्त झाला आहे, ज्याच्या सर्व ग्रंथि क्षीण होऊन गेल्या आहेत, अशाला कसलेंहि कष्ट व ताप शिवत नाहींत.

(१५२) येसं सन्निचयो नत्थि ये परिञ्ञातभोजना।
सुञ्ञतो अनिमित्तो च विमोक्खो यस्स गोचरो।
आकासे'व सकुन्तानं गतितेसं दुरन्नया ॥
(अर्हन्तवग्ग ७-३)

जो सांसारिक वस्तूंचा संग्रह करीत नाहीं, ज्याचें अन्नपान नियमित असतें, शून्य व कारणरहित असें निर्वाण ज्यास गोचर झालें आहे, त्याची गति आकाशांतील पक्ष्याप्रमाणें अज्ञेय आहे.

(१५३) सन्तं अस्स मनं होति सन्ता वाचा च कम्मञ्च।
सम्मदञ्ञाविमुत्तस्स उपसन्तस्स तादिनो ॥
(अर्हन्तवग्ग ७-७)

निर्वाणाचें यथार्थ रूप जाणून घेऊन मुक्त झालेल्या अर्हताचें मन प्रशांत होतें. त्याच प्रमाणें त्याची वाणी व कर्म हींहि शांत होतात.

(१५४) गामे वा यदि वा'रञ्ञे निन्ने वा यदि वा थले ।
यत्थारहन्तो विहरन्ति तं भूमिं रामणेय्यकं ॥
(अर्हन्तवग्ग ७-९)

गांवांत अगर जंगलांत, खालीं जमिनीवर अगर उंच डोंगरावर असे कोठें जरी अर्हत् लोक विहार करीत असले, तरी त्याचें तें निवासस्थान मोठें रमणीयच खरें.

(१५५) यो च गाथा सतं भासे अनत्थपदसंहिता ।
एकं धम्मपदं सेय्यो यं सुत्वा उपसम्मति ॥
(सहस्सवग्ग ८-३)

अर्थशून्य अशा शंभर गाथांचे पठणापेक्षां सार्थ असें सद्धर्माचें एकच पद म्हटलें तरीं तें श्रेष्ठ होय. कारण त्याच्या श्रवणानें मनुष्य उपशांत होतो.

(१५६) यो सहस्सं सहस्सेन सङ्गामे मानुसे जिने ।
एकं च जेय्यमत्तानं स वे सङ्गामजुत्तमो ॥
(सहस्सवग्ग ८-४)

संग्रामांत तलवार गाजवून हजार मनुष्यांवर जय मिळविण्यापेक्षां ज्यामध्यें मनुष्य स्वतःलाच जिंकतो तो संग्रामच श्रेष्ठ होय.

(१५७) अभिवादनसीलिस्स निच्चं वद्धापचायिनो ।
चत्तारो धम्मा वड्ढन्ति आयु वण्णो सुखं बलं ॥
(सहस्सवग्ग ८-१०)

जो अभिवादनशील आहे व जो वृद्धांचा सेवक आहे त्याचें आयुष्य, वर्ण, सुख व बल या चार गोष्टी संवर्धन पावतात.

( १५८ ) यो च वस्ससतं जीवे अपस्सं अमतं पदं ।
एकाहं जीवितं सेय्यो पस्सतो अमतं पदं ॥
( सहस्सवग्ग ८–१५ )

निर्वाणाचें ज्ञान करून न घेतां शंभर वर्षें जगण्याहून निर्वाणाचें यथार्थ ज्ञान झालेल्या मनुष्याचें एक दिवसाचें आयुष्य हें श्रेष्ठ आहे.

( १५९ ) पापोपि पस्सति भद्रं याव पापं न पच्चति ।
यदा च पच्चति पापं अथ पापानि पस्सति ॥
( पापवग्ग ९–४ )

जोपर्यंत पापकर्माचें फल प्रत्यक्ष दिसत नाहीं, तोपर्यंत पापी हा पापाला चांगलें समजतो. पण पापाचें फल जेव्हां प्रत्यक्ष पुढें उभें राहतें तेव्हां त्याला पाप दिसूं लागतें.

( १६० ) वणिजो'व भयं मग्गं अप्पसत्थो महद्धनो ।
विसं जीवितुकामो'व पापानि परिवज्जये ॥
( पापवग्ग ९–८ )

थोडे काफिले व पुष्कळ संपत्ति जवळ घेऊन चाललेला व्यापारी हा भययुक्त मार्ग सोडून देतो किंवा जगण्याची इच्छा असलेला पुरुष विषाचा त्याग करतो, त्याप्रमाणें मनुष्यानें पापाचा त्याग करावा.

( १६१ ) न अन्तलिक्खे न समुद्दमज्झे न पब्बतानं विवरं पविस्स ।
न विज्जती सो जगतिप्पदेसो यत्थट्ठितोमुच्चेय्य पापकम्मा
( पापवग्ग ९–१२ )

आकाशांत काय, समुद्रांत काय अगर पर्वतगुहेंत काय जगांत असें कोठें स्थान नाहीं कीं, ज्याचा आश्रय केला असतां पाप्याला आपल्या पापकर्माचें फल चुकवितां येईल.

(१६२) न अन्तलिक्खे न समुद्दमज्झे न पव्वतानं विवरं पविस्स।
न विज्जती सोजगतिप्पदेसो यत्थट्ठितं न प्पसहेय्य मच्चू॥
(पापवग्ग ९–१३)

आकाशांत, समुद्राच्या पोटांत, पर्वताच्या गुहेंत असें जगांत एखादें स्थान नाहीं की, ज्याचा आश्रय केला असतां मनुष्याला मृत्यु टाळतां येईल.

(१६३) सब्बे तसन्ति दण्डस्स सब्बेसं जीवितं पियं।
अत्तानं उपमं कत्वा न हनेय्य न घातये॥
(दण्डवग्ग. १०–२)

दंडाला सर्वच भितात. कारण जीव हा सर्वांना प्यारा आहे. या प्रमाणें सर्व प्राणी आपल्या सारखेच समजून कोणाचा घातपात करूं नये किंवा कोणाला तसें करण्यास फूस देऊं नये.

(१६४) सुखकामानि भूतानि यो दण्डेन विहिंसति।
अत्तनो सुखमेसानो पेच्च सो न लभते सुखं॥
(दण्डवग्ग १०–३)

सुखाची इच्छा करणाऱ्या प्राण्यांना जो आपल्या सुखासाठीं दंडानें प्रहार करतो, तो मेल्यावर सुखी होत नाहीं. सुखेच्छा असणाऱ्या प्राण्यांना जो मारत नाहीं तो मेल्यावर सुखी होतो.

(१६५) यथा दण्डेन गोपालो गावो पाचेति गोचरं।
एवं जरा च मच्चू च आयुं पाचेन्ति पाणिनं॥
(दण्डवग्ग १०–७)

गुराखी हा काठीच्या मदतीनें गुरांना जसा कुरणाकडे वळवून नेतो, तद्वत् जरा व मृत्यु मनुष्याचें आयुष्य घेऊन जातात.

(१६६) न नग्गचरिया न जटा न पङ्का
नानासका थण्डिलसायिका वा ।
रजोवजल्लं उक्कुटिकप्पधानं
सोधेन्ति मच्चं अवितिण्णकङ्खं ॥
(दण्डवग्ग १०-१३)

ज्याचे मनांतील संशय फिटले नाहींत त्याची शुद्धि नग्न राहून, जटा वाढवून, अंगाला राख फासून, उपवास करून, जमिनीवर निजून, धूळ माखून, आसनमांडी घालून होणार नाहीं.

(१६७) अलङ्कतो चेपि समं चरेय्य
सन्तो दन्तो नियतो ब्रह्मचारी ।
सब्बेसु भूतेसु निधाय दण्डं
सो ब्राह्मणो सो समणो स भिक्खू ॥
(दण्डवग्ग १०-१४)

शरीरावर अलंकार धारण केले असले तरी जो शान्त, दान्त, नियत-ब्रह्मचारी आणि दंडत्यागी आहे, तोच खरा ब्राह्मण, तोच खरा श्रमण आणि तोच खरा भिक्षु होय.

(१६८) उदकं हि नयन्ति नेत्तिका
उसुकारा नमयन्ति तेजनं ।
दारुं नमयन्ति तच्छका
अत्तानं दमयन्ति सुब्बता ॥
(दण्डवग्ग १०-१७)

माळी पाटानें पाण्यास वाटेल तेथें नेतात, लोहार वाटेल तसे बाणास वांकवितात, सुतार लांकडाच्या काठीला वाटेल तसें रूप देतात आणि जे सुव्रत आहेत ते स्वतःस वाटेल तसे वळवितात.

(१६९) परिजिण्णमिदं रूपं रोगनिड्ढं पभङ्गुरं।
भिज्जती पूतिसन्देहो मरणान्तं हि जीवितं ॥
( जरावग्ग ११–३ )

हें जें शारीरिक रूप आहे तें कालांतरानें जीर्ण होणारें आहे, तसेंच तें रोगाचें माहेरघर आहे आणि भंगुर आहे. अर्थात् अखेर तें नाश पावणारें आहे. कारण जिवाचा अंत हा शेवटीं मरणांत होतो.

(१७०) अट्ठिनं नगरं कतं मंसलोहितलेपनं।
यत्थ जरा च मच्चू च मानो मक्खो च ओहितो ॥
( जरावग्ग ११–५ )

हें शरीर म्हणजे हाडाचें नगर असून तें मांस व रक्त यांनी लिंपून काढलें आहे. आणि तेथें जरा, मृत्यु, मान व मोह हीं छपून राहिलीं आहेत.

(१७१) अप्पस्सुतायं पुरिसो बलिवद्दो'व जीरति।
मंसानि तस्स वड्ढन्ति पञ्ञा तस्स न वड्ढति ॥
( जरावग्ग ११–७ )

जो अल्पविद्य आहे तो माजलेल्या बैलाप्रमाणें लठ्ठ फुगतो. अर्थात् फक्त त्याचें मांस तेवढेंच वाढतें. बुद्धि कांहीं वाढत नाहीं.

( १७१ अ ) अचरित्वा ब्रह्मचरियं अलद्धा योब्बने धनं।
जिण्णकोंचा'व ज्झायन्ति खीणमच्छे'व पल्लले ॥
( जरावग्ग ११–१० )

जो ब्रह्मचर्याचें पालन करीत नाहीं, जो यौवनांत धन मिळवीत नाहीं, तो वृद्धापकाळीं मासे नसलेल्या जलाशयांतील क्रौंच पक्ष्या-प्रमाणें चिंताग्रस्त होतो.

(१६६) न नग्गचरिया न जटा न पङ्का
नानासका थण्डिलसायिका वा ।
रजोवजल्लं उक्कुटिकप्पधानं
सोधेन्ति मच्चं अवितिण्णकङ्खं ॥
(दण्डवग्ग १०-१३)

ज्याचे मनांतील संशय फिटले नाहींत त्याची शुद्धि नग्न राहून, जटा वाढवून, अंगाला राख फासून, उपवास करून, जमिनीवर निजून, धूळ माखून, आसनमांडी घालून होणार नाहीं.

(१६७) अलङ्कतो चेपि समं चरेय्य
सन्तो दन्तो नियतो ब्रह्मचारी ।
सब्बेसु भूतेसु निधाय दण्डं
सो ब्राह्मणो सो समणो स भिक्खू ॥
(दण्डवग्ग १०-१४)

शरीरावर अलंकार धारण केले असले तरी जो शान्त, दान्त, नियत-ब्रह्मचारी आणि दंडत्यागी आहे, तोच खरा ब्राह्मण, तोच खरा श्रमण आणि तोच खरा भिक्षु होय.

(१६८) उदकं हि नयन्ति नेत्तिका
उसुकारा नमयन्ति तेजनं ।
दारुं नमयन्ति तच्छका
अत्तानं दमयन्ति सुब्बता ॥
(दण्डवग्ग १०-१७)

माळी पाटानें पाण्यास वाटेल तेथें नेतात, लोहार वाटेल तसें बाणास वांकवितात, सुतार लांकडाच्या काठीला वाटेल तसें रूप देतात आणि जे सुव्रत आहेत ते स्वतःस वाटेल तसे वळवितात.

आपण केलेलें पाप आपणालाच दूषित करतें. व आपण न केलेलें पाप आपणाला शुद्ध करतें. शुद्धि अगर अशुद्धि याला कारण आपणच आहो. दुसरा दुसऱ्याला शुद्ध करूं शकत नाहीं.

(१७६) यो च पुब्बे पमज्जित्वा पच्छा सो नप्पमज्जति ।
सो'मं लोकं पभासेति अब्भा मुत्तो'व चन्दिमा ॥
(लोकवग्ग १३–६)

जो प्रथम प्रमाद-करून मग प्रमाद करीत नाहीं, तो या लोकाला मेघांतून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणें प्रकाशित करतो.

(१७७) एकं धम्मं अतीतस्स मुसावादिस्स जन्तुनो ।
वितिण्णपरलोकस्स नत्थि पापं अकारियं ॥
(लोकवग्ग १३–१०)

ज्यानें धर्माचें अतिक्रमण केलें आहे, जो असत्य भाषण करतो, ज्यानें परलोकाची चाड सोडली आहे, अशानें काय करावयाचें राहिलें आहे?

(१७८) न वे 'कदरिया देवलोकं वजन्ति
बाला ह वे न प्पसंसन्ति दानं ।
धीरो च दानं अनुमोदमानो
तेनेव सो होति सुखी परत्थ ॥
(लोकवग्ग १३–११)

कंजूष लोक हे देवलोकीं जात नाहींत. मूर्ख लोक दानाची प्रशंसा करीत नाहींत, पण जे पंडित आहेत ते दानास अनुमोदन देऊन त्यापासून परलोकांत सुखी होतात.

(१७९) किच्छो मनुस्स पटिलाभो किच्छं मच्चानं जीवितं ।
किच्छं सद्धम्मसवणं किच्छो बुद्धानं उप्पादो ॥
(बुद्धवग्ग १४–४)

(१७२) अत्तानं एव पठमं पटिरूपे निवेसये ।
अथञ्ञमनुसासेय्य न किलिस्सेय्य पण्डितो ॥
( अत्तवग्ग १२–२ )

प्रथम मनुष्यानें स्वतः उद्योगास लागावें आणि मग दुसऱ्यास उपदेश करण्याच्या भरीस पडावें. अशा तऱ्हेनें पंडित लोक क्लेश प्राप्त करून घेत नाहींत.

(१७३) अत्ता हि अत्तनो नाथो कोहि नाथो परो सिया ।
अत्तना'व सुदन्तेन नाथं लभति दुल्लभं ॥
( अत्तवग्ग १२–४ )

मनुष्य हा आपला आपणच स्वामी आहे. कल्याणकर्ता स्वामी त्याचा असा दुसरा कोण असणार ! स्वतःला उत्तम तऱ्हेनें दमन केल्यास त्या दुर्लभ स्वामीला म्हणजे निर्वाणाला प्राप्त करून घेतो.

(१७४) सुकरानि असाधूनि अत्तनो अहितानि च ।
यं वे हितञ्च साधुञ्च तं वे परमदुक्करं ॥
( अत्तवग्ग १२–७ )

ज्यापासून आपलें स्वतःचेंच अहित होतें अशीं दुष्कृत्यें करणें हें फार सोपें आहे. पण जें चांगलें व हितकर आहे तें करणें हें मात्र मोठें कठीण आहे.

(१७५) अत्तना'व कतं पापं अत्तना संकिलिस्सति ।
अत्तना अकतं पापं अत्तना'व विसुज्झति ।
सुद्धि असुद्धिपच्चत्तं नञ्ञो अञ्ञं विसोधये ॥
( अत्तवग्ग १२–९ )

आपण केलेलें पाप आपणालाच दूषित करतें. व आपण न केलेलें पाप आपणाला शुद्ध करतें. शुद्धि अगर अशुद्धि याला कारण आपणच आहों. दुसरा दुसऱ्याला शुद्ध करूं शकत नाहीं.

(१७६) यो च पुब्बे पमज्जित्वा पच्छा सो नप्पमज्जति ।
सो'मं लोकं पभासेति अब्भा मुत्तो'व चन्दिमा ॥
(लोकवग्ग १३-६)

जो प्रथम प्रमाद-करून मग प्रमाद करीत नाहीं, तो या लोकाला मेघांतून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणें प्रकाशित करतो.

(१७७) एकं धम्मं अतीतस्स मुसावादिस्स जन्तुनो ।
वितिण्णपरलोकस्स नत्थि पापं अकारियं ॥
(लोकवग्ग १३-१०)

ज्यानें धर्माचें अतिक्रमण केलें आहे, जो असत्य भाषण करतो, ज्यानें परलोकाची चाड सोडली आहे, अशानें काय करावयाचें राहिलें आहे?

(१७८) न वे कदरिया देवलोकं वजन्ति
बाला ह वे न प्पसंसन्ति दानं ।
धीरो च दानं अनुमोदमानो
तेनेव सो होति सुखी परत्थ ॥
(लोकवग्ग १३-११)

कंजूष लोक हे देवलोकीं जात नाहींत. मूर्ख लोक दानाची प्रशंसा करीत नाहींत, पण जे पंडित आहेत ते दानास अनुमोदन देऊन त्यापासून परलोकांत सुखी होतात.

(१७९) किच्छो मनुस्स पटिलाभो किच्छं मच्चानं जीवितं ।
किच्छं सद्धम्मसवणं किच्छो बुद्धानं उप्पादो ॥
(बुद्धवग्ग १४-४)

मनुष्याचा जन्म येणें हें कठीण, त्याला जीवन मिळणें हेंहि तितकेंच कठीण. सद्धर्म ऐकण्यास मिळणें हें सुद्धां कठीणच. आणि बुद्धाचा जन्म येणें हें सर्वांत कठीण आहे.

(१८०) सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसम्पदा।
सचित्तपरियोदपनं, एतं बुद्धान सासनं॥

(बुद्धवग्ग १४-५)

कोणतेंहि पापकृत्य न करणें, तसेंच पुण्याचा संग्रह करणें आणि चित्त शुद्ध राखणें हीच बुद्धाची शिकवण आहे.

(१८१) खन्ती परमं तपो तितिक्खा,
निब्बाणं परमं वदन्ति बुद्धा।
नहि पब्बजितो परूपघाती
समणो होति परं विहेठयन्तो॥

(बुद्धवग्ग १४-६)

क्षमा हें परम तप आहे आणि तितिक्षा हें श्रेष्ठ निर्वाण आहे. असें बुद्ध सांगतात. दुसऱ्याचा घात करणारा हा प्रव्रजित होऊं शकत नाहीं. तद्वत् दुसऱ्याला पीडा देणारा हा श्रमणहि होऊं शकत नाहीं.

(१८२) अनुपवादो अनुपघातो पातिमोक्खे च संवरो।
मत्तञ्ञुता च भत्तस्मिं पन्तञ्च सयनासनं।
अधिचित्ते च आयोगो एतं बुद्धान सासनं॥

(बुद्धवग्ग १४-७)

निंदा न करणें, घात न करणें, प्रतिमोक्षद्वारा आपणास सुरक्षित राखणें, आहारांत नियमित राहणें, निवासस्थान गांवाबाहेर अगर अरण्यांत दूर करणें, चित्ताला योगांत निमग्न करणें ही बुद्धाची शिकवण आहे.

(१८३) अपि दिब्बेसु कामेसु रतिं सो नाधिगच्छति ।
तण्हक्खयरतो होति सम्मासम्बुद्धसावको ॥
(बुद्धवग्ग १४-९)

सर्व विषयभोग हे अल्पस्वाद व दुःखदायक आहेत. असें जाणून पंडित लोक हे देवलोकांतील भोगांतहि रति बाळगीत नाहींत. आणि सम्यक् संबुद्धाचे श्रावक हे तृष्णेचा नाश करण्यांत उद्युक्त असतात.

(१८४) यो च बुद्धञ्च धम्मञ्च सङ्घञ्च सरणं गतो ।
चत्तारि अरियसच्चानि सम्मप्पञ्ञाय पस्सति ॥
(बुद्धवग्ग १४-१२)

जो मनुष्य बुद्ध, धर्म व संघ यां त्रिवर्गाला शरण गेला व जो चारहि आर्यसत्यांचें प्रज्ञेच्या योगानें उत्तमप्रकारें आकलन करतो;

(१८५) एतं खो सरणं खेमं एतं सरणमुत्तमं ।
एतं सरणमागम्म सब्बदुक्खा पमुच्चति ॥
(बुद्धवग्ग १४-१४)

तो मनुष्य त्या चार सत्यांचें आश्रय करून सर्व दुःखांतून मुक्त होतो. म्हणून हा आश्रयच क्षेमकर असून तोच सर्वांत उत्तम आश्रय होय. या आश्रयाचा अवलंब केल्यानें मनुष्याची सर्व दुःखांतून मुक्तता होते.

(१८६) सुखो बुद्धानं उप्पादो सुखा सद्धम्मदेसना ।
सुखा संघस्स सामग्गी समग्गानं तपो सुखो ॥
(बुद्धवग्ग १४-१६)

बुद्धजन्म हा सुखदायक आहे. सद्धर्माचा उपदेश हाहि सुखदायकच आहे. आणि संघांतील एकोपा हा पण तितकाच सुखकारक आहे. तसेंच एकतायुक्त तपाचरण करणें हें सुद्धां सुखदायकच होय.

( १८७ ) सुसुखं वत जीवाम वेरिनेसु अवेरिनो ।
वेरिनेसु मनुस्सेसु विहराम अवेरिनो ॥
( सुखवग्ग १५ – १ )

वैरीलोकांत निर्वैर राहून मी सुखानें जीवन कंठीत आहे. आणि वैरीलोकांत निर्वैर राहून मी विहार करीत आहे.

( १८८ ) जयं वेरं पसवति दुक्खं सेति पराजितो ।
उपसन्तो सुखं सेति हित्वा जयपराजयं ॥
( सुखवग्ग १५–५ )

विजय हा वैर उत्पन्न करणारा आहे. कारण पराजित मनुष्य हा दुःखित होऊन झोंपी जातो. जो शांत झाला आहे, तो जय व पराजय यांचा त्याग करून सुखानें झोंपी जातो.

( १८९ ) नत्थि रागसमो अग्गि, नत्थि दोससमो कलि ।
नत्थि खन्धसमा दुक्खा नत्थि सन्तिपरं सुखं ॥
( सुखवग्ग १५–६ )

रागासमान अग्नि नाहीं. द्वेषासमान कलि नाहीं. पंचस्कंधासमान दुःख नाहीं आणि निर्वाणासमान सुख नाहीं.

( १९० ) जिघच्छा परमा रोगा, सङ्खारा परमा दुखा ।
एतं ञत्वा यथाभूतं निब्बाणं परमं सुखं ॥
( सुखवग्ग १५–७ )

भूक हा सर्वांत मोठा रोग आहे. संस्कार सर्वांत मोठें दुःख आहे. आणि हें जो जाणतो त्याला निर्वाण हें परमसुख आहे, हें कळून येतें.

(१९१) आरोग्य परमा लाभा सन्तुट्ठी परमं धनं।
विस्सासपरमा ञातो निब्बाणं परमं सुखं॥
(सुखवग्ग १५–८)

आरोग्य हा श्रेष्ठ लाभ आहे. संतोषवृत्ति हें परम धन आहे. विश्वास हा मोठा बधु आहे आणि निर्वाण हें श्रेष्ठ सुख आहे.

(१९१अ) माणियेहि समागच्छि अप्पियेहि कदाचन।
पियानं अदस्सनं दुक्खं अप्पियानञ्च दस्सनं॥
(पियवग्ग १६–२)

प्रिय वस्तूचा संग धरू नकोस. त्याचप्रमाणें अप्रिय वस्तूचाहि पण नको. कारण प्रिय वस्तूचें दर्शन झालें नाहीं, म्हणजे दुःख होतें आणि अप्रिय वस्तूचें झालें म्हणजेहि दुःखच होतें.

(१९२) पियतो जायते सोको पियतो जायते भयं।
पियतो विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं?॥
(पियवग्ग १६–४)

प्रियापासून शोक होतो आणि प्रियापासून भय होतें. जो प्रियापासून सुटला, त्याला मग शोक कुठचा आणि भय तरी कसलें?

(१९३) सीलदस्सनसम्पन्नं धम्मट्ठं सच्चवादिनं।
अत्तनो कम्म कुब्बानं तं जनो कुरुते पियं॥
(पियवग्ग १६–९)

शील व सम्यक् दृष्टि यानी जे संपन्न आहेत, तसेच जे धर्माचरणात रत आहेत, जे सत्य बोलतात, व जे कर्तव्यमग्न आहेत, त्याचें जन प्रियच करतात.

(१९४) कोधं जहे विप्पजहेय्य मानं ।
सञ्ञोजनं सब्बमतिक्कमेय्य ॥
तं नामरूपस्मिं अजसज्जमानं ।
अकिञ्चनं नानुपतन्ति दुक्खा ॥
(कोधवग्ग १७-१)

क्रोधाचा त्याग कर ! अभिमान टाकून दे ! सगळ्या संसारबंधनांतून मुक्त हो ! याप्रमाणें नामरूपांत आसक्त न होणारे आणि परिग्रहरहित असे जे आहेत त्यांना दुःख संताप देत नाहीं.

(१९५) अक्कोधेन जिने कोधं असाधुं साधुना जिने ।
जिने कदरियं दानेन सच्चेन अलिकवादिनं ॥
(कोधवग्ग १७-३)

अक्रोधानें क्रोधास जिंकावें. असाधूला साधुतेनें जिंकावें. कंजूषाला दानानें जिंकावें. व खोटें बोलणाऱ्याला सत्यानें जिंकावें.

(१९६) सच्चं भणे न कुज्झेय्य, दज्जा'प्पस्मिम्पि याचितो ।
एतेहि तीहि ठानेहि गच्छे देवान सन्तिके ॥
(कोधवग्ग १७-४)

सत्य बोलावें. क्रोध करूं नये. मागणारास द्यावें. या तीन गोष्टी केल्यानें मनुष्य देवाजवळ जातो.

(१९७) अहिंसका ये मुनयो निच्चं कायेन संवुता ।
ते यन्ति अच्चुतं ठानं यत्थ गन्त्वा न सोचिरे ॥
(कोधवग्ग १७-५)

जो हिंसारहित व आत्मसंयमी आहे तो अच्युतपद गांठतो. तेथें गेल्यावर मग त्याला शोकाचें कारणच रहात नाहीं.

(१९८) सदा जागरमानानं अहोरत्तानुसिक्खिनं ।
निब्बाणं अधिमुत्तानं अत्थं गच्छन्ति आसवा ॥
(कोधवग्ग १७-६)

सतत जागृत राहून रात्रदिवस जो योगाभ्यासात मग्न असतो व निर्वाणप्राप्तीकडे ज्याचें सगळें लक्ष असतें, त्याचे सर्व आस्रव नष्ट होऊन जातात.

( १९९ ) कायप्पकोपं रक्खेय्य कायेन संवुतो सिया ।
कायदुच्चरितं हित्वा कायेन सुचरितं चरे ॥
( कोधवग्ग १७-११ )

कायिक दुष्कृत्यापासून सावध रहा. तसेंच इंद्रियांचें संयमन कर. कायिक दुष्कृत्याचा त्याग करून सदाचरणाचें अनुसरण कर.

( २०० ) कायेन संवुता धीरा अथोवाचाय संवुता ।
मनसा संवुता धीरा ते वे सुपरिसंवुता ॥
(कोधवग्ग १७-१४)

ज्याचा शरीरावर, वाणीवर आणि मनावर ताबा आहे, असे ते पंडित लोक सुसंयमित होतात.

( २०१ ) पाण्डुपलासो व दानिसि, यमपुरिसापिच तं उपट्ठिता ।
उय्योगमुखे च तिट्ठसि पाथेय्यम्पि च ते न विज्जति ॥
(मलवग्ग १८-१)

तू आता पिकलेलें पान झाला आहेस. यमदूत जवळ येऊन उभे आहेत. तुझा अंतकाळ आता जवळ आला आहे. पण परलोकीच्या प्रवासाची शिदोरी तुझ्याजवळ तयार नाहीं.

( २०२ ) सो करोहि दीपमत्तनो खिप्पं वायम पण्डितो भव।
निद्धन्तमलो अनङ्गणो दिब्बं अरियभूमिमेहिसि ॥
( मलवग्ग १८–२ )

तूं आपलें द्वीप म्हणजे सुरक्षित स्थान कर ! आणि सतत उद्योगास लाग ! पंडित हो ! मळ धुवून काढ ! दोषरहित हो ! असें करशील तर आर्यांच्या दिव्यस्थानांप्रत जाशील.

( २०३ ) मलत्थिया दुच्चरितं मच्छेरं ददतो मलं।
मला वे पापका धम्मा अस्मिं लोके परम्हि च ॥
( मलवग्ग १८–८ )

स्त्रीजीवनावरचा मोठा कलंक म्हणजे व्यभिचार हा होय. दात्याचा कलंक म्हणजे कंजूषपणा होय. आणि पाप हा या लोकींचा व परलोकींचा म्हणजे उभयलोकींचा मळ आहे.

( २०४ ) ततो मला मलतरं अविज्जा परमं मलं।
एतं मलं पहत्वान निम्मला होथ भिक्खवो ॥
( मलवग्ग १८–९ )

त्याच्यापेक्षांहि वाईट मळ म्हणजे ही अविद्या होय. इतकेंच नव्हे, तर सर्व मळांमध्यें ती अत्यंत वाईट मळ आहे. म्हणून भिक्षूनो ! या अविद्यामलाचा सर्वस्वी त्याग करा ! आणि मोत्याप्रमाणें निर्मल व्हा !

( २०५ ) सुरामेरयपानञ्च यो नरो अनुयुञ्जति।
इधेवमेसो लोकस्मिं मूलं खनति अत्तनो ॥
( मलवग्ग १८–१३ )

जो प्राणिहिंसा करतो, जो खोटें बोलतो, जो चोरी करतो, जो व्यभिचार करतो, जो दारू पितो, असा जो आहे, तो आपला खड्डा आपल्या हातानेंच खणून तयार करतो.

( २०६ ) नत्थि रागसमो अग्गि नत्थि दोससमो गहो ।
नत्थि मोहसमं जालं नत्थि तण्हासमा नदी ॥
( मलवग्ग १८-१७ )

रागासारखा अग्नि नाहीं. द्वेषासारखा ग्रह नाहीं. मोहासारखा पाश नाहीं आणि तृष्णेसारखी नदी नाहीं.

( २०७ ) सुदस्सं वज्जमञ्ञेसं अत्तनो पन दुद्दसं ।
परेसं हि सो वज्जानि ओपुणाति यथाभुसं ।
अत्तनो पन छादेति कलिं'व कितवा सठो ॥
( मलवग्ग १८-१८ )

दुसऱ्याचे दोष पाहणें हें फार सोपें आहे. पण आपले दोष पाहणें हें मोठें कठीण आहे. भुशाप्रमाणे दुसऱ्याचे दोष उधळीत मनुष्य गांवभर धुंडत फिरतो. पण जुगारी जसा खोटया दानाला लपवितो, तद्वत् तो आपले स्वतःचे दोष लपवून ठेवितो.

( २०८ ) न तेन पण्डितो होति यावता वहु भासति ।
खेमी अवेरी अभयो पण्डितो'ति पवुच्चति ॥
( धम्मट्ठवग्ग १९-३ )

फार बोलतो म्हणून मनुष्य कांहीं पंडित होत नाहीं. जो क्षेमवान, निर्वैर व निर्भय आहे, त्यालाच पंडित म्हणतात.

( २०९ ) न तेन थेरो होति येन'स्स पलितं सिरो ।
परिपक्को वयो तस्स मोघजिण्णो'ति वुच्चति ॥
( धम्मट्ठवग्ग १९-५ )

डोक्याचे केस पिकले म्हणून कांहीं मनुष्य स्थविर होत नाहीं. फक्त त्याचें आयुष्यमात्र पक्क झालें असें होतें. अशास लोक तुच्छतेनें 'म्हातारडा' असें म्हणतात.

(२१०) यम्हि सच्चञ्च धम्मो च अहिंसा सञ्ञोमो दमो ।
स वे वन्तमलो धीरो थेरो'ति पवुचति ॥
(धम्मट्ठवग्ग १९–६)

परंतु ज्याच्यामध्यें सत्य, धर्म, अहिंसा, संयम आणि दम आहे तोच निर्मल, तोच धीर आणि तोच स्थविर होय.

(२११) यो'ध पुञ्ञञ्च पापञ्च वाहित्त्वा ब्रम्हचरियवा ।
सङ्खाय लोके चरति स वे भिक्खू'ति वुच्चति ॥
(धम्मट्ठवग्ग १९–१२)

जो यालोकीं पुण्य व पाप या दोहोंचाहि त्याग करून, ब्रह्मचारी राहून ज्ञानी लोकांच्या सहवासांत फिरतो, त्याला भिक्षु असें म्हणतात.

(२१२) मग्गानट्ठङ्गिको सेट्ठो सच्चानं चतुरो पदा ।
विरागो सेट्ठोधम्मानं द्विपदानञ्च चक्खुमा ॥
(मग्गवग्ग २०–१)

सर्व मार्गांत अष्टांगिक मार्ग हा श्रेष्ठ आहे, सत्यधर्मांत चारपाद म्हणजे चार आर्यसत्यें हीं श्रेष्ठ आहेत. धर्मांत वैराग्य हें श्रेष्ठ आहे. आणि मनुष्यांत ज्ञानचक्षु असलेला मनुष्य श्रेष्ठ आहे.

(२१३) सब्बे सङ्खारा अनिच्चा'ति यदा पञ्ञाय पस्सति ।
अथ निब्बन्दति दुक्खे, एस मग्गो विसुद्धिया ॥
(मग्गवग्ग २०–५)

सर्व संस्कार अनित्य आहेत, हें जेव्हां मनुष्य ज्ञानचक्षूनें ओळखतो, तेव्हां तो सर्व दुःखापासून निर्वेद पावतो. हाच निर्वाणाचा मार्ग होय.

(२१४) सब्बे धम्मा अनत्ता'ति यदा पञ्ञाय पस्सति ।
अथ निब्बन्दति दुक्खे एस मग्गो विसुद्धिया ॥
(मग्गवग्ग २०–७)

सर्व धर्म म्हणजे पंचस्कंध हे अनात्म आहेत, हें जेव्हां मनुष्य प्रज्ञेनें ओळखतो तेव्हां तो सर्व दुःखांतून निर्वेद पावतो. निर्वाणाचा हाच मार्ग होय.

(२१५) उच्छिन्द सिनेहमत्तनो कुमुदं सारदिकं'व पाणिना।
सन्तिमग्गमेव ब्रूहय निब्बानं सुगतेन देसितं॥
(मग्गवग्ग २०–१३)

शरद् ऋतूंतील कमल ज्याप्रमाणें हातानें तोडून टाकावें, त्याप्रमाणें आत्म्यावरील प्रेम खुडून काढा! आणि शांतिमार्गाकडे–म्हणजे सुगतकथित निर्वाणाकडे वळा!

(२१६) तं पुत्तपसुसम्मत्तं ब्यासत्तमनसं नरं।
सुत्तं गामं महोघो'व मच्चू आदाय गच्छति॥
(मग्गवग्ग, २०–१५)

महापूर हा जसा सुप्त गांवाला वाहून नेतो, तद्वत् ज्याचें मन पुत्र-पशु इत्यादिकांच्या प्रेमपाशांत अडकून पडलें आहे, त्याला मृत्युराज पकडून घेऊन जातो.

(२१७) न सन्ति पुत्ता ताणाय न पिता नापि बन्धवा।
अन्तकेनाधिपन्नस्स नत्थि ञातिसु ताणता॥
(मग्गवग्ग २०–१६)

जेव्हां यमाचा पाश गळ्यांत पडेल, तेव्हां पुत्र त्याचें रक्षण करूं शकत नाहीं. बाप नाहीं. बांधवहि नाहींत. जेव्हां मृत्यूची झडप पडेल, तेव्हां ज्ञातिबांधव त्याचें त्यापासून रक्षण करण्यास अगदीं असमर्थ आहेत.

( २१८ ) एतमत्थवसं ञत्वा पण्डितो सीलसंवुतो ।
निब्बाणगमनं मग्गं खिप्पमेव विसोधये ॥
( मग्गवग्ग २०-१७ )

ही गोष्ट ओळखून शीलसंपन्न अशा ज्ञानी मनुष्यानें निर्वाणाचा मार्ग साफ करून ठेवावा.

( २१९ ) सद्धा सीलेन सम्पन्नो यसोभोगसमप्पितो ।
यं यं पदेसं भजति तत्थ तत्थेव पूजितो ॥
( पकिण्णकवग्ग २१-१४ )

श्रद्धावान्, शीलवान्, यश व भोग यांनी संपन्न असा पुरुष जाईल तेथें तो आदरसत्कारार्हच होतो.

( २२० ) अपुञ्ञलाभो च गती च पापिका ।
भीतस्स भीताय रती च थोकिका ॥
राजा च दण्डं गरुकं पणेति ।
तस्मा नरो परदारं न सेवे ॥ ( निरयवग्ग २२-५ )

प्रमाद करणारा व परदारागमन करणारा जो पुरुष आहे, त्याच्या या चार गति आहेत. ( १ ) त्याला पुण्य लाभत नाहीं. ( २ ) सुखानें झोंप येत नाहीं. ( ३ ) लोकांत निंदा होते आणि ( ४ ) मरणोत्तर नरक प्राप्त होतो.

( २२१ ) अकतं दुक्कतं सेय्यो पच्छा तपति दुक्कतं ।
कतञ्च सुकतं सेय्यो यं कत्वा नानुतप्पति ॥
( निरयवग्ग २२-९ )

दुष्कृत्य न करणें हें श्रेष्ठ आहे. कारण जो दुष्कृत्य करतो. तो नंतर पश्चात्तापांत पडतो. पुण्यकर्म करणें हें श्रेष्ठ आहे. कारण त्यापासून मनुष्याला ताप होत नाहीं.

(२२२) वज्जञ्च वज्जतो ञत्वा अवज्जञ्च अवज्जतो ।
सम्मादिट्ठिसमादाना सत्ता गच्छन्ति सुग्गतिं ॥
(निरयवग्ग २२–१४)

दोपाला दोप व अदोपाला अदोप जाणणारे प्राणी सुगतीला जातात.

(२२३) अहं नागो'व सङ्गामे चापतो पतितं सरं ।
अतिवाक्यं तितिक्खिस्सं दुस्सीलो हि बहुज्जनो ॥
(नागवग्ग २३–१)

संग्रामांत हत्ती जसा शत्रूच्या धनुष्यांतून सुटलेले बाण सहन करतो, तद्वत मीहि दुर्जनांच्या दुर्भाषणास सहन करीन. कारण जगांत दुःशील लोकांचाच भरणा अधिक आहे.

(२२४) दन्तं नयन्ति समितिं दन्तं राजाभिरूहति ।
दन्तो सेट्ठो मनुस्सेसु यो'तिवाक्यं तितिक्खति ॥
(नागवग्ग २३–२)

शिकून सहनशील झालेल्या हत्तीला युद्धांत घेऊन जातात. अशा दान्त हत्तीवरच राजा आरोहण करतो. मनुष्यांत जो स्वतःचें दमन करणारा आहे, तो श्रेष्ठ आहे. कारण तो दुसऱ्याचें कठोर भाषण सहन करतो.

(२२५) सुखा मेत्तय्यता लोके अथो पेत्तेय्यता सुखा ।
सुखा सामञ्ञता लोके अथो ब्रम्हञ्ञता सुखा ॥
(नागवग्ग २३–१३)

संसारांत आईबापाची सेवा ही मोठी सुखकर आहे. तसाच श्रमणभाव हा सुखकर आहे. आणि ब्राह्मणत्व हें झालें तरी सुखकरच आहे.

( २२६ ) सुखं याव जरा सीलं सुखा सद्धा पतिट्ठिता ।
सुखो पञ्ञाय पटिलाभो पापानं अकरणं सुखं ॥
( नागवग्ग २३–१४ )

वृद्धावस्थेपर्यंत शीलाचें पालन करणें हें सुखकर आहे, दृढ श्रद्धा बाळगणें हेंहि सुखकर आहे. त्याचप्रमाणें ज्ञानाचा लाभ हाहि सुखकरच आणि पाप न करणें हेंहि सुखकरच होय.

( २२७ ) मनुजस्स पमत्तचारिनो तण्हा वड्ढति मालुवा विय ।
सो पलवती हुराहुरं फलमिच्छं'व वनस्मिं वानरं ॥
( तण्हावग्ग २४–१ )

बेहोष होऊन आचरण करणाऱ्या मनुष्याची भोगतृष्णा 'मालुव' वेलीप्रमाणें वाढतच जाते. वनांत फलाच्या इच्छेनें या झाडावरून त्या झाडावर, त्या झाडावरून या झाडावर उडत फिरणाऱ्या वानराप्रमाणें तो तृष्णामूढ मनुष्य जन्मजन्मांतरीं सारखा भटकतच फिरतो.

( २२८ ) यथापि मूले अनुपद्दवे दळ्हे ।
छिन्नेपि रुक्खो पुनरेव रूहति ॥
एवम्पि तण्हानुसये अनूहते ।
निब्बत्तति दुक्खमिदं पुनप्पुनं ॥
( तण्हावग्ग २४–५ )

मूळ उखडून न टाकतां नुसता वरवरच छाटलेला वृक्ष जसा पुनः वाढ घेतो तसें तृष्णेची खवखव समूळ नष्ट न झाल्यास या दुःखरूपी संसारचक्रांत पुनः पुनः भ्रमण करणें भाग आहे.

( २२९ ) न तं दळ्हं बन्धनमाहु धीरा यदायसं दारुजं पब्बजञ्च ।
सारत्तरत्ता मणिकुण्डलेसु पुत्तेसु दारेसु च या अपेक्खा ॥
( तण्हावग्ग २४–१२ )

येथें जगांत लोखंड, लांकूड अगर दोरी यांचें जें बंधन आहे, त्यास बुद्धिमान् लोक बळकट बंधन समजत नाहींत. तर हिरेमाणिक, कडींकुंडलें, पुत्रदारा इत्यादिकांवरची जी दृढ आसक्ति तिलाच दृढ बंधन समजतात.

(२३०) सब्बदानं धम्मदानं जिनाति।
सब्बरसं धम्मरसो जिनाति॥
सब्बं रतिं धम्मरती जिनाति।
तण्हक्खयो सब्बदुक्खं जिनाति॥

(तण्हावग्ग २४–२१)

धर्मदान हें इतर सर्व दानांहून श्रेष्ठ दान आहे. धर्मरस हा इतर सर्व रसाहूनहि श्रेष्ठ रस आहे. धर्मरति इतर सर्व रतीहून श्रेष्ठ रति आहे. आणि तशांत तृष्णाक्षय हा तर सर्व दुःखाला जिंकणारा आहे.

(२३१) तिणदोसानि खेत्तानि रागदोसा अयं पजा।
तस्मा हि वीतरागेसु दिन्नं होति महप्फलं॥

(तण्हावग्ग २४–२३)

तृण हा शेताचा मळ म्हणजे दोष आहे. आणि राग हा मनुष्याचा दोष आहे. अतएव जो रागरहित आहे, त्यालाच दान देणें हें परम फलदायक होय.

(२३२) चक्खुना संवरो साधु, साधु सोतेन संवरो।
घाणेन संवरो साधु साधु जिव्हाय संवरो॥

(२३३) कायेन संवरो साधु, साधु वाचाय संवरो।
मनसा संवरो साधु साधु सब्बत्थ संवरो ॥
(भिक्खुवग्ग २५-२)

देहाचें दमन हितकर; वाणीचें दमन हितकर; मनाचें दमन हितकर, अर्थात् सर्व इंद्रियांचें दमन हें हितकर व सुखकर होय. जो भिक्षू याप्रमाणें सर्वत्र दमनयुक्त असतो तो सर्व दुःखांतून पार होतो.

(२३४) धम्मारामो धम्मरतो धम्मं अनुविचिन्तयं।
धम्मं अनुस्सरं भिक्खू सद्धम्मा न परिहायति ॥
(भिक्खुवग्ग २५-५)

धर्मांत रममाण होणारे, धर्मांत रत होणारे, धर्माचें चिंतन करणारे, धर्माचें अनुसरण करणारे भिक्षू हे सद्धर्मापासून चळत नाहींत.

(२३५) मेत्ताविहारी यो भिक्खू पसन्नो बुद्धसासने।
अधिगच्छे पदं सन्तं सङ्खारूपसमं सुखं ॥
(भिक्खुवग्ग २५-९)

जो मित्राबरोबर विहार करतो व बुद्धशासनांत प्रसन्न राहतो, तो भिक्षू सर्व संस्काराचें उपशमन करणारें व अत्यंत सुखमय अशा निर्वाण-पदाप्रत प्राप्त होतो.

(२३६) झाय भिक्खू! मा च पमादो।
मा ते कामगुणे रमस्सु चित्तं ॥
मा लोहगुळं गिलि पमत्तो।
मा कन्दि 'दुक्खमिदं'ति दह्यमानो ॥
(भिक्खुवग्ग २५-१२)

हे भिक्षो! ध्यानांत मग्न होऊन रहा! आळसांत पडून राहूं नकोस! चित्ताला विषयभोगांत भटकूं देऊं नकोस! प्रमत्त होऊन तापलेला लोखंडाचा लाल गोळा गिळूं नकोस! कारण तो जाळूं लागला म्हणजे हाय हाय करीत रडत बसण्याचा प्रसंग येणार नाहीं.

(२३७) नत्थि झानं अपञ्ञस्स पञ्ञा नत्थि अज्झायिनो।
यम्हि झानञ्च पञ्ञा च स वे निब्बानसन्तिके॥
(भिक्खुवग्ग २५-१३)

जो प्रज्ञाविहीन आहे, त्याला ध्यान साधणार नाहीं. आणि जो ध्यानहीन आहे, त्याला प्रज्ञा साधणार नाहीं. ज्याच्यांत ध्यान व प्रज्ञा हीं दोन्हीं आहेत, तोच निर्वाणाच्या समीप गेला आहे.

(२३८) सन्तकायो सन्तवाचो सन्तवा सुसमाहितो।
वन्तलोकामिसो भिक्खू उपसन्तो'ति वुच्चति॥
(भिक्खूवग्ग २५-१९)

शरीर व वाणीनें शांत, सुसमाहित, जगांतील सर्व आमिषें वमन करून टाकलेला, अशा सुशांत भिक्षूला उपशांत असें म्हणतात.

(२३९) अत्तना चोदयत्तानं पटिमंसेथ अत्तना।
सो अत्तगुत्तो सतिमा सुखं भिक्खु विहाहिसि॥
(भिक्खूवग्ग २५-२०)

जो स्वतःच स्वतःला प्रेरित करतो, जो स्वतःच स्वतःला संलग्न करतो, तो आत्मगुप्त स्मृतिमान भिक्षु सुखानें विहार करतो.

(२४०) अत्ता हि अत्तनो नाथो, अत्ता हि अत्तनो गति।
तस्मा संयमय'त्तानं अस्सं भद्रं व वाणिजो॥
(भिक्खूवग्ग २५-२१)

मनुष्य हा स्वतःच स्वतःचा मालक आहे. स्वतःच स्वतःची गति आहे. म्हणून वाणी हा ज्याप्रमाणे आपला घोडा कह्यांत ठेवितो, तद्वत मनुष्यानें स्वतःला आपल्या कह्यांत ठेवावें.

(२४१) यो हवे दहरो भिक्खु युञ्जती बुद्धसासने।
सो'मं लोकं पभासेति अब्भा मुत्तो व चन्दिमा॥
(भिक्खूवग्ग २५-२३)

जो अल्पवयस्क भिक्षु बुद्धशासनांत संलग्न आहे, तो मेघमुक्त चंद्राप्रमाणें या लोकाला प्रकाशित करतो.

(२४२) दिवा तपति आदिच्चो रत्तिमाभाति चन्दिमा।
सन्नद्धो खत्तियो तपति झायी तपति ब्राम्हणो॥
अथ सब्बमहोरत्तं बुद्धो तपति तेजसा।
(ब्राम्हणवग्ग २६-५)

सूर्य हा दिवसा प्रकाशतो. चंद्र हा रात्रीं प्रकाशतो. भूषणांनी विभूषित झाल्यावर राजा हा प्रकाशतो. ब्राह्मण हा ध्यानमग्न झाला म्हणजे प्रकाशतो आणि बुद्ध हा रात्रंदिवस प्रकाशत असतो.

(२४३) यस्स कायेन वाचाय मनसा नत्थि दुक्कटं।
संवुतं तीहि ठानेहि तमहं ब्रूमि ब्राम्हणं॥
(ब्राम्हणवग्ग २६-९)

ज्याचेकडून काया, वाचा, मनें पाप घडत नाहीं, व जो या तीनहि ठिकाणीं संयत आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

(२४४) न जटाहि न गोत्तेन न जच्चा होति ब्राम्हणो।
यम्हि सच्चञ्च धम्मो च सो सुची सो च ब्राम्हणो॥
(ब्राम्हणवग्ग २६-११)

जटानें, गोत्रानें अगर जन्मानें कोणी ब्राह्मण होत नाहीं. तर ज्याच्यांत सत्य व धर्म आहे तोच पवित्र व तोच ब्राह्मण होय.

( २४५ ) किं ते जटाहि दुम्मेध ! किं ते अजिनसाटिया ।
अब्भन्तरं ते गहणं बाहिरं परिमज्जसि ॥
( ब्राम्हणवग्ग २६–१२ )

हे मूर्खा ! जटा वाढवून तुला काय मिळणार आहे ? मृगचर्म पांघरूनतरी काय लाभ होणार आहे ? आंत रागादि मलाने तुझें अंतःकरण पूर्ण भरलेलें असतां, बाहेरून आंग धुवून काय होणार आहे ?

( २४६ ) न चाहं ब्राम्हणं ब्रूमि योनिजं मत्तिसंभवं ।
'भो'वादि नाम सो होति सचे होति अकिञ्चनो ।
अकिञ्चनं अनादानं तमहं ब्रूमि ब्राम्हण ॥
( ब्राह्मणवग्ग २६–१४ )

ब्राह्मण-आईच्या उदरांतून जन्मास आला म्हणून मी कोणाला ब्राह्मण म्हणत नाहीं तो 'भो वादी' आहे. आणि तो सुखवस्तु आहे. त्यालाच मी ब्राह्मण म्हणतो कीं, जो अपरिग्रही व त्यागी आहे.

( २४७ ) सब्बसंयोजनं छेत्वा यो वे न परितस्सति ।
संगातिगं विसंयुत्तं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥
( ब्राम्हणवग्ग २६–१५ )

ज्यानें सारीं संसारबंधनें तोडून टाकलीं आहेत, जो निर्भय, संगरहित व आसक्तिरहित आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतो.

( २४८ ) अक्कोसं वधबन्धञ्च अदुट्ठो यो तितिक्खति ।
खन्तिबलं बलानीकं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥
( ब्राम्हणवग्ग २६–१७ )

जो निर्विकार मनानें शिवीगाळ, आणि वध-बंधनें यांस सहन करतो. क्षमाबल हें ज्याच्या सेनेचा सेनापति आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतो.

( २४९ ) निधाय दण्डं भूतेसु तसेसु थावरेसु च ।
योन हन्ति न घातेति तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥
( ब्राम्हणवग्ग २६–२३ )

सर्व चराचर भूतमात्रांच्या ठायीं दंडाला सोडचिठी दिली आहे. जो प्राणिवध करीत नाहीं व करण्यास प्रोत्साहन देत नाहीं, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतों.

( २५० ) अविरुद्धं विरुद्धेसु अत्तदण्डेसु निब्बुतं ।
सादानेसु अनादानं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥
( ब्राम्हणवग्ग २६–२४ )

जो विरोधकांमध्यें विरोधरहित असतो, दंडधारकांमध्यें दंडहीन असतो, जो संग्रहकरणारांत संग्रहहीन असतो, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतो.

( २५१ ) आसा यस्स न विज्जन्ति अस्मिं लोके परम्हि च ।
निरासयं विसंयुत्तं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥
( ब्राम्हणवग्ग २६–२८ )

इहलोक व परलोक या उभयलोकांतहि ज्याची आशा गुंतून राहिली नाहीं, जो आशारहित व आसक्तिरहित झाला आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतो.

( २५२ ) यो'ध पुञ्ञञ्च पापञ्च उभो सङ्गं उपच्चगा ।
असोकं विरजं सुद्धं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥
( ब्राम्हणवग्ग २६–३० )

ज्यानें इहलोकीं पुण्य व पाप या दोहोंची आसक्ति पूर्ण सोडून दिली आहे, जो शोकरहित झाला आहे, जो निर्मळ व शुद्ध आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतो.

( २५३ ) यस्स गतिं न जानन्ति देवागन्धब्बमानुसा ।
खीणासवं अरहन्तं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥
( ब्राम्हणवग्ग २६–३८ )

जो प्राण्यांचा जन्म व मृत्यु हीं उत्तमप्रकारें जाणतो, जो आसक्तिरहित आहे, जो सुगतीस प्राप्त झाला आहे, व जो ज्ञानी आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतो.

( २५४ ) उसभं पवरं वीरं महेसिं विजिताविनं ।
अनेजं नहातकं बुद्धं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥
( ब्राम्हणवग्ग २६–४० )

ज्याच्यापुढें, मागें व मध्यें कांहीं नाहीं, जो अकिंचन व परिग्रहरहित आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतो.

( २५४ अ ) पुब्बेनिवासं यो वेदि सग्गापायञ्च पस्सति ।
अथो जातिक्खयंपत्तो अभिञ्ञावोसितो मुनि ।
सब्बवोसितवोसानं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥

## उदान

(२५५) न उदकेन सुचि होति, बह्वेत्थ न्हायती जनो ।
यम्हि सच्चञ्च धम्मो च सो सुचि सो च ब्राम्हनो'ति ॥
(जटिलसुत्त १-१-९)

बहुतकाळापासून लोक स्नान करीत आले आहेत. पण उदकानें कांहीं शुचिर्भूतता प्राप्त होत नाहीं. पण सत्य व सदाचरण हीं ज्याच्यामध्यें वास करीत आहेत, तोच खरा शुचिर्भूत आणि तोच खरा ब्राह्मण।

(२५६) यत्थ आपो च पठवी तेजो वायो गाधनि ।
न तत्थ सुक्का जोतन्ति आदिच्चो न प्पकासति ॥
न तत्थ चन्दिमा भाति तमो तत्थ न विज्जति ।
यदा च अत्तना वेदि मुनि सो तेन ब्राम्हणो ॥
अथ रूपा अरूपा च सुखदुक्खा पमुच्चती'ति ॥
(बाहिय सुत्त १०-१-१०)

असें एक स्थान आहे कीं जेथें पृथ्वी नाहीं, उदक नाहीं, तेज नाहीं व वायूहि नाहीं. तेथें नक्षत्रें प्रकाशत नाहींत. सूर्य प्रकाशत नाहीं. चंद्रहि प्रकाशत नाहीं. आणि अंधकारहि पण नाहीं. जेव्हां गाढ अशा समाधींत ब्राह्मणाला सत्याचें दर्शन होतें, तेव्हां तो रूप व अरूप या लोकांपासून आणि सुखदुःखांतून मुक्त होतो.

(२५७) यं च कामसुखं लोके यं चिदं दिवियं सुखं ।
तण्हक्खयसुखस्स ते कलं नग्घन्ति सोळसिन्ति ॥
(राजसुत्त १२-२-२)

जगांत जें कामसुख आहे आणि स्वर्गांत जें दिव्य सुख आहे, तें सर्व तृष्णाक्षयापासून जो आनंद होतो, त्याच्या सोळाव्या अंशाची देखील बरोबरी करूं शकत नाहीं।

( २५८ ) पियरूपा सातगधिता वे देवकाया पुथुमानुसा च ॥
अघाविनो परिजुन्ना मच्चुराजस्स वसं गच्छन्ति ॥
ये वे दिवा च रत्तो च अप्पमत्ता जहन्ति पियरूपं ।
ते वे खणन्ति अघमूलं मच्चुनो आमिसंदुरतिवत्तन्ति ॥
( एकपुत्तसुत्त ( १७–२–७ )

तो देव असो वा मनुष्य असो, जो संसारावर आसक्ति ठेवून त्यांतच रंगून व गढून जातो, तो पाप अगर पुण्यांचा अधिकारी होऊन, अखेर मृत्युराजाच्या कक्षांत जातो.

( २५९ ) यथा पि पब्बतो सेलो अचलो सुप्पतिट्ठितो ।
एवं मोहक्खया भिक्खू पब्बतो'व न वेधती'ति ॥
( सारिपुत्तसुत्त २४–३–४ )

ज्या प्रमाणें पर्वताचा पहाड अचल व सुप्रतिष्ठित असतो, तद्वत् मोहक्षय झालेला पर्वताप्रमाणें चलन पावत नाहीं.

( २६० ) यम्हि न माया वत्तति न मानो ।
यो खीणलोभो अममो निरासो ॥
पणुन्नकोधो अभिनिब्बुतत्तो ।
सो ब्राम्हणो सो समणो स भिक्खू ति ॥
( पिलिन्द सुत्त २६–३–६ )

ज्याच्यांत कपट अगर अभिमान लवमात्रहि नाहीं, जो निर्लोभ झाला आहे, जो ममत्वशून्य आहे, क्रोधरहित आहे, सर्व विवंचनेंतून सुटला आहे, तोच ब्राह्मण, तोच श्रमण आणि तोच भिक्षू होय !

( २६१ ) यस्स सेलूपमं चित्तं ठितं नानुपकप्पति ।
विरत्तं रजनीयेसु कोपनेय्ये न कुप्पति ॥
यस्स एवं भावितं चित्तं कुतो तं दुक्खमेस्सती'ति ॥
( जुण्हा सुत्त ३४-४-४ )

ज्याचें मन खडकाप्रमाणें स्थिर व अविकंपित आहे आणि प्रिय-विषयांच्या ठायीं विरक्त झालें आहे, जो रागावलेल्यावर राग धरत नाहीं, याप्रमाणें ज्याचें चित्त सुभावित आहे, त्याला दुःख कोठून शिवेल ?

( २६२ ) सुकरं साधुना साधु साधु पापेन दुक्करं ।
पापं पापेन सुकरं, पापं अरियेभि दुक्करं'ति ॥
( नन्दसुत्त ४८-५-८ )

जे सज्जन आहेत, त्यांना सत्कर्म करणें हें सोपें आहे. पण दुष्कर्म करणें हें त्यांना फार कठीण जातें. जे स्वभावाचेच दुष्ट आहेत, त्यांना दुष्कर्म करणें हें फार सोपें आहे. पण जे साधु पुरुष आहेत, त्यांना दुष्कर्म करणें हें मोठें कठीण जातें.

( २६३ ) अत्थि भिक्खवे ! तदायतनं, यत्थ नेव पठवी न आपो न तेजो न वायो न आकासानञ्चायतनं न विञ्ञाणानञ्चायतनं न अकिञ्चञ्ञायतनं न नेवसञ्ञानासञ्ञायतनं नायं लोको न परोलोको उभो चन्दिमसूरिया, तदाहं भिक्खवे नेव आगतिं वदामि न गतिं न ठितिं न चुतिं न उपपत्तिं अप्पतिट्ठं अपावत्तं अनारम्मणमेव तं एसे'वन्तो दुक्खस्स'ति ॥ ( निब्बाण सुत्त ७१-८-१ )

भिक्षूहो ! असें एक आयतन म्हणजे स्थान आहे कीं जेथें पृथ्वी नाहीं, जल नाहीं, तेज नाहीं व वायुहि नाहीं. तसेंच तेथें आकाश-आयतन, विज्ञान-आयतन, अकिञ्चन-आयतन किंवा नेवसंज्ञानासंज्ञा-आयतन यांत कोणतेंच आयतन नाहीं. तेथें हा लोकहि नाहीं, परलोकहि नाहीं. त्याचप्रमाणें तेथें चंद्रहि नाहीं व सूर्यहि नाहीं. भिक्षूहो ! तेथें जाणें नाहीं व येणें नाहीं. तेथें स्थिति नाहीं व च्युति नाहीं. तें आधाररहित आहे. संसरणरहित आहे. आवलंबनरहित आहे. तेथेंच सर्व दुःखाचा अंत आहे.

(२६४) दुद्दसं अनत्तं नाम, न हि सच्चं सुदस्सनं ।
पटिविद्धा तण्हा जानतो, पस्सतो न'त्थि किञ्चनं'ति ॥

(निब्बाणसुत्त ७२-८-२)

अनत्ताचें ज्ञान होणें हें मोठें कठीण आहे. आणि सत्य उमजणें हें कांहीं सोपें नाहीं.

(२६५) अत्थि भिक्खवे ! अजातं अभूतं अकतं असंखतं, नो चेतं भिक्खवे ! अभविस्स अजातं अभूतं अकतं असङ्खतं, न यिध जातस्स भूतस्स कतस्स सङ्खतस्स निस्सरणं पञ्ञायेथ। यस्मा भिक्खवे ! अत्थि अजातं अभूतं अकतं असङ्खतं, तस्मा जातस्स भूतस्स कतस्स सङ्खतस्स निस्सरणं पञ्ञायती'ति ॥

(निब्बाणसुत्त ७३-८-३)

भिक्षूहो ! अजात, अभूत, अकृत व असंस्कृत असें एक आहे. कारण हें अजात, अभूत, अकृत व असंस्कृत जर नसतें, तर, भिक्षूहो ! जात, भूत, कृत व संस्कृत यापासून मुक्तीचें ज्ञान झालें नसतें. आणि ज्याअर्थी, भिक्षूहो ! अजात, अभूत, अकृत व असंस्कृत हें आहे, त्याअर्थी जात, भूत, कृत व संस्कृत यां-पासून मुक्तीचें ज्ञान प्रतीत होतें.

(२६६) निस्सितस्स च चलितं अनिस्सितस्स चलितं न'त्थि, चलिते असति पस्सद्धि, पस्सद्धिया सति रति न होति, रतिया असति आगतिगति न होति, आगतगतिया असति चुतूपपातो न होति, चुतूपपाते असति नेवेध न हुरं न उभयमन्तरे, एसेव'न्तो दुक्खस्सा'ति ॥

(निब्बाणसुत्त ७४-८-४)

जें निस्सित म्हणजे आश्रित आहे. तेंच चलन पावतें. जें अनिस्सित म्हणजे आधाररहित आहे, तें चळन पावत नाहीं. आणि जेथें चलन नाहीं, तेथेंच शांतीचा वास आहे. जेथें शांति आहे, तेथें रति नाहीं. जेथें रति नाहीं तेथें आगति व गति-म्हणजे येणें जाणें-नाहीं, जेथें येणें-जाणें नाहीं, तेथें जन्ममृत्यु नाहींत. तेथें हा लोकहि नाहीं व परलोकहि नाहीं. उभयलोकहि नाहींत. हाच दुःखाचा अंत होय.

(२६७) ये केचि सोका परिदेविता वा दुक्खा च लोकस्मिं अनेक-रूपा। पियं पटिच्च भवन्ति ये ते, पिये असन्ते न भवन्ति ये ते। तस्माहि ते सुखिनो वीतसोका येसं पियं नत्थि कुहिञ्चि लोके। तस्मा असोकं विरजं पत्थमानो पियं कयिराथ कुहिंञ्चि लोके'ति ॥

(विसाखा सुत्त ७८-८-८)

विशाखे! जगांत जो कांहीं शोक आहे, मनस्ताप आहे, दुःख आहे, तें सर्व आसक्तीपासून प्रेमापासून-उत्पन्न होतें. आसक्ति नसेल -प्रेम जर नसेल-तर दुःखशोकादि नाहींत. म्हणून या जगांत जे प्रेमरहित झाले आहेत, तेच खरोखर सुखी होत. तेच खरोखर दुःखमुक्त होत. म्हणून विशाखे! तूं जगांत कोणत्याहि वस्तूवर प्रेम अगर आसक्ति ठेवूं नकोस! (तरच तूं दुःखमुक्त व सुखी होशील.)

## इति-वुत्तक

( २६८ ) येन लोभेन लुद्धासे सत्ता गच्छन्ति दुग्गतिं ।
तं लोभं सम्मदञ्ञाय पजहन्ति विपस्सिनो ।
पहाय न पुनायन्ति इमं लोकं कुदाचनन्ति ॥
( रागसुत्त १–१–१ )

ज्या लोभानें लुब्ध होऊन लोक दुर्गतीस जातात, अशा त्या लोभाचें यथार्थ ज्ञान करून घेऊन ज्ञानी जन त्याचा त्याग करतात. आणि अशा लोभाचा त्याग केल्यावर ते पुनः कांहीं या लोकीं जन्म पावत नाहींत.

( २६९ ) मानुपेता अयं पजा मानगन्था भवे रता ।
मानं अपरिजानन्ता आगन्तारो पुनब्भवं ॥
ये च मानं पहत्वान विमुत्ता मानसङ्खये ।
ते मानगन्थाभिभूनो सब्बदुक्खं उपच्चगुन्ति ॥
( मानसुत्त १–१–८ )

अहंकारानें ग्रस्त झालेली अशी ही प्रजा असून, त्याच्या बंधनामुळेंच ती संसारांत रममाण झाली आहे. आणि जे त्या अहंकाराला जाणत नाहींत ते पुनः पुनः जन्ममरणाच्या फेऱ्यांत अडकून पडतात. पण ज्यांनी त्या मानदंभाचा त्याग केला व त्याच्या तावडींतून मुक्त झाले, ते मानग्रंथी तोडून दिल्यामुळें सर्व दुःखांतून पार होऊन जातात.

( २७० ) येन कोधेन कुद्धासे सत्ता गच्छन्ति दुग्गतिं ।
तं कोधं सम्मदञ्ञाय पजहन्ति विपस्सिनो ।
पहाय न पुनायन्ति इमं लोकं कुदाचनन्ति ॥
( कोधसुत्त १–२–२ )

या क्रोधानें प्रकुपित होऊन लोक दुःखभागी होतात, पण जे ज्ञानी आहेत ते त्याला यथार्थतः जाणून, त्याचा त्याग करतात. आणि या क्रोधाचा त्याग केल्यावर पुनः ते या लोकीं जन्मास येत नाहींत.

( २७१ ) नत्थञ्ञो एकधम्मोपि येनेव निवुता पजा ।
संसरन्ति अहोरत्तं यथा मोहेन आवुता ॥
ये च मोहं पहत्वान तमोखन्धं पदालयुं ।
न ते पुन संसरन्ति हेतु तेसं न विज्जती'ति ॥
( मोहसुत्त १–२–४ )

ज्यामुळें मनुष्य हा संसारांत बद्ध होऊन दीर्घकाल जन्ममृत्यूच्या भवचक्रांत अडकून पडतो, असा मोहासारखा दुसरा धर्म नाहीं. ज्यांनी या अंधकारमय मोहाचा-अज्ञानाचा-त्याग केला, ते पुनः जन्मास येत नाहींत. कारण तसें निमित्त मग त्यांच्यांत नसतें.

( २७२ ) तण्हा दुतियो पुरिसो दीघमद्धानं संसरं ।
इत्थभावञ्ञथाभावं संसारं नातिवत्तति ॥
एवमा दीनवं ञत्वा तण्हादुक्खस्स सम्भवं ।
वीततण्हो अनादानो सतो भिक्खू परिब्बजे 'ति ॥
( तण्हासुत्त १–२–५ )

त्याच प्रमाणें तृष्णा ही दुसरी आहे. तिच्यामुळेंच मनुष्य हा संसाराच्या दीर्घप्रवासांत गुंतून पडतो. त्याची जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून सुटका होत नाहीं. धर्माचें अतिक्रमण हेंच तृष्णेपासून उद्भवणाऱ्या दुःखाचें मूळ असून, मनुष्य हें जेव्हां जाणतो तेव्हां तो तृष्णारहित व स्नेहशून्य होत्साता भिक्षु होऊन घरांतून बाहेर पडतो.

( २७३ ) कल्याणमित्तो यो भिक्खू सप्पतिस्सो सगारवो ।
करं मित्तानं वचनं सम्पजानो पतिस्सतो ॥
पापुणे अनुपुब्बेन सब्बसंयोजन क्खयन्ति ।

( कल्याणमेत्त सुत्त, १–२–७ )

जो भिक्षु कल्याणकारक मित्र आहे, जो आज्ञाधारक, व आदरशील आहे, जो मित्रवचन सत्य करणारा आहे, आणि जो सावध व विचारी आहे, तो क्रमशः सर्व संसार-बंधनाचा नाश करतो.

( २७४ ) अपायिको नेरयिको कप्पट्ठो संघभेदको ।
वग्गारामो अधमट्ठो योगक्खेमतो धंसति ॥
संघं समग्गं भित्वान कप्पं निरयम्हि पच्चती'ति ।

( संघभेद सुत्त, १–२–८ )

जो संघांत भेद उत्पन्न करतो, तो दीर्घकाल दुःखांत व नरकांत जाऊन पडतो. तो लोकांत रमणारा, व अधर्मानें वागणारा असल्यामुळें योगक्षेमापासून पतन पावतो. आणि संघात भेद केल्यामुळें त्या पापाचें प्रायश्चित्त म्हणून कल्पांतापर्यंत तो नरकांत सारखा पिचत पडतो.

( २७५ ) सुखा संघस्स सामग्गी समग्गानञ्च 'नुग्गहो ।
समग्गरतो धम्मट्ठो योगक्खेमा न धंसति ॥
संघं समग्गं कत्वान कप्पं सग्गम्हि मोदती'ति ।

( संघसमागी सुत्त, १–२–९ )

पण संघांतील ऐक्य हें खरोखर सुखावह आहे. व त्या संघांतील भिक्षूंचा अनुग्रही तितकाच सुखकारक आहे. कारण जो संघाच्या ऐक्यभावांत आनंद मानतो, जो धर्मविनयानें वागतो, तो योगक्षेमापासून च्युत होत नाहीं. संघांत एकोप्यानें वागणारा तो भिक्षु कल्पांतापर्यंत स्वर्गांत सुखानें नांदतो.

( २७६ ) पुञ्ञमेव सो सिक्खेय्य आयतग्गं सुखिद्रियं ।
दानं च समचरियञ्च मेत्तचित्तञ्च भावये ॥
एते धम्मे भावयित्वा तयो सुखसमुद्दये ।
अब्यापज्झं सुखं लोकं पण्डितो उपपज्जती'ति ॥
( झायी सुत्त, १-३-२ )

उच्चगतीस नेणारें व सुख देणारें असें सत्कर्मच-पुण्यकर्मच-मनुष्यानें करण्यास शिकावें. दान, सद्वर्तन व स्नेहभाव यांत अनुरत असावें. या तीन सद्गुणांत जो रत असतो, तो ज्ञानी दुःखरहित अशा सुखलोकाप्रत जातो.

( २७७ ) अप्पमादं पसंसन्ति पुञ्ञकिरियासु पण्डिता ।
अप्पमत्तो उभो अत्थे अधिगण्हाति पण्डितो ॥
दिट्ठे धम्मे च यो अत्थो यो च 'त्थो सम्परायिको ।
अत्थाभिसमया धीरो पण्डितो' ति पवुच्चति ॥
( उभोअत्थसुत्त, १-३-३ )

पुण्यकर्म करण्यांत दक्षता असणें याचीच सूज्ञ लोक प्रशंसा कारितात. सत्कर्मदक्ष असा ज्ञानीच या लोकांतील व परलोकांतील अर्थात् उभय लोकांतील-अर्थ प्राप्त करून घेतो. अर्थाला दृढ चिकटून राहणाऱ्या धीर पुरुषालाच लोक पंडित असें म्हणतात.

( २७८ ) यो न हन्ति न घातेति न जिनाति न जापये ।
मेत्तं सो सब्बभूतेसु वेरं तस्स न केनची'ति ॥
( मेत्तभावसुत्त, १-३-७ )

जो स्वतः हिंसा करीत नाहीं व दुसऱ्याकडून करवीत नाहीं व दुसऱ्यास पीडा देत नाहीं व दुसऱ्याकडून देववीत नाहीं, तो सर्व प्राण्यांचा मित्र होऊन राहतो. त्याच्याशी मग कोणाचेंच वैर राहत नाहीं.

( २७९ ) चक्खु सोतञ्च घानञ्च जिव्हा कायो तथा मनो ।
एतानि यस्स द्वारानि अगुत्तानि'ध भिक्खुनो ॥
भोजनम्हि अमत्तञ्ञू इन्द्रियेसु असंवुतो ।
कायदुक्खं चेतोदुक्खं दुक्खं सो अधिगच्छति ॥
डय्हमानेन कायेन डय्हमानेन चेतसा ।
दिवा वा यदि वा रत्तिं दुक्खं विहरति तादिसो'ति ॥
( इंद्रियसुत्त, २–१–१ )

चक्षु, श्रोत्र, घ्राण, जिव्हा, देह व मन, हीं इंद्रियद्वारें ज्या भिक्षूचीं या लोकांत सुरक्षित नाहींत, जो खाद्यपेयांत मितव्यय पाळीत नाहीं व ज्याचा इंद्रियावर ताबा नाहीं, त्यास शारीरिक व मानसिक अशीं दोन्ही प्रकारचीं दुःखें भोगावीं लागतात.

( २८० ) यो च सतिमा निपको झायी
आतापी ओत्तप्पी च अप्पमत्तो ।
संयोजनं जातिजराय छेत्वा
इधेव सम्बोधिमनुत्तरं फुसे'ति ॥
( अनोत्तपी सुत्त २–१–७ )

जो स्मृतिमान आहे, विवेकी आहे, मननशील आहे व त्याचप्रमाणें जो उत्साही, विनम्र व कर्तव्यदक्ष आहे, तो संसाराचीं-जन्ममृत्यूचीं-सर्व बंधनें टाकून या लोकींच सर्वश्रेष्ठ अशी संबोधि प्राप्त करून घेतो.

( २८१ ) या काचि 'मा दुग्गतियो अस्मिं लोके परम्हि च ।
अविज्जामूलका सब्बा इच्छालोभसमुच्चया ॥
यतो होति पापिच्छो अहिरीको अनादरो ।

ततो पापं पसवति अपायं तेन गच्छति ॥
तस्मा छन्दञ्च लोभञ्च अविज्जञ्च विराजयं ।
विज्जं उप्पादयं भिक्खु सब्बा दुग्गतियो जहे'ति ॥

(अविज्जासुत्त, २-२-३)

या लोकांत व परलोकांत ज्या काय दुर्गति आहेत, त्या सर्व अविद्यामूलक असून, इच्छा व लोभ यांनी समन्वित आहेत. आणि ज्या अर्थी पापाची इच्छा करणारा मनुष्य निर्लज्ज व उद्धट होतो, त्या अर्थी तो पापालाच जन्म देतो आणि अखेर दुर्गतीस जातो. म्हणून राग, लोभ व अज्ञान यांचा त्याग करावा. ज्ञान मिळवावें. असें केल्यानें भिक्षू ह्या सर्व दुःखांतून मुक्त होतो.

(२८२) पञ्ञा हि सेट्ठा लोकस्मिं यायं निब्बेधगामिनी ।
या च सम्मा पजानाति जातिभवपरिक्खयं ॥
तेसं देवा मनुस्सा च सम्बुद्धानं सतीमतं ।
पिहयन्ति सपञ्ञानं सरीरान्तिमधारिनन्ति ॥

(पञ्ञासुत्त, २-२-४)

या लोकीं निर्वाणाप्रत नेणारी प्रज्ञा हीच श्रेष्ठ आहे. कारण ही प्रज्ञाच जातिभवाचा उच्छेद उत्तम तऱ्हेनें जाणते. जे संबुद्ध व स्मृतिमान आहेत व जे प्रज्ञासंपन्न व म्हणून अंतिम देहधारी आहेत, त्यांचा मनुष्यें व देवसुद्धां मोठा हेवा करतात.

(२८३) जातं भूतं समुप्पन्नं कतं सङ्खतमद्धुवं ।
जरामरणसङ्खतं रोगनीळं पभङ्गुणं ।
आहारनेत्तिप्पभवं नालं तदभिनन्दितुं ॥

तस्स निस्सरणं सन्तं अतक्कावचरं धुवं ।
अजातं असमुप्पन्नं असोकं विरजं पदं ।
निरोधो दुक्खधम्मानं सङ्खारूपसमो सुखो 'ति ॥
( अज्ञातसुत्त, २-२-६ )

जें जात, भूत, समुत्पन्न, कृतक, संस्कृत, अध्रुव, जरामरणशील, रोगाचें घर, टिसूळ व अन्नावर वाढणारें आहे, अशा देहावर प्रेम करणें हें योग्य नाहीं. आता या देहाचा नाश म्हणजेच शांति होय. आणि ती तर्कातीत व शाश्वत अशी आहे. ही अजात आहे. अकृत आहे. शोकरहित व रागरहित आहे. तशीच ती सर्व दु:खात्मक धर्माचा नाश करणारी व सर्व संशयाचा उपशम करणारी आहे.

( २८४ ) यस्स कामासवो खीणो अविज्जा च विराजिता ।
भवासवो परिक्खीणो विप्पमुत्तो निरूपधि ।
धारेति अन्तिमं देहं जेत्वा मारं सवाहनन्ति ॥
( आसवसुत्त ३-१-८ )

ज्याचे वासनादोष क्षीण झाले आहेत, ज्यानें अविद्येचा त्याग केला आहे, ज्याचे भवासव क्षय पावले आहेत, जो विमुक्त व निरुपाधिक झाला आहे, त्यानेंच मारावर-मृत्यूवर-जय मिळविला आहे आणि त्याचाच हा प्रस्तुत जन्म शेवटचा होय.

( २८५ ) तण्हायोगेन संयुत्ता रत्तचित्ता भवाभवे ।
ते योगयुत्ता मारस्स अयोगक्खेमिनो जना ।
सत्ता गच्छन्ति संसारं जातिमरणगामिनो ।

ये च तण्हं पहत्वान वीततण्हा भवाभवे ।
ते च पारङ्गता लोके ये पत्ता आसवक्खयन्ति ॥
(तण्हासुत्त ३-१-९)

जे तृष्णेनें घेरलेले आहेत, ज्यांचें मन ऐहिक व पारलौकिक संसारांत रंगलें आहे, ते जन सुरक्षित नसून अखेर मृत्यूच्या पाशांत जाऊन पडणारे आहेत. आणि ज्यांनी तृष्णेचा त्याग केला, जे जन्ममरणात्मक संसाराविषयी विरक्त झाले आणि ज्यांचे सर्व दोष क्षीण झाले, ते जन्ममरणरूपी संसारापासून पार मुक्त झाले.

(२८६) सीलं समाधि पञ्ञा च यस्स एते सुभाविता ।
अतिक्कम्म मारधेय्यं आदिचो'व विरोचती'ति ॥
(मारधेय्य सुत्त, ३-१-१०)

शील, समाधि व प्रज्ञा हीं ज्याचीं सुरक्षित आहेत, तो माराच्या बंधनांतून मुक्त होऊन, सूर्याप्रमाणें चमकूं लागतो.

(२८७) यादिसं कुरुते मित्तं यादिसं चुपसेवति ।
स वे तादिसको होति सहवासो हि तादिसो ॥
असन्ते नुपसेवेय्य सन्ते सेवेय्य पण्डितो ।
असन्तो निरयं नेन्ति सन्तो पापेन्ति सुग्गती'ति ॥
(सुखसुत्त ३-३-७)

जसा मित्र करावा व जशी त्याची सेवा करावी, तशाप्रकारचा तो होतो. कारण सहवासच तसा असतो. असाधु लोकांची सेवा करूं नये. पंडितानें साधूंचा संग करावा. असाधूची संगति नरकास कारण होते. संतांची संगति सुगति प्राप्त करून देते.

(२८८) अनत्थजननो लोभो लोभो चित्तप्पकोपनो ।
भयमन्तरतो जातं तं जनो नावबुज्झति ॥
लुद्धो अत्थं न जानाति लुद्धो धम्मं न पस्सति ।
अन्धं तमं तदा होति यं लोभो सहते नरं ॥
(मल्सुत्त, ४-४-९)

लोभ हा अनर्थकारक आहे. तसाच तो चित्तप्रकोप करणारा आहे. त्यामुळें अंतःकरणात भय उत्पन्न होतें. पण लोक हें जाणत नाहींत. जो लोभी आहे, तो अर्थ जाणत नाहीं. आणि त्याला धर्महि कळत नाहीं. जेव्हा मनुष्य लोभाला वश होतो, तेव्हा त्याला सर्वत्र अंधकार दिसू लागतो.

---

# सुत्तनिपात

## उरगवग्गो ( १ )

( २८९ ) यो रागमुदच्छिदा असेसं
मिसपुप्फवंऽव सरोरुहं विगह्य।
सो भिक्खु जहाति ओरपारं
उरगो जिण्णमिव तचं पुराणं॥
( उरगवग्ग १-१-२ )

तळावात उतरून कमलपुष्प जसें सहज तोडून टाकण्यांत येतें, तद्वत् जो रागाला—म्हणजे विषयभोगाला—निःशेष उखडून काढतो तो भिक्षु कात टाकून दिलेल्या सर्पाप्रमाणें हा तीर व पैल तीर सोडून म्हणजे ससारातून—मुक्त होतो.

( २९० ) यो तण्हमुदच्छिदा असेसं
सरितं सीघसरं विसोसयित्वा।
सो भिक्खु जहाति ओरपारं
उरगो जिण्णमिव तचं पुराणं॥
( उरगवग्ग १-१-३ )

धुमधडाक्यानें वाहत चाललेल्या तृष्णारूपी नदीला सुकवून, जो तिला कोरडी ठणठणीत करून टाकतो, तो भिक्षु कात टाकून दिलेल्या सापाप्रमाणें—दोन्ही तीरातून सुटून भवचक्रातून मुक्त होतो.

( २९१ ) यस्स वनथजा न सन्ति केचि
विनिबन्धाय भवाय हेतुकप्पा ।
सो भिक्खु जहाति ओरपारं
उरगो जिण्णमिव तचं पुराणं ॥
( उरगवग्ग १–१–१६ )

भवबंधनाला कारणीभूत अशी ही जी तृष्णा, ती कसल्याहिप्रकारें ज्याच्या अंतःकरणांत राहिली नाहीं, तो भिक्षु कात टाकून दिलेल्या सर्पाप्रमाणें अलीकडील व पलीकडील तीर ओलांडून संसार पाशांतून मुक्त होतो.

( २९२ ) सोचति पुत्तेहि पुत्तिमा
गोमिको गोहि तथेव सोचति ।
उपधी हि नरस्स सोचना
न हि सोचति यो निरूपधीति ॥
( धनियसुत्त, १–२–१७ )

पुत्र असणारा पुत्रासाठीं चिंता करीत असतो. आणि गवळी हा गायींसाठीं चिंतेंत मग्न असतो. त्याच प्रमाणें उपाधि म्हणजे विषयभोग हे मनुष्याच्या चिंतेचें कारण आहेत. जो उपाधिरहित झाला–विषयभोग-विरत झाला–त्याला चिंतेचें कारणच रहात नाहीं.

( २९३ ) कामाहि चित्रा मधुरा मनोरमा
विरूपरूपेन मथेन्ति चित्तं ।
आदीनवं कामगुणेसु दिस्वा
एकोचरे खग्गविसाणकप्पो ॥
( खग्गविषाणसुत्त, १–३–१६ )

काम हा विचित्र, मधुर आणि तसाच मनोहरहि आहे. तो अनेक प्रकारानें मनाला झुलवीत असतो. पण विषयसुखभोगाचे दुष्परिणाम दृष्टीपुढें ठेवून भिक्षूनें खड्गविषाणाप्रमाणें एकलकोंडें राहून विहार करावा.

( २९४ ) सीहोऽव सद्देसु असन्तसन्तो
वातोऽव जालम्हि असज्जमानो ।
पदुमंऽव तोयेन अलिप्पमानो
एकोचरे खग्गविसाणकप्पो ॥
( खग्गविसाणसुत्त, १–३–३७ )

शब्दानें कंपित न होणाऱ्या सिंहाप्रमाणें, जाळ्यात न सापडणाऱ्या वायूप्रमाणें, पाण्यानें लिप्त न होणाऱ्या कमलाप्रमाणें बनून भिक्षूनें खड्गविषाणाप्रमाणें एकलकोंडें राहून विहार करावा.

( २९५ ) मेत्त उपेक्खं करुणं विमुत्तिं
आसेवमानो मुदितं च काले ।
सब्बेन लोकेन अविरुज्झमानो
एको चरे खग्गविसाणकप्पो ॥
( खग्गविसाणसुत्त १–३–३९ )

मैत्री, उपेक्षा, करुणा, विमुक्ति व मुदिता यांचें यथा काल सेवन करीत, समग्र संसारात कसलाहि विरोधभाव न धरतां, भिक्षूनें खड्गविषाणाप्रमाणें एकलकोंडें राहून विहार करावा.

( २९६ ) सद्धा बीजं तपो वुट्ठि पञ्ञा मे युगनंगलं ।
हिरि ईसा मनो योत्तं सति मे फालपाचनं ॥
( कसिभारद्वाजसुत्त १–४–२ )

श्रद्धा हें माझें बीज आहे. तप ही वृष्टि आहे. प्रज्ञा हा माझा नांगर आहे. लज्जा हा नांगराचा दंड आहे. मन हें जोतें आहे. स्मृति हा फाळ व छकुती आहे.

( २९७ ) कायगुत्तो वचीगुत्तो आहारे उदरे यतो ।
सच्चं करोमि निदानं सोरच्चं मे पमोचनं ॥
( कसिभारद्वाजसुत्त १-४-३ )

कायेचें मी संयमन केलें आहे. तसेंच वाणीचेंहि केलें आहे. आहाराच्या बाबतींतहि मी संयत आहे. सत्य निर्वाणरति हें प्रमोचन आहे.

( २९८ ) विरियं मे धुरधोरय्हं योगक्खेमाधिवाहनं ।
गच्छति अनिवत्तन्तं यत्थगन्त्वा न सोचति ॥
( कसिभारद्वाजसुत्त १-४-४ )

निर्वाणाकडे नेणारें वीर्य हे योगक्षेमरूपी धुरा वाहणारे माझे बैल आहेत. ते निरंतर त्याच मार्गानें जात असतात, कीं जेथें गेल्यानें मनुष्य शोक करीत नाहीं.

( २९९ ) एवमेसा कसी कट्ठा सा होति अमतप्फला ।
एतं कसिं कसित्वान सब्ब दुक्खा पमुच्चतीति ॥
( कसिभारद्वाजसुत्त,१-४-५ )

याप्रमाणें ही माझी शेती कसली गेली आहे. ही अमृतफल देणारी आहे. अशा प्रकारची शेती करून मनुष्य हा सर्व दुःखांतून मुक्त होऊन जातो.

( ३०० ) सुविजानो भवं होति सुविजानो पराभवो ।
धम्मकामं भवं होति धम्मदेस्सी पराभवो ॥
( पराभवसुत्त, १-६-२ )

उन्नत पुरुष सरळ रीतीनें जाऊं शकतो व पतनोन्मुख मनुष्यहि सरळरीतीनें जाऊं शकतो. पण जो धर्मप्रेमी आहे तो उन्नतिप्रत जातो व धर्मद्वेषी हा अवनतीस जातो.

( ३०१ ) असन्तस्स पिया होन्ति सन्ते न कुरुते पियं।
असतं धम्मं रोचेति तं पराभवतो मुखं ॥

( पराभवसुत्त १-६-४ )

ज्याला दुर्जन प्रिय व सज्जन अप्रिय आहेत व जो दुर्जनाच्या मताची वाखाणणी करतो, तेंच त्याच्या अवनतीचें—अर्थात् पराभवाचें —कारण आहे.

( ३०२ ) निद्दासीली सभासीली अनुट्ठाता च यो नरो।
अलसो कोधपञ्ञाणो तं पराभवतो मुखं ॥

( पराभवसुत्त, १-६-६ )

जो झोपाळु आहे, बहुत जनांचा संपर्क ठेवणारा आहे, जो उद्योगहीन आहे, आळशी आहे, तामसी आहे, तेंच त्याच्या, —पराभवाचें-मूळ आहे.

( ३०३ ) यो मातरं वा पितरं वा जिण्णकं गतयो
पहु सन्तो न भरति तं पराभवतो मुर

(

जो ब्राह्मण, श्रमण अगर इतर याचकाला खोटें बोलून फसवितो अगर धोक्यात घालतो, तेंच त्याच्या अवनतीचें मूळ आहे.

( ३०५ ) पहूतवित्तो पुरिसो सहिरञ्ञो सभोजनो ।
एको भुञ्जति सादूनि तं पराभवतो मुखं ॥

( पराभवसुत्त, १-६-१२ )

सोनें व खाद्यपेय इत्यादि पदार्थांनीं सुसंपन्न असून दुसऱ्यास न देतां एकटाच त्याचा उपभोग घेतो, तेंच त्याच्या पराभवाचें मूळ आहे.

( ३०६ ) जातित्थद्धो धनत्थद्धो गोत्तत्थद्धो च यो नरो ।
सं ञातिं अतिमञ्ञेति तं पराभवतो मुखं ॥

( पराभवसुत्त १-६-१४ )

जो आपली जात, संपत्ति व गोत्र याचा गर्व वाहतो व आपल्या बांधवाचा अपमान करतो, तेंच त्याच्या अधोगतीचें कारण आहे.

( ३०७ ) इत्थिधुत्तो सुराधुत्तो अक्खधुत्तो च यो नरो ।
लद्धं लद्धं विनासेति तं पराभवतो मुखं ॥

( पराभवसुत्त, १-६-१६ )

जो नित्य अहर्निश स्त्रीच्या सहवासात पडून राहतो, दारू पितो, व जुगार खेळतो, जो आपली संपत्ति उधळून टाकतो, तेंच त्याच्या परागतीचें कारण आहे.

( ३०८ ) सेहि दारेहिऽसन्तुट्ठो वेसियासु पदिस्सति ।
दिस्सति परदारेसु तं पराभवतो मुखं ॥

( पराभवसुत्त, १-६-१८ )

जो आपल्या धर्मपत्नीच्याठायीं असंतुष्ट राहतो आणि वेश्येच्या अगर परस्त्रीच्या नादात व संगतीत रमतो, तेंच त्याच्या अवनतीचें बीज आहे.

( ३०९ ) एते पराभवे लोके पण्डितो समवेक्खिय ।
अरियो दस्सनसम्पन्नो स लोकं भजते सिवंऽति ॥
( पराभवसुत्त, १–६–२५ )

सुविचार संपन्न व पंडित असा जो आर्य पुरुष आहे तो हीं सगळीं अवनतीचीं कारणें नीट मनांत बिंबवून संसारांत सुखानें कालक्रमणा करतो.

( ३१० ) अट्ठिनहारुसंयुत्तो तचमंसावलेपनो ।
छविया कायो पटिच्छन्नो यथाभूतं न दिस्सति ॥
( विजयसुत्त १–११–२ )

हाड व स्नायु यांनी युक्त, त्वचा व मांस यांनी लिंपलेलें, असें हें जें शरीर जसें आहे तसें तें दिसत नाहीं.

( ३११ ) अन्तपूरो उदरपूरो, यकपेळस्स वत्थिनो ।
हृदयस्स पप्फासस्स, वक्कस्स पिहकस्स च ॥
( विजयसुत्त, १–११–३ )

( ३१२ ) सिंघाणिकाय खेळस्स, सेदस्स मेदस्स च ।
लोहितस्स लसिकाय, पित्तस्सच वसाय च ॥
( विजयसुत्त, १–११–४ )

या शरीरामध्यें आंतडें, उदर, यकृत, वस्ति, हृदय, फुप्फुस, त्वक्, शेंबूड, लाळ, घाम, मेद, रक्त, कफ, पित्त आणि चरबी इत्यादि भरलेलीं आहेत.

( ३१३ ) अथस्स नवहि सोतेहि असुचि सवति सब्बदा ।
अक्खिम्हा अक्खिगूथको कण्णम्हा कण्णगूथको ॥
( विजयसुत्त १–११–५ )

त्याच्या नऊ दारांतून सतत घाण द्रव्यें गळत असतात. डोळ्यांतून अश्रु व कानांतून मळ स्रवत असतो.

( ३१४ ) खादन्ति नं सुवाना च, यो सिगाला च वका च किमी ।
काका गिज्झा च खादन्ति, ये चऽञ्ञे सन्ति पाणिनो ॥
( विजयसुत्त १-११-९ )

असा हा अमंगल द्रव्यांनी भरलेला देह मृत झाला म्हणजे त्याला स्मशानांत कुत्रे, कोल्हे, लांडगे, किडे, कावळे, गिधाडें आणि इतर प्राणी फाडफाडून खाऊन टाकतात.

( ३१५ ) सुत्वान बुद्धवचनं, भिक्खु पञ्ञाणवा इध ।
सो खो नं परिजानाति, यथाभूतं हि पस्सति ॥
( विजयसुत्त, १-११-१० )

येथें बुद्धिमान भिक्षु, बुद्ध भगवंताचें हें वरील वचन ऐकून, शरीराच्या स्वभावाला उत्तम तऱ्हेनें जाणून घेतो आणि त्याला त्या त्या स्वरूपांत पाहतो.

( ३१६ ) द्विपादकोयं असुचि, दुग्गन्धो परिहीरति ।
नानाकुणपपरिपूरो, विस्सवन्तो ततो ततो ॥
( विजयसुत्त १-११-१३ )

अपवित्र व नाना दुर्गन्धानी परिपूर्ण भरलेलें हें द्विपाद शरीर आंतील दुर्गंध बाहेर टाकीत असतें. आणि ही सर्व घाण एक एका मार्गानें बाहेर पडते.

( ३१७ ) एतादिसेन कायेन, यो मञ्ञे उण्णमेतवे ।
परं वा अवजानेय्य, किमञ्ञत्र अदस्सनाऽति ॥
( विजयसुत्त १-११-१४ )

अशा प्रकारच्या शरीरानें युक्त असा जो कोणी आपणास उच्च व दुसऱ्यास नीच समजतो, त्याला त्या अविद्येशिवाय दुसरें कारण काय आहे ?

## चूळवग्गो, (२)

(३१८) पाणातिपातो वध-छेद-बन्धनं ।
थेय्यं मुसावादो निकतिवञ्चनानि ॥
अज्झेनकुत्तं परदारसेवना ।
एसामगन्धो न हि मंसभोजनं ॥

(आमगन्धसुत्त, २-२-४)

हिंसा, वध, बंधन, चोरी, असत्य धोकाबाजी, ठगेपणा, अर्थशून्य अध्ययन, आणि परस्त्रीगमन हा आमगंध होय. मांसभक्षण हा आमगंध नव्हे.

(३१९) कोधो मदो थम्भो पच्चुट्ठापना च ।
माया असूया भस्ससमुस्सयो च ॥
मानातिमानो च असब्भि सन्थवो ।
एसामगन्धो न हि मंसभोजनं ॥

(आमगन्धसुत्त, २-२-७)

क्रोध, मद, धिटाई, विरोध, माया, ईर्ष्या, आत्मप्रौढी, मानातिमान, व दुर्जनसंगति हा आमगंध होय. मांसाहार नव्हे.

(३२०) ये पापसीला इणघातसूचका ।
वोहारकूटा इधपाटिरूपिका ॥

नराधमा येऽध करोन्ति किब्बिसं।
एसामगन्धो न हि मंसभोजनं ॥
(आमगंधसुत्त, २-२-८)

पापी, देणें बुडविणारा, चहाडखोर, कपटी, ढोंगी असा नराधम पापकर्म करतो. तो आमगंध होय. मांसभक्षण हा आमगंध नव्हे.

(३२१) यथा माता पिता भाता, अञ्ञे वाऽपि च ञातका।
गावो नो परमा मित्ता, यासु जायन्ति ओसधा ॥
(ब्राह्मणधम्मिकसुत्त २-७-१३)

जशी माता, जसा पिता, जसा भाऊ व जसे इतर बांधव, त्याचप्रमाणें गाय देखील आमची परम मित्र आहे; कीं जिच्यापासून औषधें प्राप्त होतात.

(३२२) अन्नदा बलदा चेता, वण्णदा सुखदा तथा।
एतमत्थवसं ञत्वा, नास्सु गावो हनिंसु ते ॥
(ब्राह्मणधम्मिकसुत्त, २-७-१४)

*अशा प्रकारची ही गाय आम्हाला अन्न देणारी आहे. बल देणारी आहे. सुख देणारी आहे. या गोष्टी जाणून प्राचीन कालीन ब्राह्मण गाईचा वध करीत नसत.*

(३२३) तस्मा हवे सुप्पुरिसं भजेथ।
मेधाविनं चेव बहुस्सुतं च ॥
अञ्ञाय अत्थं पटिपज्जमानो।
विञ्ञातधम्मो सोसुखं लभेथाति ॥
(नावासुत्त, २-८-८)

जो अर्थ समजून धर्माप्रमाणें चालतो अशा बुद्धिमान बहुश्रुत साधु-पुरुषाची संगति करावी. जो अर्थ समजून घेऊन धर्माप्रमाणें चालतो तो धर्म जाणून सुख प्राप्त करून घेतो.

( ३२४ ) हस्सं जप्पं परिदेवं पदोसं ।
मायाकतं कुहनं गिद्धिमानं ॥
सारम्भकक्कसकसावमुच्छं ।
हित्वा चरे वीतमदो ठितत्तो ॥
( किंसील सुत्त २–९–५ )

हसणें, खिदळणें, गप्पागोष्टी, विलाप, द्वेष, कपट, ढोंग, लोलुपता, अभिमान, स्पर्धा, मल आणि मोह यांना सोडून, मदरहित व स्थिरचित्त होऊन आचरण करावें.

( ३२५ ) धम्मे च ये अरियपवेदिते रता ।
अनुत्तरा ते वचसा मनसा कम्मना च ॥
ते सन्ति–सोरच्च–समाधि–सण्ठिता ।
सुतस्स पञ्ञाय च सारमज्झगूति ॥
( किंसील सुत्त २–९–७ )

जो आर्योपदिष्ट धर्मांत रत आहे, तो मन, वचन व शरीरानें उत्तम आहे. शांति, शिष्टता व समाधि यांत स्थिर होऊन विद्या व प्रज्ञा यांचें तत्त्व तो प्राप्त करून घेतो.

( ३२६ ) उट्ठहथ नीसीदथ, को अत्थो सुपितेन वो ।
आतुरानं हि का निद्दा, सल्लविद्धान रुप्पतं ॥
( उट्ठानसुत्त २–१०–१ )

जागे व्हा ! उठून बसा ! निजून राहण्यांत काय लाभ आहे ! दुःखरूपी तीर शरीरांत रुतून बसल्यामुळें विव्हळणाऱ्या मनुष्याला झोंप कसली !

( ३२७ ) पमादो रजो पमादो पमादानुपतितो रजो ।
अप्पमोदन विज्जाय अब्बहे सल्लमत्तनोऽति ॥
( उट्ठानसुत्त २-१०-४ )

आळस हा महारोग आहे. प्रमादामुळेंच हा रोग उत्पन्न होतो. उद्योग व विद्या यांच्या सहायानें हा शरीरांत रुतून बसलेला दुःखरूपी तीर तेथून ओढून काढा !

( ३२८ ) हित्वा पियं च अप्पियं च ।
अनुपादाय अनिस्सितो कुहिञ्चि ।
संयोजनियेहि विप्पमुत्तो ।
सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥
( सम्मापरिब्बाजनिय सुत्त, २-१३-५ )

जो प्रिय व अप्रिय यांचा त्याग करतो, कसल्याहि प्रकारचा अनुराग किंवा तृष्णा मनांत धरीत नाहीं, जो बंधनापासून मुक्त झाला, तो चांगल्या तऱ्हेनें जगांत विचरण करणारा होतो.

( ३२९ ) मज्जं च पानं न समाचरेय्य ।
धम्मं इमं रोचये योगहट्ठो ।
न पायेय्य पिवतं नानजञ्ञा ।
उम्मादनं तं इति नं विदित्वा ॥
( धम्मिकसुत्त, २-१४-२३ )

या माझ्या धर्माची इच्छा करणाऱ्या गृहस्थानें मद्यपानाच्या परिणामाला उन्माद समजून त्याचें सेवन करूं नये. दुसऱ्यास ते पाजूं नये आणि दुसऱ्यास तसें करण्यास सम्मति देऊं नये.

( ३३० ) मदा हि पापानि करोन्ति बाला ।
करोन्ति चऽञ्ञेऽपि जनेपमत्ते ।
एतं अपुञ्ञायतनं विवज्जये ।
उम्मादनं मोहनं बालकन्तं ॥

( धम्मिकसुत्त, २-१४-२४ )

मूर्ख व व्यसनाधीन लोक मदामुळेंच पाप करण्यास प्रवृत्त होतात. जें मादक आहे, मोहक आहे, व मूर्खांना प्रिय आहे, ते हें पापस्थळ त्यागकर !

( ३३१ ) पाणं न हाने न चादिन्नमादिये ।
मुसानभासे न च मज्जपो सिया ।
अब्रह्मचरिया विरमेय्य मेथुना ।
रत्तिं न भुंजेय्य विकाल भोजनं ।।

( धम्मिकसुत्त, २–१४–२५ )

प्राण्याचा वध करूं नये. चोरी चिपडी करूं नये. असत्य भाषण बोलूं नये, मादक पदार्थ सेवन करूं नये. अब्रह्मचर्य आणि मैथुन यांपासून विरत रहावें. आणि रात्रीं विकाल भोजन करूं नये.

( ३३२ ) मालं न धारे न च गन्धमाचरे ।
मंचे छमायं च सयेथ सन्थते ।
एतं हि अट्ठङ्गिकमाहुऽपोसथं ।
बुद्धेन दुक्खन्तगुना पकासितं ।।

( धम्मिकसुत्त २–१४–२६ )

माला धारण करूं नये. सुगंधि पदार्थ सेवूं नये, बाजली, जमीन किंवा सतरंजीवर निजावें. दुःखपारंगत बुद्धाचें अष्टांगिक मार्गदर्शन याला 'उपोसथ' असें म्हणतात.

## महावग्ग ( ३ )

( ३३३ ) तमेव भासं भासेय्य, यायत्तानं न तापये ।
परे च न विहिंसेय्य, सा वे वाचा सुभासिता ॥
( सुभासितसुत्त ३–३–२ )

अशीच भाषा बोलावी कीं जिच्यापासून स्वतःला ताप होणार नाहीं व इतराना दुःख होणार नाहीं. अशी जी भाषा तीच भाषा खरी सुंदर आहे.

( ३३४ ) पियवाचमेव भासेय्य, या वाचा पटिनन्दिता ।
यं अनादाय पापानि, परेसं भासते पियं ॥
( सुभासितसुत्त ३–३–३ )

सर्वांना आनंद देणारी अशी गोड भाषाच बोलावी. कठोर व मर्मभेदक अशा भाषेला सोडून देऊन दुसऱ्याला प्रिय होईल अशी मधुर भाषाच बोलावी.

( ३३५ ) सच्चं वे अमता वाचा, एस धम्मो सनन्तनो ।
सच्चे अत्थे च धम्मे च, आहु सन्तो पतिट्ठिता ॥
( सुभासितसुत्त ३–३–४ )

जें सत्यवचन आहे ती खरोखर अमृत वाणीच होय. हा सनातन धर्म आहे. सत्य, अर्थ व धर्म यांत प्रतिष्ठित असलेल्या संताचे हे अमृतबोल आहेत.

( ३३६ ) यथापि कुम्भकारस्स, कत्ता मत्तिक भाजना ।
सब्बे भेदनपरियन्ता, एवं मचान जीवितं ॥
( सल्लसुत्त ३–८–४ )

कुंभारानें केलेलीं मृत्तिकेचीं भांडीं केव्हां ना केव्हां तरी फुटणारच आणि हें जसें खरें तसेंच मनुष्याचें जीवन झालें तरी त्या मडक्याच्या भांडयासारखेंच आहे.

( ३३७ ) दहरा च महन्ता च, ये बाला ये च पण्डिता ।
सब्बे मच्चुवसं यन्ति, सब्बे मच्चुपरायणा ॥
( सल्लसुत्त ३–८–५ )

लहान काय किंवा मोठा काय, मूर्ख काय किंवा ज्ञानी काय हे सर्व अखेर मृत्यूच्या स्वाधीन होणारच आहेत. सर्व प्राणिजात मृत्यूच्या आधीन आहे.

( ३३८ ) तेसं मच्चुपरेतानं, गच्छतं परलोकतो ।
न पिता तायते पुत्तं, ञाति वा पन ञातके ॥
( सल्लसुत्त ३–८–६ )

जो मृत्यूच्या आधीन झाला असून परलोकाच्या मार्गास लागला आहे, अशाला तो पुत्र जरी असला तरी बाप मृत्यूपासून त्याचें रक्षण करूं शकत नाहीं. किंवा बंधुहि बंधूचें रक्षण करण्यास असमर्थ ठरतो.

( ३३९ ) एवमब्भाहतो लोको, मच्चुना च जराय च ।
तस्मा धीरा न सोचन्ति, विदित्वा लोकपरियायं ॥
( सल्लसुत्त, ३–८–८ )

याप्रमाणें इहलोकांतला हा संसार मृत्यु व जरा यांनी ग्रस्त आहे. म्हणून ज्ञानी लोक संसाराचा हा स्वभाव जाणून दुःख करीत नाहींत.

( ३४० ) न जचा ब्राम्हणो होति, न जचा होति अब्राम्हणो ।
कम्मना ब्राम्हणो होति, कम्मना होति अब्राम्हणो ॥
( वासेट्ठसुत्त ३-९-५७ )

जन्मानें कोणी ब्राह्मण होत नाहीं आणि जन्मानें कोणी शूद्र होत नाहीं. तर कर्मानेंच ब्राह्मण होतो आणि कर्मानेंच शूद्र होतो.

( ३४१ ) चोरोऽपि कम्मना होति, योधाजीवोऽपि कम्मना ।
याजको कम्मना होति, राजाऽपि होति कम्मना ॥
( वासेट्ठसुत्त ३-९-५९ )

कर्मानें चोर होतो. कर्मानें योद्धा होतो. कर्मानें याचक होतो आणि कर्मानेंच राजाहि होतो.

( ३४२ ) एवमेतं यथाभूतं, कम्मं पस्सन्ति पण्डिता ।
पटिच्चसमुप्पाददसा कम्मविपाककोविदा ॥
( वासेट्ठसुत्त, ३-९-६० )

कर्मफलाला जाणणारे पंडित कारणामुळ उत्पन्न होणाऱ्या कर्माला म्हणजे प्रतीत्यसमुत्पाद तत्त्वप्रणालीला यथार्थतया जाणून असतात.

( ३४३ ) कम्मना वत्तती लोको, कम्मना वत्तती पजा ।
कम्मनिबंधना सत्ता, रथस्साणीव यायतो ॥
( वासेट्ठसुत्त, ३-९-६१ )

लोक सगळे कर्मानेंच चालणारे आहेत. प्रजा झाली तरी कर्मानेंच चालते. रथाचें चाक जसे अणीला बांधलें जातें तद्वत प्राणी हे कर्मानें बांधले गेले आहेत.

( ३४४ ) यथा अहं तथा एते, यथा एते तथा अहं ।
अत्तानं उपमं कत्वा, न हनेय्य न घातये ॥
( नाळकसुत्त ३-११-२७ )

जसा मी तसेच हे प्राणी आहेत. हे प्राणी जसे आहेत त्याप्रमाणें मी आहे. याप्रमाणें आपणासारखेच सर्व समजून कोणाची हिंसा करूं नये. आणि करवूं नये.

( ३४५ ) जाति-मरण-संसारं, ये वजन्ति पुनप्पुनं ।
इत्थभावऽञ्ञथाभावं, अविज्जा येव सा गति ॥
( द्वयतानुपासनासुत्त, ३–१२–६ )

अविद्येमुळेंच प्राणी सगळे वारंवार जन्ममृत्युरूपी संसारांत अडकून पडतात. आणि एका गतीपासून दुसऱ्या गतीस प्राप्त होतात.

( ३४६ ) अविज्जा ह्यं महामोहो, येनिदं संसितं चिरं ।
विज्जगता च ये सत्ता, नागच्छन्ति पुनब्भवन्ति ॥
( द्वयतानुपासनासुत्त, ३–१२–७ )

ही अविद्या मोठी मायावी आहे. तिचा आश्रय करून अज्ञलोक संसारांत अडकून पडतात. जे विद्यासंपन्न आहेत, ते पुनः जन्मास येत नाहींत.

( ३४७ ) यं किञ्चिदुक्खं सम्भोति, सब्बंसङ्खारपच्चया ।
सङ्खारानं निरोधेन, नत्थि दुक्खस्स सम्भवो'ति ॥
( द्वयतानुपासनासुत्त, ३–१२–८ )

मनुष्याला जें कांहीं दुःख होतें तें सर्व संस्कारामुळें होतें. संस्काराचा नाश झाला असतां दुःखाची उत्पत्ति होत नाहीं.

( ३४८ ) एतं आदीनवं ञत्वा, तण्हा दुक्खस्स सम्भवं ।
वीततण्हो अनादानो, सतो भिक्खु परिब्बजेऽति ॥
( द्वयतानुपासनासुत्त ३–१२–९ )

दुःखाला कारणीभूत संस्काराचे दुष्परिणाम जाणून सर्व संस्काराचा त्याग केल्याने आणि वासना रोखून धरल्याने दुःखाचा अंत होतो. या गोष्टीची यथार्थता जाणून सम्यक्-दर्शी पंडित म्हणजे भिक्षू संसार जिंकून पुनर्जन्म पावत नाहींत.

## अट्ठकवग्गो (४)

(३४९) कामं कामयमानस्स, तस्सचेतं समिज्झति ।
अद्धा पीतिमनो होति, लद्धामच्चो यदिच्छति ॥
(कामसुत्त, ४-१-१)

मनुष्य मनांत जी जी इच्छा करील, ती ती पूर्ण होत गेली, तर तो खचित प्रसन्नचित्त होतोच होतो.

(३५०) खेत्तं वत्थुं हिरञ्ञं वा गवास्सं दासपोरिसं ।
थियो वन्धु पुथू कामे, यो नरो अनुगिज्झति ॥
(कामसुत्त, ४-१-४)

(३५१) अबला नं बलीयन्ति, मद्दन्ते नं परिस्सया ।
ततो नं दुक्खमन्वेति, नावं भिन्नमिवोदकं ॥
(कामसुत्त ४-१-५)

शेत, वस्तु, हिरण्य, गाय, घोडा, दास, स्त्री इत्यादि अनेक प्रिय वस्तूंची जो मनुष्य लालसा धरतो, त्याला वासनामागून वासना सारख्या दाबतच जातात आणि परिश्रम त्याला मर्दन करीत सुटतात. पाण्यांत भंगलेली नांव जशी जलसमाधि घेते, तद्वत तो दुःखाच्या डोहांत धडपडून अखेर गडप होऊन जातो.

( ३५२ ) तस्मा जन्तु सदा सतो, कामानि परिवज्जये ।
ते पहाय तरे ओघं, नावं सिञ्चित्व पारगू ॥
( कामसुत्त, ४-१-६ )

म्हणून मनुष्यानें सदा स्मृतिमान राहून, वासनेचा त्याग करावा. तिचा त्याग करून-भरलेल्या नांवेला हलकी करून, तीतून भवसागर ओलांडून जावा.

( ३५३ ) तं ब्रूमि उपसन्तोऽति, कामेसु अनपेक्खिनं ।
गन्था तस्स न विज्जन्ति, अतारि सो विसत्तिकं ॥
( पुराभेदसुत्त, ४-१०-१० )

त्यालाच मी उपशांत म्हणतो कीं त्याच्या मार्गें कसलींहि संसार बंधनें राहिलीं नाहींत. कारण तो तृष्णेपासून पार पलीकडे गेलेला असतो.

( ३५४ ) यस्स लोके सकं नत्थि, असता च न सोचति ।
धम्मेसु च न गच्छति, स वे सन्तोऽति वुच्चतीति ॥
( पुराभेदसुत्त, ४-१०-१४ )

ज्याच्या संसारांत स्वतःचें असें कांहीं राहिलेलें नाहीं, जो होऊन गेलेल्या गोष्टींसंबंधानें पस्तावत नाहीं, आणि जो धर्मांच्यामार्गे लागत नाहीं, त्यालाच उपसंत असें म्हणतात.

( ३५५ ) सब्बसो नामरूपस्मिं, यस्स नत्थि ममायितं ।
असता च न सोचति, स वे लोके न जिय्यति ॥
( अत्तदंडसुत्त ४-१५-१६ )

ज्याला सर्व प्रकारांनीं नामरूपांत आसक्ति राहिली नाहीं व जो असतासंबंधी शोक करीत नाहीं, तो संसारांत पुनः जन्मास येत नाहीं.

## पारायणवग्ग ( ५ )

( ३५६ ) नदिट्ठिया न सुतिया न ञाणेन ।
मुनीध नन्द कुसला वदन्ति ॥
विसेनिकत्वा अनिघा निरासा ।
चरन्ति ये ते मुनयोऽति ब्रूमि ॥

( नंदमाणवकपुच्छासुत्त, ५–८–२ )

हे नंदा ! पंडितलोक हे मतामुळें, विवेमुळें, अगर ज्ञानामुळें कधी कोणाला मुनि म्हणत नाहींत. पण जा शोकरहित, पापरहित, तृष्णारहित होऊन जगांत व्यवहार करतो, त्यालाच मी मुनि म्हणतो.

( ३५७ ) यथा अदक्खि तथा अक्खासि, विमलो भूरिमेधसो ।
निक्कामो निब्बनो नाथो, हेतु मुसा भणे ॥

( पारायणसुत्त ५–१८–८ )

मी आता पारायणाचें वर्णन करतो. त्या विमल महाप्राज्ञानें जसें पाहिलें तसें त्यानें वर्णन केलें आहे. नाथ हा निष्काम आहे ! वितृष्ण आहे ! मग तो असत्य कसें बोलेल ?

( ३५८ ) पहीनमलमोहस्स, मानमक्खप्पहायिनो ।
हन्दाहं कित्तयिस्सामि, गिरं वण्णूपसंहितं ॥

( पारायणसुत्त, ५–१८–९ )

मोहमलरहित, मान व शाठ्यतारहित अशा भगवंताच्या मधुर वाणीचें मी अवश्यमेव वर्णन करतो.

( ३५९ ) तमोनुदो बुद्धो समन्तचक्खु ।
लोकन्तगू सब्बभयातिवत्तो ।
अनासवो सब्बदुक्खप्पहीनो ।
सच्चव्हयो ब्रम्हे उपासितो मे ॥

( पारायणसुत्त ५–१८–१० )

अविद्यारूपी अंधकारास दूर करणारे भगवान बुद्धदेव हे सर्वद्रष्टे आहेत ! संसाराचे पूर्ण ज्ञाते आहेत ! भवसागराच्या पार गेलेले आहेत ! वासनारहित झालेले आहेत ! सर्व दुःखांतून मुक्त झालेले आहेत ! हे ब्राह्मणा ! ते यथार्थतेनें बुद्ध म्हणविले जातात ! आणि त्यांच्याजवळच मी गेलो होतो.

( ३६० ) एको तमनुदासीनो, जातिमा सो पभंकरो ।
गोतमो भूरिपञ्ञाणो, गोतमो भूरिमेधसो ॥

( पारायणसुत्त ५–१८–१३ )

अंधकारास दूर लोटून देणारे आहेत ते ! ते हे भगवान ! प्रकाश देणारे आहेत ! गौतमबुद्ध हे महाप्रज्ञ व महाविज्ञ आहेत ! ब्राह्मणा ! ते महाज्ञानी आहेत ! !

( ३६१ ) यो मे धम्ममदेसेसि, सन्दिट्ठिकमकालिकं ।
तण्हक्खयमनीतिकं, यस्स नत्थि उपमा क्वचि ॥

( पारायणसुत्त, ५–१८–१८ )

येथें तत्काळ फल देणाऱ्या तृष्णेचा समूळ उच्छेद करणाऱ्या, व दुःखाचा पूर्ण निरास करणाऱ्या, अशा श्रेष्ठ धर्माचा ज्यांनी मला उपदेश

केला व ज्यांना साजण्यासारखी जगांत उपमाच नाहीं अशा महाप्राज्ञ व महाविज्ञ भगवान गौतमबुद्धास सोडून मी क्षणभरहि अलग राहूं शकणार नाहीं.

( ३६२ ) अधिदेवे अभिञ्ञाय, सब्बं वेदि परोवरं ।
पञ्हानन्तकरो सत्था, कंखीनं पटिजानतं ॥
( पारायणसुत्त, ५–१८–२५ )

हे भगवन् ! बुद्ध प्रभो ! आपण अधिदेवत्वाला जाणून आर पार असें सर्व कांहीं जाणून घेतलें आहे. आपण शास्ता असून संशयी पण समजूतदार लोकांच्या संशयाचें निरसन करणारे आहा.

( ३६३ ) असंहीरं असंकुप्पं यस्स नत्थि उपमा क्वचि ।
अद्धा गमिस्सामि न मेऽत्थ कंखा ।
एवं मं धारेहि अधिमुत्तचित्तं ॥
( पारायणसुत्त, ५–१८–२६ )

निर्वाण हें अजय आहे ! तें अटळ आहे ! त्याला उपमा अशी जगांत नाहींच नाहीं ! मी तें श्रद्धेच्या जोरावर अवश्य प्राप्त करून घेईन ! याविषयीं मला मुळींच शंका नाहीं ! पूर्णरूपानें मी आतां खचित मुक्तचित्त झालों आहे, असें मला खात्रीनें समजा ! !

( ३६४ ) सीलं समाधिपञ्ञा च, विमुत्ति च अनुत्तरा ।
अनुबुद्धा इमे धम्मा, गोतमेन यसस्सिना ॥
इति बुद्धो अभिञ्ञाय, धम्मं अक्खासि भिक्खुनं ।
दुक्खस्सन्तकरो सत्था, चक्खुमा परिनिब्बुतो'ति ॥
( दीघनिकायपरिनिब्बाणसुत्त, १६–४–१ )

'सील, समाधि, प्रज्ञा व सर्वश्रेष्ठ विमुक्ति हे धर्म यशस्वी बुद्ध-भगवंतानें यथार्थ जाणले. व अशा योग्य तऱ्हेनें जाणून त्याचा त्यांने आपल्या भिक्षु जनास उपदेश केला. दुःखाचा अंत करणारा असा विचक्षण शास्ता म्हणजे भगवान बुद्ध आतां परिनिर्वाणाप्रत जाता झाला.'

(३६५) यो च बुद्धञ्च धम्मञ्च सङ्घञ्च सरणं गतो ।
चत्तारि अरियसच्चानि सम्मप्पञ्ञाय पस्सति ॥
एतं खो सरणं खेमं एतं सरणमुत्तमं ।
एतं सरणमागम्म सब्बदुक्खा पमुच्चति ॥
(धम्मपद १४, १२ व १४)

जो कोणी भगवान बुद्ध, त्याचा धर्म व त्याचा भिक्षुसंघ यांस मनोभावें शरण गेला आणि जो चारहि आर्य सत्यांना उत्तम प्रकारें जाणता झाला, त्याचा तो आश्रय कल्याणकारक असून, तो सर्वांत उत्तमांतला उत्तम आश्रय होय ! हा आश्रय केल्यानें मनुष्य हा सर्व दुखांतून खात्रीनें मुक्त होतो.



# पालि-पारिभाषिक शब्दकोश

अकिञ्चन– द्रव्यहीन, कांही नसलेला, रागद्वेष-रहित.

अकिञ्चन्यायतन–'कांही नाही'चा भाव, दिव्यस्थान.

अकत (अकृत)– निर्वाण, अकृत्रिम.

अकतञ्ञ– निर्वाण जाणणारा.

अट्ठङ्गिकमग्ग (अष्टांगिकमार्ग) – निर्वाणप्राप्तीचा बुद्धोक्त मार्ग; याचे आठ प्रकार आहेत: (१) सम्यक् दृष्टि (२) सम्यक् संकल्प (३) सम्यक् वाचा (४) सम्यक् कर्मान्त (५) सम्यक् आजीव (६) सम्यक् व्यायाम (७) सम्यक् स्मृति, व (८) सम्यक् समाधि. यालाच दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा असें म्हणतात.

अत्तदीप (आत्मदीप)– विवेकबुद्धि, स्वावलंबन.

अत्ता (आत्मा)–देह, जीव, पुद्गल, व्यक्ति, आपण.

अदत्तादान– चोरी.

अध्यात्म– अंतःकरण.

अनत्ता (अनात्मा) – आत्म्याचा अभाव, दुःख, अनित्यता, पंचस्कंध.

अनागामी– पुनर्जन्ममुक्त, पुनः या लोकीं न जन्मणारा.

अनुत्तर– सर्वोत्तम, अनुपम.

अनुभूत– प्राप्त.

अनुशय– मल, चित्तमल, अविद्या, तृष्णा.

अनुसति– स्मरण.

अनभिरत– आसक्तिहीन,रागशून्य.

अनुत्तर– सर्वोत्कृष्ट, अनुपम.

अंतराय– विघ्न, बाधक.

अपाय– दुर्गति, विनाश.

अप्पमत्त ( अप्रमत्त )– उद्योगी, प्रमादरहित, प्रयत्नशील.

अब्भोकास– खुलीजागा.

अभिञ्ञा ( अभिज्ञा )– दिव्यज्ञान, निर्वाणप्राप्तीचें ज्ञान, लोकोत्तर ज्ञान, दिव्यशक्ति; ही अभिज्ञा सहाप्रकारची आहे: (१) दिव्यदृष्टि (२) दिव्यश्रुति (३) कामरूप, ( ४ ) पूर्वजन्मस्मृति (५) दिव्यज्ञान व (६) विमुक्तिज्ञान.

अभिधम्म– बुद्धोपदेश, धर्मविषय.

अभिध्या– परद्रव्यासक्ति, लोभ.

अभिनिवेश– राग, आग्रह, ममता, दुराग्रह.

अभूत– न जन्मलेलें, अज, असत्य.

अभ्यास– भावना.

अमत– निर्वाण, मरणरहित.

अरति - अनासक्ति, रागरहित.

अरिय–उत्तम, निर्दोष, बुद्ध श्रावक, बुद्ध भिक्षु.

अरियसच्च– बुद्धधर्मांतील श्रेष्ठज्ञान. हें चारप्रकारचें आहे :– (१) दुःख, (२) दुःखसमुदय, (३) दुःखनिरोध व (४) दुःखनिरोधगामिनीप्रतिपदा.

अर्थ– वस्तु, भाषण, वचन, ध्येय, श्रेय.

अर्हत्– जीवन्मुक्त; क्षीणाश्रव.

अविज्जा (अविद्या) – अज्ञान, अयथार्थज्ञान, दुःखाचें मूळ, संसाराचें कारण.

अविहिंसासंकप्प ( अविहिंसासंकल्प )– हिंसारहितसंकल्प.

अव्यापादसंकप्प – क्रोधरहितसंकल्प.

असुभदिट्ठि– देहांत अस्थि-चर्म, रक्त-मांस,मल-मूत्र इत्यादि घाण पदार्थ पाहून त्याविषयीं विरक्तपणा बाळगणें; अर्थात् देहासक्ति टाकून देणें, विषयमोहित न होणें.

अहिंसा– हिंसा न करणें, दुःख न देणें, प्राणि-पीडा न करणें.

### आ

आकाशानन्त्यायन–आकाशाप्रमाणें अनंत होणेचा भाव, शांतविहार.

आकिञ्चन्यायतन–'कांहीं नाहीं' चा भाव, दिव्यस्थान.

आगति-गति– येणें जाणें, जन्म-मृत्यु.

आतप– उष्णता.

आतापी– उद्योगी.

आदि– शुद्ध.

आदिब्रह्मचर्य– शुद्धब्रह्मचर्य.

आदीनव– दुष्परिणाम, वाईटपणा.

आनापानसति– प्राणायाम.

आनृसंस– सुपरिणाम, गुण, लाभ.

आपत्ति– दोष, पाप.

आबाधा– पीडा, आजारी.

आयतन–षडिंद्रियें, स्थान, आश्रय, हीं इंद्रियें सहा आहेतः– डोळा, कान, नाक, जीभ, त्वचा, व मन.

आरब्धवीरिय– उद्योगी.

आरम्मण – आलंब, लक्ष्य.

आर्य– उत्तम, निर्मल.

आलय – कामतृष्णा, रुचि, लीन होणें, तृष्णा.

आवसथ– निवासस्थान.

आवास– मठ.

आवुस – स्नेहसूचक संबोधन.

आश्वास– प्रश्वास– श्वास घेणें व सोडणें. श्वासोच्छ्वास.

आसव – चित्त-मळ, दोष, क्लेश; हे आसव चतुर्विध आहेतः (१) कामासव ( दैहिक विषय सुखेच्छा ) (२) दृष्टि-आसव (मताभिमान) (३) भवासव (पारलौकिकेच्छा ) व (४)

अविद्या ( अज्ञान, अयथार्थज्ञान, विपरीत ज्ञान ).

इ

इद्धि ( ऋद्धि )– अलौकिक शक्ति, दिव्यशक्ति.

इद्धिपाद ( ऋद्धिपाद )–दिव्यशक्ति लाभ.

इपुकार– बाण बनविणारा.

इंद्रिय– शरीर, मन, ज्ञान.

उ

उग्ग ( उग्र )– श्रेष्ठ.

उच्छेदवाद – जडवाद; मरणोत्तर मागें कांहीं राहत नाहीं, हा वाद.

उदान–बुद्धोपदेश.

उप्पत्ति– समुदय, जन्म.

उपधि– भोगेच्छा, विषयसंग्रह, कर्म, क्लेश, देह.

उपशम– शांति, समाधि, शमन.

उपसंत – शांत.

उपसंपदा – बुद्धसंघात प्रविष्ट होण्याची प्राथमिक दीक्षा.

उपादान – आसक्ति, दृढ तृष्णा, प्रेमयुक्त ग्रहण, भोगेच्छा पकडणें.

उपाधि– स्कंध, काम, क्लेश, कर्म, भोग्यपदार्थ, विषय.

उपायास– रडणे, आक्रोश.

उपासक– बुद्धधर्म स्वीकारलेला गृहस्थ.

उपोसथ– उपवासव्रत, विश्रांति, पौर्णिमेच्या दिवशीं भिक्षूंनें पाळावयाचे यम-नियम, अमावास्या.

ए

एपणा – इच्छा.

ओ

ओघ– पूर, तृष्णा, आस्रव.

औ

औद्धत्य– मानसिक चंचलता, अशांति, तळमळ, उद्वेग, खेद.

क

कम्म ( कर्म )– क्रिया, क्रियाफल.

कान्त – सुंदर.

काम— विषयेच्छा, विषयभोग, वासना, इंद्रियसंभोग,

कामगुण— इंद्रियांचे विषय; उदा. रूप, रस, गंध, शब्द व स्पर्श, विषय-भोग.

कामतण्हा ( कामतृष्णा )— इंद्रियजनित सुखेच्छा,विषयभोगेच्छा.

कामराग— भोगेच्छा, विषयासक्ति.

कामासव— विषयभोगेच्छा-दोष.

काय— समुदय, योनि, शरीर.

कायगतासति— शरीर हें अमंगल अशा घाण पदार्थांनी भरलेलें आहे, याची सतत आठवण; अशुभ भावना; देहाचें अमंगलत्व जाणून विरक्त होणेचा अभ्यास.

कायदुश्चरित— कायिक दुष्कर्म.

कारण— हेतु, निर्णय.

कुसल— उत्तम, पुण्यप्रद; हीं कर्में सहा आहेतः— *अहिंसा;* चोरी न करणें, अव्यभिचार, सत्यभाषण, दारू वगैरे मादक पदार्थ सेवन न करणें.

कैकृत्य— संदेह, संशय, खेद, वाईट गोष्टी करण्याची इच्छा.

क्लेश— मल, चित्तदोष.

क्षण— संधि, योग.

क्षीणासव— चित्तमलादिकांपासून मुक्त, अर्हत्.

## ख

खंद ( स्कंध )—विषयाचे-गुण, जसेः रूप, रस, गंध, स्पर्श इत्यादि; त्याचप्रमाणें वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान.

## ग

गंथि ( ग्रंथि )— बंधन. याचे चार प्रकार आहेतः ( १ ) अभिध्या ( परद्रव्यासक्ति ), (२) व्यापाद ( परद्वेष ) (३) शीलव्रतपरामर्ष ( व्रतोपासादिकांनी मोक्ष-मिळतो हा समज ) व (४) इदं *सत्याभिनिवेश ( मी म्हणतों* तेंच खरें असा दुराग्रह ).

गाथा— बुद्धोपदेश,

गहपति ( गृहपति )— गृहस्थ, वैश्य.

गंधर्व— उत्पन्न होणारा जीव अगर सत्त्व.

**च**

चक्षुर्विज्ञान— चक्षुद्वारा मिळणारें ज्ञान.

चंक्रम— विहारांत एकांतांत फिरण्याची जागा.

चातुर्याम— अहिंसा, अस्तेय, सत्य-भाषण, भोग-निरति.

चित्त— मन, विज्ञान.

चीवर— भिक्षूनें पांघरावयाचें वस्त्र; याचे तीन प्रकार आहेतः (१) संघाटी, (२) अंतरवास, (३) एत्तरासंग.

चेतना— संज्ञेच्या नंतरची मनाची अवस्था, मानसकर्म, चिंतन.

चैत्य— देवस्थान, देवतांचा चौथरा.

च्युति— मृत्यु.

**छ**

छंद— राग, रुचि, आसक्ति, प्रीति.

**ज**

जाति— जन्म, जात.

जातिधम्मा— जन्ममरणधर्मा.

ज्झान ( ध्यान )— अहंकार नाश.

**त**

तथागत— जसे मागे आले तसे पुढें येणार, बुद्ध, पूर्ण ज्ञानी, मुक्त-पुरुष, लोकगुरु.

तण्हा ( तृष्णा )— आसक्ति, वासना, इच्छा, पुनर्जन्माला कारण होणारी वासना. ही तीन प्रकारची आहेः (१) कामतृष्णा (ऐहिक सुखभोगेच्छा), (२) भवतृष्णा (पारलौकिक भोगेच्छा), (३) विभवतृष्णा ( नाहींसें होण्याची इच्छा ).

तन्दी— आलस्य.

तर्कावचर— तर्कानें अप्राप्य.

तिकाय (त्रिकाय)— बुद्धाचीं तीन शरीरें:—(१) धर्मकाय (२) संभोग काय (३) निर्माणकाय.

तुषित— तुषित नांवाचा देवलोक, तुषित देव.

तेजन— बाणाचें पोलादी टोंक.

थ

थीनमिद्ध— आळस,

द

दर्शन— विचार, ज्ञान, साक्षात्कार.

दहर— तरुण,

दान्त— संयत, विनीत.

दिट्ठि (दृष्टि)— वाद, मत, सिद्धान्त, धारणा.

दुक्ख— अप्रिय गोष्ट; उदाहरणार्थ- जन्म, जरा, व्याधि, मरण, प्रियवियोग, अप्रियसयोग इत्यादि.

दुक्खनिरोध— दुःखनाश.

दुक्खसमुदय—दुःखोत्पत्ति, दु.खाचें कारण, तृष्णा.

दोमनस्स— निरुत्साह, चित्तसंताप, खेद.

ध

धम्म (धर्म)— मनाचे विषय, कार्य कारण भाव, पदार्थ, विचार.

धम्मचक्क (धर्मचक्र)—धर्मोपदेश.

धम्मविचय—धर्मान्वेषण.

धातु— ब्रम्हांड, लोक, चित्त, पद, भूत.

न

नन्दी— तृष्णा, राग, वासना.

नाम— मन, विज्ञान, वेदना, संज्ञा, संस्कार, विज्ञान यांचा संघात.

नामरूप—देह व मन यांचा संघात, सजीव शरीर.

निदान — कारण, दुःखोत्पत्तीचें कारण.

निब्बाण (निर्वाण) — विझणें, अविद्यानाश, सत्यज्ञानप्राप्ति, दुःखविमुक्ति, संसारनाश, श्रेष्ठ- पद, ब्रह्म.

निरय— नरक.

निरोध— नाश, विनाश.

निर्वेद— वैराग्य, उदासीनता.

निक्खमण— घरांतून बाहेर पडणें.

निष्ठा— श्रद्धा.

निस्सरण ( निःसरण )– मुक्तीचा मार्ग, बाहेर पडण्याचा रस्ता.

नीवारण– बंधन; हें पांच प्रकारचें आहे: (१) कामच्छंद (२) व्यापाद (३) स्त्यानमिद्ध (४) औद्धत्य व (५) विचिकित्सा.

नैक्खम्मसंकप्प– काम भोगेच्छा त्याग.

नैवसञ्ञानासञ्ञा ( नैवसंज्ञानासंज्ञा )– न चेतन, न अचेतन; चेतनाचेतनशून्य, शांत विहार.

**प**

पञ्ञा (प्रज्ञा)–ज्ञानशक्ति, निर्वाणप्राप्तीचें ज्ञान, सत्यज्ञान.

पटिच्चसमुप्पाद ( प्रतीत्य समुत्पाद) कार्य-कारण परंपरा; दुःखोत्पत्ति व दुःखनाश यांची कार्य-कारण मीमांसा.

पतिपदा ( प्रतिपदा )– मार्ग.

पतिपन्न– मार्गारूढ, बनवलेला.

पब्बज्जा ( प्रव्रज्या )– संसारनिवृत्त होऊन भिक्षु होणें; भिक्षुसंघांत प्रविष्ट होणेंसाठीं घ्यावयाची प्रारंभाची दीक्षा.

पधान – अभ्यास.

पभव– उत्पत्ति.

पमाद ( प्रमाद )– आलस्य, बेसावधपणा, विषयमोह, सन्मार्गच्युति.

परिदेव– प्रलाप, विलाप, रोदन.

परिनिब्बाण– दुःखविमुक्ति, दुःखाभाव.

परिवज्जा– संन्यास.

परिक्खार ( परिष्कार )– तट, सहायक सामग्री.

परियेसन– शोधणें.

पहाण– त्याग, नाश.

पर्याय– प्रकार, विकल्प, कथन, मतलब.

पस्सद्धि ( प्रश्रब्धि )–शांति, एकाग्रता.

पसन्न ( प्रसन्न)– निर्मल, श्रद्धाळु.

पाणातिपात– प्राणिहिंसा.

पातिमोक्ख (प्रातिमोक्ष)– भिक्षूचे यमनियम.

पारमिता–सद्गुण; हे सहा आहेतः (१) दान (२) नीति (३) समाधान (४) वीर्य (५) समाधि (६) विज्ञान.

पीत्ति– संतोष, आनंद.

पुग्गल– पुरुष, व्यक्ति, जीव, आत्मा.

पुनब्भव– पुनर्जन्म.

पुथुज्जन (पृथक् जन)– संसारी जीव, अज्ञानी जन, प्राकृत-लोक.

## ब

बल– श्रद्धा, वीर्य, स्मृति, ध्यान व विज्ञान अशीं हीं बलाचीं पांच अंगें आहेत;

बहुलीकरण– भावना, अभ्यास.

बुद्ध– ज्ञानी, सर्वज्ञ, पूर्णप्रज्ञ, संसार-मुक्त, दिव्यज्ञानी.

बोज्झंग (बोध्यंग) ज्ञानाचीं अंगें; हीं आठ आहेतः (१) वीर्य, (२) स्मृति, (३) धर्मविचय, (४) प्रीति, (५) आनंद (६) प्रश्रब्धि, (७) समाधि व (८) उपेक्षा.

बोधि–परमज्ञान, श्रेष्ठज्ञान, निर्वाण-ज्ञान.

बोधिवृक्ष– ज्या झाडाखालीं बसून चिंतन करीत असतां बुद्धास दिव्यज्ञान झालें तो पिंपळाचा वृक्ष.

बोधिसत्व– पुढें बुद्ध होणारा जीव.

ब्यापाद (व्यापाद)– परपीडा, द्रोह, हिंसा, द्वेष.

ब्रह्मचरिय (ब्रह्मचर्य)– अष्टांगिक-मार्ग, श्रेष्ठजीवन, साधुपणा.

ब्रह्मचरियवास– संन्यास, शिष्यत्व.

ब्रह्मभूत – विशुद्ध.

ब्रह्मविहार– मैत्री, करुणा, मुदिता, व उपेक्षा, या चार मनोवृत्तींना ब्रह्मविहार असें म्हणतात.

ब्रह्मा– ईश्वर.

## भ

भन्ते– स्वामी, जी.

भव – जन्म, संसार, जाति, जन्म-मृत्युपरंपरा, लोक.

भवतण्हा–परलोक-सुखेच्छा; जन्मण्याची इच्छा.

भवनिरोध– जन्ममृत्यूचा नाश.

भावना– ध्यान, चिंतन, अभ्यास; या भावना पांच आहेत :– (१) मेत्त भावना (प्रेम भावना) (२) करुणा भावना (दया) (३) मुदित भावना (४) असुभ भावना (देह अपवित्र आहे याचें स्मरण).

भिक्खु– बौद्ध संन्यासी.

भिक्खुणी– बौद्ध संन्यासिनी.

## म

मग्ग (मार्ग)– रस्ता, पद.

मनसिकार – मनावरील संस्कार.

मनाप– प्रिय, सुखकारक.

महाभूत– पृथ्वी, जल, तेज व वायु यांस महाभूत असें म्हणतात.

महानिसंस (महानृशंस्य)– महाफळ.

मार – कामदेव, सैतान, यमदेव, ब्रह्मचर्य-द्वेष, पापी.

मिच्छा (मिथ्या)– खोटी धारणा.

मिच्छाचार (मिथ्याचार)- दुराचार.

मिच्छादिट्टि (मिथ्यादृष्टि)– खोटें-मत.

मिच्छासंकप्प– खोटा विचार; हा त्रिविध आहे:– (१) काम संकल्प (कामविचार), (२) व्यापाद संकल्प (दुसऱ्याचें अहित चिंतणें), (३) विहिंसा संकल्प (दुसऱ्यास पीडा देणें; उपद्रव करणेंचा विचार).

मिगदाव– सारनाथ, वाराणशी.

मिद्ध– आलस्य.

मीढसुख– कामसुख, विषयसुख, प्रापंचिकसुख.

मुदिता– प्रसन्नता.

मोह– मूढता, मूर्खपणा, अज्ञान, मानासिक मांद्य.

### य

योगक्खेम (योगक्षेम)— कल्याण, मंगल, निर्वाण, कल्याणमार्ग.

### र

रूप— मूर्ति, शरीर, धातु.

रूपखंध— पृथ्वी, जल, अग्नि व वायु यांचा संघात.

### ल

लोभ— कंजूषपणा, अधाशीपणा.

### व

वर्षावास— पावसाळ्यांत प्रवास न करतां मठांत वास करून राहणें.

वाद— मत, सिद्धांत, दृष्टि, शास्त्रार्थ.

वायाम (व्यायाम)— प्रयत्न.

विचिकिच्छा— संशय, संदेह,

विञ्ञाण (विज्ञान)— चित्तक्रिया, जीवनप्रवाह, चित्त, चेतना.

विञ्ञाणानञ्चायतन-अंतरहित असें विज्ञानमय स्थान, शांतविहार.

वितक्क (वितर्क)— मिथ्यासंकल्प, विषयचिंतन.

विनय— नीति.

विपस्सना— प्रज्ञा, अंतर्दृष्टि.

विपाक— कर्मफल, परिणाम, भोग.

विभव— नाश, संसार क्षय, धन.

विभवतण्हा (विभवतृष्णा)— मरणोत्तर जीवाचा कांही संबंध नाहीं, ही भावना.

विमुत्ति (विमुक्ति)—निर्वाण, मोक्ष, दु:खनाश, भवचक्रांतून सुटका.

विरज— निर्मल, दोषरहित.

विरिय (वीर्य)— उद्योग, मनोबल, सत्कर्माविषयी उत्साह.

विवेक— एकाग्रता, एकांतचिंतन.

विहार— ध्यान, मठ.

वेदना— अनुभव, इंद्रियज्ञान, स्पर्शज्ञान, भोग.

वय (व्यय)— नाश.

व्याकत (व्याकृत)— कथित, कथनयोग्यविषय.

व्यापाद— हिंसा, द्रोह, द्वेष, पीडा.

### श

शमथ— समाधि, शांति.

शयनासन– वासस्थान.

शास्ता– बुद्ध, उपदेष्टा.

### स

सक्कदागामी– भिक्षुजीवनांतील दुसरी अवस्था; पुनः एकदाच जन्मास येणारा भिक्षु.

सत्काय– आत्मवाद.

सक्कायदिट्ठि ( सत्कायदृष्टि )– शरीर हें असत् असतां सत्य समजणें. (१) भवदृष्टि म्हणजे जन्मापासून मरणापर्यंतच जिवाचें अस्तित्व मानणें; (२) विभवदृष्टि म्हणजे मरणोत्तर आत्मा म्हणून कांही वस्तु राहते ही भावना; नित्य आत्म्याची धारणा.

सत्त्व– प्राणी, जीव, व्यक्ति, पुद्गल.

समथ ( शमथ )– समाधि, शांति, उपशम.

समण– संन्यासी, भिक्षु.

समाधि– एकाग्रता, चित्तस्थैर्य, चित्तशांति.

समापत्ति– समाधि.

समुदय– उत्पत्ति, कारण, दुःखोत्पत्ति.

सम्बोधि– सत्यज्ञान, संसारभंजकज्ञान, निर्वाण, विमुक्तिज्ञान.

सम्माकम्मांत – दुष्कर्मापासून अलिप्त राहणें.

सम्मादिट्ठि ( सम्यग्दृष्टि )– आयसत्याचें यथार्थज्ञान, चांगली धारणा असणारा.

सम्मावाचा– सत्य भाषण, गोड भाषण, प्रिय भाषण.

सम्मावायम– सत्कर्म.

सम्मासति– जागरूकता.

सम्मासमाधि ( सम्यक् समाधि )– अष्टांगिक मार्गांतील शेवटची पायरी, चित्तैकाग्रता, चित्तशांति.

सम्मासंकप्प ( सम्यक् संकल्प )– सद्विचार.

सयनासन– वासस्थान, घर, निवास.

सरण ( शरण )– आश्रय, रक्षक.

सावक ( श्रावक )– बुद्धोपासक.

सील ( शील )– सदाचार; हें पांच प्रकारचें आहे. ( १ ) अहिंसा (२) चोरी न करणें (३) खोटें न बोलणें म्हणजे सत्यभाषण (४) व्यभिचार न करणें म्हणजे परस्त्रीपासून दूर राहणें व (५) दारू व मादक पदार्थ सेवन न करणें.

सीलब्बतपरामर्श – व्रतोपवासादिकानें मुक्ति मिळते असा समज व विश्वास.

सुभदिट्ठि ( शुभदृष्टि )– देहासक्ति, देहावरील प्रेम, विषयमोह.

सुगत– बुद्ध,

सुत्त– सूत्र, सूक्त.

सेख– शिक्षणास पात्र, विद्यार्थी.

सोमनस्स ( सौमनस्य )– चित्तोल्हास, सुख, आनंद.

सोतापत्ति ( स्रोतापत्ति )– स्रोतापन्न होणें, धर्माचरणाच्या प्रवाहांत शिरणें, धारेस लागणें.

सोतापन्न– धर्मप्रवाहांत पडलेला.

सखार ( संस्कार )– कर्म, इंद्रियविज्ञान, गति, मानसिक ठसा.

संखत ( संस्कृत )–कृत्रिम, बनावट.

संघ– भिक्षु-बंधुत्व, भिक्षूंची पारिषद्.

संघाटि– भिक्षूंनी पांघरावयाचें वस्त्र.

संघाराम– भिक्षूंचें निवासस्थान. विहार, मठ.

सम्बोज्झंग ( संम्बोध्यंग )–ज्ञानाचीं अंगें. हीं सात आहेत. (१) स्मृति (२) धर्मविचय (प्रज्ञा) (३) वीर्य ( उत्साह ) (४) प्रीति ( सत्कर्मजनित आनंद ) (५) प्रश्रब्धि ( चित्तशांति ) ( ६ ) समाधि ( चित्तैकाग्रता ) व (७) उपेक्षा.

संभोगकाय– आनंदमयशरीर.

संयोजन– बंधन, संसाराचें कारण, हें दहा प्रकारचें आहे: (१) सत्कायदृष्टि (२) विचिकित्सा (३) शीलव्रतपरामर्श (४) कामराग (५) व्यापाद (६) रूपराग (७) अनूपराग (८) मान (९) औद्धत्य व (१०) अविद्या. अशीं हीं दहा संसारबंधनें आहेत.

सोतापत्ति (स्रोतापत्ति)– स्रोतापन्न होणें, धारेस लागणें, भिक्षूची प्रथमावस्था.

सोतापन्न–धारेस लागलेला, पहिलीं तीन संयोजनें नष्ट झालेला.

---